ॐ

# आर्य संस्कृति

ॐ ॐ ॐ ॐ ॐ

कृण्वन्तो विश्वमार्यम्

ॐ ॐ ॐ ॐ ॐ

श्रीमत् परमहंस परिव्राजकार्य भगवान

श्री धर स्वा मी

: प्रकाशक :

श्रीदत्ताबुवा रामदासी

‘ श्रीधरकुटी ’, सज्जनगड

पो. परळी, जि. द. सातारा

●

: प्राप्तिस्थान :

श्रीसमर्थ-श्रीधर तत्त्वज्ञान मंडळ,

१०६ अ, नारायण पेठ, गेटामागें

भागवत यांचा वाडा, पुणें २

●

: मूल्याबाबत :

प्रस्तुत ग्रंथ विक्रीसाठीं नाहीं.
श्रीस्वामी महाराजांच्या ग्रंथ-
प्रकाशनासाठीं स्वेच्छेनें दिलेलें
यथाशक्ति द्रव्य स्वीकारलें जातें.
त्याची पोंच अवश्य घ्यावी.

●

पृष्ठ २ वरील ‘ निवेदन ’
कृपाकरून अवश्य पाहावें.

●

एका प्रतीचा खर्च चार रुपये

●

पृष्ठसंख्या ४१७

●



●

: प्रसिद्धी :

विजयादशमी, शके १८७८

●

: मुद्रक :

यशवन्त गोपाळ जोशी, बी. ए.

आनंद मुद्रणालय,

१९६/४६ सदाशिव पेठ, पुणें २



श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान
श्रीधर स्वामी
सज्जनगड

## प्रकाशकाचें निवेदन

प्रस्तुत ग्रंथाचा खर्च मुंबईच्या एका धानिक गृहस्थांनीं दिलेला आहे. ते श्रीस्वामी महाराजांचे चाहाते आहेत. त्यांनीं आपलें नांव प्रसिद्ध न करण्याविषयीं आग्रहच धरल्यामुळें त्यांचें नांव येथें देतां येत नाहीं. याबद्दल एकपरीनें खेद होतो; तथापि सत्कार्य करणें, दान देणें, गुरु, संत, स्वधर्म यांची यथाशक्ति सेवा करणें हें कर्तव्यच समजणाऱ्या आर्य संस्कृतीला सर्वथा उचित असेंच हें त्यांच्या हातन घडत आहे याबद्दल अभिमानाहि वाटतो. या ग्रंथांत वर्णिलेल्या आर्य संस्कृतीच्या थोरवीचा हा प्रत्यक्ष आदर्शच यदृच्छेनें जनतेसमोर उभा आहे, असें वाटतें.

येथें नामनिर्देश नसलेल्या या सद्‌गृहस्थांची सेवा श्रीस्वामी महाराजांच्या चरणीं रुजू आहेच. आम्हीं शिष्यमंडळी त्यांचे ऋणी आहोंत.

श्रीमत् प. प. भगवान श्रीधरस्वामी महाराज यांचे स्वानुभवानें भरलेले, भक्तिरसानें ओथंबलेले आणि वैराग्यानें रसरसलेले अनेकानेक ग्रंथ लिहून तयार आहेत. वरील आदर्श धानिक गृहस्थांप्रमाणें कोणालाहि या एकेका लोकोपकारक ग्रंथासाठीं सर्व वा अंशतः खर्च देण्याची इच्छा झाल्यास त्या द्रव्याचा अवश्य स्वीकार केला जाईल. कारण हें कार्य अशा सज्जनांच्या साहाय्य–सहकार्यानेंच प्रगत व्हावयाचें आहे.

याविषयींची अधिक माहिती खालील ठिकाणाहून मिळेल : ‘ श्रीसमर्थ श्रीधर तत्त्वज्ञान मंडळ ’ १०६ अ, नारायण पेठ, भागवत वाडा, पुणें २.



## निर्देश

**मुखपृष्ठ :** *मुंबईचे गुणवान चित्रकार श्री. एस्. ए. जोमराज यांची अमोल तत्परता.*

**मुद्रण :** *आनंद मुद्रणालयाचे श्री. दादासाहेब व माधवराव जोशी या बंधुद्वयाकडून सुरेख मुद्रण व प्रशंसनीय सहकार्य.*

**उपमुद्रितें :** *पुण्यांतील विद्वान संस्कृतज्ञ श्री. दत्तात्रय-शास्त्री कवीश्वर, नरसोबावाडीकर यांनीं संस्कृत मजकुराचीं उपमुद्रितें काळजीपूर्वक तपासून केलेलें आत्मीय साहाय्य.*

**मुद्रणप्रत इ. :** *प्रमुखतः श्री. व. शं गोडसे ( राम-दासी ) आणि इतर अनेक स्वामी–शिष्य–भक्तमंडळी यांची प्रेमळ सेवा.*

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान श्रीधरस्वामी महाराज यांनीं लिहिलेला हा ग्रंथ आपल्या हातीं देतांना आम्हांला आनंद व समाधानहि लाभत आहे.

श्रीस्वामी महाराजांचें वास्तव्य सज्जनगडावर पुष्कळ वर्षें झालें. त्यांनीं अतीव कडक साधनेनें साक्षात्कार करून घेतला तो गडावरच. आणि त्यांच्या निवासासाठीं बांधलेली 'श्रीधरकुटी' हि गडावरच आहे. स्वतः श्रीस्वामीहि आपल्याला सज्जनगडाचाच म्हणवितात. तथापि अलीकडे कित्येक वर्षें त्यांचें वास्तव्य कर्नाटकांत होत आलें आहे. त्या भागांत श्रीस्वामींची शिष्यमंडळी सहस्रावधि संख्येनें सर्वत्र आहेत. महाराष्ट्रांतहि त्यांची शिष्य, भक्त व चाहाती मंडळी पुष्कळच आहेत. त्यांनाहि श्रीस्वामींच्या दिव्य सहवासाचा लाभ लवकरच मिळूं लागेल अशी अपेक्षा करावयास हरकत नाहीं.

श्रीस्वामी महाराजांचा जन्म हैद्राबाद राज्यांतला. हैद्राबादलाच त्यांचें बालपण व प्राथमिक शिक्षण झालें. पुढील शिक्षणाकरितां ते पुण्याला येऊन राहिले; परंतु शिक्षण अर्धवट सोडूनच ते सज्जनगडावर तपश्चर्येसाठीं निघून गेले. तेव्हां त्यांचें वय २०–२१ च्या सुमारास होतें.

'या जगाच्या मुळाशीं एक शाश्वत वस्तु आहे व तिचा साक्षात्कार करून घेऊनच मनुष्य पूर्ण होतो' असें त्याचवेळीं विचारान्तीं त्यांच्या मनावर ठसलें. म्हणूनच ते शिक्षण सोडून गडावर आले व येथूनच त्यांच्या पारमार्थिक जीवनाला प्रारंभ झाला. आणि सेवा–साधनेची साक्षात् मूर्तिच बनून या मार्गांतील प्राप्तव्य त्यांनीं अल्पावधींत आत्मसात् केलें. ते 'प्राप्त'पदाला पोहोंचले.

श्रीस्वामी सांगतातः

"परमात्मस्वरूप होण्याकरितां परमात्म्याचें ज्ञान करून घेण्याचें साधनच आमचा धर्म आम्हांला सांगतो. 'जीवो ब्रह्मैव ना परः।' हा श्रीमत् शंकराचार्यांनीं श्रुतिसिद्धान्तच उकलून दाखविला आहे. 'नर करणी करे तो नर का नारायण बन जाय।' प्रत्यक्ष नारायण

होणें नराला शक्य आहे. नारायणच नराचें यथार्थ रूप म्हणून आमचा वेद आम्हांस उपदेश करतो. मी अशा तऱ्हेनेंच नारायण-स्वरूप बनलों आहें. हा हक्क तुम्हांलाहि आहे. पण आपण तें स्वरूप प्रकाशविणारें साधन करून त्याची प्राप्ति करून घेतली पाहिजे."

स्वधर्माविषयीं, वैदिक धर्माविषयीं, आर्य संस्कृतिविषयीं श्री-स्वामींचा अभिमान लहानपणापासूनच जाज्वल्य. याबाबतचीं अनेक उदाहरणें त्यांच्या चरित्रांत सांपडतात. आतां त्यांनीं चतुर्थाश्रम स्वीकारला आहे. सर्वत्र आत्मस्वरूप पाहण्याचाच हा आश्रम आहे 'सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तुः निरामयाः ।' ही या आश्रमाची घोषणा आहे. तीच जीवनधारणा श्रीस्वामींचीहि आहे. आणि त्याकरितांच, 'सर्व सुखी व्हावेत, असावेत' या करितांच वैदिक धर्म, आर्य संस्कृति यांच्या उद्धारार्थ ते प्रयत्नशील आहेत. कारण त्यांचें असें ठाम मत आहे कीं—'जगाच्या हिताकरितां आणि भारतीयांच्याहि उद्धाराकरितां आर्य संस्कृतीचें रक्षण कर्तव्य आहे.'

पूर्वाश्रमांत असतांना श्रीस्वामींनीं पुष्कळ मोठी ग्रंथरचना केलेली आहे. त्यांत संस्कृत, हिंदी, मराठी, कानडी व इंग्रजीहि गद्य-पद्याचा खूप मोठा संग्रह आहे. 'विवेकोदया'सारखे स्वानुभवानें ओतप्रोत असे थोर योग्यतेचे ग्रंथहि त्यांत अनेक आहेत. आजपर्यंत यांपैकीं अत्यल्प साहित्य छापून प्रकाशित झालें; व तें सर्व 'प्रसाद' म्हणून विनामूल्य वांटलें गेलें. प्रस्तुत ग्रंथहि कोणाला विकत देण्याची कल्पना नाहीं. सेवाभावानें कोणी अशा ग्रंथप्रकाशनासाठीं सेवा-द्रव्य दिलें तरच त्यांतून पुन्हां हा प्रकाशनाचा उपक्रम पुढें चालू राहावयाचा. स्वतः श्रीस्वामी असंग्रही वृत्तीचे असल्यामुळें या प्रकाशनकार्याची जोखीम त्यांच्या शिष्य-भक्त-चाहात्यांवरच येऊन पडते, हें उघड आहे. तद्द्वारां लोककल्याण हाच अर्थात हेतु अशा कार्यांत असणार.

—प्रकाशक

## संदर्भ आणि सांक्षिप्तीकरण

म. स्मृ. अ. – मनुस्मृति अध्याय
द. स्मृ. – दक्षस्मृति
दे. स्मृ. – देवलस्मृति
य. स्मृ. – यमस्मृति
या. स्मृ. – याज्ञवल्क्यस्मृति
व्या. स्मृ. – व्यासस्मृति
वृ. हा स्मृ. – वृद्धहारीतकस्मृति
बृ. स्मृ. – बृहद्यमस्मृति
लघु आ. स्मृ. – लघु आश्वलायनस्मृति
लघु शा. स्मृ. – लघु शातातपस्मृति
लघु. हा. स्मृ. – लघु हारीतस्मृति
गो. स्मृ. – गोभिलस्मृति
मुं. उप. – मुंडक उपनिषत्
ईशा. – ईशावास्योपनिषत्
तै. – तैत्तिरीय उपनिषत्
बृ. – बृहदारण्यक उपनिषत्
कठ. – कठोपनिषत्
प्रश्नो. प्र. – प्रश्नोपनिषत् प्रश्न
म. ना. उ. – महानारायण उपनिषत्
स. सा. – सर्वसार उपनिषत्
श्वे. श्वे. – श्वेताश्वेतर उपनिषत्
छां. – छांदोग्य उपनिषत्
केन. – केनोपानिषत्
महो. – महोपनिषत्
कै. – कैवल्य उपनिषत्
म. वा. उ. – महावाक्योपनिषत्
अद्व. ता. – अद्वयतारक उपनिषत्
अन्न. उ. – अन्नपूर्णा उपनिषत्
वराह उ. – वराह उपनिषत्
जाबा. उ. द.– जाबालोपनिषत् दर्शन
पाशु. ब्र. उ. – पाशुपतब्रह्म उपनिषत
नारद प. उ. – नारद-उपनिषत्
तै. शांति – तैत्तिरीयोपनिषत् शांति
निरा. उ. – निरालंब उपनिषत्
नृ. ता. – नृसिंहतापनीय उपनिषत्
– रुद्रयामल
– शुकनीति
– भर्तृहरीशतक
अमर – अमरकोश
शां. भा. – शांकरभाष्य
अग्निपु. – अग्निपुराण
भ. गी. – भगवद्गीता
– महाभारत
वा. रा. अ. कां. – वाल्मीकि रामायण अयोध्याकांड
वा. रा. बा. कां. – वाल्मीकि रामायण बालकांड
वा. रा. अर. कां. – वाल्मीकि रामायण अरण्यकांड
योगवा. – योगवासिष्ठ
अव. गी. – अवधूतगीता
भाग. स्कं. – भागवत स्कंद
वि. स. – विष्णुसहस्रनाम
रा. गी. – रामगीता
दा. द. स. ओ. – दासबोध : दशक-समास-ओवी

स्फु. प्र. – स्फुट प्रकरण (श्रीसमर्थकृत)
षड्रिपु. – षड्रिपुवर्णन ( „ )
अ. वे. पै. शा. – अथर्ववेद पैप्पलाद शाखा
अथर्व. – अथर्ववेद
शतपथ अ. – शतपथ
ऋ. – ऋग्वेद
साम. – सामवेद
यजु. – यजुर्वेद
यजु. आ. – यजुर्वेद आरण्यक
आप. सू. – आपस्तंब सूत्र
तै. सं. – तैत्तिरीय संहिता
तै. शि. – तैत्तिरीय शिक्षा
तै. भृगु. – तैत्तिरीय भृगुवल्ली

ऋ. ना. सू. – ऋग्वेद नासदीयसूक्त
अथर्व. शां. – अथर्ववेद शांति
ब्र. सू. – ब्रह्मसूत्र
पा. यो. सू. – पातञ्जल योगसूत्र
अत्रि सं. – अत्रिसंहिता
आश्वला. गृ. सू. – आश्वलायन गृह्यसूत्र
वाजस. ब्रा. – वाजसनीय ब्राह्मण
तै. ब्रा. – तैत्तिरीय ब्राह्मण
अथर्वण –
– स्कंधब्रह्म धर्मारण्य
– पञ्चदशी द्वैतविवेक
– एकाग्नि कांड
जै. न्या. मा. – जैमिनी न्यायमाला
पु. सू. – पुरुषसूक्त

# ग्रंथांतील विषय–आशय–अनुक्रम :

*( कंसांतील आंकडे पृष्ठांचे )*

* * *

॥ ॐ ॥

*श्रृण्वन्तु सर्वे अमृतस्य पुत्राः ।*

( श्वेताश्वेतर उप० )

*निजकिरणविकासितं जगत् ।*
*गमयति निजसौख्यमद्वयं यत् ॥*
*सुखशराधिभवांशुभानयम् ।*
*जगति विजयतेऽत्र विश्वधर्मः ॥*

## विश्वधर्म सूर्योदय

विश्वधर्मरूपी सूर्याचा हा उदयकाल. किती प्रशांत समय हा! देवदेवताच या पक्षीरूपानें जणू त्याची स्तुति करीत आहेत ! त्यांच्या या गोड गानाच्या मंजुळ कलरवानें वृत्ति कशा आपोआपच अंतर्मुख होत आहेत. या ब्राह्ममुहूर्तीं सर्व मुमुक्षुजन आपल्या हृदयमंदिरांत पहुडलेल्या आत्मदेवाला किती कर्णमधुर, उदयरागानें आळवून कसें जागृत करीत आहेत ! त्यांचा तो भक्तिपूर्ण मधुरध्वनि किती चित्तवेधक होत आहे !

या विश्वधर्मरूपी बालसूर्याचीं हीं कोमल किरणें किती सुंदर, किती मृदुमधुर म्हणून सांगावींत ! निश्चेष्ट होऊन पडलेल्याच्या ठिकाणीं नवचैतन्य उत्पन्न करण्याचें विलक्षण सामर्थ्य या बालकिरणांतून प्रगट होत आहे. किती कोमल स्पर्श यांचा हा ! सर्व शरीर आनंदपुलकित होत आहे. या आनंदसांद्र किरणांनीं विकसित झालेलें हें विश्वकमल, चित्ताल्हादक अशा आपल्या धवल हासानें अखिल जीवांनाच आनंदमय करीत आहे. स्फूर्तीच्या उदयाचलावर प्रगट होत असलेला धर्मसूर्य हा ! हा साऱ्या विश्वलोकांचींच मनें वेधून घेत आहे, आपल्या असीम आकर्षकतेनें या आपल्या आविर्भावाला कारणीभूत असलेल्या त्या मंगलमय सुखमहोदधि परमात्म्याकडे साहजिकच वळवीत आहे. दुर्दम्य मनाची अनावर चुळबुळ आवरून धरणारे हे याचे कोमल किरणपाश

किती मनमोहक आहेत ! पाण्यांत साखर जशी विरघळून जाते, त्याप्रमाणें हें मन त्याच्या या दिव्य आनंदांत कसें विरघळून जात आहे. चपळ मनाची अकारण खळबळ क्षणभरांतच शांत करून टाकणारे याचे हे कमनीय किरण किती आश्चर्य-मुग्ध करीत आहेत. किती मंगलमय, किती सुखकारी ! अखिल विश्वालाच एकदम ग्रासून टाकणाऱ्या त्या घोर अंधकाराचा क्षणांत नाश करणारे हे असे देदीप्यमान किरण असून देखील किती पराकाष्ठेचे कोमल आहेत ! यांचा हा सुखस्पर्श वृत्तींना कसा शांत करीत आहे. केवढा हा आनंद ! विश्वाकर्षक अशा आपल्या पवित्रपावन किरणांनीं प्रकाशत असलेला हा धर्मदिनमणि या परमात्म्याच्या आनंदसागरांतून जसा जसा वर येत आहे तसा तसा हा अखिल विश्व-लोकांच्या हृदयप्रदेशावर निरवधि दिव्य आनंदाचा ठसा उमटवीत आहे , या समयीं विश्वलोकांच्या अंतरंगांत सांठविलेलें तें शांतिसमाधान आपल्या हर्षातिरेकानें उचंबळून येऊन, या बाह्यप्रदेशांत अशा रीतीनें एकत्रित होऊन! चोंहींकडे पसरलेल्या या आरक्त वातावरणाच्या रूपानें या मंगलमय विश्व-धर्मसूर्याचें जणूं स्वागतच करीत आहे ! कोण याचा हा अनुरागपूर्ण उत्साह ! किती सुंदर दृश्य हें ! कोण हर्ष ! आनंदाच्या कशा गुदगुल्या होत आहेत. वातावरण कसें नितान्त शांत दिसत आहे.

## विश्वभाग्योदय

या विश्वधर्मरूपी सूर्याचा हा उदय म्हणजेच खरोखरी विश्वभाग्योदय—विश्वसुखोदय. किती मंगलमय पवित्र सुमुहूर्त हा ! या समयीं उत्कट भवितव्यतेचीं झडत असलेलीं हीं मंगलवाद्यें आपल्या चित्तवेधक अशा या मंजुळ ध्वनीनें अंतःकरणांत दिव्य सुखाचे अनंत तरंग वरवर उचंबळवीत आहेत ! चोंहींकडे निनादत असलेला याचा हा मंगल जयध्वनि ज्या दिव्य आनंदाच्या ठिकाणीं देहभान विसरवीत आहे तो आनंद खरोखरीच अवर्णनीय आहे.

## धर्माचें महत्त्व

**धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ।** ( म. ना. उ. ) ( तै. शा. यजुः ) आखिल विश्वाचा धर्मच एक आधार आहे, आखिल विश्वाची प्रतिष्ठा या धर्मरूप पायावरच अवलंबून आहे, म्हणून श्रुतिमाता आपल्या निखिल प्रिय पुत्रांना कसें कुरवाळून सांगत आहे. इतकें या धर्माचें महत्त्व आहे.

### मंगलमय प्रातःकाल

स्वरूपाची दिव्य जागृति आणून देणाऱ्या या मंगलमय प्रातःकालीं, या शांत आणि उल्हसित वातावरणांत, या विश्वभाग्योदयाच्या शुभमुहूर्तावर, आपल्या दयामयतेनें सर्व जीवांनाच संसारदुःखांतून मुक्त करणाऱ्या अनंत-सुखरूपी परमात्म्याचें आपण एकाग्र मनानें ध्यान करूं या.

### धर्म व धर्मप्रभु

**धर्मकृद्धर्मगुब्धर्मी** ( विष्णुसहस्रनाम )—धर्मोत्पादक, धर्मरक्षक व धर्माधार एक परमात्माच आहे. **धर्मावनायोरुकृतावतारः** (भागवत)—परमेश्वराचे सारे अवतार या धर्मरक्षणाकरितांच झाले. **धर्ममूलं हि भगवान्**—हा परमेश्वरच या धर्माचें मूळ आहे. **धर्मस्य प्रभुरच्युतः** ( विष्णुसहस्रनाम )—या विश्वधर्माचा प्रभुसुद्धां परमात्माच आहे. **यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलं । यच्चंद्रमासि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ।** ( भ. गी. )—परमात्म्याचा प्रकाशच या विश्वधर्माच्या दिनमणींतून कोंदाटला आहे. परमात्म्याला **'धर्मोधर्मविदुत्तमः'** ( विष्णुसहस्रनाम ) असें म्हणतात. हा परमात्माच धर्मरूप, तसा धर्मज्ञांत अग्रेसर पण आहे.

### आनंदघन परमात्मा

परमात्माच एक आनंदघन आहे. त्याच्या या दिव्य रूपानें तो या प्रपंचाच्या अंतर्बाह्य घनदाट भरलेला आहे. हेंच या विशाल विश्वाचें अगदीं मूळस्वरूप. तेंच यांत असणाऱ्या सर्व जीवांचेंहि पण एकमेव परिशुद्ध रूप. अखिल विश्वाच्या या स्वानंदसाम्राज्याला संसारतापत्रयाची कसली झुळुक-सुद्धां लागत नाहीं. इथें दुःखशोकाचा मागमूसहि पण नाहीं. कोणत्याहि वैषम्याची येथें कल्पना उत्पन्न होत नाहीं. श्रेष्ठकनिष्ठतेचा कसलाहि भाव येथें उमटत नाहीं. प्रपंचांत भासणारी कोणतीहि उणीव यांत दिसून येत नाहीं. यांत कसलीहि धांवपळ नाहीं. कोणतीच उपाधीहि नाहीं. सोलीव केळाप्रमाणें परमात्म्याचें निष्प्रपंच रूप आहे. या आत्मीय साम्राज्यांत चिन्मात्र असा एकच एक परमात्मा आपल्या आनंदघनतेनें चोहींकडे विराजमान आहे.

परमात्मा हा स्वसंवेद्य आणि स्वयंप्रकाश असल्यामुळें अद्वितीय आहे. **न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ।**

**तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥** ( कठ० २–५–१५ ) या मंत्राचाच अनुवाद भगवद्गीतेच्या या श्लोकांतून दिसून येतो: **न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः । यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥** ( भ. गी. १५–६ )

याचेंच विवरण श्रीसमर्थांच्या या खालील ओवींतून दिसून येतें : **तेथें चंद्र सूर्य ना पावक** । नव्हें काळोखें ना प्रकाशक । उपाधि वेगळें एक । निरुपाधि ब्रह्म ॥ ( दासबोध १७–२–५ ) तेथें सुख असे वाड । नाहीं मनास पवाड । मनेंवीण कैवाड । साधनाचा ॥ ( दा. ७–२–१६ ) देहबुद्धीचें थोरपण । परब्रह्मीं न चले जाण । तेथें होतसे निर्वाण । अहंभावासी ॥ ( –२३ ) उंच नीच नाहीं परी । राया रंका एकचि सरी । जाला पुरुष अथवा नारी । एकचि पद ॥ ( –२४ ) स्वर्ग मृत्य आणि पाताळ । तिहिं लोकींचे ज्ञाते सकळ । सकळांसि मिळोन एकचि स्थळ । विश्रांतीचें ॥ ( –२८ ) गुरुशिष्या एकचि पद । तेथें नाहीं भेदाभेद । परि या देहाचा संबंध । तोडिला पाहिजे ॥ ( –२९ ) देहबुद्धिच्या अंतीं । सकळांसि एकचि प्राप्ति । एकं ब्रह्म द्वितीयं नास्ति । हें श्रुतिवचन ॥

( दा. ७–२–३० ) परमात्म्याच्या अल्पाल्पांश प्रकाशानें हे सूर्य, चंद्र, तारका, विद्युत् आणि प्रतिप्राणिपदार्थ तारतम्यानें प्रकाशमान होत आहेत. प्रति लहानमोठ्या किरणांतून जसा सूर्याचा एकच एक प्रकाश असावा, त्याचप्रमाणें या अखिल विश्वांतल्या सकल दृश्य पदार्थांतून परमात्म्याचाच प्रकाश ओतप्रोत भरला आहे. मृगजळाच्या सगळ्या त्या तरंगांतून सूर्याचा प्रकाशच ओतप्रोत जसा भरून असतो, त्याचप्रमाणें या विश्वांतल्या निखिल दृश्य पदार्थांतून परमात्म्याचाच एक प्रकाश ओतप्रोत भरून आहे. हा परमात्माच आम्हां सर्वांचें सारसुखरूप आणि सारसर्वस्व होय.

## श्रुतिमातेचें वात्सल्य

स्वरूपबोधाचा हा प्रभातसमय. महदानंदप्राप्तीच्या या सुसमयीं, या मंगलमय प्रातःकालीं, अजून जागृत न होतां जीं बाळें अज्ञान-निद्रेच्या भरानें अनात्मदृष्टीच्या स्वप्नप्रपंचांत बरळत आहेत, त्यांना श्रुतिमाता कळवळून, कुरवाळून आपल्या वात्सल्यपूर्ण मंजुळ शब्दांनीं '**उत्तिष्ठत जाग्रत** '–' उठा जागे व्हा' म्हणून अंग हलवून हलवून परोपरीनें जागें करीत आहे.

## प्रातश्चिंतन

**प्रत्यहं प्रातरुत्थाय चिंतयेदात्मनो हितम्** ।–प्रति दिवशीं प्रातःकालीं उठून आत्महिताचें चिंतन करावें म्हणून शास्त्रवचन आहे. बुद्धिजीवी अशा सकळ प्राणिवर्गांत अग्रगण्य असणारे आम्ही मानव, सर्वहि एकत्रित होऊन या प्रबोध–प्रातःकालीं आपल्या हिताचा विचार करणें अत्यंत आवश्यक नव्हे काय ? या प्रातःसमयीं आनंदघन अशा विशुद्ध परमात्म्याचें चिंतन करणें आपलें कर्तव्य नव्हे काय ?

## आत्यंतिक हित

**यद्‌भूतहितमत्यन्तं तत्सत्यं हि मतं मम** ॥ (महाभारत) जीवमात्रांचें आत्यंतिक हित ज्याच्या योगानें होतें, तेंच सत्य म्हणून भारताचें मत आहे. त्रिकाल सत्य असणारेंच खरोखरीचें हित म्हणून इथें उद्‌घोषित केलें आहे. त्रिकालींहि जें अबाधित असतें, कसलीहि विकृति म्हणून ज्याला होत नाहीं, जें नित्य एकरूप असतें तेंच एक सत्य म्हणून म्हटलें जातें. या शाश्वत सत्याचा शोध करणेंच आम्हा सर्वांचें अंतिम खरेंखुरें हित होय, हेंच एक कर्तव्य होय.

## सनातन धर्म

**सना आतनोतीति सनातनः** । अखिल विश्वभर शाश्वत सुखाचा प्रचार करणाराच हा सनातन धर्म म्हणून याच्या नांवानेंच याचा अर्थ स्पष्ट होतो. आपल्या हिताच्या अपेक्षेनें शाश्वत सुखाची ओळख पटवून घेऊन त्याच्या प्राप्तीचें ध्येय पूर्ण व्हावयाचें झाल्यास या सनातन धर्माकडे धांव घ्यावयाला नको का ? त्याच्या अमृतमय वचनाचें श्रवण आणि पालन व्हावयाला नको का ?

## मानव-जीवनाचें ध्येय

हें सर्व विश्व इतके कष्ट सहन करून ज्या इष्टप्राप्तीकरितां अविरत प्रयत्न रात्रंदिवस चालवीत आहे तें एकच एक सुख असें शेवटीं आढळून येतें. **सुखं लब्ध्वा करोति नासुखं लब्ध्वा करोति** । या छांदोग्य उपनिषदाच्या वाक्यानेंहि हेंच स्पष्ट होतें. ‘ कोणी कांहींहि सुख मिळाल्यानेंच करतो,

कशामुळें कां होईना एकदां दुःखप्राप्ति झाली कीं कोणीहि पुन्हां तें करूं इच्छित नाहीं', हा या उपनिषद्वचनाचा अर्थ. **यः कश्चित्सौख्यहेतोस्त्रिजगति यतते नैव दुःखस्य हेतोः** । असें श्रीशंकराचार्यांचेंहि पण एक वचन शत-श्लोकींत आढळतें. या सुखाचा एकदां छडा लावून साधनांनीं त्याची प्राप्ति करून घेणें व त्या निरवधि सुखांत अखिल भिन्नभाव विसरून, निरंकुश तृप्तीनें या जगांत नांदणें, त्या आनंदांत एकरूप होऊन वागणें म्हणजेच मनुष्य-जन्माचें एकध्येय व खरेंखुरें सार्थक.

## वैदिक धर्माचें महत्त्व

**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति** (भ. गी. २-१७) स्वभावतःच अविनाशी असणाऱ्या या सुखाचा नाश कोणीहि करूं शकत नाहीं. अद्वितीय अशा या शाश्वत सुखांत समरसून टाकण्यांतच वैदिक धर्माचें महत्त्व आहे. त्रिकालाबाधित वस्तूला मात्र नाश नसतो. त्रिकालाबाधित सुखच एक आपलें इष्ट होऊं शकतें, त्रिकालाबाधित वस्तूचा लाभ व्हावा म्हणणें किंवा खऱ्या सुखाचा लाभ व्हावा म्हणणें दोन्ही एकच. शाश्वत सुखाची ओळख पटवून देऊन त्याची सर्वश्रेष्ठता विश्वविदित करणें हेंच सनातन वैदिक धर्माचें वैशिष्टय. असें झालें तर हा धर्मच आपल्या सर्वातिशय महत्त्वानें अखिल मानवाजातीचाच एक सर्वसामान्य धर्म होतो. शाश्वत सुख नको कोणास ? सुख या शब्दाचा केव्हांहि शाश्वत सुख असाच एक अर्थ होतो. सुखाकरितांच प्रयत्न करणारा कोणता मनुष्य, खऱ्या शाश्वत सुखाच्या मार्गदर्शनार्थ अवतरलेल्या या सनातन धर्माचा आश्रय करणार नाहीं ? कोण याला डावलून जाईल ? 'सनातन' या याच्या नांवानेंच वैदिक धर्माचें प्राचीनत्व व महत्त्व व्यक्त होतें; हाच एक विश्वधर्म म्हणून विश्वलोकांच्या मनांत बिंबतें. च्युति नसलेलेंच नित्य म्हणून तत्त्व म्हणवून घेतें. या सत्यवस्तूचें अथवा सत्यसुखाचें ज्ञान म्हणजेच तत्त्वज्ञान. हें तत्त्वज्ञानच श्रेष्ठ अशा सनातन धर्माचें सर्वोत्कृष्ट असें एक मुख्य लक्षण होय. मानवी जीवन सर्वतोपरी सर्वतो-मुखानें अत्युन्नत करून, 'याचि जन्मीं येणेंचि काळें' त्रिकालाबाधित सुखाचा साक्षात्कार करून देण्याचा विडाच यानें उचललेला आहे. हीच दीक्षा परमात्म्याकडूनहि याला मिळाली आहे. याला श्रुति, स्मृति, पुराण, इतिहासादि अवश्य अशा ग्रंथांचें संपूर्ण साहाय्यहि पण आहे. सत्यसुखाच्या

प्राप्तीला अवश्य असणाऱ्या सकल साधनांनींहि हा अत्यंत परिशोभित आहे. त्यासाठीं लागणाऱ्या अखिल सामुग्रीनें हा परिपूर्ण आहे. तशा आदर्श तेजस्वी विभूतींनीं हा सर्वांग-अलंकृत आहे. या भारतवर्षांतच या तात्त्विक धर्माचा अवतार झाला व यामुळेंच 'India is the motherland of philosophy' —या भारताला तत्त्वज्ञानाची मातृभूमि असें म्हटलें जातें. विद्वद्रण्य मॅक्समुल्लर नांवाच्या पाश्चात्य पंडितानें १८५८ सालीं व्हिक्टोरिया राणीस लिहिलेलें खालील पत्रच याला साक्ष आहे :

'If I were to look over the whole world to find out the country most richly endowed with all the wealth, power and beauty, that Nature can betsow, I should point to India'

—सर्व नैसर्गिक संपत्तीनें, शक्तीनें व सौंदर्यानें–ईश्वरदत्त अशा अखिल उत्कृष्ट देणगीनें अतिशय संपन्न असणारा देश कोणता म्हणून सर्व सृष्टीचें पर्यालोचन करून सांगण्याचा प्रसंग जर मला प्राप्त झाला तर मी एक भारताकडेच केवळ बोट दाखवीन.

'If I were asked under what sky the human mind has most fully developed some of it's choicest gifts, has most deeply pondered over the greatest problems of life, and has found solutions of some of them which well deserve the attention even of those who have studied Plato and Kant, I should point to India.'

—दिव्य सुखाच्या प्राप्तीकरितां आवश्यक असणाऱ्या सर्व देणग्यांनीं, सर्व गुणांनीं पराकाष्ठेचा विकास पावलेलें मानवी मन, ज्या देशांत आपल्या पूर्ण कलेनें शोभायमान आहे, मानवी जीवनाच्या निगूढ व अतिमहत्त्वपूर्ण विषयांवर खोल विचार करून हीं सर्व कोडीं ज्या देशांत अत्यंत समाधानकारक रीतीनें पूर्ण उलगडून दाखविलीं आहेत, प्लेटो व कँट यांसारख्यांच्या तत्त्वज्ञानाचा संपूर्ण अभ्यास करून समाधान मिळविलेल्या पाश्चात्य पंडितांचीं मनेंहि ज्याच्याकडे आकर्षिलीं जातात अशा दिव्य तत्त्वज्ञानाचा जन्म ज्या देशांत झाला आहे त्या देशाचें नांव काय म्हणून मला कोणी विचारल्यास मी सरळ आर्यावर्त अथवा भारतवर्ष याकडेच बोट दाखवीन.

'And if I were asked myself from what literature, we here in Europe, who are nurtured almost exclusively on the thoughts of the Greeks and Romans, and of the Semitic Race, the Jewish, may draw the corrective which is most wanted in order to make

our inner life more perfect, more universal, in fact, more truly human, a life not for this life only, but a transfigured and Eternal life, again I should point to India.'

—ग्रीक, रोमन, युनानी, ज्यू इत्यादिकांच्या विचारधारेनेंच परिपोषित असे आम्ही युरोपियन ज्या एका वाङ्मयाचा आश्रय करून ठाम सिद्धांताला येऊन पोहोंचूं, आमचें पारमार्थिक जीवन पूर्ण होण्यास ज्याची म्हणून आम्हांस अधिक आवश्यकता आहे, ज्याच्यामुळें आमचें जीवन अधिक विश्वव्यापीं होईल, ज्याच्यामुळें आमचें जीवन खरोखरीच मानवी जीवनाला सर्वतोपरी अधिक अनुरूप ठरेल, आमच्या विद्यमान जीवनांत अधिक सुधारणा घडून येईल, केवळ ऐहिकच नव्हे तर अनादिसिद्ध दिव्य जीवनालाहि जें कारणीभूत होईल, निरतिशय सुखाच्या प्राप्तीचें साधन म्हणून जें, तें वाङ्मय कोणत्या एका देशांत आपल्या पूर्णरूपानें अवस्थित आहे म्हणून जर मला कोणी विचारलें तर आपोआपच माझें बोट पुन्हां एकदां भारतवर्षाकडे अथवा त्या हिन्दुस्थानाकडेच फिरेल.

## हिन्दु संस्कृति

प्रचलित असलेल्या व नामशेष झालेल्या सर्व संस्कृतीपेक्षांहि ही हिन्दु संस्कृति अति प्राचीन आहे. केवळ आपल्या एका सत्त्वबलानेंच आजपर्यंत तिनें आपलें आस्तित्व टिकविलें आहे. कांहीं आंधळे हत्तीची माहिती मिळविण्यास गेले असतां, त्यांच्या हाताला लागलेला एकेक अवयव हाच हत्ती म्हणून भांडूं लागल्याप्रमाणें या आर्य संस्कृतीचा एकेक सिद्धांत उचलून धरून, भिन्नाभिन्न संप्रदायप्रवर्तक हीच मुख्य आर्य संस्कृति म्हणून भांडूं लागले व त्यांनीं आप-आपले संप्रदाय वेगवेगळे केले. पुढें पुढें यांच्यांतहि फाटाफूट होऊन पुष्कळ मतें-मतांतरें निर्माण झालीं. अनेक फाटे फुटले. अशा या अनेक शाखोपशाखांनीं एकच एक आर्य अथवा हिन्दु संस्कृतीचा हा विशाल वृक्ष वाढून चोंहींकडे फोफावला आहे ही यथार्थ भावना या पक्षोपपक्षांत नसल्या-मुळें ते विनाकारण आपापल्यांत द्वेषमत्सर वाढवून उगीचच अशांतता निर्माण करतात, कढतात आणि कुढतात. अंतःकलहामुळें व तसेंच परकीयांच्या अनेक आघातांमुळें, पाहिजे तितकी ही संस्कृति जगभर जरी पसरली नसली तरी आपल्या विभूतिमत्वानें व माहात्म्यानें ती आजहि विश्वमान्य आहे व सुदृढ आहे.

## हिन्दु

**हिन्दुधर्मप्रलोप्तारो जायन्ते चक्रवर्तिनः । हीनं च दूषयत्येव हिन्दु-रित्युच्यते प्रिये ॥** (मेरुतंत्र प्र. ३३)—हिन्दु धर्माचा नाश करण्याची प्रतिज्ञा करून, ती पूर्ण करण्याकरितां निरलसपणें अहोरात्र उत्कट प्रयत्न करणारे मोठमोठे चक्रवर्ति पुढें होणार आहेत, असें 'मेरुतंत्र' नामक ग्रंथांत अगोदरच भाकीत करून ठेवलेलें आढळतें. याच श्लोकांत 'हीन जनांना दूषण देणारे हिन्दु' अशी 'हिन्दु' शब्दाची व्याख्याहि पण दिसून येते. कालांतरानें कलिकाल वळावल्यावर कलीच्या कुटिल कारस्थानानें खैबर आणि सिंध या खिंडींतून येणाऱ्या विदेशीयांची धाड असह्य झाली व उत्तरदेशांत म्हणजे हिंदुकुश पर्वतावर, त्याच्या आसपास व सिंध, पंजाब या प्रदेशांतून असणारे हिंदु आजच्या निर्वासितांप्रमाणें त्यावेळींहि विंध्य प्रांतांतील आपल्या बांधवांत येऊन राहिले असें अधोलिखित कालिका पुराणाच्या वचनावरून कळून येतें: **कालेन बलिना नूनमधर्मकलिते कलौ । यवनैर्घोरमाक्रान्ता हिन्दवो विंध्य-माविशन् ।**

## हिन्दु व हिन्दुस्थान

बृहस्पति आगमामध्यें हिन्दुस्थानाची मर्यादा निश्चितपणें सांगितली आहे. **हिमालयं समारभ्य यावदिंदुसरोवरम् । तं देवनिर्मितं देशं हिन्दुस्थानं प्रचक्षते ॥**—हिमालयापासून इंदु सरोवरापर्यंतच्या देवनिर्मित दिव्य प्रदेशाला हिन्दुस्थान असें म्हणतात असा या श्लोकाचा अर्थ आहे. 'हिमालयं' या प्रथम शब्दाचें 'हि' हें प्रथमाक्षर व सीमांत सूचित करणाऱ्या 'इन्दु' या शब्दांतील 'न्दु' हें अन्त्याक्षर मिळून (हि + न्दु) 'हिन्दु' असा शब्द होतो. हिन्दुस्थानाच्या सीमा दाखविणाऱ्या या आद्यंत अक्षरांच्या जोडणीवरून यांतल्या लोकांच्या नांवाचीहि उत्पत्ति स्पष्ट होते. 'हिन्दूंचें स्थान—हिन्दुस्थान' हा अर्थ तर अगदीं स्पष्ट आहे. हिमालयापासून इंदु सरोवरानें उपलक्षित होणाऱ्या कन्याकुमारीपर्यंत पसरलेल्या हिंदुस्थानाची सीमाच या ठिकाणीं सांगितली आहे. आम्हांला 'हिन्दु' हें नांव यवनांनीं दिलें तें गौरवार्थानें नसून 'हीन' या व्यंग्यार्थानेंच दिलें व अजूनसुद्धां 'हीन' या अर्थींच याचा उपयोग करतात, तेव्हां 'हिन्दु' हा शब्दच काढून टाकला पाहिजे असें कांहींचें म्हणणें आहे. आणखी कांहींचें म्हणणें असें कीं 'हिन्दु' या शब्दांत

वैदिक व अवैदिक अशा सर्व सांप्रदायांचा अंतर्भाव होत असल्यामुळें सर्वांनाहि सामान्यपणानें लागू पडणारा हाच शब्द रूढींत ठेवावा. या दोन्ही पक्षांचा आपण विचार करूं या.

## सप्तसिंधु

' हिमालय ' आणि ' इंदु सरोवर ' यांच्या सीमांचा विचार करून, या सीमांच्या आद्यंत अक्षरांच्या एकत्रीकरणामुळें होणारा ' हिन्दु ' शब्द पाहिला तर हें परधर्मीयांनीं अथवा परदेशीयांनीं ठेवलेलें निंदाव्यंजक नांव नसून, तें पुरातन कालापासूनच चालत आलेलें आहे हें स्पष्ट होतें. कांहींच्या मताप्रमाणें सिंधुपासून तों झेलम, रावी, बियास, सतलज, सरस्वति, यमुना, गंगा या सप्तनद्यांच्या तीरांवर आर्यांची वस्ती होती व त्यामुळें त्यांना सप्तसिंधु असें प्रथम म्हणूं लागले व क्रमेण याचें रूपांतर हप्तहिंदूंत झालें; आणि आतां केवळ हिन्दु एवढाच काय तो शब्द राहिला.

**गंगे च यमुने चैव गोदावरि सरस्वति । नर्मदे सिंधुकावेरि जलेऽस्मिन्सान्निधिं कुरु ॥** या मंत्रांत गंगा, यमुना, सरस्वति, नर्मदा, सिंधु, गोदावरी, कावेरी या सप्त महानद्यांचा उल्लेख आहे. गंगा आणि सिंधु व यांच्यामध्यें असणाऱ्या झेलमादि मिळून अशा या सप्तनद्यांच्या कांठींच हिन्दूंची अथवा आर्यांची वस्ती होती असें म्हणण्यापेक्षां वर उद्धृत केलेल्या गंगादि कावेरीपर्यंतच्या व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत त्यांची वस्ती होती म्हणून मानलें तर हिमालयापासून तें इंदु सरोवरापर्यंतच्या हिन्दुस्थानाच्या सरहद्दीच्या दृष्टीनेंहि अनुकूल होईल. ज्या पुण्यनद्यांच्या कांठीं आर्यांची वस्ती होती त्या या सप्त पुण्यनद्यांचें आवाहन ते रोज पूजेकरितां ठेवलेल्या कलशोदकांत करीत व अजूनहि करीत असतात. ती प्रथा अव्याहत चालू आहे. यामुळें सहजच आपल्या देशमर्यादेची व त्यांत असणाऱ्या अखंड आपल्या आर्यजातीची प्रत्यहीं आठवण होते व पूजेच्या या पवित्र प्रसंगीं एकोप्याचा व संघटनेचा दिव्य संदेश मिळतो. या सप्त–महा–नद्यांच्या कांठीं आजूबाजूला आर्यांची वस्ती पूर्वींहि होती व ती त्यामुळें आतांहि आहे. या दृष्टीनेंच आर्यांना सप्तसिंधु म्हणजे गंगादि सप्त नद्यांच्या कांठीं व आसपास वास करून राहिलेले लोक असें प्रथम नांव आलें व तें क्रमेण हप्त-हिंदु होऊन आतां केवळ हिंदु एवढेंच एक शिल्लक राहिलें. या सात नद्यांमध्येंच सर्व भारतवर्षाचा अंतर्भाव होतो. या

सप्तनद्यांच्या मधल्या व आसपासच्या प्रदेशालाच हिन्दु लोकांचें स्थान अथवा हिन्दुस्थान असें म्हणतात. **इमम्मे गंगे यमुने सरस्वति शुतुद्रिस्तोमं स च तापरुष्णया । असिक्न्या मरुद्गृधे वितस्तयार्जीकीये शृणुह्या सुषोमया ॥** ( ऋग्वेद सं. ८, ३, ६ ) **अत्रप्रधानभूताः सप्तनद्यः स्तूयन्ते । तदवयवभूताश्च तिस्रः ।** ( इति सायणः ) या मंत्रांत गंगादि दश नद्यांना संबोधून ‘ मी केलेल्या या स्तोत्राचा स्वीकार करा ’ अशी प्रार्थना आहे. यांत मुख्य सात नद्यांचें वर्णन आहे, बाकीच्या तीन त्या उपनद्या आहेत असें सायणाचार्यांचें यावरील भाष्य आहे. या वैदिक मंत्रानेंहि मागच्या विधानाला पुष्टि मिळते. **सिंधुर्देशाब्धिनदे ।** ( विश्वमेदिन्यौ ) **सिंधुः समुद्रे नद्यां च नदे**—देश, नदी, नद व समुद्र या चार अर्थांनीं हा शब्द वापरला जातो हें या प्रमाणावरून सिद्ध होतें. सिंध देश आहे, सिंधु नद आहे, सिंधु समुद्र आहे. कोणत्याहि समुद्राला व नदीलाहि सिंधु हें सामान्य नांव आहे. ‘ स्यन्द ’ प्रस्रवणें—या धातूपासून सिंधु या शब्दाची व्युत्पत्ति आहे. ‘ स्यन्दते ’ वाहते या अर्थानें नदी असा अर्थ होतो.

‘ स ’ काराच्या ठिकाणीं ‘ ह ’ काराचा उच्चार करण्याचा परिपाठ आहे. ‘ स्वसुर ’ शब्दाचा सिंधीमध्यें ‘ स्वहुरो ’ असा उच्चार करतात. जोधपूरच्या भागांत ‘ सारा ’ शब्दाचा उच्चार ‘ हारा ’ असा होतो. प्राचीन हिंदी भाषेंत ‘ केसरी ’ या शब्दाचा उच्चार ‘ केहरी ’ असा केला जातो. नवीन हिंदींतहि ‘ मास ’ हा शब्द ‘ माह ’ असा उच्चारला जातो. वर्णमालेच्या दृष्टीनेंहि ‘ स ’ च्या पाठोपाठ ‘ ह ’ येतो; दोन्ही महाप्राणच आहेत. या अशा कारणांनीं ‘ स ’ काराच्या ठिकाणीं वाचेंत ‘ ह ’ काराचा उच्चार केला जातो. **सह्योपिच्च** ( पाणिनी ३।४–५७ ) असें पाणिनीसूत्रहि आहे. ‘ सि ’ च्या ठिकाणीं क्वचित् ‘ हि ’ असें होतें. वैदिक प्रयोगांतहि ‘ स ’ काराच्या जागीं ‘ ह ’ काराचा कोठें कोठें उपयोग केलेला दिसून येतो.

**श्रीश्च ते लक्ष्मीश्च पत्न्यौ** ( शु. यजु. ३१।११ )

**ऱ्हीश्च ते लक्ष्मीश्च पत्न्यौ** ( कृ. यजु. तै. अ. ३।१३ )

‘ श्रीश्च ’ या ठिकाणीं ‘ ऱ्हीश्च ’ हा फरक येथें स्पष्ट दिसून येतो. एकाच अर्थीं हे दोन प्रयोग आहेत. ‘ मंदाक्षं ऱ्हीस्त्रपात्रीडा ’ या आधारानें ऱ्हीः चा अर्थ लज्जा म्हणून इथें होऊं शकत नाहीं. या सर्व विवेचनावरून ‘ स ’

काराचा ' ह ' कार होतो असें सिद्ध झाल्यामुळें ' सिंधु ' पासून ' हिन्दु ' असा शब्द झाला; विदेशी लोकांनीं हें नांव पाडलें नाहीं हें स्पष्ट होतें. हा प्रयोग सर्वत्र वापरांत आढळून येत नाहीं हें खरें. आपण सिंधी मनुष्याला सिंधीच म्हणतों, सिंधु नदालाहि सिंधु नदच म्हणतों, सिंध प्रांतांलाहि सिंधच म्हणतो. समुद्र या अर्थींसुद्धां सिंधु म्हणूनच वापरतो. या कोणत्याहि ठिकाणीं हिन्दु म्हणून आपण हा शब्द वापरीत नाहीं. हिन्दु शब्दाच्या व्याख्या अनेकांनीं केल्या आहेत. त्या मिळतील तितक्या एकत्र करून त्यांवर मनन करूं.

## हिन्दु शब्दाच्या व्याख्या

**श्रुतिस्मृत्यादिशास्त्रेषु प्रामाण्यबुद्धिमवलंब्य । श्रुत्यादिप्रोक्ते धर्मे विश्वासं निष्ठां च यः करोति स एव वास्तवहिन्दुपदेन वाच्यः ।**—श्रुति स्मृत्यादि शास्त्राच्या ठिकाणीं प्रामाण्यबुद्धि बाळगून त्यांत वर्णिलेल्या धर्मावर जो संपूर्ण विश्वास ठेवतो व त्या निष्ठेनें जो वागतो तोच खरोखर हिन्दु. **श्रुत्यादिप्रोक्तानि सर्वाणि दूषणानि हिनस्तीति हिन्दुः ।** श्रुत्यादि प्रमाण ग्रंथोक्त दूषणांचा ( दोषांचा ) जो विनाश करतो तो हिन्दु. ॐ **कारमूल-मंत्राढ्यः पुनर्जन्मदृढाशयः । गोभक्तो भारतगुरुर्हिन्दुर्हिंसनदूषकः ।।** (माधवदिग्विजय)—ॐ हेंच सर्व मंत्रांचें मूल आहे. विषयवासना असेपर्यंत पुन-र्जन्म आहे असें मानणारा, गोभक्त असणारा, भारतधर्माचे सिद्धांत गुरुस्थानीं ठेवून वागणारा, हिंसा निंद्य समजणारा हिन्दु होय. **हिनास्ति तपसा पापान् दैहिकान् दुष्टमानसान् । हेतिभिः शत्रुवर्गं च स हिंदुरभिधीयते ।** ( पारि-जातहरण नाटक )—जो तपोबलानें स्वपरपाप व तनमनाचे दोष नष्ट करतो आणि तसेंच तीक्ष्ण शस्त्रांनीं दुष्ट शत्रूंचा नाश करतो तोच हिन्दु. **आसिंधु सिन्धुपर्यंता यस्य भारतभूमिका । पितृभूः पुण्यभूश्चैव स वै हिन्दुरिति स्मृतः ।।** ( स्वा. वीर सावरकर ) सिंधु नदाच्या उगमापासून हिन्दु महा-सागरापर्यंत पसरलेल्या विस्तृत भारतभूमीला जो पितृभूमि आणि आपल्या तीर्थक्षेत्रांची पुण्यभूमि मानतो तोच हिन्दु.

**यो वर्णाश्रमनिष्ठावान् गोभक्तः श्रुतिमात्रकः ।**
**मूर्तिं च नावजानाति सर्वधर्मसमादरः ।।**
**उत्प्रेक्षते पुनर्जन्म तस्मान्मोक्षणमीहते ।**
**भूतानुकूल्यं भजते स वै हिन्दुरिति स्मृतः ।।**

जो वर्णाश्रमाच्या ठिकाणीं निष्ठा ठेवतो, जो गोभक्त आहे, जो श्रुति-मताचा लोप करीत नाहीं, श्रुतीला जो मातृस्थानीं कल्पितो, जो त्या त्या मूर्तींत पाषाणादिकांची भावना न करतां सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपाची भावना करतो, मूर्तिपुरताच देव न मानतां जो विश्वव्यापी देव मानतो, सर्व धर्मांचा गौरव राखतो, स्वरूपाच्या अज्ञानानें उत्पन्न होणाऱ्या भ्रामक विषयवासनांमुळें जन्म येतो असें जो मानतो,अज्ञान व अज्ञानोत्पादक विषयवासनांच्या त्यागानें आत्मज्ञान करून घेऊन जन्ममरणापासून मुक्त होण्याची जो इच्छा करतो, भूतमात्राच्या अनुकूलतेकडे लक्ष देऊन जो वागतो तो हिन्दु. **हिंसया दूयते यश्च सदाचरण-तत्परः । वेदगो प्रतिमासेवी स हिंदुर्मुख्यशब्दभाक्** ॥ हिंसेच्या अवलोकनानें जो दुःखित होतो, जो सदाचारतंत्पर असतो, वेदाला जो मानतो, गाय आणि देव यांच्या प्रतिमेची जो पूजा करतो तो हिन्दु. **गोषु भक्तिर्भवेद्यस्य प्रणवे च दृढा मतिः। पुनर्जन्मनि विश्वासः स वै हिन्दुरिति स्मृतः**॥-गायीच्या ठिकाणीं सर्व देवांचा वास आहे असें जो मानतो, सृष्टिस्थितीलयाला, सर्व मंत्रांना, सर्व देवतांना एक प्रणवच आधार आहे, असा ज्याचा दृढ विश्वास असतो, देहबुद्धीनें जन्म येतो असें मानून, आत्मज्ञानानें देहबुध्दीचा निरास करून जो आत्मनिष्ठेनें मोक्ष मिळवितो तो हिन्दु. **हीनं दूषयतीति हिन्दुः** । ( शब्दकल्पद्रुमकोशः )—जें जें म्हणून कमी प्रतीचें, हीन, निंद्य व दूषणास्पद असतें, त्याला जो त्याज्य मानतो तो हिन्दु. **हिंदुर्हिंदूश्च पुंसि द्वौ दुष्टानां च विधर्षणे । रूपशालिनि दैत्यारौ** । ( अद्भुतकोश )-हिन्दु आणि हिन्दू हे दोनहि पुल्लिंगी शब्द दुष्टनाशक या अर्थीं व दैत्यांचे शत्रु आणि सुंदर या अर्थीं वापरले जातात. **हिन्दुर्हि नारायणादिदेवताभक्तः** । ( कविकोश )—हिन्दु हा नारायणादि देवतांचा भक्त असतो.

**प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु नियमानामनेकता ।**

**उपास्यानामनियमो हिन्दुधर्मस्य लक्षणम्** ॥ ( लो. टिळक )

—वेदांविषयीं प्रामाण्यबुध्दि, इहपर दिव्य जीवनाला कारण असणाऱ्या अनेक नियमांचें परिपालन, अभ्युदय-निःश्रेयसांची प्राप्ति करून देणाऱ्या ऐच्छिक देवतेची उपासना हें हिन्दु धर्माचें लक्षण होय.

निष्कपटता आणि प्रामाणिकता हीं हिन्दूंना ओळखण्याचीं दोन मोठीं साधनें आहेत. हिन्दूंनीं केव्हांहि अनैतिक वागणूक ठेवतांच कामा

नये. हिंदु लोकांचें जीवन अकृत्रिम असलें पाहिजे. हिन्दु हा धार्मिक, प्रसन्न, न्यायप्रिय, सत्यसंध, देवभक्त आणि गुरुभक्त असला पाहिजे. पातिव्रत्य आणि एकपत्नित्व या हिन्दूंच्या शीलांचा प्रकाश चोंहींकडे फांकला पाहिजे. वर्णाश्रम हें हिन्दु संस्कृतीचें मुख्य अंग आहे. आपापले वर्णाश्रमधर्म अनुष्ठानांत ठेवणारा हिन्दु होय हें लक्षांत ठेवावें. हिन्दुस्थानावर जें सर्वांचें उत्कृष्ट प्रेम आहे, तें खरोखरी त्याच्या अलौकिक गुणांमुळें व असा-मान्य नीति-न्यायामुळें आहे हें विसरूं नये. सर्व जगाला हिन्दुस्थान आदरणीय आहे तो सर्वथैव त्याच्या बौद्धिक, नैतिक आणि आध्यात्मिक संपत्तीमुळेंच, हें हृदयाशीं बाळगून असावें. अमृतपानानें आरोग्याचीं सर्व लक्षणें जशीं एकाएकीं अंगीं बाणतात, त्याचप्रमाणें अध्यात्मज्ञानानें सर्व सद्‌गुण अंगीं बाणतात. ही आत्मनिष्ठा हिन्दु संस्कृतीचें मूळ होय, हें कोणत्याहि हिन्दूनें विसरतां कामा नये. वेदोपनिषदांवरच ही हिन्दु संस्कृति उभारली आहे, हें हिन्दूंनीं लक्षांत ठेवलें पाहिजे. सद्‌बुध्दि, सदाचरण, विश्वबंधुत्व, सत्य, अध्यात्मनिष्ठा, समत्व, परस्परप्रेमाची वागणूक, दया–दान–धर्म, उच्चविचार-सरणी, उत्कृष्ट नीति इत्यादिकांमुळें ‘ हिन्दु ’ अखिल विश्वांतच प्रथम स्थान मिळवितात हें जाणून प्रति हिन्दूनें वागावयाला पाहिजे. आपल्या सत्कीर्तीला कलंक लागेल असें आचरण प्राणान्तींहि खरा हिन्दु कधीं करणार नाहीं. सत्कीर्तीवर प्राणापेक्षांहि अधिक प्रेम ठेवणें हें हिन्दूंचें एक प्रधान लक्षण आहे. **हिन्दुर्दुष्टो न भवति नानार्यो न विदूषकः। सद्धर्मपालको विद्वान् श्रौत-धर्मपरायणः।** ( रामकोश )–हिन्दु हा केव्हांहि दुष्ट, दुर्जन नसतो, अवि-श्वसनीय नसतो. तो कधींहि हीन होत नाहीं. तो सज्जनांची निंदा करीत नाहीं. तो सदैव सध्दर्मपालकच असतो. तो स्वतः विवेक-विचारपूर्ण विद्वान असतो. तो वेदांनीं घालून दिलेल्या आपल्या धर्मकर्माच्या ठिकाणीं नित्य निरत असतो. हिन्दु लोक परमतसहिष्णु, आश्रितपालक, धर्माविरुध्द कोणी आक्रमण केल्यास त्याचे संरक्षणार्थ प्राण पणाला लावणारे असतात. आपद्‌ग्रस्तांना शक्य तें साहाय्य करण्यास ते तत्पर असतात. **हिनास्ति दुर्वृत्तिः इति हिन्दुः।** –आपल्या अथवा दुसऱ्याच्या दुर्वृत्ति समूळ नष्ट करणारा तोच हिन्दु. स्वपर हृदयांत सद्‌वृत्तिचें बीं पेरून, सर्व दुर्वृत्ति समूळ नाहींशी करणाराच हिन्दु हें हिन्दूंचें ब्रीदवाक्य आहे. हिन्दु लोक अखिल मानवजातीच्या अत्युन्नत हिताची अपेक्षा बाळगून असतात व तदनुकूल तें आचरण ठेवतात. सर्वांच्याबद्दल

त्याच्या अंतःकरणांत दया असते. ते विश्वबंधुच असतात. त्यांचें कोणाशींहि तत्त्वतः वैर असत नाहीं. त्यांचा धर्मपालनाचा आग्रह मात्र असतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे हिन्दु संस्कृतीच्या शरीराचे अनुक्रमें मुख, बाहू, मांड्या आणि पाय होत, हे विसरूं नये. शील हा हिन्दूंच्या नसानसांतून वाहणारा एक मुख्य धर्म आहे. हिन्दु सभ्यता आखिल विश्वांतच नांवाजलेली आहे. तिचा कोणत्याहि हिन्दूनें लोप करूं नये.

## भारत

हिंदुस्थान व हिन्दु या शब्दांचा विचार केल्याप्रमाणें 'भारत' या शब्दाचा विचार करूं. भारत आणि हिन्दुस्थान या दोन्ही नांवांनीं ओळखला जाणारा देश एकच आहे. या देशाची सीमा खालीलप्रमाणें आहे.

**उत्तरं यत्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणम् । वर्षं तद्भारतं नाम भारती यत्र संततिः ॥** दक्षिणसमुद्राच्या उत्तरेला व हिमालय पर्वताच्या दक्षिणेला म्हणजे कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंत ज्या देशाची सीमा आहे तो भारत देश व या भारत देशाची संतति भारती होय. हिन्दुस्थान आणि हिन्दु, भारत व भारती हे शब्द समानार्थक आहेत हें शब्दांच्या अर्थावरून स्पष्ट कळून येईल.

## भारतभूमीचें श्रेष्ठत्व

**तत्रापि भारतं श्रेष्ठं जंबूद्वीपे महामुने । यतो हि कर्मभूरेषा ततोऽन्या भोगभूमयः ॥**—जंबूद्वीपांत भारतवर्ष हा फार श्रेष्ठ देश होय. भारतवर्ष ही एकमात्र कर्मभूमि आहे. येथें सत्क्रियावान् पुरुषाला वाटेल तें साधून घेतां येतें. आपल्या सत्साधनांच्या जोरावर इथल्यांना कसलीहि पदवी मिळवितां येते; इतकेंच नव्हे तर परमात्मकृपेनें आपली योग्यता कितीहि वाढवितां येते. परमात्मस्वरूपहि होतां येते. इतर देश मात्र केवळ भोगभूमि आहेत. मागच्या जन्मीं केलेल्या कर्मांचें फळच केवळ तेथें भोगलें जातें. भोगसाधनांचेंच त्या ठिकाणीं प्राबल्य असतें असा या श्लोकाचा अर्थ.

पुण्यवान् अशा भारतवर्षांत किंवा हिन्दुस्थानांत जन्म पावलेले फार पुण्यवंत, परम भाग्यशाली! भगवत्सेवेला अनुकूल असलेली ही भूमि आहे. या ठिकाणच्या लोकांना स्वर्गमोक्षाची प्राप्ति होते, हें अनेक पुराणादि वाक्यांवरून

स्पष्ट होतें. उदाहरणार्थ एक दोन श्लोकांचा आपण येथें विचार करूं. **गायन्ति देवाः किल गीतकानि। धन्यास्तु ते भारतभूमिभागे ॥ स्वर्गापवर्गास्पदमार्गभूते । भवन्ति भूयः पुरुषाः सुरत्वात् ॥** (विष्णुपुराण २–३–२४)—स्वर्गमोक्षांना कारणीभूत होणाऱ्या भारतभूमींत जन्म घेऊन आलेलीं माणसें खरोखरच धन्य धन्य म्हणून भारतीयांचें यशोगान साऱ्या देवदेवताहि मुक्त कंठानें करतात व आपलाहि जन्म त्या ठिकाणीं व्हावा म्हणून मनापासून इच्छितात. **अहो अमीषां किमकारि शोभनम्। प्रसन्न एषां स्विदुत स्वयं हरिः॥ यैर्जन्म लब्धं नृषु भारताजिरे । मुकुंदसेवौपयिकं स्पृहा हि नः ॥** (श्रीमद्भागवत ५–१९–२१ ) स्वतः परमात्माच ज्यांच्यावर बहु प्रसन्न होऊन कृपा करतो अशा भारतीयांचें आम्ही आणखी जास्ती काय हित करूं शकणार ? कसलें कल्याण करणार ? भरतभूमींत—हिन्दुस्थानांत जन्म प्राप्त होणें म्हणजे मोठें भाग्य ! परमात्म्याच्या सेवेला अनुकूल असणारा हा देश ! या देशावर आमची फार ममता आहे म्हणून स्वतः देवच या भारताचे व भारतवासियांचे गोडवे गातात.

एक युरोपियन स्त्री आपल्या वयाच्या साठाव्या वर्षापर्यंत भारतांतच होती. भारतांत जन्म घेण्याच्या उद्देशानें येथेंच देह सोडण्याचा तिचा कृतनिश्चय होता. या जन्मीं मी युरोपियन होऊन जन्माला आलें; पण पुढें मात्र येथेंच उत्तम कुळांत जन्म घेऊन मोक्षाधिकारी होईन व साधन करून मोक्ष मिळवीन म्हणून तीच स्वतः सांगत असे. किती युरोपियन युवक संन्यस्तवृत्तीनें भगवीं वस्त्रें धारण करून हिमाळयाकडे साधन करीत असलेले दिसून येतात. पाश्चात्यांना भारताविषयींचा असणारा आदर भारताची खरीखुरी योग्यता व्यक्त करतो, देवांच्या विधानाचें सत्य कैमुनिक न्यायानें पटवितो.

## भारतीय कोण

चीन देशांत जन्म घेऊन पूर्वापार चालत आलेल्या तिथल्या संस्कृतिप्रमाणें वागणाऱ्याला चिनी म्हटल्याप्रमाणेंच जपानी, अफगाण, अरब, इंग्लिश जर्मन, फ्रेंच, अमेरिकन म्हणून म्हणण्यांत येतें. त्या त्या देशांत जन्म घेऊन तिथल्या तिथल्या संस्कृतिप्रमाणें वागणाऱ्यांना द्योतक अशीं नांवें प्राप्त झाल्याप्रमाणेंच या भारतांत जन्म घेऊन इथल्या आर्य संस्कृतिप्रमाणें वागणाऱ्याला भारतीय म्हणून म्हणतात. या भारत देशालाच आर्यावर्त, हिन्दुस्थान अशींहि

पण नांवें असल्यामुळ येथल्यांना आर्य, हिन्दु असेंहि म्हणतात. ऋग्वेदादिक आर्यांचे धर्मग्रंथ आहेत. आर्य संस्कृतीचा हाच एक पाया आहे. ऋग्वेदादि वाङ्मय अति प्राचीन आहे, त्यांतसुध्दां भारत या शब्दाचा उल्लेख आहे.

'The Rigwedas are the Hindu sacred writings which are probably the oldest literary compositions in the world.' ( Wall's Sex and Sex worship, p. 8 )

—विश्वांतल्या आखिल वाङ्मयांत अतिप्राचीनतम असें जर कोणतें वाङ्मय असेल तर तें हिंदूंचे ऋग्वेदादि अतिपवित्र धर्मग्रंथ होत, असें पाश्चात्य पंडितसुद्धां घंटाघोषानें जगास कळवीत आहेत. यांतसुध्दां 'भारत' हा शब्दप्रयोग दिसून येतो. **य इमे रोदसि उभे अहामिंद्रमतुष्टवम् । विश्वामित्रस्य रक्षाति ब्रह्मेदं भारतं जनम् ॥** ( ऋ. ३-५३-१२ ) आकाश व भूमी यांच्यामध्यें अंतरिक्षांत असणाऱ्या इंद्राला मी संतुष्ट केलें आहे, त्याची प्रार्थना केली आहे. विश्वामित्राचें ब्रह्मात्मक उपास्य दैवत भारतीय लोकांचें संरक्षण करतें असा या मंत्राचा अर्थ आहे. महात्मे देवांची प्रार्थना करून लोकांचें संरक्षण करतात हें या मंत्रावरून स्पष्ट होतें. **भासि वा भायां वा रतः भारतः** ।—स्वप्रकाश आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं रत असणारा भारत. **भारूपं परं ब्रह्म तस्य स्वयं प्रकाशत्वात् । तस्मिन् भारूपे ब्रह्मणि रतः सक्तः भारतः**। ब्रह्म स्वयंप्रकाश असल्यामुळें त्यास भारूप म्हणून म्हटलें जातें. भारूप परब्रह्मांत जो अखंड रत असतो ( आसक्त असतो ) त्यालाच भारत म्हणून म्हटलें जातें. **भारूप आत्मा सर्वगतः तस्मिन् भारूपे आत्मनि रतः भारतः** । स्वयंज्योति आत्मरूप सर्वगत आहे. त्या आत्मत्वाच्या ठिकाणीं रत असणाऱ्याला भारत म्हणून नांव आहे. **भा ब्रह्मविद्या तस्यामेव रमत इति भारतः** । 'भा' म्हणजे ब्रह्मविद्या, त्या ब्रह्मविद्येच्या ठिकाणींच रममाण होणारा भारत होय. **आ नो यज्ञं भारती तू यमेत्विळा मनुष्वदिह चेतयन्ती । तिस्रो देवीर्बर्हिरेदं स्योनं सरस्वती स्वपसः सदन्तु** ( ऋ. ) **एतु नो यज्ञं भारती, क्षिप्रं भरत आदित्यस्तस्य भा इळा च मनुष्यवदिह चेतयमानाः तिस्रो देव्यो बर्हिरिदं सुखं सरस्वती च सुकर्मणा आसीदस्तु** ॥ ( निरुक्त २-८-१३ ) मनुष्याप्रमाणें आमच्या ठिकाणीं ममत्व ठेऊन तुम्ही तीन देवता आमच्या यज्ञाला लवकर या, असा याचा भावार्थ आहे. या मंत्रांत भारती शब्द आला आहें. या भारती पदाचा अर्थ निरुक्तांत खालीलप्रमाणें

केला आहे. **भरत आदित्यः तस्य भा स्वभूता दीप्तिः भारती ।** भरत ह्मणजे सूर्य आणि त्याची प्रभा ही भारती असा यास्कांनीं अर्थ केला आहे. श्रुति सूर्याविषयीं काय सांगते तें पाहूं. **सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च** ( ऋ.१-११५-१ ) **सर्वस्य प्रेरकः परमात्मा जगतो जंगमस्य तस्थुषः स्थावरस्य चात्मा स्वरूपभूतः ।** ( सायणः ) हा सूर्यमंडलांतरवर्ति सर्वप्रेरक परमात्माच या स्थिरचर विश्वाचें आत्मरूप. तैत्तिरिय उपनिषदाच्या भृगुवल्लींत **स यश्चायं पुरुषे यश्चासावादित्ये स एकः ॥** ( ३–४ )—एक परमात्माच या देहांत आणि त्या सूर्यमंडळांत व्यापून आहे—या दोन वचनांनीं श्रुत्युक्त उपासनेचा क्रम अवगत होतो, भारतीयांच्या उपासनेची पध्दत समजून येते व स्वप्रकाश आत्मस्वरूपांत रत असणाराच भारत या तत्त्वाला पुष्टि मिळते. श्रीमद्‌भगवद्गीतेंत तर भारत शब्दाचा प्रयोग पुष्कळ ठिकाणीं आला आहे. ‘ **पश्याश्चर्याणि भारत** ’ । ‘ **सत्त्वं भवति भारत** ’ । ‘ **व्यक्तमध्यानि भारत** ’ । ‘ **तन्निबध्नाति भारत** । ’ इत्यादि.

---

श्रीमद्भागवताच्या पंचम स्कंदाच्या चतुर्थाध्यायांतील प्रमाणावरून भगवान् ऋषभदेवाचा ज्येष्ठ पुत्र भरत याच्या कालापासून याचें नांव प्राप्त झालें व तेव्हांपासून या देशाला भारतवर्ष हें नांव आलें असें मानलें तरी वरील भारत या शब्दाच्या अर्थाला पुष्टिच येते. “ History repeats itself ” इतिहासाची पुनरावृत्ति होत असते या न्यायानें ऋषभपुत्र भरतानें या देशाची पूर्वील आत्मनिष्ठा उजळली असा याचा अर्थ होतो. ऋषभ आणि भरत हे दोघेहि आत्मनिष्ठ होते. यथा राजा तथा प्रजा या नात्यानें भरताच्या उपदेशानें पुन्हां सकल राष्ट्र आत्मनिष्ठ झालें हें यामुळें उद्‌घोषित होतें. भारत या शब्दाचा आत्मनिष्ठ असा अर्थ एवंच वेदकालापासून आला असून हें भारतवर्षाचें व तत्रस्थ राजाप्रजाजनांचें एक स्वरूप-लक्षण आहे असा या सर्व विवेचनावरून निष्कर्ष निघतो. वैशिष्ट्यद्योतक हा भारत शब्द आहे आणि गौरवार्थी व जाणीव या अर्थीं याचा उपयोग पूर्वीं होत होता हें श्रीभगवद्गीतच्या ‘ भारत ’ या अनेक ठिकाणीं आलेल्या संबोधनावरून आढळून येतें.

**आर्य**

**यवं वृकेणाश्विना वपन्तेषं मनुषाय दस्रा । अभिदस्युं बकुरेणाधमन्तोरुज्योतिश्चक्रथुरार्याय ।** (ऋ. १–११७–२१) **यवामिव वृकेणाश्विनौ**

**निवपन्तौ वृको लांगलं भवति। वितर्कनात्। लांगलं लंगतेः। लांगूलवद्वा। लांगूलं लगतेर्लंगतेर्लंबतेर्वा। अन्नं दुहतौ मनुष्याय दर्शनीयावभिधमन्तौ दस्युं बकुरेण ज्योतिषा वोदकेन वाऽऽर्य ईश्वरपुत्रः॥** ( निरुक्त ६-५-२६ ). या मंत्रांत आर्य शब्द आला आहे. या मंत्रांत अश्विनीकुमारांची स्तुतिहि आली आहे. 'तुम्ही द्युलोकांतील देवता आहांत. शेतकरी नांगरांनीं जमीन नांगरून जसें धान्य पेरतात व झालेल्या पिकांनीं-धान्यांनीं समाजाला जसा अन्नाचा पुरवठा करतात, अन्नदानानें जसा समाज तृप्त करतात, त्याप्रमाणेंच तुम्ही अश्विनीकुमार सूर्याकडून झालेल्या पर्जन्यवर्षावानें आमच्या पुत्रपौत्रांना, पितृपितामहांना आखिल सुखसौकर्याचा पुरवठा करतां, तृप्त करतां. दिलेल्या अर्घ्यानें व केलेल्या तर्पणानें देवपितृगण तृप्त होतात. तें ज़ल त्यांचें अन्न बनतें. हे अतिसुंदर असणाऱ्या अश्विनीकुमारांनो! तुम्ही सूर्यद्वारें पर्जन्याची वृष्टि करून मनुष्यांकरितांहि अन्नाची समृध्दि करतां, दुर्भिक्ष दुष्काळ नष्ट करतां. आर्य ईश्वरपुत्राला विस्तृत दृश्य पाहण्यास डोळे दिलेत, पुन्हां दृष्टि आणलीत.' निरुक्ताच्या आधारें असा हा या मंत्राचा भावार्थ होतो. ईश्वरपुत्र म्हणजे ईश्वर या नांवाच्या ऋषीचा पुत्र. भुकेच्या वेळीं रुईचें दूध पिऊन याचे डोळे गेले. गुरुघरच्या गाई कोठें गेल्या म्हणून पाहात असतां अकस्मात हा एका विहिरींत पडला. याचा शोध करीत याचे गुरु जवळ येऊन ठेपले. डोळे गेलेले पाहून त्यांनीं त्याला अश्विनीमंत्राचा उपदेश दिला. अश्विनीमंत्रांनीं त्याला पुन्हां दृष्टि आली. धौम्य ऋषिच याचे गुरु होत. यांच्या या शिष्याचें नांव उपमन्यु असें होतें. केवळ आशीर्वादानेंच आपल्या शिष्यांना वेदशास्त्रसंपन्न करण्याबद्दलची यांची ख्याति प्रसिध्द आहे. ही कथा महाभारतांत आली आहे. सातारा जिल्ह्यांतील वांईजवळ धोम म्हणून एक प्रसिध्द गांव आहे. हें या धौम्यऋषींचें एक आश्रमस्थान म्हणून ओळखलें जातें. धौम्यमुनींचा आश्रम या ठिकाणीं असल्यामुळेंच याला धोम असें नांव पडलें. गुरुसेवेनें सकल विद्येची प्राप्ति होते हें तत्त्व यांच्या आश्रमांत संपूर्णतया साकार झालेलें दिसून येत होतें. आदिमहाकाव्य म्हणून प्रसिद्ध असलेल्या वाल्मीकि रामायणांतहि आर्य हा शब्द पुष्कळ ठिकाणीं आला आहे. **आर्यः सर्वसमश्चैव सदैव प्रियदर्शनः॥ स च सर्वगुणोपेतः कौसल्यानंदवर्धनः॥** ( वा. रा. बा. स. १-१६, १७ ). **सुखिनी कच्चिदार्या च देवी नंदति कैकयी॥** ( वा. रा. अ. स. १००-१० ). **आर्यपुत्र पितामाता**

( वा. रा. अयो. स. २७-३ ) **व्रतामार्यैः सहस्रशः** । इत्यादि. आर्य हें संबोधन काव्य, नाटकें इत्यादिकांतून पुष्कळ दिसून येतें.

**आर्यः सर्वसमश्चैव सदैव प्रियदर्शनः ।**
**स च सर्वगुणोपेतः कौसल्यानंदवर्धनः ॥**

या श्लोकानें आर्यांचीं लक्षणें व आदर्श व्यक्ति यांचा बोध होतो. ' आर्यः सर्वसमश्चैव '-आर्य हा सर्वसम असतो या लक्षणानें आर्याची आत्मनिष्ठा व ' सदैव प्रियदर्शनः ' त्याचें दर्शन सदैव सर्वांना प्रिय असतें या लक्षणानें त्याची सर्वतोपरि आकर्षकता व्यक्त होते. सर्व सद्‌गुणांनीं अलंकृत असणाऱ्या आर्यांचा आदर्श पुरुष मर्यादापुरुषोत्तम श्रीराम होय हें या श्लोकाच्या दुसऱ्या ओळीनें सिद्ध होतें. ' कौसल्यानंदवर्धनः ' या पदानें सर्व लौकिक पारमार्थिक आदर्श जीवनानें सुशोभित असें आदर्श प्रिय पुत्रत्वाचेंहि एक लक्षण उमटून दिसतें. आर्यांचीं दहा लक्षणें खालील श्लोकांत पाहावयास मिळतात.

**शान्तस्तितिक्षुर्दान्तश्च सत्यवादी जितेन्द्रियः ।**
**दाता दयालुर्नम्रश्च आर्यः स्याद्दशभिर्गुणैः ॥**

आर्य शांत, सहनशील, मनोनिग्रही, सत्यसंध, जितेंद्रिय, दानशील, दयाळू व नम्र असतो. शांति, तितिक्षा, मनोजय, सत्य भाषण, जितेंद्रियता, दातृत्व, दया व नम्रता हे आठ गुण असलेलाच आर्य होय. या आठ गुणांनींच आर्यत्व ओळखलें जातें. ऐहिक तशा पारलौकिक दिव्य जीवनाच्या प्राप्तिकरितां या आठ गुणांची आवश्यकता असल्यामुळें आर्य हे अखिल मानवजातीचेच मार्गदर्शक होत हें कोणाच्याहि मनांत बिंबण्यासारखें आहे.

## भारतवर्षाचें प्राचीनत्व

वेदांतील वर्णनाशीं व पुराणाच्या कथांशीं त्या त्या क्षेत्रांतील खाणाखुणा पटतात. हीं सर्व क्षेत्रें हिमालयापासून तों कन्याकुमारीपर्यंत पसरलेल्या हिन्दुस्थानाच्या हद्दींतच दिसून येतात. चार धाम आणि द्वादश ज्योतिर्लिंगांची यात्रा म्हणजे संबंध हिन्दुस्थानाचीच प्रदक्षिणा होते. चार धामेंच पाहाना का ! उत्तरेला बद्रीनारायण, दक्षिणेला रामेश्वर, पूर्वेला जगन्नाथपुरी व पश्चिमेला द्वारका. हिन्दुस्थानाच्या पूर्व-पश्चिम, दक्षिण-उत्तर अशा या चतुःसीमाच आहेत. ' द्वादशज्योतिर्लिंग ' स्तोत्रांत या बारा ज्योतिर्लिंगांची यादी आढळून येते.

**सौराष्ट्रे सोमनाथं च श्रीशैले मल्लिकार्जुनम् ।**
**उज्जयिन्यां महाकालमोंकारममलेश्वरम् ॥ १ ॥**
**परल्यां वैजनाथं च डाकिन्यां भीमशंकरम् ।**
**सेतुबंधे तु रामेशं नागेशं दारुकावने ॥ २ ॥**
**वाराणस्यां तु विश्वेशं त्र्यंबकं गौतमीतटे ।**
**हिमालये तु केदारं घुसृणेशं शिवालये ॥ ३ ॥**
**एतानि ज्योतिर्लिंगानि सायंप्रातः पठेन्नरः ।**
**सप्तजन्मकृतं पापं स्मरणेन विनश्यति ॥ ४ ॥**

या सर्व ज्योतिर्लिंगांची यात्रा पायीं करावयाची झाल्यास आपोआपच भारतवर्षाची प्रदक्षिणा होते. **सार्धत्रिकोटितीर्थानि**–साडेतीन कोटि तीर्थें आहेत. हीं सर्व तीर्थें करावयाचीं म्हणजे हिंदुस्थानाच्या कानाकोपऱ्यांतूनहि हिंडावें लागतें. तीर्थ-क्षेत्रांनीं अतिपवित्र, अनेक सुंदर सुंदर देवालयांनीं दिव्य स्फूर्तिदायक व पुराणकथा–निदर्शक. यांतील तपोभूमि म्हणवून घेणाऱ्या वनोपवनांनीं अति शोभायमान असा अतिशय रमणीय देश म्हणजे हा भारत-वर्ष होय. परमार्थप्राप्तीची ही एक दिव्य भूमी होय. सृष्टीच्या आरंभापासून या भूमींत देवदेवता ऋषिमुनींनीं बहु अनुष्ठानें केलीं. तप केलें, यज्ञयाग केले. या सर्व स्थळीं त्यांचीं स्मारकें अजूनहि त्या दिव्य घटनेची स्मृति आणून देतात, तसे कांहीं अवशेषहि तेथें सांपडतात. हिमालयांत तर असलीं स्थळें खूपच आहेत. याचा प्रारंभ हरिद्वारापासूनच होतो. हरिद्वाराच्या जवळ असणाऱ्या कनखल क्षेत्रांतच दक्षयज्ञ झाला. येथून पुढें निघालें म्हणजे त्रिमूर्तींचींहि तपस्थानें आढळतात. दक्षिणेंत उत्तरेंत चोंहींकडे यज्ञयागांचीं कितीतरी स्थळें भेटतील. हिला देवभूमि असें म्हणतात. मानवकुलाचा मूळपुरुष मनु हा प्रथम या भूमीचा राजा झाला. ब्रह्मदेवाच्या उजव्या आणि डाव्या भागापासून मनु व शतरूपा यांची उत्पत्ति झाली. हें मानवकुलांतील सर्वादि दांपत्य. या भारतवर्षांत असणारी सर्व प्रजा ऋषींची संतति होय हें गोत्र, सूत्र व शाखा यावरून स्पष्ट होतें.

ब्रह्मदेवाकडून निवृत्ति, प्रवृत्ति असे दोन मार्ग निर्माण केले गेले. या दोन संस्कारांची सृष्टि निर्माण केली गेली. सनक सनंदनादिकांची प्रथम सृष्टि आणि नव प्रजापतींची ही दुसरी. या नव प्रजापतींपासून प्रजोत्पत्ति झाली, प्रवृत्तिमार्ग वाढला. यांच्याच प्रजेला आर्य असें नांव आहे. यांच्या कुलांतील

सर्वहि आर्य होत. या आर्यांची कर्मभूमी म्हणजे हें भारतवर्ष होय. हें आर्यांच्या वेदोक्त कर्माकरितांच परमात्म्यानें निर्माण केलें आहे. या विधानाची सार्थकता येथील तीर्थक्षेत्र द्वारा पटते हें कितीदा सांगितलें तरी कमीच आहे. दक्षिणेच्या यात्रेंत जागजागीं वेदकालीन ऋषींचे आश्रम आढळून येतात. गोकर्ण महाबळेश्वर, सेतुबंध, रामेश्वर इत्यादि स्थळें आपल्या नामनिर्देशांनीं व स्मारकांनीं त्या त्या घटनेची साक्ष पटवितात. हीं सर्व स्थळें म्हणजे ऐतिहासिक स्थळेंच होत. कांहीं कांहीं स्थळें त्या त्या देवांच्या व ऋषींच्या नांवांनींच प्रसिद्ध आहेत. आसेतुहिमाचल ही सर्वहि आर्यभूमीच आहे याची हीं स्थळें साक्ष देतात. कर्नाटकाकडील सिर्सी भागांतल्या याण येथील लोक तेथील देवस्थानापासून थोड्या अंतरावर असलेलें एक स्थळ दाखवून 'श्रीशंकरानें मोहिनीरूप धारण केलेल्या विष्णूकडून भस्मासुरास भस्म करून टाकलेलें स्थळ हेंच' म्हणून सांगतात व त्याची खूण म्हणून ते तेथील सर्व माती जळून गेल्याप्रमाणें आहे ती दाखवितात. पौराणिक घटनांचा त्या त्या स्थळाच्या पुराव्याशीं कसा ताळमेळ जमतो हें तेथल्या लोकांनीं सोदाहरण पटवून सांगितलें आहे. ब्रह्मादिकांनीं यज्ञ केलेल्या स्थळीं उकरलें असतां आजहि भस्म मिळतें. गाणगापुराहून भाविक लोक अद्यापि भस्म घेऊन येतात. त्या टेकडीच्या भागांत कोठेंहि भस्म मिळतें. यज्ञ करून कित्येक वर्षें होऊन गेलीं असलीं तरी त्या पौराणिक दिव्य कथांचें सत्यत्व आजहि अशा रीतीनें प्रकट होत आहे. **इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्।** इतिहासपुराणांवरून वेदांचा अर्थ स्पष्टपणें जाणला जातो. इतिहासपुराणांत दिसून येणाऱ्या कथानकांच्या खुणा पटविणारीं जीं वैशिष्ट्यें ठिकठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतात त्यावरून वेदशास्त्रपुराणइतिहासांचें प्रामाण्य मनाला पटतें. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत व आणखी सर्वत्र आढळून येणाऱ्या विस्मय-जनक प्रत्यंतरांनीं ही देवभूमि आहे हें निश्चितपणें मनावर बिंबतें. उत्तरेस हिमालय, दक्षिणेस हिंदुमहासागर, पूर्वेस गंगासागर (बंगालचा उपसागर) आणि पश्चिमेस सिंधुसागर (अथवा अरबी समुद्र) अशी ही चतुःसीमान्त देवभूमी म्हणजे खरोखर मोक्षभूमी आहे. यांत जन्म घेऊन आर्य संस्कृतीचा आश्रय केलेली मंडळी धन्य धन्य! देवनिर्मित अशी ही पुण्यभूमी आहे. परमात्म्यानें यथ अवतार धारण केले. येथें अवतार घेऊन येथला धर्म स्वतः पाळला आणि तो पुन्हां स्थापला. पहिल्यापासूनच परमात्म्यानें येथें श्रेष्ठ

पुरुषांना जन्माला घातलें. **आर्या अत्रावर्तन्त इति आर्यावर्तः** । भारतभूमीचें दैवी वैशिष्ट्य न विसरतां त्याचें रक्षण करणें हें प्रत्येक भारतीयाचें प्राणपणानें पाळलें जाण्यासारखें आद्य कर्तव्य आहे. **विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य आद्यब्राह्मणो द्वितीये परार्धे श्रीहरेः श्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वन्तरे कलियुगे प्रथमपादे जंबूद्वीपे भरतखंडे भारतवर्षे महामेरोर्दक्षिणपार्श्वे**, इत्यादि. या नित्य म्हटल्या जाणाऱ्या संकल्पावरून हिंदु संस्कृति ही परमात्मप्रणीत आहे, अखंड भारत ही आर्यभूमी आहे व येथें अनादि कालापासून राहणारे आर्यच होत हें स्पष्ट होतें. याची विस्मृति होऊं नये म्हणूनच हा संकल्प नित्याच्या संकल्पांत गोंवला गेला आहे. केवढे ते ऋषि विशाल ज्ञानाचे आणि सूक्ष्म दूरदृष्टीचे होते !

आर्यांचे वंशज आपण हें न विसरतां तदुचित, तत्कथित रीती-नीति, धर्म-कर्म सांभाळून, वितंडवाद न करतां उच्च नागरिकतेचा आदर्श पाळून मोक्षसाधनांनीं विभूषित व्हावें, धन्य होऊन दिव्य जीवनाचें उदाहरण स्वयं होऊन राहावें, हेंच भारतांत जन्मल्याचें सार्थक होय. पूर्वींच्या अनेक परकीय राज्यकर्त्यांनीं अनेक विरोधी कल्पना निर्माण करून परस्परांत द्वेष वाढविला व ' विभजन आणि शासन ' ( Divide and rule ) हें तत्त्व अमलांत आणलें, वाटेल त्या मार्गांनीं राज्य केलें; परंतु आतां स्वराज्य प्राप्त झालें असल्यानें ह्या सर्वहि भेदभावना आणि कुटिल राज्यपद्धति टाकून, देशबंधुत्वाच्या आणि धर्मबंधुत्वाच्या हार्दिक प्रेमानें परस्परांशीं वागत, पवित्र आर्य संस्कृतीचा उच्च ध्वज जगांत मिरवीत, मोक्षमार्गानुवर्ती होणें हें किती सुखावह व केवढें भूषणावह आहे ! असें हें सौभाग्य आजच्या भारताला परमेश्वरकृपेनें लवकरच लाभो व त्यामुळें अखिल विश्वाचेंच कल्याण होवो.

## आर्य आणि आर्यावर्तांचीं लक्षणें

आर्यावर्त हा कोणत्या लक्षणांनीं बाकींच्या राष्ट्राहून भिन्न म्हणून ओळखला जातो हें खालील श्लोकावरून स्पष्ट होईल. **वर्णाश्रमविभागोऽयं यस्मिन्देशे न विद्यते । स म्लेंच्छदेशो विज्ञेय आर्यावर्तस्ततोऽन्तरः ॥** ( विष्णुस्मृति )—ज्या देशांत वर्णाश्रमविभाग नाहीं तो ' म्लेंच्छ देश. ' वर्णाश्रमविभागांनीं युक्त असणारा आर्यावर्त होय. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंतच्या सर्व प्रदेशांतून पूर्वींपासूनच वर्णाश्रमपद्धति अस्तित्वांत असल्यामुळें

हिमालयापासून तों कन्याकुमारीपर्यंत आर्यावर्ताची स्थळमर्यादा पूर्वीपासूनच आहे व वर्णाश्रमधर्माचे निर्बंध पालन करणारे येथील सर्वहि लोक पूर्वीपासूनच आर्य आहेत हें यावरून सिद्ध होतें. भारत व आर्य या शब्दांविषयीं आपण विचार केला. हिन्दु आणि हिन्दुस्थान हे यांचेच प्रतिशब्द आहेत हेंहि पण आपण ओळखलें. अलीकडे तर हिन्दु आणि हिन्दुस्थान हे शब्द सर्रास वापरले जातात.

आरशांत तोंड बघितल्याप्रमाणें पाश्चात्य पंडितांच्या लिखाणांतून आपली आर्य संस्कृति कशी दिसते ते बघूं. या उदाहरणांनीं खिस्तधर्मीयांच्या व प्रचारकांच्या डोक्यांत प्रकाश पडेल, तत्प्रेमीयांनाहि कळून चुकेल, अलीकडच्या सुशिक्षित वर्गाला व पुढारी वर्गालाहि एक धडा मिळेल.

"The custom of the country prohibits inter-marriage between the castes : for instance the husbandman cannot take a wife from the artisan caste. Custom also prohibits any one from exercising two trades or from changing from one caste to another. One cannot for instance, become a husbandman if he is a herdsman or become a herdsman if he is an artisan." ( Mebindle : Megasthenes p. 218 )

—या देशाच्या पद्धतीप्रमाणें मिश्रविवाह निषिद्ध आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण आहेत. यांत कधींच रोटीबेटीचा व्यवहार होत नाहीं; इतकेंच नव्हे तर एखाद्या शेतकऱ्याचा शिल्पकाराच्या मुलीशीं विवाह होत नाहीं. त्याचप्रमाणें शिल्पकाराचाहि शेतकऱ्याच्या मुलीशीं विवाह होत नाहीं. भारतांत त्या त्या जातीला नेमून दिलेला व्यवसायच त्या त्या जाती करतात. येथें अन्य जातींचा व्यवहार निषिद्ध ठरतो. अन्य जातीचा स्वीकार करणेंहि पण अगदीं निषिद्ध मानलें जातें. उदाहरणार्थ, धनगरास कुणबी होतां येत नाहीं व कुणबी धनगर होऊं शकत नाहीं, तर मग ब्राह्मण क्षत्रिय होणें, क्षत्रिय वैश्य होणें व वैश्य शूद्र होणें हें दूरच राहिलें.

चांभार, महार, मांग, भंगी, ढोर इत्यादि अतिशूद्रांतून देखील रोटी-बेटीचा व्यवहार तर दूरच राहिला पण एकमेकाच्या हातचें पाणीसुद्धां आजहि ते पीत नाहींत.

'जातीभेद वेदकालीन नव्हे' या आक्षेपास डॉ. कीथ केंब्रिज इतिहासांत भारताचा उल्लेख करतांना काय उत्तर देतो तें पाहूं.

" The Rigweda certainly knows of a ruling class, Kshatriya, and the Vedic kingship was normally hereditary......... There are traces, moreover, of the devision of tribe into the holy (Brahman), the kingly ( Kshatriya ) and the commonalty. " ( Keith, Cambridge History. p. 93—94 )

—शासक क्षत्रिय जातीचा परिचय ऋग्वेदास चांगलाच आहे. वेदकालीं सुद्धां राज्यपद हें वंशपरंपरागत होतें. इतकेंच नव्हे तर त्या वेळींहि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि या खालील शूद्रादि जन्मगत जाती समाजांत प्रचलित होत्या याचा उल्लेखहि पण सांपडतो.

" There is a good reason to believe that in the period of the Rigweda the Priesthood and the Nobility were hereditary." (Cambridge History p. 126 )

—ऋग्वेदकालींहि जन्मानेंच ब्राह्मण-क्षत्रियादि जाती होत्या, कर्मानें नव्हे, हें विश्वसण्यास तशींच सबळ कारणें आढळतात. वर्णसंकराबद्दल याचें काय म्हणणें आहे तें पाहूं.

" There is no instance recorded in Vedic texts of a Vaishya rising to the state of a priest or prince " ( Cambridge History p. 127 )

—वैश्यानें आपली उन्नति करून घेऊन ब्राह्मणत्व अथवा क्षत्रियत्व संपादन केल्याचें एकहि उदाहरण वैदिक वाङ्मयांत आढळून येत नाहीं.

" The caste system existed substantially in the time of Yajurveda. " ( Cambridge History p. 55 )

—यजुर्वेदकालींहि वर्णव्यवस्था चांगलीच प्रचलित होती.

" It is probable enough that among the Sudras themselves there were rules of endogamy............ The Vedic Aryans and the aborigines alike married within the tribe. " ( Ibid p. 129 )

—शूद्रांमध्यें सुद्धां आपआपल्या जातींतच विवाह करण्याचे नियम होते. वैदिक आर्य तसेच अनार्य हे आपआपल्या जातींतील वधूंशींच विवाह करीत असत.

" The first is called the Brahmanas, men of pure conduct. They guard themselves in religion, live purely and observe the most correct principles. The second is called the Kshatriyas, the royal caste. For ages they have been the governing class. They apply themselves to virtue ( humanity ) and kindness. The third is

called Vaishyas, the merchant class; they engage in commercial exchange, and they follow profit at home and abroad. The fourth is called Sudra, the agricultural class; they labour in ploughing and tillage. In the four classes purity or impurity of caste assigns everyone to his place.........They do not allow marriages between relatives. A woman once married can never take another husband." ( Beal Hiuentsang, PP. 79—80 )

हुएनत्संग या पाश्चात्य पंडितानें प्राचीन भारतांतील वर्णविभागाविषयीं काय लिहिलें आहे तें पाहूं.

—चातुर्वर्णांपैकीं पहिल्या वर्णास ब्राह्मण असें म्हणतात. हे पवित्र आचरणाचे असतात. यांना धर्माचेंच कवच असतें. यांचें जीवन पवित्रपावन असतें. अचूक मूलग्राही सिद्धान्तांचें परिशीलन, ते आंगवळणीं पाडून घेणें हें त्याचें शीलच असतें. दुसऱ्या जातीला क्षत्रिय असें नांव आहे. हा राजवंश. पुरातन कालापासून राज्य करीत आलेली जात ही. मनुष्यत्वाला अनुरूप असणारे सर्व परोपकारादि सद्गुण यांच्या ठिकाणीं असतात. दया–दान–धर्म हे यांच्यांत पूर्णपणें वास करून असतात. तिसरी जात म्हणजे वैश्यांची. हा व्यापारी वर्ग, अर्थात व्यापार हाच याचा व्यवसाय असतो. देश-विदेशांतून क्रयविक्रयाच्या योगानें लाभ संपादन करणें हाच यांचा उद्योग. चौथी जात शूद्रांची होय. कृषि हेंच यांचें जीवन. जमीन नांगरणें, धान्य पेरणें हाच यांचा व्यवसाय. या चार जातींतील शुद्धाचारांचें तारतम्य हेंच त्या त्या जातींची स्थळमर्यादा आंखून देतें. यांच्यांत सगोत्र विवाह निषिद्ध आहे. कोणतीहि विवाहित स्त्री कधींहि पुनर्विवाह करीत नाहीं.

"The Brahmans study the four Vedashastras. The teachers must themselves have closely studied the deep and secret principles they contain and penetrated to their remotest meaning."

—ब्राह्मण चार वेद व सहा शास्त्रें यांचा अभ्यास करतात. आचार्य–अध्यापकांना वेदांच्या गंभीर आणि गूढ प्रमेयांचा खोलवर विचार करून मूलगामी सूक्ष्म दृष्टीनें त्यांचा पूर्ण शोध करून त्यांचें रहस्य उलगडून तें अंगवळणी पाडून घ्यावें लागतें.

"When they have finished their education, and have attained thirty years of age, then their character is formed and their knowledge is ripe. When they have secured an occupation, they first of all thank their master for his attention.

" There are some, deeply versed in antiquity, who devote themselves to elegant studies, and live apart from the world, and retain the simplicity of their character. These rise above mundane pursuits and are as insensible to renoun as to the contempt of the world. Their name having spread afar, the Rulers appreciate them highly, but are unable to draw them to court. The chief of country honours them on account of their ( Mental ) gifts, and the people exalt their fame and render them universal homage. This is the reason of their devoting themselves to the studies with ardour and resolution, without any sence of fatigue. ( Beal Hiuen-tsang, p. 83. )

—ज्या वेळीं ब्रह्मचारी आपलें अध्ययन पूर्ण करून तीस वर्षांच्या वयाचे होतात, तेव्हां त्यांचें लौकिक व पारमार्थिक व्यक्तिमत्व आकारास येऊन ज्ञानहि परिपक्व होतें. आपल्या जीवनांत स्वतःला प्राप्त झालेलें विद्यानैपुण्य, यश, अधिकार आणि वैभव यांचें श्रेय सर्वप्रथम ते आपल्या गुरूलाच देतात, व हें सर्व गुरूच्या कृपेचेंच फळ मानतात. अध्ययन पूर्ण झाल्यानंतर गुरूंनीं आपल्याकडे दक्षतेनें लक्ष पुरविल्याबद्दल कृतज्ञ असतात. अध्ययनान्तीं कृतज्ञतापूर्वक, शिष्य, मोठे परिश्रम सोसूनहि गुरुदक्षिणा देतात. त्यांपैकीं कांहीं जण निवृत्तिमार्गानुगामी होतात. हे सृष्टीच्या उपक्रमोपसंहाराच्या ज्ञानाचे गाढे विद्वान असतात. उच्च अशा वेदान्त शास्त्राच्या अभ्यासासाठींच त्यांनीं स्वतःला वाहून घेतलेलें असतें. सांसारिक जीवनाचा यांनीं त्याग केलेला असतो. जगाच्या व्यापापासून हे दूर असतात. विषयव्यामोह कसला तो यांना माहीतच नसतो. हे विरक्तीचे मूर्तिमंत पुतळेच असतात. यांच्यांत कसलीहि ऐहिक धडपड नसते. धन-कनक-कांता-पुत्रादिकांच्या मगरमिठींतून यांची कायमचीच सुटका झालेली असते. शीतोष्ण, निंदास्तुति, सुखदुःख, हानिलाभ यासारखीं कसलींहि द्वंद्वें त्यांना बाधत नाहींत. यांना दिव्य सामर्थ्य प्राप्त झालेलें असतें. त्यांची कीर्ति चोंहींकडे पसरलेली असते. राजे—महाराजांनाहि यांच्या ठिकाणीं अत्यधिक भक्ति, विश्वास असतो. आपल्या दरबारांत व राजमंदिरांत नेऊन त्यांचा गौरव करावा, त्यांची विविधोपचारांनीं सेवा करावी या उत्कट इच्छेनें त्यांची कितीहि प्रार्थना केली तरी तें त्यांना नको असतें. ते आत्मानंदानेंच तृप्त व तल्लीन असतात. त्यांच्या मनोजयादि अलौकिक गुणामुळें, असामान्य सामर्थ्यामुळें व दिव्य प्रभावामुळें राजे त्यांना पूज्य

मानतात, त्यांचा आदर राखतात. सर्व जनताहि त्यांची भक्त होऊन असते, सर्वच त्यांची कीर्ति वाखाणतात. मोठमोठ्या समुदायानिशीं त्यांचा आदर-सत्कार करतात. दुर्दम्य उत्साहानें, अचल धैर्यानें व अविश्रांत परिश्रमानें त्यांनीं जें आपल्याला तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाला वाहून घेतलेलें असतें, तेंच त्यांच्या या सर्वपूज्यतेचें कारण असतें.

" Simple living and high thinking "—साधी राहाणी आणि उच्च विचारसरणी या तत्त्वाच्या पूर्ण वास-स्थानाचा शोध घेण्याकरितां निघालेल्या पाश्चात्यांना येथले ब्राह्मण पाहून कृतकृत्यता वाटली. कंदमूलादिकांचा आहार, वल्कलादि वस्त्रें, अजातशत्रुत्व, सर्वसमत्व, सर्वभूतहित दृष्टि, निर्विषय आत्मतृप्ति, अचल समाधानाची शांतवृत्ति, निरुपद्रवी असें सरल आणि सुलभ जीवन, पराकाष्ठेचे उन्नत विचार इत्यादि हे असे पूर्वींच्या ब्राह्मणांचे नैसर्गिक गुण होते.

" **मनसि च परितुष्टे कोऽर्थवान् को दरिद्रः ।** "

तत्कालीन ब्राह्मणांना पाहिल्याबरोबरच या वाक्याचें सत्यत्व प्रत्यंतराला येई. त्यांचें दर्शन घेतल्याबरोबर " **स तु भवति दरिद्रो यस्य तृष्णा विशाला** " हें अगदीं बरोबर मनांत बिंबे. एक मन जर नेहमीं संतुष्ट असेल तर दरिद्री कोण आणि श्रीमंत कोण ? ' ज्याची हाव अधिक तोच खरोखर दरिद्री ' असा या वरील श्लोकचरणाचा अर्थ होतो. **यो मे गर्भगतस्यापि वृत्तिं कल्पितवान् प्रभुः । शेषवृत्तिविधानाय स किं सुप्तोऽथवा मृतः ॥** ज्या सर्वेश्वर परमात्म्यानें गर्भांत देखील माझें संगोपन केलें, माझ्या जीवनाची जबाबदारी पत्करली तो आजहि आहेच कीं नाहीं ! तो झोंपतहि नाहीं आणि मृतहि होत नाहीं, असें आहे तर मला माझ्या जीवनाची एवढी कां म्हणून चिंता लागावी ? **आयुरन्नं प्रयच्छति**—आयुष्यच अन्न पुरवितें, अशा दृढ विश्वासानें त्या वेळची ब्राह्मण जात अत्यंत निश्चिंत असे. वनोपवनांतल्या पवित्र वातावरणांत राहून आलेल्या विद्यार्थ्यांना पाठ सांगत ईश्वरचिंतनांत काळ घालवी. **भोजनाच्छादने चिन्तां वृथा कुर्वन्ति मानवाः । योऽयं विश्वंभरो देवः स भक्तान् किमुपेक्षते ।** हें वाक्य त्यांच्याविषयींची साक्ष पटवील. अन्नवस्त्राच्या बाबतींत मानव उगीच काळजी वाहतात. विश्वाचेंच जो पोषण करतो तो परमात्मा आपल्या अनन्य भक्तांचें पोषण करणार नाहीं ? भक्तांची उपेक्षा करील ? हा या श्लोकाचा अर्थ. **अनन्याश्चिंतयन्तो मां ये जनाः पर्युपासते । तेषां**

**नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्** । हें भगवंताचें वाक्य यांच्या बाबतींत सत्य होई. " बाळक जाणेना मातेसी । तिचें मन तयापासीं ॥ तैसा देव हा दयाळ । करी भक्तांचा सांभाळ ॥ " असा समर्थांचाहि अनुभव आहे. सत्तेच्या व ऐहिक वैभवाच्या शिखरावर असलेल्या राजांना सुद्धां हे अकिंचन ब्राह्मण प्रसंगीं परमेश्वराचें सर्वपोषकत्व ध्यानीं आणून देत असत, हें श्री समर्थ-शिववांच्या उदाहरणानें समजून येतें; खडकांतील बेडकीच्या गोष्टीची आठवण होते; त्यांचे " आम्ही काय कुणाचें खातों रे । तो राम आम्हांला देतो रे ।" हे चरण ऐकूं येतात; " खडक फोडितां सजीव बेडकी " हें पद डोळ्यांपुढें उभें राहतें. बाह्य दगदगीच्या जीवनाला कंटाळून, अनेक भौतिक सुखाच्या अधिकाधिक शोधांनीं वाढत गेलेल्या विषयवासनांच्या दाहान होरपळून, ' He whose wants are few, is happy '— ' ज्याच्या गरजा थोड्या तो सुखी ' या तत्त्वाचा पडताळा पटवून घेण्याकरितां निघालेल्या पाश्चात्य पंडितांना येथें आत्मसुखाचीं ' दोंदें ' येऊन निर्विषय तृप्तीची ढेकर देत असलेल्या ब्राह्मणांना बघून समाधान झालें. अशांपैकीं एका ऑलिव्हर गोल्डस्मिथनें आपल्या देशांत गेल्यानंतर ' सिटिझन ऑफ दी वर्ल्ड ' नांवाचा एक प्रबंध लिहून प्रसिद्ध केला. त्या प्रबंधाचा कांहीं भाग डोळे भरून पाहून पोट भरून आनंद मानूं या. पूर्वींच्या ब्राह्मणाविषयीं वर्णावें तितकें थोडेंच आहे. पण केवळ दीडशें वर्षांपूर्वींच्याच आमच्या पूर्वजांचें या वर्णनाच्या झरोक्यांतून दर्शन घेऊन तृप्त होऊं या :

" Hail O ! ye simple, honest Brahmanas of the East, ye noffensive friends of all that were born to happiness as well as you, you never sought a short-lived pleasure from the miseries of other creatures. You never studied the tormenting arts of ingenious refinement. You never looked upon a guilty meal. How much more purified and refined are all your sensations than ours ? You distinguish every element with the utmost precision, a stream untested before is a new luxury, a change of air is a new banquet too refined for western imaginations to conceive."

——साधु जीवनाच्या सरळ आणि परिशुद्ध पौर्वात्य ब्राह्मणांनो, तुमचा अखंड जयजयकार असो. तुम्ही, धन्य ! धन्य ! तुम्ही जगन्मित्र आहां, तुम्हीं विश्वबंधु आहां, तुमच्याप्रमाणेंच सत्य सुख संपादून कृतकृत्य होण्याकरितां जन्मास आलेल्या सर्वांवर तुमचें हार्दिक निःस्वार्थी प्रेम आहे. कोणालाहि

कसलाहि उपद्रव न होईल अशा तऱ्हेचें निरुपद्रवी जीवन तुमचें. स्वार्थाकरितां दुसऱ्यांना पिळवटून, त्यांचें सुख हरण करण्याची दुर्बुद्धि तुमच्या ठिकाणीं नाहीं. दुसऱ्यांना पीडा देऊनच प्राप्त होणाऱ्या व दुसऱ्यांच्या दुःखाकष्टांनीं थबथबलेल्या क्षणभंगुर सुखाच्या पाठीमागें तुम्ही कधींच लागलां नाहीं. प्रगतीच्या व नागरिकतेच्या पडद्याआड सभ्यतेनें परपीडा करण्याचें चातुर्य शिकविणाऱ्या, आध्यात्मिक उन्नतीला विघ्नरूप असणाऱ्या अनैसर्गिक सुधारणेच्या भौतिक विद्या केव्हांहि तुम्ही शिकलांच नाहींत. अशा तऱ्हेची प्रवृत्तीच तुमच्या ठिकाणीं नाहीं. सर्वसामान्य लोकांच्या तोंडाला पाणी सुटण्यासारख्या चटकदार, मांसादि उत्तेजक आहाराकडे तुमची दृष्टि चुकूनहि जात नाहीं. तें तुमच्या दृष्टीनें पाप ठरतें. त्यांत निरपराध प्राण्याची हिंसा होते, ही जाणीव तुम्हांला असते. या बाबतींत आपल्यासारखेच सर्व प्राण्यांना तुम्ही समजतां. आमच्या या आचारविचारांपेक्षां तुमचा तो पुण्यपावन आचारविचार पराकाष्ठेचा परिशुद्ध आहे ! उन्नत भूमिकेची उच्च नीति तुमची. विश्वादर्श पवित्रपावन जीवन तुमचें. त्यांत आध्यात्मिक विकास आहे. तुमची सदसद्विवेकशक्ति अगाध आहे. पंचभूतांचे व त्यांच्या कार्यांचे तुम्ही बिनचूक गुण जाणतां. प्रतिभूतांच्या उत्पत्तीचा यथार्थ परिचय तुम्हांला आहे. पंचभूतांचें व पांच भौतिक शरीरादिकांचें पृथःकरण करून तुम्ही यथार्थ परमात्मस्वरूप निवडून घेतां. निसर्गरमणीय स्थळीं ध्यानासक्त होऊन बसणें हेंच तुम्हांला अतिशय सुखाचें वाटतें. झुळझुळ वाहणाऱ्या पाण्याचे निर्मळ झरे, नवीन नवीन प्रवाह, रमणीय नद्या, दिव्य सरोवरें डोळ्यापुढें आलीं म्हणजे तुमच्या डोळ्याचें व मनाचें पारणें फिटतें. स्नान-संध्या करणें म्हणजे तुमचें नित्य नूतन भोगसुख. शहरांतील कृत्रिम वातावरण टाकून, संसारसुखाचें कल्पित वातावरण सोडून, निसर्गरमणीय असा पवित्र एकान्त सेवन करणें हेंच तुमचें मेजवानीचें जेवण, पंचपक्वान्नांचें भोजन, एक मोठा सण; पाश्चात्य सुधारणेच्या तर्कशक्तीला अंदाज बांधण्यासहि अशक्य होणारें, अगदींच अपरिचित असणारें, परमरमणीय, परमविशुद्ध, परमपावन जीवन तुमचें हें !

विदेशी आणि विधर्मी म्हणविणाऱ्या गुणग्राही पाश्चात्य पंडितांनीं निःपक्षपातानें, आपल्या देशधर्माचा दुरभिमान सोडून केलेल्या या वर्णनांत आर्य संस्कृतीचें महत्त्व सांठविलें आहे. त्यांचें औदार्यहि उठून दिसतें. ब्राह्मण आणि भारतीय संस्कृतीकडे पाश्चात्य किती गौरवपूर्ण, महत्त्वपूर्ण दृष्टीनें पाहतात

हें यावरून कळून येईल, ख्रिस्त-धर्म-प्रचारकांचीहि दृष्टि विशाल होईल. आमच्या संस्कृतीविषयीं तुम्ही आदर बाळगीत असाल, ग्वाही देत असाल तर मग आम्ही तीवर विश्वास ठेवूं, असें पाश्चात्य पंडितांजवळ सांगण्याचा प्रसंग गुदरलाच तर ते आपलें हृदय उकलून आर्य संस्कृतीचें महत्त्व दाखवितील व पूज्यत्व आणि प्रेम व्यक्त करतील यांत कांहीं संशय नाहीं. याला हीं वरील वाक्येंच प्रमाण आहेत.

आर्य संस्कृतीविषयीं पाश्चात्य पंडितांचें प्रेम, आदर व भक्ति इतक्या कोटीची श्रेष्ठ असल्यानंतर त्या संस्कृतीच्याच हिंदुजनांची कशी व किती असावयाला पाहिजे हें कैमुतिक न्यायानेंच सिद्ध होतें. वर्णव्यवस्थेविषयीं, ब्राह्मणांच्या आदर्श जीवनाविषयीं पाश्चात्यांचा आदर पुष्कळशा भारतीयांना आपलें मत बदलावयाला लावील, ब्राह्मण जातीविषयीं आदर उत्पन्न करील यांत संशय नाहीं. आर्य संस्कृतीच्या प्रमाण ग्रंथांतून ब्राह्मण जातीला जरी गुरुत्व दिलें असलें तरी समाजाच्या सुव्यवस्थेला सर्वांची सारखीच आवश्यकता दाखविली आहे: त्याच्या त्याच्या पूर्वार्जित संस्काराच्या अनुरूप भावी जीवनाला अनुकूल होण्याकरितां त्या त्या वर्णांत त्या त्या जीवांचा जन्म ईश्वराज्ञेनें होत असतो. यांच्या जन्म-धर्म-कर्मादिकांत असणारी भिन्नता म्हणजे एका देहाच्या शिर, बाहू, मांड्या व पाय असावेत त्याप्रमाणें आहे. विश्वरूपी परमात्म्याच्या या अवयवापासूनच त्यांची क्रमानें उत्पत्ति झाली. या वर्णांचें मूळ एक परमात्मा आहे. त्याच्या अखंड देहांत या सर्वांचा अंतर्भाव होतो. त्यामुळें येथें कोणी तशी द्वेषासूया निर्माण करणारी कोणतीहि कुहक भावना उत्पन्न करूं नये व करून घेऊं नये हें स्पष्टपणें शिकविलें आहे.

## वर्णांची उपयुक्तता

वायुपुराणांतील श्लोकांत वर्णाश्रमाच्या उपयुक्ततेसंबंधीं विचार आलेला आहे तो पाहूं:—

**यदि ते ब्राह्मणा न स्युर्ज्ञानयोगवहास्सदा ।**
**उभयोर्लोकयोर्देवि स्थितिर्न स्यात्समासतः ॥**

**यदि निःक्षत्रियो लोको जगत्स्यादधरोत्तरम् ।**
**रक्षणात् क्षत्रियैरेव जगद्भवति शाश्वतम् ॥**

तथैव देवि वैश्याश्च लोकयात्राहिताः स्मृताः ।
अनृतानुपजीवन्ति प्रत्यक्षफलदा हि ते ॥
शूद्राश्च यदि ते न स्युः कर्मकर्ता न विद्यते ।
त्रयः पूर्वे शुद्रमूलाः सर्वे कर्मकराः स्मृताः ॥

—ब्राह्मणांच्या ज्ञानविज्ञान-सामर्थ्यानें समाजाला अभ्युदयनिःश्रेयसांची प्राप्ति होऊन त्यांच्या योगसामर्थ्यानें समाजाचें रक्षण होत असल्यामुळें, अशा मार्गदर्शक ब्राह्मणांच्या अभावीं सर्व समाजाची स्थिति ढांसळून जाते. क्षत्रिय नसले तर समाज अधरोतर गर्तीस प्राप्त होतो—म्हणजे शासक वर्गाच्या अभावीं वर्णाश्रमाचा क्रम बिघडतो. खालच्या जातीकडून वरच्या जातीवर अतिक्रम होतो. वरवरच्या जाती मलीन होतात. स्वतः आपण वागून वर्णाश्रम—धर्माप्रमाणें प्रजेला वागविण्याची जबाबदारी शासक क्षत्रिय वर्गाकडेच असते. सत्वशील राजाकडून संरक्षण केल्या गेलेल्या प्रजेस शाश्वत स्वास्थ्य लाभतें. व्यापारांत बुद्धिमान असे दानधर्मशील श्रीमान् वैश्य नसले तर राष्ट्राची जीवनयात्राच कष्टप्रद होते. वैयक्तिक कौटुंबिक, सामाजिक, राष्ट्रीय, जागतिक, कोणतेंहि जीवन घ्या, तें सुखासमाधानाचें व्हावयाचें असेल तर संपत्ति ही पाहिजेच. धर्मानेंच अर्थशास्त्र हें वैश्यांकडे आहे. त्यांच्या संपत्तीचें साहाय्य जगास आवश्यक असतें. सुखमय राष्ट्राच्या समाधानी जीवनास या धनिक जातीची मदत आवश्यक असते. आपापल्या जीवनासाठीं प्रत्येकजण श्रीमंत आणि धार्मिक लोकांचा आश्रय करीतच असतो. अशा दृष्टीनें धनिक वर्ग हा अनेक लोकांच्या जीवनाचा मार्ग होतो. याप्रमाणें हा व्यापारी वर्ग आश्रित लोकांना प्रत्यक्ष फलदायी होत असल्यामुळें, हा नसेल तर सर्व राष्ट्र दरिद्र–दुर्मुख होतें, म्हणून या वर्गाची आवश्यकता असते. शूद्र नसले तर शेतकी व्यवसायच नाहींसा होईल. जीवनास अवश्य असें धान्य यांच्या श्रमानेंच राष्ट्रास मिळतें. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तिन्ही वर्गांनाहि यांची आवश्यकता आहे. यांच्याकडून मिळालेल्या अन्नाहारानें या तीन्ही वर्गांचें संगोपन होत असल्यामुळें जीवनाला हे मुख्य कारण होत. हा वर्ग श्रमजीवी आणि सेवापर होय. हा अर्थ ‘ कर्मकराः ’ या शब्दानें अभिप्रेत होतो.

वर्णव्यवस्था ही हिन्दु धर्माचें एक प्रमुख अंग, हिंदी संस्कृतीचें हें एक प्रमुख तत्त्व व अखिल मानव जीवनांतलें पूर्वकर्मार्जित स्थान होय. अखिल

समाजाच्या सुसंघटित जीवनाकरितां निसर्गतःच झालेला एक श्रमविभाग होय. हे चार वर्ण समाजाचे घटकावयवच होत. या सुसंघटित अवयवांनीं सुशोभित असणारें हें विश्व, परमात्म्याचा सुंदर स्थूल देह होय, हें 'पुरुषसूक्ता'च्या आधारें सिद्ध होतें. विश्व हेंच विराट रूप म्हणून म्हटलें जातें. '**विविधत्वेन राजत इति विराट्**'—विविधरूपानें विराजमान असणारा तो विराट. अखिल नामरूपांचें हें सामुदायिक स्वरूप. थोडक्यांत यालाच विश्व म्हणतात. हा एक परमात्म्याचा दिव्य स्थूल देह होय. देहाच्या आकृतीप्रमाणें या विश्वाच्या अभिमानी देवाच्या देहाचीहि कल्पना करावी लागते. अर्जुनाला या विराट् रूपाचें दर्शन होऊन जें संभाषण झालें तें एका विशिष्ट रूपानेंच झालें असलें पाहिजे. एकाच वेळीं विश्वांतल्या सर्व मुखांनीं विशिष्ट कांहीं सांगणें व ऐकणें दोन्हीहि संभवनीय होत नाहींत. विश्वांतल्या अखिल रूपांच्या अभिमानी देवाचा, एक सर्व-संग्राहक देह असला पाहिजे. हें "**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् । मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥**" (भ. गीता ११–७) या श्लोकावरून स्पष्ट होतें. या विराट् देहाच्या मुखापासून ब्राह्मण, बाहूपासून क्षत्रिय, मांड्यांपासून वैश्य व पायापासून शूद्र अशा क्रमानें या चार वर्णांची उत्पत्ति झाली असें खालील श्रुतिवचनांनीं कळून येतें.

**ब्राह्मणोस्य मुखमासीत् बाहू राजन्यः कृतः ।**
**उरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां॑ शूद्रो अजायत ॥**

यांत एका देहाच्या अवयवाप्रमाणें हे सर्व वर्ण एकवाक्यतेनें राहून आपापलीं कार्यें सुरळीतपणें पार पाडीत, सुखसमाधानानें असले पाहिजेत असा श्रुतीचा आशय आहे हेंहि यांतून स्पष्ट होतें. **सर्वस्यास्य तु सर्गस्य गुप्त्यर्थं स महाद्युतिः ॥ मुखबाहूरुपज्जानां पृथक्कर्माण्यकल्पयत्** । (मनु. १–८७) आपल्याकडून उत्पन्न झालेल्या सृष्टीच्या सुव्यवस्थ्यर्थ या भिन्न भिन्न वर्णांना तत्तदनुरूप पृथक् पृथक् धर्मकर्में त्या जगन्नियंत्या परमेश्वराकडूनच निर्णीत झालीं, हें या 'मनुस्मृती'च्या श्लोकावरून स्पष्ट होतें. वर्णधर्मकल्पना मानवजनित नव्हे हें यावरून कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे. तशींच चारी वर्णांना, सर्व मानवांनाहि सर्वसामान्य असणारीं धर्मकर्में सांगितलेलीं आहेत. प्रथम या चार वर्णांचीं धर्मकर्में बघूं या.

**अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा ।**
**दानं प्रतिग्रहं चैव ब्राह्मणानामकल्पयत् ॥** ( मनु. १–८८ )
**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥** (भ. गी. १८–४२)

—स्वतः वेदाध्ययन करणें व दुसऱ्यांनाहि शिकविणें, स्वतः यज्ञ करणें व क्षत्रियादिकांकडून करविणें, त्याचप्रमाणें स्वतः दान करणें व स्वतः दुसऱ्याकडून दानाचा स्वीकार करणें या सहा कर्मांखेरीज मनोनिग्रह, इंद्रियनिग्रह, तप, पावित्र्य, शान्ति, सरलता, वेदशास्त्रप्राविण्य, परमात्मसाक्षात्कार, कर्मोपासनेविषयींची आसक्ति, भक्ति, विश्वास आणि आस्तिक्यबुद्धि इत्यादि ब्राह्मणांना सांगितलेलीं धर्मकर्में होत.

**प्रजानां रक्षणं दानं इज्याध्ययनमेव च ।**
**विषयेष्वप्रसक्तिश्च क्षत्रियस्य समासतः ॥** ( मनु. १–८९ )
**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धेचाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥**

—प्रजारक्षण, दान, यज्ञ, अध्ययन, विषयाच्या ठिकाणीं अनासक्ति याखेरीज शौर्य, तेजस्विता, धैर्य, दक्षता, रणभूमीवरून पळ न काढणें म्हणजे शत्रूस पाठ न दाखविणें, प्रभुत्व हीं क्षत्रियांचीं स्वाभाविक धर्मकर्में होत.

**पशूनां रक्षणं दानमिज्याध्ययनमेव च ।**
**वाणिज्यं च कुसीदं च वैश्यस्य कृषिमेव च ॥**
**कृषिगोरक्षवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ॥** ( मनु. १–९० )

—गोरक्षण, दान, यजन, अध्ययन, व्यापार, व्याजबट्टा, शेतकी इत्यादि वैश्यांचीं स्वाभाविक धर्मकर्में होत.

**एकमेव तु शूद्रस्य प्रभुः कर्म समादिशत् ।**
**एतेषामेव वर्णानां शुश्रूषामनसूयया ॥**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥** (मनु. १–९१ )

या त्रैवर्णिकांची असूयारहित सेवा करणें हें एकच कर्म देवानें शूद्रांना नेमून दिलें. " विश्वस्य राजा " असें ऋग्वेदहि ज्याला म्हणतो त्या परमात्म्यानें चार वर्णांनाहि क्रमानुसार पृथक् पृथक् धर्मकर्में नेमून दिलीं, हें त्याच्या शासकत्वाला अनुरूपच झालें. इतःपर मानव जातीचीं सर्वसामान्य धर्मकर्में पाहूं या.

## सर्वसामान्य मानवधर्म

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।**
**एतत्सामासिकं धर्मं चातुर्वर्ण्येऽब्रवीन्मनुः ।।** (मनु. १०।६२)

निरनिराळ्या स्मृतींनीं सार्ववर्णिक धर्म सांगितले आहेत त्यांपैकीं हे धर्म मनूक्त आहेत. मागच्या श्लोकांत त्या सर्वांचा अंतर्भाव झाला आहे.

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।**
**दानं दया दमः शान्तिः सर्वेषां धर्मसाधनम् ।।**
( याज्ञ. स्मृ. अ. १–२ )

कोणासहि पीडा न देणें, सत्य भाषण करणें, परद्रव्याचा अपहार न करणें, मन आणि शरीर यांचें पावित्र्य राखणें, इंद्रियदमन करणें, यथाशक्ति दान देणें, आपत्कालीं दीनांचें रक्षण करणें, मनोजय असणें, अपकारकर्त्या-विषयीं उपकारबुद्धि बाळगणें हीं धर्मकर्में सर्व वर्णांनाहि, सर्व मानवजातीलाहि लागू आहेत, असें याज्ञवल्क्यांनीं सांगितलें आहे.

**अहिंसा सत्यमस्तेयमकामक्रोधलोभता ।**
**भूतप्रियहितेहा च धर्मोऽयं सार्ववर्णिकः ।।**

या श्लोकांत काम, क्रोध राहित्य आणि सर्व प्राणीमात्रांच्या हिताची इच्छा करणें हीं दोन लक्षणें अधिक दिसून येतात.

**सत्यमस्तेयमक्रोधः शौचं धीर्न्हीर्धृतिर्दमः ।**
**संयतेंद्रियता विद्या धर्मः सर्व उदाहृतः ।।**

सदसद्विवेकबुद्धि असणें, आपत्कालीं धैर्य बाळगणें, वेदशास्त्राविरुद्ध अथवा धर्माविरुद्ध वागण्याची लाज वाटणें, इंद्रियजय संपादणें, अध्यात्मविद्या अंगवळणीं पाडून घेणें हीं लक्षणें या श्लोकांत अधिक आहेत.

विष्णुपुराणांतील देवी अंशाच्या आठव्या अध्यायांतहि सर्व वर्णांचीं धर्मकर्में सांगितलीं आहेत. यांत गृहस्थांनाच उद्देशून बरींच लक्षणें आलेलीं आहेत.

**भृत्यादिभरणार्थाय सर्वेषां च परिग्रहः ।**
**ऋतुकालाभिगमनं स्वदारेषु महीपते ।।**
**दया समस्तभूतेषु तितिक्षा नाभिमानिता ।**
**सत्यं शौचमनायासो मंगलं प्रियवादिता ।।**

**मैत्र्यं स्पृहा तथा तद्वद्कार्पण्यं नरेश्वर ।**
**अनुसूया च सामान्या वर्णानां कथिता गुणाः ।।**

—आपल्या कुटुंबाच्या लोकांचें, सेवक जनांचें व तसेंच आश्रितांचें संगोपन होण्याकरितां नीतिन्यायानें द्रव्योपार्जन करणें, आवश्यक अशा इतर वस्तूंचाहि संग्रह करणें, आपापल्या सहधर्मचारिणीशींच ऋतुकालीं मात्र गमन करण, पाहिले चार दिवस, अकरावी आणि तेरावी रात्र, पर्व, तिथि, दुर्दिन इत्यादि वर्ज्य करून शुभमुहूर्तीं, सत्पुत्र-प्राप्तीकरितां रतीची इच्छा करणें, भूतदया, सहनशीलता, निरभिमानता, सत्यसंधत्व, बाह्यांतर पावित्र्य, अनायासाचें जीवन, स्वपर मंगलकारक वागणूक, सर्वदा हितमित मृदुमधुर असें प्रिय व सत्य भाषण, सर्वांशीं मित्रता, अत्याधिक आशेचा त्याग, हावरेपणा नसणें, औदार्य, द्वेषराहित्य, मत्सरराहित्य हे गुण सर्व वर्णांच्या गृहस्थांना आवश्यक आहेत व सर्व गृहस्थांत असावेत. विश्वांतील सर्व मानवांनाच अवश्य असणारीं हीं धर्मकर्में होत. जीवनाच्या नित्य व्यवहारांत आध्यात्मिक सुख-समाधानाचें दिव्य जीवन व्यतीत करणें मानवांचें एक मुख्य लक्षण आहे. परमात्म्याच्या कृपेला मनुष्य पात्र होण्यास कारणीभूत असणाऱ्या बहुतेक धर्मकर्मांचा समुच्चय खालील श्लोकांतून आढळेल. हे श्लोक ‘ भागवतां ’तील आहेत.

**सत्यं दया तपः शौचं तितिक्षेक्षा शमो दमः ।**
**अहिंसा ब्रह्मचर्यं च त्यागः स्वाध्याय आर्जवम् ।।**
**संतोषः समदृक्सेवा ग्राम्येहोपरमः शनैः ।**
**नृणां विपर्ययेहेक्षा मौनमात्मविमर्शनम् ।।**
**अन्नाद्यादेः संविभागो भूतेभ्यश्च यथार्हतः ।**
**तेष्वात्मदेवताबुद्धिः सुतरां नृषु पांडव ।।**
**श्रवणं कीर्तनं चास्य स्मरणं महतां गतेः ।**
**सेवेज्यावनतिर्दास्यं सख्यमात्मसमर्पणम् ।।**
**नृणामयं परो धर्मः सर्वेषां समुदाहृतः ।**
**त्रिंशल्लक्षणवान्राजन् सर्वात्मा येन तुष्यति ।।**

( श्रीमद्भा० १-११-८-१२ ).

सत्य, दया, तप, पावित्र्य, सहनशीलता, तात्त्विक दृष्टि, मनोनिग्रह, इंद्रियदमन, अहिंसा, त्या त्या आश्रमोक्त ब्रह्मचर्य, त्याग, स्तोत्रपाठ, ब्राह्मणांना

वेदपाठ, सरलस्वभाव, सदासंतोष, समदृष्टि, श्रेष्ठांची सेवा, रोग्यांची शुश्रूषा, शक्यतों हळु हळु विषयवासनांचा त्याग, भोगनिवृत्ति, निषिद्ध व अभिमानपूर्वक केलेल्या कर्माचें फळ अति दुःखमय असतें याचा विचार, वाक्संयम आत्मानात्मविवेक, पात्रतेप्रमाणें सर्व प्राण्यांना अन्नादिकांचें यथायोग्य वितरण, सर्व जीवमात्रांनाहि आपलें आत्मरूप इष्टदेवतारूप म्हणून पाहणें, परमात्म्याच्या सगुण चरित्रामृताचें व निर्गुण सिद्धांतांचें श्रवण करणें, त्याच्या दिव्य लीलांचें रसभरित कीर्तन करणें, कीर्तनसमयीं देहभान विसरणें, परमात्म्याचा तो लीलानुग्रह आठवणें व त्याच्या मंगल नामाचें अखंड स्मरण करणें, त्या आनंदांतच विरून जाणें, परमात्म्याच्या विविध प्रतिमांची सेवा, पूजा, होम, हवन, नमस्कार, दास्य, स्वतःला परमात्म्याचा दास मानणें, परमात्म्यावर सर्वांपेक्षां अधिक निःस्वार्थ प्रेम ठेवून त्याला जीवींचा जिवलग समजून जीवींचें इंगित कळविणें, त्याला सर्व समर्पण करून आपल्याला भिन्न न उरवितां त्यांतच समरसून जाणें. या तीस लक्षणांनीं युक्त असा धर्मच अखिल मानवधर्म होय. सर्वांचें शुद्ध रूप असणारा परमात्मा ज्याच्या योगानें संतुष्ट होऊन अशा सर्व अनन्य भक्तांना मुक्ति देतो, तो हा तीस लक्षणी धर्म सर्वथा सर्वांकडून सदा अनुष्ठेय असा आहे. या धर्माच्या आचरणानें अखिल मानवांनाच अभ्युदय-निःश्रेयसाची प्राप्ति होते यांत तिळमात्र संशय नाहीं. ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यासी या चार आश्रमांना चार प्रकारचें शास्त्रनिर्णित ब्रह्मचर्य आहे. अखिल स्त्रियांच्या ठिकाणीं मातृभावना ठेवणें हें ब्रह्मचर्याश्रमाचें ब्रह्मचर्य, आपल्या विवाहित स्त्रीशिवाय अन्य स्त्रियांच्या ठिकाणीं मातृदृष्टि ठेऊन ऋतुकालीं मात्र विधीला अनुसरून ईशनमनपुरःसर सत्पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें स्वस्त्रीशीं रत होणें हें गृहस्थांचें ब्रह्मचर्य होय. कायावाचामनेंकरून सर्वत्र निष्काम होणें, हें वानप्रस्थाश्रमाचें ब्रह्मचर्य आणि सर्वत्र नामरूपातीत आनंदघन स्वरूपाच्या अनुसंधानांत, नरनारी भेदरहित केवळ एक ब्रह्मानंदरूप होऊन राहणें हें संन्यासाश्रमाचें ब्रह्मचर्य होय.

अखिल मानव जातीचाच हा धर्म म्हणून येथें सांगितल्यामुळें ही विश्वधर्माचीच मीमांसा झाली. अखिल मानवांनीं आपलें आचरण कसें ठेवावें हें यांत स्पष्टपणें पाहावयास मिळेल. सत्य धर्माची दिशा कळून, यांत विश्वधर्माचें प्रतिबिंब स्पष्टपणें उठून दिसेल—विश्वधर्माच्या सूर्योदयाचें स्पष्ट दर्शन होईल.

* * *

## आदर्श पद्धतीचें रामराज्य ..................... २

आजपर्यंत हिंदुस्थान परकीयांच्या अमलाखालीं होता. त्यांचा तो असह्य जाच त्यानें आजपर्यंत सहन केला. पारतंत्र्याच्या त्या दुःखमय जीवनांत ' जीवनं भद्राणि पश्यति ' । हेंच एक धैर्य तो बाळगून होता. भविष्यकालाचीं सुखस्वप्नें पाहात कसें तरी तो आपलें जीवन कंठीत आला. परमात्म्याच्या कृपेनें त्याचें सुखस्वप्न खरें ठरलें व आज तो स्वातंत्र्य भोगीत आहे, स्वतंत्र राष्ट्र म्हणून मिरवीत आहे. रामराज्याचा दिव्य व मंगलमय उन्नत आदर्श आपल्या डोळ्यांपुढें ठेवून त्याला सर्वथैव अनुरूप असें स्वरूप भारताला प्राप्त व्हावें म्हणून येथील सर्व जनता तीव्रपणें इच्छीत आहे. त्यांची ही सदिच्छा पूर्ण होवो असें कोणीहि म्हणेल. तथापि ध्येयाची कल्पना प्रथम असावयाला पाहिजे, अशा दृष्टीनें रामराज्याच्या वर्णनाचें एकदां अवलोकन करूं या :

**प्रहृष्टमुदितो लोकस्तुष्टः पुष्टः सुधार्मिकः ।**
**निरामयो ह्यरोगश्च दुर्भिक्षभयवर्जितः ॥**
**न पुत्रमरणं केचिद् द्रक्ष्यन्ति पुरुषाः क्वचित् ।**
**नार्यश्चाविधवा नित्यं भविष्यन्ति पतिव्रताः ॥**
**न चाग्निजं भयं किंचिन्नाप्सु मज्जन्ति जन्तवः ।**
**न वातजं भयं किंचिन्नापि ज्वरकृतं तथा ॥**
**न चापि क्षुद्भयं तत्र न तस्करभयं तथा ।**
**नगराणि च राष्ट्राणि धनधान्ययुतानि च ॥**

—पाहावें तिथें रामराज्यांतली आखिल प्रजा हर्षपूर्ण दिसून येई. आनंदित दिसून येई. संतुष्ट दिसून येई. पुष्ट दिसून येई. सुधार्मिक दिसून येई. रोग म्हणून कसला तो कोणालाहि त्यावेळीं माहीतच नव्हता. सर्व रामराज्यांतच धन-धान्याची समृद्धि होती. त्यावेळीं दारिद्र्य आणि दुष्काळ हे शब्द ऐकूनहि कुणाला माहीत नव्हते. पुत्रशोकानें तळमळणारें एकहि हृदय त्यावेळीं दिसून येत नसे. कोणालाहि अकालीं मृत्यु नव्हता. बालविधवा आणि अपतिव्रता त्यावेळीं नव्हतीच. घर जळाल्याचें अथवा भाजल्याचें एकहि उदाहरण त्यावेळीं नव्हतें. कोणताहि प्राणी पाण्यांत बुडून मरत नसे. भर पावसाळ्यांतल्या भयंकर पुरानेंहि कोठें प्राणहानि झाली नव्हती. उभ्या रामराज्यांत कोठें वादळ

म्हणून झालें नाहीं, कीं कोठें वावटळ म्हणून उठली नाहीं. अंथरुणावर पडून कोणी कण्हत आहे असें कधींच कोठें त्यावेळीं आढळून आलें नव्हतें. अपरिचित स्थळीं गेल्यानंतर तेथें जेवणाचें कसें होईल ही चिंता त्यावेळीं कोणालाहि वाटत नव्हती. सर्व ठिकाणींहि आल्यागेल्याचें आतिथ्य यथायोग्य होई. द्रव्याची थैली खुशाल आपल्या उशाखालीं ठेऊन कोठेंहि कोणी निर्भयपणें झोंपत असत. चोर आणि चोरी हे शब्द त्यावेळीं ऐकूनहि माहीत नव्हते, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. यथेच्छ दार उघडें टाकून निर्धास्तपणें कोणीहि घराबाहेर जाई. किल्ली–कुलपाचा व्यवहारच नव्हता. गृह-मंदिरें, वृक्षलता, पुरें-पट्टणें अगदीं समद्ध होतीं. चोंहींकडेच त्या रामराज्यांत धन-धान्याची विपुलता होती. भारतवर्षाचें राज्यहि असलें रामराज्य व्हावयास पाहिजे.

## परवर्णाचें धर्माचरण त्याज्य

नाहीं म्हणावयाला कोण्या एका शूद्राच्या तपामुळें ब्राह्मणाचा एक मुलगा निवर्तल्याची कथा रामायणांत दिसून येते. आपल्या मुलाचें शव पुढें ठेऊन ब्राह्मण राजवाड्यापुढेंच आक्रोश करूं लागला. आपल्या राज्यांत असें अनिष्ट होण्यास कारण काय म्हणून रामानें चौकशी सुरू केली. वासिष्ठादि आपल्या मंत्रिमंडळापुढें हा प्रश्न ठेवला. त्यांतून नारदांनीं बोलण्यास सुरवात केली.

**हीनवर्णो नृपश्रेष्ठ तप्यते सुमहत्तपः ।**
**अद्य तपति दुर्बुद्धिस्तेन बालवधो ह्ययम् ।।**
**सत्वं पुरुषशार्दूल मार्गस्व विषयं स्वकं ।**
**दुष्कृतं यत्र पश्येथाः तत्र यत्नं समाचर ।।**
**एवं चेद्धर्मवृद्धिश्च नृणां चायुर्विवर्धनं ।**
**भविष्यति नृपश्रेष्ठ बालस्यास्य च जीवितम् ।।**

—( आपला सेवाधर्म टाकून ) ब्राह्मणांनीं करावयाचें तप शूद्र करीत असल्यामुळें या ब्राह्मण बालकाला हा अपमृत्यु संभवला आहे. त्याचें निवारण झाल्यास हा मुलगा आपोआप जीवन्त होईल, असें श्री-रामाच्या पृच्छेवरून नारदांनीं कळविलें. आपल्या वर्णाचा धर्म सोडून परवर्णाच्या धर्माचें आचरण करणाऱ्या त्या शूद्राला शोधून श्रीरामानें त्या कर्मापासून त्याला परावृत्त केलें न केलें तोंच इकडे तो ब्राह्मण बालक जीवंत

झाला. **यस्मिन्मुहूर्ते काकुत्स्थ शूद्रोऽयं विनिपातितः । तास्मिन्मुहूर्ते बालोऽसौ जीवेन समयुज्यत ।** ( वा. रा. उ. सर्ग ७६–१५ ) या शूद्राचें नांव ' शंबूक ' असें होतें. स्ववर्णधर्म सोडून वागल्याचें, अकालीं मरणाचें व पुत्रशोकाचें सबंध रामराज्यांत हें एकच उदाहरण आहे. या ब्राह्मणपुत्राच्या निधनाची वार्ता पसरते न पसरते तोंच त्याचें निवारणहि झालें. त्या ब्राह्मणाला पुत्रशोक जाणवतो न जाणवतो इतक्यांतच पुत्रशोकाची निवृत्ति झाली. ब्राह्मण-संततीच्या अकालीं मृत्यूचें कारण म्हणजे इतरांकडून केलें जाणारें ब्राह्मण-धर्माचें अनुष्ठान हें असें सिद्ध झाल्यास सांप्रत याबद्दल फार खोलवरच विचार करणें आवश्यक आहे. विधवाविवाहविषयक कायद्यापेक्षां वैधव्यच मुळीं न येण्याचा मार्ग यांत कांहीं सांपडतो काय याचा या कथासंदर्भानें विचार करावा. इतर जातींकडून आचरल्या जाणाऱ्या ब्राह्मणधर्माचें अनुष्ठान जसें बंद करावें लागेल तसेंच ब्राह्मण जातीकडून आचरल्या जाणाऱ्या वर्णेतराच्या धर्माचें वर्तनहि त्याच्या हिताच्या दृष्टीनें बंद करावें लागणार. हें असें झाल्यास सर्व वर्णांतूनच बालविधवांची संख्या निःसंशय नष्ट होईल. हा वरील कथाभाग वाल्मीकि रामायणाच्या उत्तरकांडांतर्गत ७३ व ७४ व्या सर्गांतून आला आहे. ७४ व्या सर्गाचा प्रारंभ **प्रस्थाप्य तु स शत्रुघ्नं भ्रातृभ्यां सह राघवः । प्रमुमोद सुखी राज्यं धर्मेण परिपालयन् ॥ ततः कतिपयाहःसु वृद्धो जानपदो द्विजः । मृतं बालमुपादाय राजद्वारमुपागमत् ॥** या दोन श्लोकां-पासून आहे. पुढच्या ३ पासून १८ व्या श्लोकापर्यंत ब्राह्मणाच्या पुत्रशोकाचें वर्णन त्याच्याच शब्दांत दिलें आहे. **एवं बहुविधैर्वाक्यैरुपरुध्य मुहुर्मुहुः ।** असा १८ व्या श्लोकाचा प्रारंभ होऊन येथें १८ वा सर्ग पूर्ण झाला आहे.

—प्रकृत विषयावर प्रकाश पाडणारे व अधिक माहिती देणारे कांहीं कांहीं वेंचक श्लोक आपण येथें मुद्दाम बघूं. **अप्राप्तयौवनं बालं पञ्चवर्षसहस्रकम् । अकाले कालमापन्नं......पश्यामि निधनं गतम् ।** केवळ पांच हजार वर्षांच्या, अजून तारुण्यहि प्राप्त न झालेल्या, त्यांतच अकालीं मृत्युमुखीं पडलेल्या मुलाला जें मी हें माझ्यापुढें बघतों आहें, तें माझ्या कोणत्या पूर्वदुष्कृताचें फळ कोणास ठाऊक? असा हा ४ व ५ या दोन्ही श्लोकांचा मिळून भावार्थ होतो. पांच हजार वर्षांचा हा मुलगा अजून ' अप्राप्तयौवन ' होता यावरून त्या वेळच्या आयुर्मानाची कल्पना करतां

येते. कृतयुगांत मानवांना 'एक लक्ष वर्षं' आयुर्मान होतें व पुढें तें १०।१० हिश्श्यानें कमी कमी होत कलियुगांत शंभर वर्षांचेंच मात्र राहिलें, असें जें इतर ग्रंथांतून दिसून येतें, त्याची येथें आठवण होते. पुढच्या ७ व्या श्लोकांत आपल्याकडून असें कोणतेंहि पातक घडलें नाहीं अशा अर्थाचा ब्राह्मणाचा विलाप आहे. तो श्लोक असा : **न स्मराम्यनृतं ह्युक्तं न च हिंसां स्मराम्यहम् । सर्वेषां प्राणिनां पापं कृतं नैव स्मराम्यहम् ॥** सबंध आयुष्यांत मी खोटें बोलल्याचें उदाहरण नाहीं. माझ्या हातून हिंसा म्हणून कसली ती आजपर्यंत झाली नाहीं, अखिल प्राण्यासंबंधींहि कोठें कांहीं पातक झालेलें मला आठवत नाहीं. तर मग हा मला पुत्रशोक कां? कोणाच्या पातकामुळें हा घडून आला? हा या श्लोकाचा भावार्थ. त्या वेळच्या माणसांचें कसें निर्दुष्ट जीवन होतें हें या श्लोकांतून स्पष्ट होऊन या उलट असणारें जीवनच पुत्रशोकाला कारणीभूत होतें, हें यांतून ध्वनित होतें. **केनाद्य दुष्कृतेनायं बाल एव ममात्मजः । अकृत्वा पितृकार्याणि गतो वैवस्वतक्षयम् ।** या श्लोकांत आपलें उत्तरकार्य व श्राद्धपक्षादि आपल्या मुलाच्या हातून व्हावींत ही इच्छा त्या वेळच्या माणसांतूनहि किती प्राबल्यानें वसत होती हें यावरून कळून येतें. **नेदृशं दृष्टपूर्वं मे श्रुतं वा घोरदर्शनम् । मृत्युरप्राप्तकालानां रामस्य विषये यथा ॥** रामराज्यांत अकालीं मृत्यु आलेला या ब्राह्मणालाहि आतांपर्यंत अश्रुत आणि अदृष्टपूर्व होता, हें या श्लोकावरून व्यक्त होतें. **न ह्यन्यविषयस्थानां बालानां मृत्युतो भयम् । स राजञ्जीवयस्वैनं बालं मृत्युवशं गतम् ॥** या व याच्या मागच्या दहाव्या श्लोकावरून राजा कोठें कांहीं चुकला तरच असा प्रजेला अकालीं मृत्यु येतो असें कळविण्याचा उद्देश ब्राह्मणाच्या वचनानें स्पष्ट होतो. या श्लोकांत राजा-प्रजाजनांत पितृ-पुत्राप्रमाणें संबंध असतो हें '**जीवयस्वैनं बालं**' या पदावरून व्यक्त होतें. येथें आपल्या मृत मुलाला उठविण्याची प्रार्थनाहि दिसून येते. **राजदोषैर्विपद्यन्ते प्रजा ह्यविधिपालिताः । असद्वृत्ते हि नृपतावकाले म्रियते जनः ।** राजाच्या कसल्याहि दोषामुळें अविधीनें प्रजेचें पालन होत असल्यास म्हणजे वर्णाश्रमोक्त प्रकारें प्रजेचें पालन होत नसल्यास प्रजा विपद्ग्रस्त होते, राजाच्या दुर्वृत्तामुळेंच प्रजेला अकालीं मृत्यु येतो हा सिद्धांत या श्लोकांत तर अगदीं उठून दिसतो. **पुरेषु जनपदेषु । पुरे जनपदे चापि ।** या पुढील श्लोकांच्या पदावरून राजांत व राज्यांत म्हणजे कोठेंहि कांहीं दोष किंवा प्रमाद संभवला तर असा अकालीं

मृत्यु येतो हेंहि सुचविलें आहे. यावरून राज्यधुरंधरांची जबाबदारी व्यक्त होते. **ततो द्विजा वसिष्ठेन सार्धमष्टौ प्रवेशिताः । राजानं देवसंकाशं वर्धस्वेति ततोऽब्रुवन् । मार्कंडेयोऽथ मौद्गल्यो वामदेवश्च काश्यपः । कात्यायनोऽथ जाबालिर्गौतमो नारदस्तथा । एते द्विजर्षभाः सर्वे आसनेषू-पवेशिताः ॥ मन्त्रिणस्तानुपाव्हयत्** । इत्यादि अठराव्या अध्यायाच्या श्लोकावरून श्रीरामाच्या मंत्रिमंडळाचा परिचय होतो. अष्टप्रधानांची कल्पना येथें व्यक्त होते. हें मंत्रिमंडळ सर्व ऋषिमुनि म्हणून म्हणवून घेणाऱ्या ब्राह्मणांचेंच होतें हेंहि आढळून येतें. ' वर्धस्वेति ' या शब्दावरून त्यावेळच्या राजाशीर्वादाची पद्धतिहि कळून येते. **यो ह्यधर्ममकार्यं वा विषये पार्थिवस्य तु । करोति चाश्रीमूलं तत्पुरे वा दुर्मतिर्नरः** । राज्यांत कोठेंहि अधर्म वा अकार्य झालें असतां तें राष्ट्राच्या संपत्तीचें नाशक होतें, हें या श्लोकावरून स्पष्ट होतें. **अधीतस्य च तप्तस्य कर्मणः सुकृतस्य च । षष्ठं भजति भागं तु प्रजा धर्मेण पालयन्** । प्रजेचें धर्मानें पालन केलें असतां प्रजेनें केलेल्या अध्ययनाचा, तपाचा, सत्कर्माचा एकषष्ठांश भाग राजाला मिळतो. उत्पत्तीचाहि एकषष्ठांश राजाला मिळतो हेंहि यांतून निघतें.

## आर्य संस्कृतीचा आदर्श पुरुष

आर्य अथवा हिन्दु सस्कृतीची आदर्श व्यक्ति, आदर्श पुरुष म्हणजे श्रीराम. **रामो विग्रहवान् धर्मः** ।—श्रीराम म्हणजे धर्माची केवळ साक्षात् मूर्तीच होय. **श्रीरामवद्वर्तितव्यं स धर्मः रावणवद्वर्तितव्यं सोऽधर्मः**।—श्रीरामाप्रमाणें वागणें म्हणजेच धर्म व रावणाप्रमाणें वागणें म्हणजेच अधर्म,अशा धर्म आणि अधर्माच्या व्याख्या विश्वमार्गदर्शनार्थ विद्वानांनीं करून ठेवल्या आहेत. श्रीराम हा मर्यादा पुरुषोत्तम होय. धर्म सोडून एक तसूभरहि इकडे तिकडे त्याचें पाऊल वांकडें पडत नसे. श्रीरामाच्या धर्माचरणाची ख्याति विश्वविख्यात आहे. **जज्ञे विष्णुः सनातनः** या वाल्मीकि रामायणाच्या प्रमाणावरून साक्षात् सनातन महाविष्णूच श्रीरामरूपानें ' लीलामानव तनुधारी ' होऊन भूतलावर अवतरला होता हें स्पष्ट आहे. सर्वतंत्रस्वतंत्र सर्व आयुष्यभर असूनहि देखील एवढ्या कांटेकोर रीतीनें धर्माचें पालन जें श्रीरामाच्या चरित्रांत आढळून येतें तें धर्माचें महत्त्व दर्शविण्याकरितां, अखिल मानवांना जीवनाचा एक धडा घालून देण्याकरितां, सन्मार्गदर्शन करून देण्याकरितां व प्रत्येक मनुष्याचें ' **प्लववदाचरणम्** '

म्हणजे नावेप्रमाणें स्वपर–तारक आचरण असावें, हें तत्त्व उलगडून दाखविण्या-करितां हें कोणाच्या लक्षांत येणार नाहीं? श्रीरामाच्या चरित्रांतील गर्भहेतु समजून आपण वागलों तर आम्हां सर्वांवर त्याचा अनुग्रह होऊन हिन्दुस्थानाचें आजचें राज्य अगदीं खरेंखुरें रामराज्य होईल यांत तिळमात्र संदेह नाहीं. ज्याची म्हणून आपल्याला कृपा हवी त्याचें इंगित ओळखून त्या धोरणानें आपल्याला वागावयास पाहिजे. श्रीरामरायाशीं सख्य संपादावयाचें ही कल्पना आल्याबरोबर श्रीसमर्थांनीं केलेलें सख्यभक्तीचें वर्णन चटकन डोळ्यापुढें उभें राहिलें. त्यांतील दोन तरी ओव्या उद्धृत केल्याशिवाय पुढें जाववत नसल्यानें अपरिहार्य होऊन येथें त्या उद्धृत करतोंच.

देवास जयाची अत्यंत प्रीती । आपण वर्तावें तेणें रीतीं ।
येणें करितां भगवंतीं । सख्य घडे नेमस्त ॥ ( दास. द. ४ स. ८ ओ. ३ )
आपण तैसोंचि वर्तावें । आपणासि तेंच आवडावें ।
मनासारिखें होतां स्वभावें । सख्य घडे नेमस्त ॥ (दास. द. ४ स. ८ ओ.५)

श्रीरामाच्या धर्माचरणाचा आदर्श पुढें ठेऊन वागण्याचा निश्चय केला तर आपोआप त्याच्याशीं सख्य वडेल.

## गांधीजींची रामभक्ति व सनातनित्व

राम आणि रामराज्य यांच्या ठिकाणीं असणाऱ्या उन्नत गुणांनीं गांधीजी आकर्षित झाले. मनामध्यें ठरविलेल्या आदर्श राज्याला ‘रामराज्य’ असें अत्युन्नत कीर्तीचें मंगलमय नांव त्यांनीं चोखाळूनच ठेविलें.

त्यांनीं स्वतः श्रीरामाचें दिव्य नाम मुखानें अखंड घेण्यास सुरुवात केली. भारतीय भावी रामराज्याकरितां आत्मसमर्पणहि केलें. ‘हे राम’ ‘हे राम’ असेच त्यांचे अंतकाळचे शब्द होते. **अंतकाले च मामेव स्मरन् मुक्त्वा कलेवरम् । यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥** (भ. गी. ८-५) भगवंताचेंच वाक्य नव्हे का हें!

१९२० सालच्या सप्टेंबर महिन्यांतील २९ दिनांकाच्या ‘यंग इंडिया’ नामक आपल्या पत्रांतून गांधीजी आपल्या स्वतःबद्दल काय लिहितात तें वघूं. ( १ ) मी वेद, उपनिषदें, पुराणें आदि सर्व हिन्दुधर्मग्रंथांना मानतों. ( २ ) ‘गोरक्षण’ या धर्मावर माझा पूर्ण विश्वास आहे. ( ३ ) मी वर्णाश्रमधर्मालाहि मानतों. ( ४ ) मूर्तिपूजेवरहि माझा अविश्वास नाहीं. या सर्व कारणांवरून मी

स्वतःला खरोखरीच ‘ सनातनी हिन्दु ’ म्हणूनच उद्घोषित करतों. हीं त्यांचीं वचनें त्यांनाच आदर्श म्हणून पुढें ठेवून, त्यांच्या मतानुसार राज्य चालविण्याकरितां परोपरीनें प्रयत्न करणाऱ्या पुढाऱ्यांनीं आठवावयाला पाहिजेत ना ?

‘ रामनामाचें महत्त्व ’ या विषयावर ‘ नवजीवन ’ या पत्रांतून त्यांनीं आपला स्वानुभव जो प्रगट केला आहे तो पाहूं. “ रामनामाच्या बलानें पाषाणसुद्धां तरले. रामनामाच्या बलानें यःकश्चित् वानरसेनेनें रावणाचा गर्व धुळीस मिळविला. रामनामाच्या आधारानें हनुमन्तानें समुद्र ओलांडिला. द्रोणागिरी उचलला. सती सीता कित्येक दिवसपर्यंत त्या राक्षसांच्या ताब्यांत राहून देखील आपलें सतीत्वाचें संरक्षण ती केवळ रामनामामुळेंच निर्धास्तपणें करून होती. रामविरहाच्या मरणप्राय परिस्थितींत देखील या श्रीरामनामाच्या मुळेंच भरतानें आपले प्राण वांचविले व लक्ष्मणानें चौदा वर्षें निद्राआहारांचा त्याग केला. या रामनामाशिवाय दुसरा ध्यास त्यांना नव्हता. त्यांच्या कंठनाळांतून एक रामनामाचेंच वास्तव्य होतें. या सर्व प्रमाणांवरून कलिकल्मष सारें धुवून टाकण्याकरितांच या रामनामाचा भूतलावर जन्म झाला आहे, असें श्रीतुलसीदासांनीं म्हटलें आहे. दुसऱ्यांचें कशाला माझाच अनुभव पाहा ना ! हा मी माझाच अनुभव तुमच्यापुढें ठेवतों. व्याभिचारापासून जर मीं कशामुळें परावृत्त झालों असेन तर तें या रामनामामुळेंच. दुर्दम्य मनाच्या त्या दुष्ट प्रवृत्तींना जिंकण्याचें सामर्थ्य मला या रामनामामुळेंच प्राप्त झालें. ज्या ज्या वेळीं माझ्यावर कठीण प्रसंग आले त्या त्या वेळीं मी या रामनामानेंच त्यांतून वांचलों. अनेक संकटांतून या रामनामानेंच माझें संरक्षण केलें. कोट्यवधि लोकांचें नेतृत्व करण्यास व त्यांच्या त्या मनाचें अनुसंधान राखून त्यांची एकवाक्यता घडवून आणण्यास, समाजांतून सुंदर एकोपा निर्माण करण्यास या रामनामाच्या अखंड स्मरणासारखें दुसरें कोणतेंहि इतकें सबल व सुंदर साधन नाहीं. ”

गांधींचा हा अनुभव श्रीरामनामाच्या महत्त्वासंबंधीं श्रीसमर्थांनीं केलेल्या उपदेशाची आठवण करून देतो. महाराष्ट्रांत मनोबोधाचा आणि श्रीदासबोधाचा सर्वत्र प्रचार आहे. त्या गोड वचनांपैकीं कांहीं येथें आठवणीकरितां उद्धृत करूं.

**मनोबोध**

जयाचेनि नामें महादोष जाती । जयाचेनि नामें गती पाविजेती ।
जयाचेनि नामें घडे पुण्यठेवा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ ७१ ॥

बहूनाम या रामनामीं तुळेना । अभाग्या नरा पामरा हें कळेना । विषा औषध घेतलें पार्वतीशें । जिवा मानवा किंकरा कोण पूसे ॥ ८२ ॥ जेणें जाळिला काम तो राम ध्यातो । उमेशीं अती आदरें गूण गातो । बहू ज्ञान वैराग्य सामर्थ्य जेथें । परी अंतरीं नाम विश्वास तेथें ॥ ८३ ॥ मुखीं राम विश्राम तेथेंचि आहे । सदानंद आनंद सेऊनि राहे । तयावीण तो शीण संदेहकारी । निजधाम हें नाम शोकापहारी ॥ ८६ ॥ मुखीं राम त्या काम बाधूं शकेना । गुणें इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना । हरीभक्त तो शक्त कामासी मारी । जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी ॥ ८७ ॥ बहू चांगलें नाम या राघवाचें । अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें । करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें । जिवा मानवा हेंचि कैवल्य साचें ॥ ८८ ॥ हरीनाम नेमस्त पाषाण तारी । बहू तारिले मानवदेहधारी । तया रामनामीं सदा जो विकल्पी । वदेना कदा जीव तो पापरूपी ॥ ९८ ॥ जगीं धन्य वाराणशी पुण्यराशी । तयेमाजी जातां गती पूर्वजांसी । मुखें रामनामावळी नित्यकाळीं । जिवा हीत सांगे सदा चंद्रमौळी ॥ ९९ ॥ हरीकीर्तनें प्रीति रामीं धरावी । देहेबुद्धि निरूपणें वीसरावी । परद्रव्य आणीक कांता परावी । यदर्थीं मना सांडि जीवीं करावी ॥ १०२ ॥

## दासबोध

सकळ जनामध्यें नाम । रामनाम उत्तमोत्तम । श्रम जावोनि विश्राम । चंद्रमौळी पावला ॥ १६ । ८ । ३ ॥ कोडें सांकडें संकट । नाना संसार खटपट । अवस्था लागतां चटपट । नामस्मरण करावें ॥ ४।३।६. चालतां बोलतां धंदा करितां । खातां जेवितां सुखी होतां । नाना उपभोग भोगितां । नाम विसरों नये ॥ ७ ॥ नामें संकटें नासती । नामें विघ्नें निवारती । नामस्मरणें पाविजेति । उत्तमपदें ॥ ११ ॥ भूत पिशाच्य नाना छंद । ब्रह्मगिऱ्हो ब्राह्मण समंध । मंत्रचळ नाना खेद । नामनिष्ठें नासती ॥ १२ ॥ नामें विषबाधा हरती । नामें चेडे चेटकें नासती । नामें होये उत्तम गती । अंतकाळीं ॥ १३ ॥ बाळपणीं तारुण्यकाळीं । कठिण काळीं वृद्धाप्यकाळीं । सर्वकाळीं अंतकाळीं । नामस्मरण असावें ॥ १४ ॥ नामाचा महिमा जाणे शंकर । जना उपदेसी विश्वेश्वर । वाराणसी मुक्तिक्षेत्र । रामनामें करूनी ॥ १५ ॥ उफराट्या नामासाठीं ।

वाल्मिक तरला उठाउठी। भविष्य वदला शतकोटी। चरित्र रघुनाथाचें ॥ १६ ॥ नामें पाषाण तरले। असंख्यात भक्त उद्धरले। महापापी तेचि जाले। परम पवित्र ॥ १८ ॥ नाम स्मरे निरंतर। तें जाणावें पुण्य शरीर। माहांदोषांचे गिरीवर। रामनामें नासती ॥ २२ ॥ अगाध महिमा नवचे वदला। नामें बहुत जन उध्दरला। हळहळापासून सुटला। प्रत्यक्ष चंद्रमौळी ॥ २३ ॥ चहूं वर्णां नामाधिकार। नामीं नाहीं लाहान थोर। जडमूढ पैलपार। पावती नामें ॥ २४ ॥

महाराष्ट्रांत बहुतेक ठिकाणीं सायंकाळीं सर्व मुलेंबाळें देवापुढें बसून ‘ रामरक्षा ’ म्हणतात. नयनश्रवणमनोहर वाटतें. त्यांतील रामानामासंबंधीं येथें आठवलेले दोनच श्लोक देतों. **पातालभूतलव्योमचारिणश्छद्मचारिणः। न द्रष्टुमपि शक्तास्ते रक्षितं रामनामभिः** ॥ ११ ॥ **रामेति रामभद्रेति रामचन्द्रेति वा स्मरन्। नरो न लिप्यते पापैर्भुक्तिं मुक्तिं च विन्दति** ॥ १२ ॥ स्वर्गमृत्युपाताळांतून कोठेंहि किती कपटानें देवदानवमानवादिपैकीं कोणीहि कसेंहि करून कितीहि खटपटी केल्या तरी रामनामानें रक्षित असलेल्याला दुःख देणें राहिलेंच, नुसतें त्याचेकडे बघणेंहि शक्य नाहीं. राम, रामभद्र, रामचंद्र म्हणून जो श्रीरामाचें नामस्मरण करतो, त्याला पाप आणि पाप्यांचा स्पर्शच होत नाहीं, म्हणजे त्याच्या वाटेलाच तें जात नाहींत असा अर्थ.

वेदांतहि नामाचें महत्त्व फार आहे. कांहीं वेदवचनें उद्धृत करितों. ओघानेंच एक विषय संपूर्ण होत आहे. वेदांत नाममहिमा नाहीं, नामस्मरण हें वैदिक नव्हे, वेदांत नामाचा उल्लेख नाहीं, असें म्हणणाऱ्यालाहि तें कळून येईल. **मनामहे चारु देवस्य नाम** ॥ ( ऋ० १।२४।१ ) **भूरि नाम वन्दमानो दधाति** ॥ ( ऋ० ५।३।१० ) **मर्त्या अमर्त्यस्य ते भूरि नाम मनामहे** ॥ (ऋ० ८।११।५) **विश्वाहि वो नमस्यानि नामान** (ऋ० १०।६३।१ **यस्य नाम महद्यशः** ॥ (यजु० ३२।३ ) **सदा ते नाम स्वयशो विवक्मि** ॥ ( सामवेद ५०।३।४।२ ) **यत् ते नाम सुहवम्** ॥ ( अथर्व० ७।२०।२१ ) **नाम उपास्व** ॥ ( छां० ७।१।४ )

आजपर्यंत कितीतरी सम्राट झाले असतील, कित्येकांनीं तरी या संमुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य केलें असेल पण श्रीरामाची सर कोणालाहि

नाहीं. श्रीरामाची उपासना अमित कालापासून ज्याप्रमाणें चालत आलेली आहे त्याप्रमाणें कोणत्याहि सम्राटाची उपासना चालू नाहीं. रामाचें नांव त्याच्या राज्याला प्राप्त झाल्याप्रमाणें कोणत्याहि राजाचें नांव त्याच्या राज्याला प्राप्त झालें नाहीं. या सर्व दृष्टीनें श्रीरामाचें व त्याच्या राज्यपध्दतीचें महत्त्व पटवून घेतां येईल व त्याचें श्रेष्ठत्व ओळखतां येईल, '**रामो राजमणिः सदा विजयते**' यांतलें मर्म लक्षांत घेतां येईल.

## वाल्मीकि–नारदसंवाद

**तपःस्वाध्यायनिरतं तपस्वी वाग्विदां वरम् ।**
**नारदं परिपप्रच्छ वाल्मीकिर्मुनिपुंगवम् ॥** ( वा. रा. बा. कां.स.१-१ )

श्रीवाल्मीकि रामायणाचा हा सर्वप्रथम श्लोक आहे. श्री वाल्मीकि–नारद-संवादाला येथूनच प्रारंभ झाला. श्रीरामाचें विभूतिमत्व आणि आदर्शत्व निदर्शनास आणून देणाऱ्या यापुढील श्लोकांचा विचार करूं. वाल्मीकि नारदाला विचारतात :

**को न्वस्मिन् सांप्रतं लोके गुणवान् कश्च वीर्यवान् ।**
**धर्मज्ञश्च कृतज्ञश्च सत्यवाक्यो दृढव्रतः ॥** ( वा. रा.बा.कां.स. १-२)
**चारित्रेण च को युक्तः सर्वभूतेषु को हितः ।**
**विद्वान्कः कः समर्थश्च कश्चैकः प्रियदर्शनः ॥**
**आत्मवान् को जितक्रोधो द्युतिमान् कोऽनसूयकः ।**
**कस्य बिभ्यति देवाश्च जातरोषस्य संयुगे ॥** (वा.रा.बा.कां.स.१-३,४)

——अखिल विश्वांत गुणाढ्य, पराक्रमशाली, धर्मज्ञ, कृतज्ञ, सत्यसंध, सत्य-संकल्प, सच्चरित, सर्वभूतहितैषी असा आज कोण आहे ? विद्वान असून समर्थ, समर्थ असून विश्वमोहक, विश्वमोहक असून जितेंद्रिय असा आत्मनिष्ठ आज कोण आहे ? कोणी आज क्रोधाला जिंकलें आहे ? जगांत आज अत्यंत तेजस्वी असा कोण आहे ? कोण असा आज रागद्वेषशून्य सर्वसम म्हणवून घेतो ? दुष्टदमनाकरितां कोपानें ठाण देऊन उभा राहिला असतां देवदेवतांचीसुद्धां पांचावर धारण बसवणारा असा कोण महावीर्यशाली आज आहे ?

नारद उत्तर देतातः

**इक्ष्वाकुवंशप्रभवो रामो नाम जनैः श्रुतः ।**
**नियतात्मा महावीर्यो द्युतिमान् धृतिमान्वशी ॥**

**बुद्धिमान् नीतिमान् वाग्मी श्रीमान् शत्रुनिबर्हणः ॥**

( वा. रा. बा. कां. स. १–९ )

—असा एक इक्ष्वाकुवंशोद्भव श्रीराम मात्र आहे. इंद्रियमनांवर याचा पूर्ण ताबा आहे. अद्‌भुत पराक्रम याच्या ठिकाणीं आहे. याच्या सामर्थ्याला जोड नाहीं. महान् तेजस्वी ! महान् धैर्यशाली ! महान् लोकप्रिय ! अति बुद्धिमान ! उत्कृष्ट नीतिमान् ! अगाध वक्ता ! अपार धनाढ्य ! सकलशत्रुविनाशक असा अलोट शक्तिमान् !

**विपुलांसो महाबाहुः कंबुग्रीवो महाहनुः ।**
**महोरस्को महेष्वासो गूढजत्रुररिंदमः ॥**
**आजानुबाहुः सुशिराः सुललाटः सुविक्रमः ।**
**समः समविभक्तांगः स्निग्धवर्णः प्रतापवान् ।**
**पीनवक्षा विशालाक्षो लक्ष्मीवान् शुभलक्षणः ॥**

( वा. रा. बा. कां. स. १ )

—उंच खांदे, आजानुबाहु, शंखाकृती कंठ, आकर्षक कपोल, मनोहर हनुवटी, विशाल असें भरीव वक्षस्थल, त्याच्या हातांतलें तें दीर्घ धनुष्य, त्याची ती भव्य तशी सुंदर आकृति हीं सकळ लक्षणें त्याच्या अलौकिक पराक्रमाची साक्ष देतात, निरवधि पौरुषाची ग्वाही पटवितात. त्याचा शिरोभाग, ललाट सारेच शरीराचे अवयव त्याचें दिव्य विभूतिमत्व प्रगट दर्शवितात. याच्या पराक्रमाच्या अत्युग्र विवेकाचें शांत व अति गंभीर तेजहि त्याच्या मुखावर झळकतांना दिसतें. दर्शनमात्रें कर्तुमाकर्तुमन्यथाकर्तुं समर्थ असा साक्षात् परमेश्वरच भूभारहरण करण्याकरितां स्वतः अवतरला आहे अशी सर्वांची भावना होते. त्याचे सर्व अवयव प्रभुत्वसूचक आहेत. सर्वांनाहि तो प्रत्यक्ष थोर आधार वाटतो. त्याच्या ब्रह्मस्वरूपाचा परमानंद दर्शनानेंच इतरांच्या मनांत बिंबतो. त्याचा तो गोड स्वर, त्याची बोलण्याची पद्धत, चालण्याची ढब, पाहण्याची दृष्टि, सर्वच त्याच्याविषयीं एक दिव्य भावना निर्माण करतात. त्याच्या धवल हासानें मुग्ध न झालेला प्राणीच नाहीं. याचें सर्वच कांहीं अवर्णनीय आहे. एकंदरींत हा अखिल कल्याण–गुणगणरत्नाकरच आहे यांत संशय नाहीं. अखिल नक्षत्रांनीं जसा चंद्र तसा अखिल सज्जनसमूहांनीं हा श्रीराम अति शोभायमान वाटतो. याचें वसिष्ठादि मंत्रिमंडळ प्रभावळीप्रमाणें

याची शोभा वाढवितें. ब्राह्मणांवर त्याची अतिशय भक्ति असून वसिष्ठापासून याला विद्या प्राप्त झाली आहे. मृदुमधुर अशा प्रेमळ भाषणानें हा सर्वांचेंच चित्त रिझवतो, सर्वांचाच गौरव राखतो, सर्वांनाच आनंद उत्पन्न करतो. याचे सर्व अवयव वज्राप्रमाणें कठीण असले तरी तितकेच ते कमनीय व कोमल आहेत. शास्त्रीय आचरणाची व धर्माची राम म्हणजे एक ओतीव मूर्तीच आहे, सर्व शास्त्रीय शुभलक्षणांची एक मूसच आहे.

आदर्श रामचरित्र

**धर्मज्ञः सत्यसंधश्च प्रजानां च हिते रतः ।**
**यशस्वी ज्ञानसंपन्नः शुचिर्वश्यः समाधिमान् ॥ १२ ॥**
**प्रजापतिसमः श्रीमान् धाता रिपुनिषूदनः ।**
**रक्षिता जीवलोकस्य धर्मस्य परिरक्षिता ॥ १३ ॥**
**रक्षिता स्वस्य धर्मस्य स्वजनस्य च रक्षिता ।**
**वेदवेदांगतत्त्वज्ञो धनुर्वेदे च निष्ठितः ॥ १४ ॥**
**सर्वशास्त्रार्थतत्त्वज्ञः स्मृतिमान् प्रतिभानवान् ।**
**सर्वलोकप्रियः साधुरदीनात्मा विचक्षणः ॥ १५ ॥**
**सर्वदाभिगतः सद्भिः समुद्र इव सिंधुभिः ।**
**आर्यः सर्वसमश्चैव सदैव प्रियदर्शनः ॥ १६ ॥**
**स च सर्वगुणोपेतः कौसल्यानंदवर्धनः ।**
**समुद्र इव गांभीर्ये धैर्येण हिमवानिव ॥ १७ ॥**
**विष्णुना सदृशो वीर्ये सोमवत्प्रियदर्शनः ।**
**कालाग्निसदृशः क्रोधे क्षमया पृथिवीसमः ॥ १८ ॥**
**धनदेन समस्त्यागे सत्ये धर्म इवापरः ।**
**तमेवं गुणसंपन्नं रामं सत्यपराक्रमम् ॥ १९ ॥** (वा. रा. बा. स. १)

—या श्रीरामाच्या आचार-विचारांतून त्याची ज्ञानविज्ञानसंपन्नता साहजिकच प्रगट होते. याचें शरणागतवात्सल्य अपूर्व आहे. प्रजाधर्म, राजधर्म, पितृधर्म, मातृधर्म, सतिधर्म, पतिधर्म, पुत्रधर्म, बंधुधर्म, वर्णधर्म, आश्रमधर्म, प्रवृत्तिधर्म, निवृत्तिधर्म, व्यक्तिधर्म, समाजधर्म इत्यादि त्याला चांगले अवगत आहेत. तो सत्यप्रतिज्ञ असून त्याला दोनदां बोलणें माहीतच नाहीं. प्रजेच्या सार्वांगिक हिताविषयीं तो सदव दक्ष असतो. त्याची यशकीर्ति

चोहींकडे पसरली आहे. तो सर्वज्ञ आहे. त्याचा स्वभाव अति सरल असून त्याचें अंतःकरण अतिशय शुध्द आहे. त्याच्या दर्शनानें लोकांच्या मनांत पवित्र भावनाच निर्माण होते. नरनारायणाप्रमाणें याचें वैराग्य आहे. प्रजेमध्यें हा प्रजापतीप्रमाणें शोभतो. हा सद्वृत्तिपोषक, सज्जनरक्षक, दुष्टसंहारक व आपल्या आचार–विचार आणि प्रचार द्वारां धर्माचें रक्षण करणारा आहे. विश्वरक्षणाच्या बाबतींत तर हा प्रत्यक्ष विष्णुच वाटतो. आपला क्षत्रियधर्म सोडून एक पाऊलहि हा इकडे तिकडे कधीं टाकीत नाहीं. शास्त्रांचा तत्त्वार्थ त्याला चांगला अवगत असून आत्मविस्मृति त्याला कधीं होतच नाहीं. त्याची धारणाहि पण असाधारण आहे. विचारलेल्या वादग्रस्त प्रश्नांचीं तो योग्य व समर्पक उत्तरें देतो. समुद्राला आपोआप जशा सर्व नद्या येऊन मिळतात त्याप्रमाणें सर्व लोक याला शरण येत असतात. याच्या सर्व लक्षणांनीं हा आर्य वाटतो. सर्वांविषयींच्या समतोल वर्तनानें सर्वांना हा संतुष्ट करीत असतो. दर्शनमात्रेंकरून आनंद उत्पन्न करणाऱ्या याच्या दर्शनार्थ मोठ्या उत्साहानें लोकांच्या झुंडीच्या झुंडी नित्य लोटतात. सर्व गुणालंकृत असा हा श्रीराम माता कौसल्येच्या आनंदसमुद्राला भरती आणणारा एक निष्कलंक चंद्रच आहे. शतकोटी मन्मथापेक्षांहि अधिक याचें सौंदर्य आहे. धरणीप्रमाणें याची धारणा आहे. बृहस्पतीप्रमाणें याची बुध्दिमत्ता आहे. यमधर्माप्रमाणें याचा दंड आहे. सर्वच याचें अवर्णनीय आहे. तशाच सबळ कारणाखेरीज श्रीरामाला कधीं क्रोध येत नाहीं. धर्माविरुध्द आचरण करून सज्जनांना अकारण पीडा देणाऱ्या उन्मत्त दुष्टांना मात्र तो कालाग्नीप्रमाणें भासतो; अन्यथा तो सदाच शांत असतो. क्षमा हा त्याचा उपजत गुण आहे. अत्युन्नत मानवधर्माचे धडे देणारें हें श्रीरामचरित नित्य पठनीय, मननीय आणि अनुकरणीय आहे.

**अहं वेद्मि महात्मानं रामं सत्यपराक्रमम् ।**
**वसिष्ठोऽपि महातेजा ये चेमे तपसि स्थिताः ॥**

(वा. रा. बा. कां. स. १९–१४)

यज्ञाच्या रक्षणासाठीं श्रीरामाला आपल्याबरोबर नेण्याकरितां आलेल्या विश्वामित्राचें हें वाक्य आहे. बाल्यावस्थेंतच श्रीरामाचें सार्वांगिक थोरपण सर्व महात्म्यांना विदित होतें; असें यावरून स्पष्ट दिसतें. या श्रीरामाचें माहात्म्य काय हें मी एकट्यानेंच जाणलें आहे, असें नसून याचें माहात्म्य वसिष्ठांनाहि

पूर्णपणें माहीत आहे; व जे जे आत्मतपोमग्न आहेत त्या सर्वांनाहि तें ठाऊक आहे. असें या वरील श्लोकांत विश्वामित्रानें म्हटलें आहे. या ठिकाणीं **वेदाहमेतं पुरुषं महान्तम्** । या वैदिक ऋचेची आठवण होते.

अयोध्या कांडाच्या प्रथम सर्गांत ह्या ९ व्या श्लोकापासून ते ३२ व्या श्लोकापर्यंत व दुसऱ्या सर्गांत ह्या २८ व्या श्लोकापासून ते अध्याय संपेपर्यंत श्रीरामाचें वर्णन आहे. **सौंदर्यैर्वा गुणैर्वा रघुपतिसदृशो नास्ति देवो द्वितीयः** हेंच तत्त्व यांतून ओतप्रोत भरलें आहे. 'दास म्हणे रघुनाथाचा गुण घ्यावा' या श्रीसमर्थ–उक्तीची या ठिकाणीं आठवण होते.

**" स हि रूपोपपन्नश्च वीर्यवाननसूयकः ।**
**भूमावनुपमः सूनुर्गुणैर्दशरथोपमः ॥ ९**
**स च नित्यं प्रशान्तात्मा मृदुपूर्वं च भाषते ।**
**उच्यमानोऽपि परुषं नोत्तरं प्रतिपद्यते ॥ १०**
**कदाचिदुपकारेण कृतेनैकेन तुष्यति ।**
**न स्मरत्यपकाराणां शतमप्यात्मवत्तया ॥ ११**
**शीलवृद्धैर्ज्ञानवृद्धैर्वयोवृद्धैश्च सज्जनैः ।**
**कथयन्नास्त वै नित्यमस्त्रयोग्यान्तरेष्वपि ॥ १२**
**बुद्धिमान् मधुराभाषी पूर्वभाषी प्रियंवदः ।**
**वीर्यवान्न च वीर्येण महता स्वेन विस्मितः ॥ १३**
**न चानृतकथो विद्वान् वृद्धानां प्रतिपूजकः ।**
**अनुरक्तः प्रजाभिश्च प्रजाश्चाप्यनुरज्यते ॥ १४**
**सानुक्रोशो जितक्रोधो ब्राह्मणप्रतिपूजकः ।**
**दीनानुकंपी धर्मज्ञो नित्यं प्रग्रहवान् शुचिः ॥ १५** इत्यादि
(वा. रा. अ. स. १)

—श्रीरामाचें चालणें, बोलणें सारेंच सुंदर आणि वीर्यवत्तर असतें. पृथ्वींत त्याला तोड नाहीं. परनिंदामत्सरादि दुर्गुणांनीं तो सदाच रहित असतो. तो नित्य निर्विकार आत्मनिष्ठ आहे. अगोदरच तो स्वतः मृदुमधुर शब्दांनीं सर्वांची विचारपूस करतो. एखादा मुद्दाम अथवा अजाणपणानें कांहीं कठोर बोलला तर उलट कांहीं न बोलतां उगीच राहातो व त्याच्यावर डावहि धरीत नाहीं. कोणाशीं बोलावयाचें झाल्यास तो अत्यंत विनयानें संभाषण करून गोड शब्दांनीं त्याचें समाधान करतो. कोणत्याहि भावनेनें कां होईना एकदां कां कोणी

त्याच्यावर कांहीं उपकार केला तर तो त्याकरितां सदैव ऋणी असतो. शेंकडों अपराध झाले तरी आत्मबुद्धीनें क्षमा करून युक्तीनें तो त्यांना सुधारतो. शीलवृद्धांशीं शीलाच्या, ज्ञानवृद्धांशीं ज्ञानाच्या, वयोवृद्धांशीं पूर्वपूर्वींच्या, शूरवीरांशीं युद्धाच्या-संबंधीं तो संभाषण करतो. सज्जनांशीं तो अतिस्नेहानें बोलतो. तो बुद्धि खर्च करून परोपरी राष्ट्राच्या हिताकरितां जीवनोपयोगी निरनिराळीं सुख-साधनें निर्माण करीत असतो. प्रिय तसेंच हितामित व अति मृदुमधुर असें त्याचें सत्य भाषण असतें. स्वतः लोकैक वीर असून देखील, वीर्यशौर्यादि त्याचे असे अनेक अलौकिक गुण असले तरी अणुमात्र त्याला त्याचा अहंकार नाहीं. खोटें बोलावयाचें कसें तें त्याला माहीतच नाहीं. अर्थाचा अनर्थ करून कधींहि तो आपली विपरीत भावना करून घेत नाहीं. तो तत्त्वदर्शी व सर्वज्ञ आहे. वृद्धांनीं केलेल्या आदरसत्काराची दुपटीनें तो फेड करतो. तो प्रजेशीं जसा प्रीतीनें वागतो त्याप्रमाणें प्रजाहि त्याच्याशीं प्रीतीनें वागते. **कर्मणा मनसा वाचा चक्षुषा च चतुर्विधम् । प्रसादयति यो लोकं तं लोकोऽनुप्रसीदति** ।। हें याच्या बाबतींत अगदीं अक्षरशः खरें ठरतें. कसल्याहि गोष्टीची तो उगीच घिसघिस लावीत बसत नाहीं. क्रोध त्यानें जिंकला आहे. ब्राह्मणपूजेचा त्याला फार आनंद. तो दीनदयाळ आहे, आश्रितवत्सल आहे, सूक्ष्म धर्म त्याला सर्व माहीत आहे. सर्वदाच त्याचें आंखीव आचरण असतें. सदाचेंच त्याचें वर्तन अति परिशुद्ध असतें.

वाल्मीकि रामायणाच्या अयोध्या कांडांतील प्रथम सर्गांतल्या ९ व्या पासून १५ व्या श्लोकापर्यंतचे नमुन्यादाखल कांहीं श्लोक वर दिले आहेत. विस्तारभयानें अधिक देतां आले नाहींत. वाचकांनीं पुढचे ३२ पर्यंतचे श्लोक स्वतःच वाचून आचरणाचे धडे शिकावेत. या पुढच्याच ८ व्या सर्गांत पुन्हां २८ व्या श्लोकापासून श्रीरामाच्या गुणवर्णनाला सुरुवात झाली आहे. **दिव्यैर्गुणैः शक्रसमो रामः सत्यपराक्रमः । इक्ष्वाकुभ्योऽपि सर्वेभ्यो ह्यतिरिक्तो विशांपते ।। २८ ।। रामः सत्पुरुषो लोके सत्यः सत्यपरायणः । साक्षाद्रामाद्विनिर्वृत्तो धर्मश्चापि श्रिया सह ।। २९ ।। दान्तैः सर्वप्रजाकान्तैः प्रीतिसंजननैर्नृणां । गुणैर्विरोचते रामो दीप्तः सूर्य इवांशुभिः ।।४९।।** इत्यादि.

मुळावरून हा सबंधच सर्ग वाचावा. अध्यायाच्या शेवटपर्यंत यांत थोड्या फार प्रमाणांत श्रीराम-गुणानुवाद आहेच. निर्दुष्ट अशा दिव्य जीवनाचें हें वर्णन म्हणजे एक अचूक मार्गदर्शनच होय. वाचकांनीं याचा लाभ करून

घ्यावा. जीवनांत वागावें कसें हें यामुळें आपल्याला उत्तमरीतीनें शिकतां येतें. श्रीरामाचें गुणवर्णन थोडें थोडें जें येथें केलें आहे तें याचकरितां.

**श्रीसमर्थांचें मार्गदर्शन**

श्रीसमर्थांनीं श्रीरामचरिताचाच आदर्श ठेऊन 'श्रीदासबोधां'त अनेक ठिकाणीं कोठें विधिमुखानें तर कोठें निषेधमुखानें मार्गदर्शन केलें आहे. प्रथम दशकाच्या ५ व्या समासांत सज्जनांचीं लक्षणें दिलीं आहेत.

संत आनंदाचें स्थळ । संत सुखाचि केवळ । नाना संतोषाचें मूळ । ते हे संत ॥ १६ ॥ संत धर्माचें धर्मक्षेत्र । संत स्वरूपाचें सत्पात्र । नातरी पुण्याची पवित्र । पुण्यभूमी ॥ १८ ॥ या दोन ओव्या श्रीरामाच्या आतां-पर्यंतच्या वर्णनाला कशा तंतोतंत जुळतात तें पाहा. मनुष्याच्या आदर्श जीवनाचें येथें उद्घाटन आहे. पुढच्या ६ व्या समासांत सुद्धां आदर्श गुणाचें चित्र रेखाटलें आहे, आदर्श सज्जनांची ओळख पटविली आहे. "हृदयीं वेदगर्भ विलसे । मुखीं सरस्वती विळासे । साहित्य बोलतां जैसे । भासती देवगुरु ॥ ६ ॥ जे पवित्रपणें वैश्वानर । जे स्फूर्तिकिरणाचे दिनकर । ज्ञातेपणें दृष्टीसमोर । ब्रह्मांड नये ॥ ७ ॥ जे अखंड सावधान । जयांस त्रिकाळाचें ज्ञान । सर्वकाळ निराभिमान । आत्मज्ञानी ॥ ८ ॥ पुढच्या ७ व्या समासांत कवि-वर्णनाच्या मिषानें आदर्श व्यक्तीचा ठसा लागोपाठच पुन्हां उमटविला आहे. अध्यात्मग्रंथांची खाणी । कीं हे बोलके चिंतामणी । नाना कामधेनूची दुभणी । वोळली श्रोतयांसी ॥ ५ ॥ कीं हे निरंजनाची खूण । कीं हे निर्गुणाची ओळखण । मायाविलक्षणाचें लक्षण । ते हे कवि ॥ ८ ॥ कवि स्वधर्माचा आश्रयो । कवि मनाचा मनोजयो । कवि धार्मिकाचा विनयो । विनयकर्ते ॥ ११ ॥ ८ व्या समासांत सभासदांच्या निमित्तानें पुन्हां याचीच पुनरावृत्ति आहे. त्यांतीलहि कांहीं ओव्या बघूं. परमेश्वराचे गुणानुवाद । नाना निरूपणाचे संवाद । अध्यात्मविद्या भेदाभेद । मथन जेथें ॥ ५ ॥ कर्मशीळ आचारशीळ । दानशीळ धर्मशील । शुचिष्मंत पुण्यशीळ अंतर शुद्ध कृपाळु ॥ ८ ॥ भूत भविष्य वर्तमान । जयांस त्रिकाळींचें ज्ञान । बहुश्रुत निरभिमान । निरापेक्षी ॥ २८ ॥ शांति क्षमा दयाशीळ । पवित्र आणि सत्वशीळ । अंतरशुद्ध ज्ञानशीळ । ईश्वरी पुरुष ॥ १९ ॥ यांत काय नाहीं? सर्व कांहीं आलें. श्रीरामाचेंच हें सूत्रमय वर्णन झालें. यावरून अभ्यासाव्याच्या लक्षणांचीहि दिशा उमगते.

२ ऱ्या दशकांतल्या प्रथम समासांत "वंदून सद्गुरु चरण। करून रघुनाथ स्मरण। त्यागार्थ मूर्खलक्षण। बोलिजेल ॥" म्हणून उपक्रम केला आहे. मूर्खलक्षण (स. १), कुविद्या लक्षण (३), रजस्तमोगुणांचें लक्षण (५–६), पढतमूर्खांचें लक्षण (१०) हे सर्व समास जाणून या अवगुणांचा त्याग करावयाचा व याविरुद्ध सद्गुणांचा अभ्यास करावयाचा हा धडा येथें मिळतो. १८ व्या दशकाच्या ५ व्या समासांत व १९ व्या दशकाच्या ३ ऱ्या समासांत करंटपणाचीं लक्षणें कोणतीं तीं जाणून त्यागण्याकरितां श्रीसमर्थांनीं दिलीं आहेत. हा सर्व निषेधमुखाचा उपदेश आहे.

**मूर्खलक्षण**—जन्मला जयांचे उदरीं। तयांसी जो विरोध करी। सखी मानिली अंतुरी। तो एक मूर्ख ॥ २।१।८. सांडून सर्वहि गोत। स्त्री-आधेन जीवित। सांगे अंतरींची मात। तो एक मूर्ख ॥ ९ ॥ परस्त्रीसी प्रेमा धरी। श्वशुरगृहीं वास करी। कुळेंविण कन्या वरी। तो एक मूर्ख ॥ १० ॥ धरून परावी आस। प्रेत्न सांडी सावकाश। निसुगाईचा संतोष। मानी तो एक मूर्ख ॥ १७ ॥ एकाएकी एकसरा। झाला विषयीं निलाजरा। मर्यादा सांडून सैरा। वर्ते तो एक मूर्ख ॥२१॥ नीच यातीसी सांगात। परांगनेसी एकांत। मार्गें जाय खात खात। तो एक मूर्ख ॥२२॥ स्वयें नेणें परोपकार। उपकाराचा अनुपकार। करी थोडें बोले फार। तो एक मूर्ख ॥ ३० ॥ विद्या वैभव ना धन। पुरुषार्थ सामर्थ्य ना मान। कोरडाच वाहे अभिमान। तो एक मूर्ख ॥ ३२ ॥ जिवलगांस परम खेदी। सुखाचा शब्द तोहि नेदी। नीच जनांस वंदी। तो एक मूर्ख ॥३८॥ पुत्र कळत्र आणि दारा। इतुकाचि मानुनिया थारा। विसरोनि गेला ईश्वरा। तो एक मूर्ख ॥ ४० ॥ जैसें जैसें करावें। तैसें तैसें पावावें। हें जयास नेणवे। तो एक मूर्ख ॥ ४१ ॥ देवद्रोही गुरुद्रोही। मातृद्रोही पितृद्रोही। ब्रह्मद्रोही स्वामीद्रोही। तो एक मूर्ख ॥ ४४ ॥ परपीडेचें मानी सुख। परसंतोषाचें मानी दुःख। गेले वस्तूचा करी शोक। तो एक मूर्ख ॥४५॥ आदरेंविण बोलणें। न पुसतां साक्ष देणें। निंद्य वस्तु अंगिकारणें। तो एक मूर्ख ॥ ४६ ॥ तुक तोडून बोले। मार्ग सांडून चाले। कुकर्मी मित्र केले। तो एक मूर्ख ॥ ४७ ॥ तस्करासी ओळखी सांगे। देखिली वस्तु तेचि मागे। आपलें अन्हीत करी रागें। तो एक मूर्ख ॥ ५१ ॥ सांडुनिया जगदीशा। मनुष्याचा मानी भर्वसा। सार्थकेंवीण वेंची वयसा। तो एक

मूर्ख ॥ ५४ ॥ अनीतीनें द्रव्य जोडी । धर्म नीती न्याय सोडी । संगतीचें मनुष्य तोडी । तो एक मूर्ख ॥ ५९ ॥ लक्ष्मी आलियावरी । जो मागील ओळखी न धरी । देवीं ब्राह्मणीं सत्ता करी । तो एक मूर्ख ॥ ६८ ॥ आपुलें काज होये तोंवरी । बहुसाल नम्रता धरी । पुढिलांचें कार्य न करी। तो एक मूर्ख ॥ ६९ ॥

**उत्तम गुण**—क्षणक्षणां रुसों नये । लटिका पुरुषार्थ बोलों नये । केल्यावीण सांगों नये । आपुला पराक्रम ॥ २।२।११. कोणाचा उपकार घेऊं नये । घेतला तरी राखों नये । परपीडा करूं नये । विश्वासघात ॥ १७ ॥ व्यापकपण सांडूं नये । परावेन होऊं नये । आपलें ओझें घालूं नये । कोणीएकासी ॥ १९ ॥ धूम्रपान घेऊं नये । उन्मत्त द्रव्य सेऊं नये । बहुचकासीं करूं नये । मैत्री कदा ॥ २५ ॥ कामेंवीण राहों नये । नीच उत्तर साहों नये । आसुदें अन्न सेवूं नये। वडिलांचेंहि ॥२६॥ तोंडीं शिवी असों नये । दुसऱ्यास देखोन हांसों नये । उणें अंगीं संचारों नये । कुळवंताचे ॥ २७ ॥ (कोणी) एकाचा घात करूं नये । लटकी ग्वाही देऊं नये । अप्रमाण वर्तो नये । कदाकाळीं ॥ २९ ॥ स्नान संध्या सांडूं नये । कुळाचार खंडूं नये । अनाचार मांडूं नये । चुकुरपणें ॥३४॥ देवाचा नवस बुडऊं नये । आपला धर्म उडऊं नये । भलते भरीं भरों नये । विचारेंवीण ॥ ३६ ॥ गुरु विरहित असूं नये । नीच यातीचा गुरु करूं नये । जिणें शाश्वत मानूं नये । वैभवेंसी ॥ ३९ ॥ सत्यमार्ग सांडूं नये । असत्य पंथें जाऊं नये । कदा अभिमान घेऊं नये । असत्याचा॥४०॥

**रजोगुण**—अलीकडच्या काळांतल्या लोकांना यांत बरेंच समजून घेण्यासारखें असल्यामुळें माहितीकरितां हा भाग मुद्दाम येथें दिला आहे.

रजोगुण येतां शरीरीं । वर्तणूक कैसी करी । सावध होऊनि चतुरीं । परिसावें ॥ २।५।७. माझें घर माझा संसार । दैव कैंचा आणिला थोर । ऐसा करी जो निर्धार । तो रजोगुण ॥ ८ ॥ बरें खावें बरें जेवावें । बरें ल्यावें बरें नेसावें । दुसऱ्याचें अभिळाषावें । तो रजोगुण ॥ १० ॥ कैंचा धर्म कैंचें दान । कैंचा जप कैंचें ध्यान । विचारीना पापपुण्य । तो रजोगुण ॥ ११ ॥ नेणें तीर्थ नेणें व्रत । नेणें अतिथी अभ्यागत । अनाचारीं मनोगत । तो रजोगुण ॥ १२ ॥ धन धान्याचें संचित । मन होये द्रव्या-सक्त । अत्यंत कृपण जीवित्व । तो रजोगुण ॥ १३ ॥ मी तरुण मी सुंदर ।

मी बलाढ्य मी चतुर। मी सकळांमध्यें थोर। म्हणे तो रजोगुण ॥ १४ ॥ दुसऱ्याचें सर्व जावें। माझेंचि बरें असावें। ऐसें आठवे स्वभावें। तो रजोगुण ॥ १६ ॥ कपट आणि मत्सर। उठे देहीं तिरस्कार। अथवा कामाचा विकार। तो रजोगुण ॥ १७ ॥ वैभव देखोनि दृष्टीं। आवडी उपजली पोटीं। आशागुणें हिंपुटीं। करी तो रजोगुण ॥ २२ ॥ विनोदार्थीं भरे मन। शृंगारिक करी गायेन। रागरंग तानमान। तो रजोगुण ॥ २४ ॥ उन्मत्त द्रव्यावरी अति प्रीति। ग्रामज्य आठवे चित्तीं। आवडे नीचाची संगति। तो रजोगुण ॥ २८ ॥ तस्करविद्या जीवीं उठे। परशून्य बोलावें वाटे। नित्यनेमास मन विटे। तो रजोगुण ॥ २९ ॥ देवाकारणीं लाजाळु। उदरालागीं कष्टाळु। प्रपंचीं जो स्नेहाळु। तो रजोगुण ॥ ६० ॥ गोडग्रासीं आळकेपण। अत्यादरें पिंडपोषण। रजोगुणें उपोषण। केलें न वचे ॥ ३१ ॥ शृंगारिक तें आवडे। भक्ति वैराग्य नावडे। कळालाघवीं मन पवाडे। तो रजोगुण ॥ ३२ ॥ नेणोनियां परमात्मा। सकळ पदार्थीं प्रेमा। बळात्कारें घाली जन्मा। तो रजोगुण ॥ ३३ ॥

**तमोगुण**—शरीरीं क्रोध भरतां। नोळखे मातापिता। बंधु बहिण कांता। ताडी तो तमोगुण ॥ २। ६। ३. आपला आपण शस्त्रपात। पराव्याचा करी वात। ऐसा समयो वर्तत। तो तमोगुण ॥ ६ ॥ अखंड भ्रांति पडे। केला निश्चय विघडे। अत्यंत निद्रा आवडे। तो तमोगुण ॥ ८ ॥ स्त्रीहत्या बाळहत्या। द्रव्यालागीं ब्रह्महत्या। करूं आवडे गोहत्या। तो तमोगुण ॥ १२ ॥ अंतरीं धरूनि कपट। पराचें करी तळपट। सदा मस्त सदा उद्धट। तो तमोगुण ॥ १४ ॥ कळह व्हावा ऐसें वाटे। झोंबी घ्यावी ऐसें उठे। अंतरीं द्वेष प्रगटे। तो तमोगुण ॥ १५ ॥ युद्ध देखावें ऐकावें। स्वयें युद्धाचि करावें। मारावें कीं मरावें। तो तमोगुण ॥ १६ ॥ मत्सरें भक्ति मोडावी। देवालयें विघडावीं। फळतीं झाडें तोडावीं। तो तमोगुण ॥ १७ ॥ सत्कर्में तीं नावडती। नाना दोष ते आवडती। पापभय नाहीं चित्तीं। तो तमोगुण ॥ १८ ॥ भांडण लावून द्यावें। स्वयें कौतुक पाहावें। कुबुद्धि घेतली जीवें। तो तमोगुण ॥ २२ ॥ प्राप्त झालिया संपत्ति। जीवांस करी यातायाती। कळवळा नये चित्तीं। तो तमोगुण ॥ २३ ॥ नावडे भक्ति नावडे भाव। नावडे तीर्थ नावडे देव। वेदशास्त्र नलगे सर्व। तो तमोगुण ॥ २४ ॥ स्नानसंध्या नेम नसे। स्वधर्मीं भ्रष्टला दिसे। अकर्तव्य करीतसे।

तो तमोगुण ॥ २५ ॥ ज्येष्ठ बंधु बाप माये । त्यांचीं वचनें न साहे । शीघ्र कोपी निघोन जाये ।। तो तमोगुण ॥ २६ ॥ उगेंचि खावें, उगेंचि असावें । स्तब्ध होऊन बैसावें । कांहींच स्मरेना स्वभावें । तो तमोगुण ॥२७॥

जीवनांतले हे धोक्याचे टप्पे आहेत. यांना चुकवूनच दिव्य सुखाच्या मार्गानें जाऊन आम्हांला भारताचें रामराज्य सार्थ करून दाखवावयाचें आहे; आपलें जीवन दिव्य करावयाचें आहे; स्वपर–राष्ट्राचाच काय, वेदऋषिमुनि यांच्या शिकवणीच्या अनुसारें अखिल जगाचाच उद्धार करावयाचा आहे. आर्य संस्कृतीचा परिपाठ जगांत दृढमूल होईपर्यंत आपल्या आचारविचार-उच्चारांचे धडे अखिल विश्वालाच द्यावयाचे आहेत. तेव्हां याकरितां आपली पूर्वतयारी किती व कशी व्हावयाला पाहिजे, तें प्रत्येकानेंच विचार करून अगत्य ठरविणें भाग आहे. त्याच्या मार्गदर्शनार्थ येथें हा उपक्रम आहे, हें प्रत्येकानें लक्षांत ठेवावें. यासंबंधीं “ कदापि वीट मानूं नये । शिकवणेचा ” ही समर्थ–हितोक्ति ध्यानांत आणावयास पाहिजे.

**पढतमूर्ख**–सुशिक्षित समाजाला यांतून बरेंच पटेल, बरेंच घेण्यासारखें वाटेल. म्हणून पढतमूर्खासंबंधींच्याहि कांहीं ओव्या बघूं : मागां सांगितलीं लक्षणें। मूर्खाआंगीं चातुर्य बाणे। आतां ऐका शहाणे। असोनि मूर्ख॥२।१०।१. तया नांव पढतमूर्ख । श्रोतीं न मनावें दुःख । अवगुण त्यागितां सुख । प्राप्त होये ॥ २ ॥ बहुश्रुत आणि व्युत्पन्न । प्रांजळ बोले ब्रह्मज्ञान । दुराशा आणि अभिमान । धरी तो एक पढतमूर्ख ॥ ३ ॥ मुक्त क्रिया प्रतिपादी । सगुण भक्ति उच्छेदी । स्वधर्म आणि साधन निंदी । तो एक पढतमूर्ख ॥ ४ ॥ आपलेन ज्ञातेपणें । सकळांस शब्द ठेवणें । प्राणी-मात्राचें पाहे उणें । तो एक पढतमूर्ख ॥ ५ ॥ जाणपणें भरी भरे । आला क्रोध नावरे । क्रिया शब्दास अंतरे । तो एक पढतमूर्ख ॥ १० ॥ दोष ठेवी पुढिलांसी । तेचि स्वयें आपणापाशीं । ऐसें कळेना जयासी । तो एक पढतमूर्ख ॥ १३ ॥ अभ्यासाचेनि गुणें । सकळ विद्या जाणें । जनास निववूं नेणें । तो एक पढतमूर्ख ॥ १४ ॥ जण उणीव ये अंगासी । तेंचि दृढ धरी मानसीं । देहबुद्धि जयापासीं । तो एक पढतमूर्ख ॥ १७ ॥ वर्णी स्त्रियांचे आवेव । नाना नाटकें हावभाव । देवा विसरे जो मानव । तो एक पढतमूर्ख ॥ १९ ॥ भरोनि वैभवाचे भरी । जीवमात्रास तुच्छ करी । पाषांडमत थावरी । तो एक पढतमूर्ख ॥ २० ॥ नाहीं भक्तीचें

साधन । नाहीं वैराग्य ना भजन । क्रियेवीण ब्रह्मज्ञान । बोले तो एक पढतमूर्ख ॥२३॥ न मनी तीर्थ न मनी क्षेत्र । न मनी वेद न मनी शास्त्र । पवित्र कुळीं जो अपवित्र । तो एक पढतमूर्ख ॥२४॥ मागें एक पुढें एक । ऐसा जयाचा दंडक । बोले एक करी एक । तो एक पढतमूर्ख ॥ २६ ॥ प्रपंचविशीं सादर । परमार्थी ज्याचा अनादर । ज़ाणपणें घे आधार । तो एक पढतमूर्ख ॥२७॥ यथार्थ सांडून वचन । जो रक्षून बोले मन । ज्याचें जिणें पराधेन । तो एक पढतमूर्ख ॥ २८ ॥ निरूपणीं भले भले । श्रोते येऊन बैसले । क्षुद्रें लक्षून बोल । तो एक पढतमूर्ख ॥३१॥ शिष्य झाला अनाधिकारी । आपली अवज्ञा करी । पुन्हां त्याची आशा धरी । तो एक पढतमूर्ख ॥ ३२ ॥ भरोन वैभवाचे भरीं । सद्‌गुरूची उपेक्षा करी । गुरुपरंपरा चोरी । तो एक पढतमूर्ख ॥ ३४ ॥ 'ज्ञान बोलोन करी स्वार्थ । कृपणा ऐसा सांची अर्थ । अर्थासाठीं लावी परमार्थ । तो एक पढतमूर्ख ॥३५॥ प्रपंच गेला हातींचा । लेश नाहीं परमार्थाचा । द्वेषी देवा ब्राह्मणांचा । तो एक पढतमूर्ख ॥ ३८ ॥

अगदीं शेलक्या अशा थोड्या ओंव्या द्याव्यात म्हणून किती हात आंखडता घेतला तरी प्रभु रामरायाच्या भक्ताचे असे कांहीं अचूक अनुभव सांगणारे बोल आहेत कीं, ते वाचतांना ही एक उत्कृष्ट ओवी आहे, आधुनिकांना ही बोधप्रद आहे, म्हणून एकेकच ओवी उध्दृत करतां करतां बऱ्याच ओंव्या घेतल्या जातात. सबंध मुळावरूनच पाहावें हें बरें; कारण यांतलें कांहींच हिणकस नाहीं.

**करंटलक्षण**—जनास मैत्री करीना । कठीण शब्द बोले नाना । मूर्खपणें आवरेना । कोणीकासी ॥ १९ । ३ । १३. पवित्र लोकांमध्यें भिडावे । ( भीड बाळगतो, लाजतो ) ओंगळामध्यें निःशंक धावे । सदा मनापासून भावे । जननिंद्य क्रिया ॥ १४ ॥ शब्द सांभाळून बोलेना । आवरिता आवरेना । कोणीएकासी मानेना । बोलणें त्याचें ॥ १६ ॥ कोणीएकासी विश्वास नाहीं । कोणीएकाशीं सख्य नाहीं । विद्या वैभव कांहींच नाहीं । उगाचि ताठा ॥ १७ ॥ राखावीं बहुतांचीं अंतरें । भाग्य येतें तदनंतरें । ऐशीं हीं विवेकाचीं उत्तरें । ऐकणार नाहीं ॥ १८ ॥ स्वयें आपणास कळेना । शिकाविलें तें ऐकेना । तयासी उपाय नाना । काये करिती ॥ १९ ॥ कल्पना करी उदंड कांहीं । प्राप्तव्य तों कांहींच नाहीं ।

अखंड पडिला संदेहीं । अनुमानाचे ॥२०॥ पुण्यमार्ग सांडिला मनें । पाप झडावें काशानें । निश्चय नाहीं अनुमानें । वास केला ॥२१॥ कांहीं एक पुरतें कळेना । सभेमध्यें बोलों राहेना । बाष्कळ लाबाड ऐसें जना । कळों आलें ॥ २२ ॥ कांहीं नेमकपण आपुलें । बहुत जनासी कळों आलें । तेंचि मनुष्य मान्य झालें । भूमंडळीं ॥२३॥ झिजल्यावांचूनी कीर्ति कैंची । मान्यता नव्हे कीं फुकाची । जिकडे तिकडे होती ची ची । अवलक्षणें ॥ २४ ॥ भल्याची संगती धरीना । आपणासी शाहाणें करीना । तो आपला आपण वैरी जाणा । स्वहित नेणें ॥ २५ ॥ लोकांसीं बरें करावें । तें उसणें सवेंचि घ्यावें । ऐसें जयाच्या जीवें । जाणिजेना ॥ २६ ॥ या कारणें अवगुण त्यागावे । उत्तम गुण समजोन घ्यावे । तेणें मनासारखें फावे । सकळ कांहीं ॥३०॥

'सत्त्वेतराभ्यां धर्माधर्मनिर्णयः' या आधारानें सत्त्वगुणात्मकच धर्म म्हणवून घेतो. या दृष्टीनें द्वितीय दशकाच्या ७ व्या समासांतलें सत्त्वगुणाचें वर्णनसुद्धां धर्म आणि धार्मिकाचा आदर्श दर्शवितें. प्रत्येकानेंच हा सत्त्वगुण वाढविला पाहिजे. सत्त्वगुणाचें महत्त्व वर्णितांना श्रीसमर्थ म्हणतात :

जो भजनाचा आधार । जो योगीयांची थार । जो निरसी संसार । दुःखमूळ जो ॥ २ ॥ जेणें होये उत्तम गती । मार्ग फुटे भगवंतीं । जेणें पाविजे मुक्ती । सायोज्यता ते ॥ ३ ॥ जो भक्तांचा कोंबसा । जो भवार्णवींचा भर्वसा । मोक्षलक्ष्मीची दशा । तो सत्त्वगुण ॥ ४ ॥ जो परमार्थाचें मंडण । जो महंतांचें भूषण । रजतमांचें निरशन । जयाचेनी ॥ ५ ॥ जो परम सुखकारी । जो आनंदाची लहरी । देऊनिया निवारी । जन्म मृत्य ॥ ६ ॥ जो अज्ञानाचा सेवट । जो पुण्याचें मूळ पीठ । जयाचेनि सांपडे वाट । परलोकाची ॥ ७ ॥

धर्ममूर्ति श्रीरामाच्या स्वाभाविकपणें आंगवळणीं पडलेल्या धर्माचरणाचीच ओळख या सत्त्वगुणांच्या वर्णनानें पटते. पुढची ओवी पाहा. "ऐसा हा सत्वगुण । देहीं उमटतां आपण । तये क्रियेचें लक्षण । ऐसें असे ॥८॥" त्याच्यापुढें सारीं धर्मपुरुषाचीं लक्षणें आलीं आहेत. सबंध समासच मननीय आहे. त्यांतून कांहीं ओव्या मात्र येथें उध्दृत करतों :

ईश्वरीं प्रेमा अधिक । प्रपंच संपादणें लौकिक । सदा सन्निध विवेक । तो सत्वगुण ॥ ५ ॥ शब्द कठीण न बोले । अति नेमेंसी चाले । योगी

जेणें तोषविले । तो सत्वगुण ।। ३७ ।। देहाभिमान गळे । विषयीं वैराग्य प्रबळे । मिथ्या माया ऐसें कळे । तो सत्वगुण ।। ४२ ।। असतां आपले आश्रमीं । अत्यादरें नित्य नेमीं । **सदा प्रीति लागे रामीं** । तो सत्वगुण ।। ४५ ।। शांति क्षमा आणि दया । ( आत्म ) निश्चय उपजे जया । सत्वगुण जाणावा तया । अंतरीं आला ।। ५२ ।। आले अतीत अभ्यागत । जाऊं नेदी तो भुकिस्त । यथानुशक्ति दान देत । तो सत्त्वगुण ।। ५३ ।। सकळांसी नम्र बोले । मर्यादा धरून चाले । सर्व जन तोषविले । तो सत्वगुण ।। ६३ ।। सकळ जनासी आर्जव । नाहीं विरोधास ठाव । परोपकारी वेंची जीव । तो सत्वगुण ।। ६४ ।। आपकार्याहून जीवीं । परकार्य सिद्धी करावी । मरोन कीर्ती उरवावी । तो सत्वगुण ।।६५।। पराव्याचे दोष गुण । दृष्टीस देखे आपण । समुद्रा ऐसी सांठवण । तो सत्वगुण ।। ६६ ।। नीच उत्तर साहणें । प्रत्युत्तर ( कांहीं ) न देणें । आला क्रोध सावरणें । तो सत्वगुण ।। ६७ ।। सन्मार्ग दाखवी जना । जो लावी हरिभजना । ज्ञान सिकवी अज्ञाना । तो सत्वगुण ।। ७९ ।। परभूषणें भूषण । परदूषणें दूषण । परदुःखें शिणे जाण । तो सत्वगुण ।। ८४ ।। आतां असो हें बहुत । देवीं धर्मीं ज्याचें चित्त । भजे कामनारहित । तो सत्वगुण ।। ८५ ।।

श्रीरामाच्या जीवन–चरित्राला आदर्श मानणाऱ्याच्या हीं सारीं लक्षणें आपोआप आंगवळणीं पडतात, हें दर्शविण्याकरितांच 'सदा प्रीति लागे रामीं' अशा पदाची श्रीसमर्थांनीं जोडणी केली आहे असें वाटतें. सनातन धर्माचें, आर्य संस्कृतीचें व त्याच्या आदर्श पुरुषाचें यांतून दर्शन होतें. याच्या पुढच्या समासांत म्हणजे दुसऱ्या दशकाच्या ८ व्या समासांत सद्विद्येचीं लक्षणें दिलीं आहेत. या समासाचा आरंभ असा आहे. ऐका सद्विद्येचीं लक्षणें । परमशुद्ध सुलक्षणें । **विचार घेतां बळेंचि बाण** । सद्विद्या आंगीं ।। हें असें सर्व देण्यांत श्री समर्थांचा 'हीं लक्षणें सर्वांच्या आंगीं बाणावींत' हा हेतु येथें स्पष्ट होतो.

सद्विद्येचा जो पुरुष । तो उत्तम लक्षणीं विशेष । त्याचे गुण ऐकतां संतोष । परम वाटे ।। २ ।। ही सबंध ओवी श्रीरामाला लागू पडत नाहीं असें कोणाला वाटेल ? भाविक सात्विक प्रेमळ । शांती क्षमा दयाशीळ । लीन तत्पर केवळ । अमृतवचनी ।। ३ ।। परम सुंदर आणि चतुर ।

परम सबळ आणि धीर । परम संपन्न आणि उदार । आतिशयेंसी ॥ ४ ॥ परम ज्ञाता आणि भक्त । महापंडित आणि विरक्त । महा तपस्वी आणि शांत । आतिशयेंसी ॥ ५ ॥ वक्ता आणि नैराशता । सर्वज्ञ आणि सादरता । श्रेष्ठ आणि नम्रता । सर्वत्रांसी ॥ ६ ॥ राजा आणि धार्मिक । शूर आणि विवेक । तारुण्य आणि नेमक । आतिशयेंसी ॥ ७ ॥। साधु पवित्र पुण्यशीळ । अंतरशुद्ध धर्मात्मा कृपाळ । कर्मनिष्ठ स्वधर्में निर्मळ । निर्लोभ अनुतापी ॥ ११ ॥ सत्यवचनी शुभवचनी । कोमलवचनी येकवचनी । निश्चयवचनी सौख्यवचनी । सर्वकाळ ॥ १७ ॥ द्रव्यसुची दारासुची । न्यायसुची अंतरसुची । प्रवृत्तिसुची निवृत्तिसुची । सर्वसुची निःसंगपणें ॥ २० ॥ मित्रपणें परहितकारी । वाग्माधुर्यें परशोक हारी । सामर्थ्यपणें वेत्रधारी । पुरुषार्थें जगमित्र ॥ २१ ॥ सुखरूप संतोषरूप । आदंदरूप हास्यरूप । ऐक्यरूप आत्मरूप । सर्वत्रांसी ॥ २५ ॥ भाग्यवंत जयवंत । रूपवंत गुणवंत । आचारवंत क्रियावंत । विचारवंत स्थिति ॥ २६ ॥ यशवंत कीर्तिवंत । शक्तिवंत सामर्थ्यवंत । वीर्यवंत वरदवंत । सत्यवंत सुकृति ॥ २७ ॥ विद्यावंत कळावंत । लक्ष्मीवंत लक्षणवंत । कुळवंत शुचिष्मंत । बळवंत दयाळु ॥ २८ ॥ युक्तिवंत गुणवंत वरिष्ठ । बुद्धिवंत बहु धारिष्ट । दीक्षावंत सदासंतुष्ट । निस्पृह वीतरागी ॥ २९ ॥

श्रीरामालाच डोळ्यापुढें ठेऊन श्रीसमर्थांनीं या ओव्या लिहिल्या नाहींत असें कोण म्हणेल ? यांत श्रीरामाच्या वर्णनाचाच हेतु नाहीं, दुसराहि हेतु आहे. तो या पुढील ओवींत स्पष्ट होतो. असो ऐसे उत्तम गुण । हें सद्विद्येचें लक्षण । अभ्यासाया निरूपण । अल्पमात्र बोलिलें ॥

पुढच्या ९ व्या समासांत विरक्तांचीं लक्षणें दिलीं आहेत. समाजांतील विरक्तांनीं इकडे विशेष लक्ष द्यावें :

विरक्तें विवेकें असावें । विरक्तें अध्यात्म वाढवावें । विरक्तें धारिष्ट धरावें । दमन विषयीं ॥७॥ विरक्तें राखावें साधन । विरक्तें लावावें भजन । विरक्तें विशेष ब्रह्मज्ञान । प्रगटवावें ॥ ८ ॥ विरक्तें सत्क्रिया प्रतिष्ठावी । विरक्तें निवृत्ति विस्तारावी । विरक्तें नैराशता धरावी । सदृढ जीवेंसी ॥ १० ॥ विरक्तें धर्मस्थापना करावी । विरक्तें नीति आवलंबावी । विरक्तें क्षमा सांभाळावी । अत्यादरेंसी ॥ ११ ॥ विरक्तें परमार्थ उजळावा । विरक्तें विचार

शोधावा । विरक्तें सन्निध ठेवावा । सन्मार्ग सत्वगुण ॥ १२ ॥ विरक्तें भाविकें सांभाळावीं । विरक्तें प्रेमळें निववावीं । विरक्तें साबडीं नुपेक्षावीं । शरणागतें ॥ १३ ॥ विरक्तें असावें परम दक्ष । विरक्तें असावें अंतरसाक्ष । विरक्तें घेढावा कैपक्ष । परमार्थाचा ॥ १४ ॥ विरक्तें अभ्यास करावा । विरक्तें साक्षेप धरावा । विरक्तें वक्तृत्वें उभारावा । मोडला परमार्थ ॥ १५ ॥ विरक्तें विमळ ज्ञान बोलावें । विरक्तें वैराग्य स्तवीत जावें । विरक्तें निश्चयाचें करावें । समाधान ॥ १६ ॥ बहुतांस करावे परोपकार । भलेपणाचा जीर्णोद्धार । पुण्यमार्गाचा विस्तार । बळेंचि करावा ॥ १९ ॥ स्नान संध्या जप ध्यान । तीर्थ यात्रा भगवद्भजन । नित्य नेम पवित्रपण । अंतरशुद्ध असावें ॥ २०॥ हें केवळ विरक्तांकरितां झालें.

दृढ ( आत्म ) निश्चयो धरावा । संसार सुखाचा करावा । विश्वजन उद्धरावा । संसर्ग मात्रें ॥ २१ ॥

ही ओवी मात्र दोन्हींकडे झुकते. संसार म्हणजे सकल विश्व सुखरूप करून टाकावें असा अर्थ निस्पृहाकडे जातो. आत्मज्ञानसंपन्न होऊन दृढात्म-निश्चयानें संसार केल्यास तो सुखाचा संसार होतो व तसा तो गृहस्थांनीं करावा असा आशय गृहस्थाविषयीं व्यक्त होतो. बाकी अंतरस्थिति दोघांची सारखीच असावी लागते. निस्पृहांना बाह्य त्यागांतहि आघाडी मारतां येते आणि ती गृहस्थांच्या बाबतींत कांहीं प्रमाणांत लंगडी होते. **द्वावेव वेदोक्तौ धर्मौ प्रवृत्तिलक्षणश्च निवृत्तिलक्षणश्चेति** ।–प्रवृत्ति-निवृत्ति लक्षणात्मक दोन वेदोक्त धर्म आहेत. दोन्हींचा आदर्श यांत दाखवून आर्यसंस्कृतीची घडी येथें निदर्शनास आणून दिली आहे.

“ गणेश शारदा सद्गुरु । संत महंत मुनेश्वरु । सर्वहि माझा रघुवीरु । सद्गुरुरूपें ॥ ” असें श्रीसमर्थांनीं श्रीरामाच्या बाबतींत उद्गारलें आहे. पांचव्या दशकांतल्या प्रथम समासाच्या प्रारंभीं “ जय जयाजी सद्गुरु पूर्ण कामा । परम पुरुषा आत्मयारामा । अनुर्वाच्य तुमचा महिमा । वर्णिला नवचे ॥१॥ जें वेदांस सांकडें । जें शब्दासी कानडें । तें सच्छिष्यास रोकडें । अलभ्य लाभे ॥ २ ॥ जें योगियांचें निजवर्म । जें शंकराचें निजधाम । जें विश्रांतीचें निजविश्राम । परम गुह्य अगाध ॥ ३ ॥ ” अशा रीतीनें श्रीसमर्थांनीं नमन केलें आहे. श्रीसमर्थ श्रीमारुतीचा अवतार आणि मारुतीचे गुरु श्रीराम. श्रीसमर्थांना श्रीरामाचाच अनुग्रह होता. श्रीरामांनीं मारुतीला एकदां

आठ उपनिषदांचा उपदेश केला हें मुक्तिकोपनिषदाच्या पुढील श्लोकावरून सिध्द होतें. **भक्त्या शुश्रूषया रामं स्तुवन्पप्रच्छ मारुतिः । राम त्वं परमात्मासि सच्चिदानंदविग्रहः । इदानीं त्वां रघुश्रेष्ठ प्रणमामि मुहुर्मुहुः ।। त्वद्रूप ज्ञातुमिच्छामि तत्त्वतो राम मुक्तये । अनायासेन येनाहं मुच्येयं भवबंधनात् । कृपया वद मे राम येन मुक्तो भवाम्यहम् ।।** यावर श्रीरामाचें उत्तर : **सांधु पृष्टं महाबाहो वदामि श्रुणु तत्त्वतः ।। वेदान्ते सुप्रतिष्ठोऽहं वेदान्तं समुपाश्रयम् । निश्वासभूता ये विष्णोर्वेदा जाताः सुविस्तराः । तिलेषु तैलवद्वेदे वेदान्तः सुप्रतिष्ठितः ।।** आर्य संस्कृतींत गुरुशिष्याचाहि एक संबंध अतूट व अत्यंत महत्वाचा आहे. श्रीसमर्थांनीं श्रीगुरुवर्णनाच्या मिशानेंहि आपल्या सद्गुरूचें अर्थात् श्रीरामरायाचेंच वर्णन केलें आहे. ब्रह्मज्ञानाकारितां ' **स गुरुमेवाभिगच्छेत** ' । श्रीसद्गुरुलाच शरण गेलें पाहिजे असें मुंडकोपनिषदाच्या प्रथम मुंडकांत सांगितलें आहे. " जैसें नेत्रीं घालितां अंजन । पडे दृष्टीस निधान । तेसें सद्गुरुवचनें ज्ञान–। प्रकाश होये ।।३८।। " असें श्रीसमर्थांचेंहि म्हणणें आहे.

**सद्गुरूचीं लक्षणें**––जो ब्रह्मज्ञान उपदेशी । अज्ञान अंधारें निरसी । जीवात्मया परमात्म्यासी । ऐक्यता करी ।। द. ५ स. २ । ९. विघडले देव आणि भक्त । जीवशिवपणें द्वैत । तया देवाभक्तां एकांत । करी तो सद्गुरु ।। १० ।। भव व्याघ्रें घाळून उडी । गोवत्सास तडातोडी । केली देखोन शीघ्र सोडी । तो सद्गुरु जाणावा ।। ११ ।। प्राणी मायाजाळीं पडले । संसारदुःखें दुखवले । ऐसे जेणें मुक्त केले । तो सद्गुरु जाणावा ।।१२।। वासना नदी माहांपुरीं । प्राणी बुडतां ग्लांती करी । तेथें उडी घाळून तारी । तो सद्गुरु जाणावा ।। १३ ।। गर्भवास अति सांकडी । इच्छा बंधनाची बेडी । ज्ञान देऊन सीघ्र सोडी । तो सद्गुरु स्वामी ।। १४ ।। फोडूनि शब्दाचें अंतर । वस्तु दाखवी निजसार । तोचि सद्गुरु माहेर । अनाथांचें ।। १५ ।। जीव एकदेशी बापुडें । तयासि ब्रह्मचि करी रोकडें । फेडी संसार सांकडें । वचनमात्रें ।। १६ ।। जें वेदांचें अभ्यांतरीं । ते काढूनि अपल्यापरी । शिष्यश्रवणीं कवळ भरी । उद्गारवचनें ।। १७ ।। वेदशास्त्र महानुभाव । पाहतां एकाचि अनुभव । तोचि एक गुरुराव । ऐक्यरूपें ।।१८।।

श्रीरामाचें अंतरीं ध्यान करून त्याला अनुलक्षूनच श्रीसमर्थांनीं हें वर्णन केलें नाहीं असें कोण म्हणेल? पुढेंहि गुरूचा आदर्श म्हणून श्रीरामालाच पुढें

ठेऊन सद्गुरूचीं लक्षणें सांगण्यास प्रारंभ केला आहे. संदेह निःशेष जाळी । स्वधर्म आदरें प्रतिपाळी । **वेद विरहित टवाळी । करूंच नेणें** ।। १६ ।। जो कोणी ज्ञान बोधी । समूळ अविद्या छेदी । इंद्रिय दमन प्रतिपादी । तो सद्गुरु जाणावा ।। २२ ।। जेथें शुद्ध ब्रह्मज्ञान । आणि स्थूळ क्रियेचें साधन । तोचि सद्गुरु निधान । दाखवी डोळां ।। २८ ।। मुख्य सद्गुरूचें लक्षण । आधीं पाहिजे विमळज्ञान । निश्चयाचें समाधान । स्वरूपस्थिति ।। ४५ ।। याहिवरी वैराग्य प्रबळ । वृत्ति उदास केवळ । विशेष आचारें निर्मळ । स्वधर्मविषयीं ।।४६।। याहिवरी अध्यात्मश्रवण । हरिकथा निरूपण । जेथें परमार्थ विवरण । निरंतर ।। ४७ ।। जेथें सारासारविचार । तेथें होये जगोद्धार । नवविधा भक्तीचा आधार । बहूत जनासी ।। ४८ ।। म्हणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन । स्वधर्म कर्म आणि साधन । कथा निरूपण श्रवण मनन । नीति न्याये मर्यादा ।। ५२ ।। यामध्यें एक उणें असें । तेणें ते विलक्षण दिसे । म्हणोनि सर्वहि विलसे । सद्गुरुपासीं ।। ५३ ।। तो बहुतांचे पाळणकर्ता । त्यांस बहुतांची असे चिंता । नाना साधनें समर्था । सद्गुरुपासीं ।। ५४ ।।

सद्गुरुकृपेनें होणाऱ्या ज्ञानाचें लक्षण श्रीसमर्थांनीं ५ व्या दशकांतील सहाव्या समासांत पुढीलप्रमाणें सांगितलें आहे. ऐक ज्ञानाचें लक्षण । ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान । पाहावें आपणासि आपण । या नांव ज्ञान ।। ५-६-१ ।। मुख्य देवास जाणावें । सत्य स्वरूप वोळखावें । नित्यानित्य विचारावें । या नांव ज्ञान ।। २ ।। जेथें दृश्य प्रकृति सरे । पंचभूतिक वोसरे । समूळ द्वैत निवारे । या नांव ज्ञान ।। ३ ।। मन बुद्धि अगोचर । न चले तर्काचा विचार । उलेख परेहूनि पर । या नांव ज्ञान ।। ४ ।। जेथें नाहीं दृश्यभान । जेथें जाणीव हें अज्ञान । विमळ शुद्ध स्वरूप ज्ञान । यासि बोलिजे ।। ५ ।। ऐक शुद्ध ज्ञानाचें लक्षण । शुद्ध स्वरूपचि आपण । या नांव शुद्ध स्वरूप ज्ञान । जाणिजे श्रोतीं ।। १० ।। जें या चराचराचें मूळ । शुद्ध स्वरूप निर्मळ । या नांव ज्ञान केवळ । वेदांत मतें ।। १८ ।। शोधितां आपलें मूळ स्थान । सहजाचि उडे अज्ञान । या नांव म्हणिजे ब्रह्मज्ञान । मोक्ष-दायेक ।। १९ ।। मी कोण ऐसा हेत । धरून पाहतां देहातीत । आव-लोकितां नेमस्त । स्वरुपाचि होये ।। २१ ।। सहाव्या दशकाच्या सातव्या समासांत "करासाठीं आतां भजन करूं ।" म्हणून विपरीत भावना

करून घेतलेल्या आपल्या शिष्याला उद्देशून श्रीरामाचें महत्त्व श्रीसमर्थांनीं सांगितलें आहे. रामराज्याच्या उद्देशानें श्रीरामाचा परिचय करून घेण्यास निघालेल्या आम्हांला श्रीसमर्थांच्या अमृतवाणीचा लाभ काय होतो तें पाहूं.

हरिहर ब्रह्मादिक । हे जयाचे आज्ञाधारक । तूं एक मानवी रंक । भजेसिना तरी काय गेलें ॥ ६–७–२० ॥ आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ । जो समर्थाचा हि समर्थ । देवां सोडविता ॥२१॥ त्याचे आम्हीं सेवकजन । सेवेकरितां जालें ज्ञान । तेथें अभाव धरितां पतन । पाविजेल कीं ॥ २२ ॥ करी दुर्जनाचा संहार । भक्तजनासी आधार । ऐसा हा तों चमत्कार । रोकडा चाले ॥ २९ ॥ मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघेंचि नासोनि जातें । कृपा केलिया रघुनाथें । प्रचीत येते ॥ ३० ॥ रघुनाथ भजनें ज्ञान जालें । रघुनाथ भजनें महत्त्व वाढलें । म्हणोनियां तुवां केलें । पाहिजे आधीं ॥ ३१ ॥ असें अगदीं निक्षून सांगून " हें तो आहे सप्रचित । आणि तुज वाटेना प्रचित । तरी साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो कराचा ॥ " असें रोखठोक कळविलें आहे. पुढेंहि " रघुनाथ स्मरोनि कार्य करावें । तें तत्काळचि सिद्धि पावे । कर्ता राम हें असावें । अभ्यांतरीं ॥ ३३ ॥ मी कर्ता ऐसें म्हणसी । तेणें तूं कष्टी होसी । राम कर्ता म्हणतां पावसी । येश कीर्ती प्रताप ॥ ३६ ॥ या कारणें रघुनाथ भजन । त्यासि मानिती बहुत जन । ब्रह्मादिक आदिकरून राम भजनीं तत्पर ॥ ३९ ॥" इत्यादि भारत-राज्याला राम-राज्याची दीक्षा देऊं पाहणाऱ्या आम्हां सर्वांनाहि हें सर्व ठाऊक असावयाला पाहिजे.

रामराज्याचें रामच अधिदैवत होतें. " हरिहर ब्रह्मादिक । हे जयाचे आज्ञाधारक " हे श्रीसमर्थांच्या तोंडचे शब्द ऐकतांना ' रामायणमहात्म्या 'चा **ब्रह्मविष्णुमहेशाद्या यस्यांशा लोकसाधकाः । तमादिदेवं श्रीरामं विशुद्धं परमं भजे** ॥ हा श्लोक आठवतो. श्रीसमर्थांनींहि सांगितलेंच आहे, " कर्म केलेंचि करावें । ध्यान धरिलेंचि धरावें । विवरलेंचि विवरावें । पुन्हां निरूपण ॥ ११।५।१. तैसे आम्हांस घडलें । बोलिलेंचि बोलणें पडलें । कां जें विघडलें चि घडलें । पाहिजे समाधान ॥ २ ॥ " अगदीं असेंच प्रस्तुत मलाहि झाल्यासारखें वाटतें. वाचकांनीं कंटाळू नये, पोतीं ठेंचून भरल्याप्रमाणें भरगच्च

व्हावें म्हणून वाटतें. उद्देश चांगलाच. उद्देशाकडे लक्ष देऊन, न कंटाळतां आस्थेनें वाचून, त्यांतले लागू पडणारे धडे गिरवून प्रत्येकानें तरबेज व्हावें. अकराव्या दशकाच्या पांचव्या समासांत राजकारणाचे धडे शिकविले आहेत. क्रमवार आचरणांत ठेवण्याचे नियम सांगितले आहेत. व्यक्तीचा आणि राष्ट्राचा व्यवहार शिकविला आहे. यांतल्याहि कांहीं ओव्या मननाकरितां येथें उद्धृत करूं :

अनन्य राहे समुदाव । इतर जनांस उपजे भाव । ऐसा आहे अभिप्राव । उपायाचा ॥ ३ ॥ मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण । तिसरें तें सावधपण । सर्वविषयीं ॥ ४ ॥ चौथा अत्यंत साक्षप ।। फेडावे नाना आक्षप । अन्याये थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥ ५ ॥ जाणावें पराचें अंतर । उदासीनता निरंतर । नीतिन्यायासि अंतर ।। पडोंचि नेदावें ॥ ६ ॥ संकेतें लोक वेधावा । येकून येक बोधावा । प्रपंचहि सांवरावा । येथानुशक्त्या ॥ ७ ॥ प्रपंच समयो ओळखावा । धीर बहुत असावा । संबंध पडों नेदावा । अति परी तयाचा ॥ ८ ॥ उपाधीसी विस्तारावें । उपाधींत न सांपडावें । नीचत्व पहिलेंच घ्यावें । आणि मूर्खपण ॥ ९ ॥ दोष देखोन झांकावे । अवगुण अखंड न बोलावे । दुर्जन सांपडोन सोडावे । परोपकार करूनी ॥१०॥ तऱ्हे भरोंच नये । सुचावे नाना उपाये । नव्हे तें चि करावें कार्ये । दीर्घ प्रेत्नें ॥११॥ फड नासोंचि नेदावा । पडिला प्रसंग सांवरावा । अतिवाद न करावा । कोणी येकासी ॥ १२ ॥ दुसऱ्याचें अभिष्ट जाणावें । बहुतांचें बहुत सोसावें ॥ १३ ॥ दुःख दुसऱ्याचें जाणावें । ऐकोन तरी वांटून घ्यावें । बरें वाईट सोसावें । समुदायाचें ॥१४॥ अपार असावें पाठांतर । सन्निध चि असावा विचार । सदा सर्वदा तत्पर । परोपकारासी ॥ १५ ॥ शांती करून करवावी । तऱ्हे सांडून सांडवावी । सत्क्रिया करून करवावी । बहुतांकरवीं ॥ १६ ॥ सरळ रीतीनें होत नसेल तर बहुजनांच्या हिताकरितां गत्यंतर नसल्यामुळें "करणें असेल अपाये । तरी बोलोन दाखवूं नये । परस्परें चि प्रत्ययें प्रचितीस आणावा ॥ १७ ॥" जो बहुतांचें सोशीना । त्यास बहुत लोक मिळेना । बहुत सोशितां उरेना । महत्व आपुलें ॥ १८ ॥ राजकारण बहुत करावें । परंतु कळोंचि नेदावें । **परपीडेवरी नसावें** । अंतःकरण ॥ १९ ॥

**शुभमस्तु सर्वजगतः परहितनिरता भवन्तु भूतगणाः । दोषाः प्रयान्तु नाशं सर्वजनोऽयं सदा सुखी भवतु ॥** करावयाचें तें याचकरितां हा आर्य संस्कृतीचा परिपाठ श्रीसमर्थांच्या या ओवींतूनहि कसा उठून दिसतो बघा. लोकहिताच्या उन्नत दृष्टीनें रोग बरा होण्यास दिल्या जाणाऱ्या कडवट औषधाप्रमाणें कांहींसें तीव्रहि वागावें लागतें. लोक पारखावे लागतात.

" लोक पारखून सांडावे । राजकारणें अभिमान झाडावे । पुन्हां मेळवून घ्यावे । दुरील दोरें ॥ २० ॥ हिरवटासी दुरी धरावें । कचरटासी न बोलावें । संमंध पडतां सोडून जावें । येकीकडे ॥ २१ ॥ ऐसें असो राजकारण । सांगतां तें असाधारण । सुचित असतां अंतःकरण । राजकारण जाणें ॥ २२ ॥

**सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः ॥** हाच आभिप्राय येथें प्रगट झाला आहे. शुद्धांतःकरणाच्या उदात्त ध्येयाच्या ईश-कृपाप्रसादित माणसांना त्या त्या वेळीं आपोआपच देवाची योग्य सूचना अथवा प्रेरणा होते. पुढें राजकारणाची नीति आहे. " वृक्षारूढासि उचलावें " आश्रयाची आवश्यकता असून शरण आलेल्या सत्पात्रास आधार द्यावा. " युद्ध-कर्त्यास " म्हणजे गुरमीच्या माणसांना " ढकलून द्यावें । " (आश्रय देऊं नये)

कारबाराचें सांगावें । आंग कैसें ॥ २३ ॥ पाहातां तरी सांपडेना । कीर्ति करूं तरी राहेना । आलें वैभव आभिळासीना । कांहीं केल्या ॥२४॥ एकाची पाठी राखणें । एकास देखों न सकणें । ऐसीं नव्हेत कीं लक्षणें । चातुर्याचीं ॥ २५ ॥

**सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः । सर्वे भद्राणि पश्यन्तु माकश्चिद् दुःखमाप्नुयात् ॥** म्हणूनच सर्व केलें पाहिजे. श्रीरामाचा अवतारहि पण याकरितांच होता. त्याच्या भारतवर्षाच्या राज्यांत म्हणजेच रामराज्यांत असेंच सर्वत्र होत असलेलें दिसून यावयाला पाहिजे.

श्रीरामदासांची शिकवण थोड्या प्रमाणांत कां होईना श्रीरामहृदयाचा परिचय होण्याकरितां आम्ही येथें बघत आहोंत. श्रीसमर्थांनीं अकराव्या दशकाच्या सहाव्या समासांत ' महंतलक्षण ' या मथळ्याखालीं आदर्श पुरुषाचीं लक्षणें सांगितलीं आहेत. कोणत्याहि दृष्टीनें आदर्श पुरुषाचीं लक्षणें सांगावयास म्हणून श्रीसमर्थ जिथे जिथे उद्युक्त होतात तिथे तिथे "करोनि रघुनाथस्मरण" हें सारखें चोंहींकडे अनुगत असतेंच असा आपण निश्चयच बाळगावा.

हरिकथा निरूपण । नेमस्तपणें राजकारण । **वर्तायाचें लक्षण । तेंहि असावें ॥४॥** पुसों जाणे सांगों जाणे । अर्थांतर करूं जाणें । सकळिकांचें राखों जाणे । समाधान ॥ ५ ॥ दीर्घसूचना आधीं कळे । सावधपणें तर्क प्रबळे । जाण जाणोनि निवळे । यथा योग्य ॥ ६ ॥ ताळमेळ तानमानें । प्रबंद कविता जाड वचनें । मज्यालसी नाना चिन्हें । सुचती जया ॥ ८ ॥ जो एकांतास तत्पर । आधीं करी पाठांतर । अथवा शोधी अर्थांतर । ग्रंथगर्भींचें ॥ ९ ॥ आधींच सिकोनि जो सिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी । गुंतल्या लोकांस उगवी । विवेकबळें ॥ १० ॥ अक्षर सुंदर वाचणें सुंदर । बोलणें सुंदर चालणें सुंदर । भक्ति ज्ञान वैराग्य सुंदर । करून दावी ॥ ११ ॥ जयास येत्न चि आवडे । नाना प्रसंगीं पवाडे । धीटपणें प्रगटे दडे । ऐसा नव्हे ॥ १२ ॥ सांकडीमधें वर्तों जाणे । उपाधीमध्यें मिळों जाणे । अलिप्तपणें राखों जाणे । आपणासी ॥ १३ ॥ आहे तरी सर्वां ठाईं । पाहों जातां कोठेंचि नाहीं । जैसा अंतरात्मा ठाईंच्या ठाईं । गुप्त जाला ॥१४॥ त्या वेगळें कांहींच नसे । पाहों जातां तो न दिसे । न दिसोन वर्तवीतसे । प्राणीमात्रासी ॥ १५ ॥ तैसाचि हा नाना परी । बहुत जनास शहाणे करी । नाना विद्या त्या विवरी । स्थूळ सूक्ष्मा ॥ १६ ॥ (आधिभौतिक आणि पारमार्थिक) राखों जाणे नीति न्याये । न करी न करवी अन्याये । कठीण प्रसंगीं उपाये । करूं जाणे ॥ १८ ॥ **ऐसा पुरुष धारणेचा । तोचि आधार बहुतांचा । दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा** ॥ १९ ॥

समर्थांचें हृदय या ठिकाणीं संपूर्ण व्यक्त झालें आहे. भारताच्या 'रामराज्यां'त रामाची ओळख आबालवृद्धांना असली पाहिजे. श्रीरामाचा परिचय व्हावा म्हणून श्रीरामाचें वर्णन श्रीसमर्थांनीं केलें व त्याची 'री' आम्ही ओढली. समर्थ म्हणतात : ऐसें ओळखिलें पाहिजे । ओळखोन भजन कीजे । जैसा साहेब नमस्कारिजे । ओळखिल्या उपरी ॥ ११-९-७ ॥ श्रीरामाला पुढें ठेऊन श्रीसमर्थांनीं जीवनांतला वर्तनक्रम आम्हांला अनेक ठिकाणीं आंखून दिला आहे व तदनुसार आर्य संस्कृतीचें बाळकडूहि आम्हांला पाजलें आहे. अकराव्या दशकाच्या दहाव्या समासांतहि असाच प्रसंग आला आहे. तिथल्या कांहीं ओंव्या पाहूं :

"मूर्ख एकदेसी होतो । चतुर सर्वत्र पाहातो ।" असा इशारा देऊन

सर्वदेहचालक अंतरात्म्याप्रमाणेंच महंत अथवा नेता असावा असा उपदेश केला आहे :

प्रगट कीर्ति ते ढळेना । बहुत जनास कळेना । पाहों जातां आढळेना । काये कैसें ॥ ६ ॥ वेषभूषण तें दूषण । कीर्तिभूषण तें भूषण । चाळणेवीण येक क्षण । जाऊं च नेदी ॥ ७ ॥ त्यागी ओळखीचे जन । सर्व काळ नित्य नूतन । लोक शोधून पाहती मन । परी इच्छा दिसेना ॥ ८ ॥ बहुतीं शोधून पाहिलें । बहुतांच्या मनास आलें । म्हणजे बरें ॥१६॥ अखंड एकांत सेवावा । अभ्यास चि करीत जावा । काळ सार्थक चि करावा । जनासहित ॥ १७ ॥ उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास शिकवावे । उदंड समुदाये करावे । परी गुप्तरूपें ॥ १८ ॥ अखंड कामाची लगबग । उपासनेस लावावें जग । लोक समजोन मग । आज्ञा इच्छिती ॥ १९ ॥ लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे । जाण जाणोन धरावे । जवळी दुरी ॥ २१ ॥ अधिकारपरत्वें कार्य होतें । अधिकार नसतां वेर्थ जातें । जाणोनि शोधावीं चित्तें । नाना प्रकारें ॥ २२ ॥ अधिकार पाहोन कार्य सांगणें । साक्षेप पाहोन विश्वास धरणें । आपला मगज राखणें । कांहींतरी ॥ २३ ॥ हें प्राचितीचें बोलिलें । आधीं केलें मग सांगितलें । मानेल तरी पाहिजे घेतलें । कोणीएकें ॥ २४ ॥ महंतें महंत करावे । युक्ति बुद्धीनें भरावे । जाणते करून विखरावे । नाना देसीं ॥ २५ ॥ शेवटच्या या दोन ओव्यांतून श्रीसमर्थांची निरहंकार वृत्ति, अचूक मार्गदर्शन, कर्तव्यदक्षता व जनहिताची कळकळ स्पष्ट व्यक्त होते.

" पतित पावनाचे ( श्रीरामाचे ) दास । तेहि पावन करिती जगास । ऐसा निश्चयो बहुतांस । अंतरीं आला ॥ " हे श्रीसमर्थांचे शब्द त्यांच्या बाबतींत अगदीं खरे ठरतात. यापुढच्या बाराव्या दशकांत पहिल्या समासांत श्रीसमर्थ सांगतात : आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका । येथें आळस करूं नका । विवेकी हो ॥ १ ॥ प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल । प्रपंच परमार्थ चालवाल। तरी तुम्ही विवेकी ॥२॥ संसारीं असतां मुक्त । तोचि जाणावा संयुक्त । अखंड पाहे युक्तायुक्त । विचारणा हे ॥ ८॥ प्रपंचीं जो सावधान । तो परमार्थ करील जाण । प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थीं खोटा ॥९॥ म्हणोनि सावधानपणें । प्रपंच परमार्थ चालविणें । ऐसें न करितां भोगणें ।

नाना दुःखें ॥ १० ॥ सुखी असतो खबर्दार । दुःखी होतो बेखबर । ऐसा हा लौकिक विचार । दिसताचि आहे ॥ १३ ॥ म्हणोनि सर्वसावधान । धन्य तयाचें महिमान । जनीं राखें समाधान । तोचि एक ॥ १४ ॥ चाळणेचा आळस केला । तरी अवचिता पडेल घाला । ते वेळ सावरायाला । अवकाश कैंचा ॥ १५ ॥ म्हणौन दीर्घसूचनेचे लोक । त्यांचा पहावा विवेक । लोकांकरितां लोक । शाहाणे होती ॥ १६ ॥ परी ते शाहाणे ओळखावे । गुणवंताचे गुण घ्यावे । अवगुण देखोन सांडावे । जनामधें ॥ १७ ॥ मनुष्य पारखूं राहेना । आणि कोणाचें मन तोडीना । मनुष्यमात्र अनुमाना । आणून पाहे ॥ १८ ॥ दिसे सकळांस सारिखा । पाहतां विवेकी नेटका । कामी निकामी लोकां । बरें पाहे ॥ १९ ॥ जाणोन पाहिजेत सर्व । हेंचि तयाचें अपूर्व । ज्याचें त्यापरी गौरव । राखों जाणे ॥ २० ॥

याच्या पुढच्या दुसऱ्या समासांतहि जीवनाचे धडे आहेत. शिकावयाचें या दृष्टीनें कांहीं ओव्या येथें बघूं. आपल्या अपयशाचें सर्व कारण म्हणजे केवळ अचूक यत्नाचा अभाव हें पुढील ओवीवरून दिसून येतें. ही ओवी एक मोठा महत्त्वाचा पाठ शिकविते. श्रीरामाच्या आदर्शमत्वाचें मुख्य कारण म्हणजे अचूक प्रयत्न हेंहि यांतून स्पष्ट होतें.

“ अचूक येत्न करवेना । म्हणोन केलें तें सजेना । आपला अवगुण जाणवेना । कांहीं केल्या ॥ ६ ॥ समजलें पाहिजे नेमक । ज्याचें त्यापरी ॥ ” हा इषारा समर्थांनीं पुष्कळ वेळां दिला आहे.

अचूक यत्नांतच याचा अंतर्भाव होतो. “ दुसऱ्यास शब्द ठेवणें । आपला कैपक्ष घेणें । पाहों जातां लौकिक लक्षणें । बहुतेक ऐसीं॥१२॥”

या जनसामान्य लक्षणापासून दिव्य जीवनाकरितां आपल्याला दूर राहणें अवश्य आहे, त्यासंबंधीं पुढें बघूं.

लोकीं बरें म्हणाया कारणें । भल्यांस लागतें सोसणें । न सोसतां भंडवाणें । सहजचि होये ॥ १२-२-१३. आपणास जें मानेना । तेथें कदापि राहावेना । उरी तोडून जावेना । कोणी येकें ॥ १४ ॥ बोलतो खरें चालतो खरें । त्यास मानिती लहानथोरें । न्याये अन्याये परस्परें । सहज चि कळे ॥ १५ ॥ लोकांस कळेना तंवरी । विवेकें क्षमा जो न करी । तेणें करितां बराबरी होत जाते ॥ १६ ॥ जंवरी चंदन झिजेना । तंव तो

सुगंध कळेना । चंदन आणि वृक्ष नाना । सगट होती ॥ १७ ॥ जंव उत्तम गुण न कळे । तों या जनास काये कळे । उत्तम गुण देखतां निवळे। जगदांतर ॥ १८ ॥ जगदांतर निवळत गेलें । जगदांतरीं सख्य जालें । मग जाणावे वोळले । विश्वजन ॥ १९ ॥ जनीं जनार्दन वोळला । तरी काये उणे तयाला । राजी राखावें सकळांला । कठीण आहे ॥ २० ॥ पुढाऱ्यांनीं इकडे लक्ष पोंहोंचवून कार्यरंगांत ( क्षेत्रांत ) वावरावें. पेरलें तें उगवतें । उसणें द्यावें घ्यावें लागतें । वर्म काढितां भंगतें । परांतर ॥२१॥ लौकिकीं बरेंपण केलें । तेणें सौख्य वाढलें । उत्तरासारिखें आलें । प्रत्योत्तर ॥ २२ ॥ हें आवघें आपणापासी ।। येथें बोल नाहीं जनासी । शिकवावें आपल्या मनासी । क्षणक्षणा ॥ २३ ॥ हा धडा अत्यंत आस्थेनें आपण शिकावयास पाहिजे. लोक नाना परीक्षा जाणती । अंतर परीक्षा नेणती । तेणें प्राणी करंटे होती । संदेह नाहीं ॥ २५ ॥ आपणास आहे मरण । म्हणोन राखावें बरेंपण । कठिण आहे लक्षण विवेकाचें ॥ २६ ॥ हें असें असलें तरी गत्यंतरच नसल्यामुळें आपल्या शतप्रयत्नानें व मुख्य श्रीराम-समर्थकृपेनें हें अंगवळणीं पाडून घ्यावयालाच पाहिजे. बरें करतां बरें होतें । हें तों प्रत्ययास येतें । आतां पुढें सांगावें तें । कोणास काये ॥ २८ ॥ चुकूनसुद्धां आडमार्गानें न जातां जाणून बुजून सदैव सन्मार्गावरच प्राणपणानें राहावयाला पाहिजे हें यांतून स्पष्ट होतें. हेंच श्रीरामाच्या जीवनाचें ब्रीदवाक्य आहे. हरिकथा निरूपण । बरेपणें राजकारण । प्रसंग प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥२९॥ विद्या उदंडचि सिकला । प्रसंगमान चुकताचि गेला। तरी मग तये विद्येला । कोण पुसे ॥ ३० ॥

समयसूचकता, प्रसंगावधान, दूरदृष्टि, अमोल संधीचा अचूक प्रयत्न करून उपयोग करून घेणें हें सर्वत्र पाहिजे, हा या ओवींत श्रीसमर्थांनीं आम्हांला पाठ दिला आहे. तो कधींच विसरतां कामा नये. हरिकथा ( सगुण भजन ), निरूपण ( ब्रह्मस्वरूपाचें परिज्ञान ) व बरेपणें राजकारण या त्रयीवर विशेष भर देऊन श्रीसमर्थ पुनः पुनः सांगत आहेत, तें कां याचा खोल विचार करून त्याचें महत्त्व जाणावयाला पाहिजे.

या पुढील तिसऱ्या समासाच्याहि या ओव्या विचारणीय आहेतः पृथ्वीमध्यें बहुत लोक । तेंहि पाहावा विवेक । इहलोक आणि परलोक । वरा पाहावा ॥ १ ॥ इहलोक साधाया कारणें । जाणत्याची संगती धरणें ।

परलोक साधाया कारणें । सद्गुरु पाहिजे ॥ २ ॥ सद्गुरूसी काये पुसावें । हेंहि कळेना स्वभावें । अनन्य भावें येकभावें । दोन्ही गोष्टी पुसाव्या ॥ ३ ॥ याचें महत्त्व विशेष आहे. इकडे आम्हां सर्वांसच लक्ष पुरवावयास पाहिजे. दोनी गोष्टी त्या कोण । देव कोण आपण कोण । या गोष्टींचें विवरण । केलें चि करावें ॥ ४ ॥ सकळ केलियाचें फळ । शाश्वत ओळखावें निश्चळ । आपण कोण हा केवळ । शोध घ्यावा ॥ ६ ॥ शाश्वत देव तो निर्गुण । ऐसी अंतरीं बाणली खूण । देव कळला मी कोण । कळलें पाहिजे ॥ २२ ॥ पंचीकरण तत्वविवरण । महावाक्यें वस्तु आपण । निसंगपणें निवेदन । केलें पाहिजे ॥२६॥ पतीतंपावनाचे दास । तेहि पावन करिती जगास । ऐसी ही प्रचीत मनास । बहुतांच्या आली ॥ ३३ ॥

रामराज्यांत नांदूं पाहाणाऱ्या आम्हां सर्वांनाहि ही ओवी अगदीं हृदयाशीं बाळगावयाला पाहिजे. श्रीरामाचा संप्रदाय, सद्गुरूचें महत्त्व, त्याला काय पुसावें व देव कोण, आपण कोण याचा उलगडा या ओवींतून झाला आहे. जगास पावन करण्याचा मार्ग व त्या मार्गदर्शकत्वाची रामभक्तावर असणारी जबाबदारी या दोन्ही गोष्टी यांतून स्पष्ट होतात. रामराज्याच्या अखिल प्रजेनें हें उमगावयाला पाहिजे. पुढच्या चौथ्या समासांतल्या .तीनचारच ओव्या घेऊं.

जैसें मुखें ज्ञान बोले । तैसी च सर्वे क्रिया चाले । दीक्षा देखोनि चाकित झाले । सुचिष्मंत ॥ १३ ॥ असें आम्हां सर्वांना व्हावयास पाहिजे. सन्मार्गें जगास मिळाला । म्हणजे जगदीश बोळला । प्रसंग पाहिजे कळला । कोणी येक ॥ १७ ॥ रामराज्यांत राहावयाचें तर हा जगदीश ओळखण्याचा मार्ग आम्हांला प्रथम हस्तगत करणें अवश्य आहे. प्रखर वैराग्य उदासीन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । स्नानसंध्या भगवद्भजन । पुण्यमार्ग ॥ १८ ॥

अशी रामराज्याची प्रजा असावयास हवी; एरवीं रामराज्याची प्रजा म्हणवून घेणें म्हणजे 'हिऱ्याच्या पोटीं गारगोटी' अथवा 'समर्थाचा पुत्र भिकारी जैसा' असें होण्याचा संभव आहे. आर्य संस्कृतीचे हे पाठ आहेत. आदर्श पुरुष श्रीरामाचीं हीं लक्षणें आहेत. 'आधीं केलें मग सांगितलें' या ब्रीदवाक्याच्या, श्रीरामभक्त मारुतिरायाच्या अवताराचे हे स्वानुभवोद्गार

आहेत. आपल्याला ज्येष्ठांनीं दिलेले हे पाठ न कंटाळतां गिरवावयालाच पाहिजेत. यानें श्रीरामाची आपल्यावर आपोआप कृपा होईल.

आयुष्यांत वागावें कसें याकरितां आपण माहिती मिळवीत जात आहोंत, तें श्रीरामाला आदर्श ठेऊन शिकत आहोंत. त्याच्या कृपेंतील अनुकरणीय व्यक्तींचे बोल ऐकत आहोंत. आर्य संस्कृतीचा परिचय करून घेत आहोंत. पुढच्या ओव्यांकडे थोडेंसें लक्ष पुरवून पुढें जाऊं. वरीच दूरची मजल गांठावयाची आहे. विषय त्यागेंवीण तों कांहीं। परलोक तो प्राप्त नाहीं। ऐसें बोलों ठाईं ठाईं। बरें पाहा ॥ ४ ॥ या विषयत्यागाचा उलगडा श्रीसमर्थच करतात. सबळ विषय त्यागणें। शुद्ध कार्याकारण घेणें। विषय त्यागाचीं लक्षणें। ओळखा ऐसीं ॥ २७॥ (द. १२ स. ७) जगण्यापुरते उपचार, गृहस्थाश्रमाच्या निर्वाहणार्थ शेलकें विषयसेवन, सदाचरण, आत्मचिंतन रामराज्याच्या प्रजेंत असावयाला पाहिजे. घाल्रून अकलेचा पवाड। व्हावें ब्रह्मांडाहून जाड। तेथें कैंचें आणलें द्वाड। करंटपण ॥ २९ ॥ (द. १२ स. ९) केल्यानें होत आहे रे। आधीं केलें चि पाहिजे। यत्न तो देव जाणावा। अंतरीं धरितां बरें ॥ (स्फुट प्रक.) श्रीसमर्थांच्या या अचूक प्रयत्नवादापुढें गबाळ निराशावाद कोठें दडून जातो त्याचा पत्ता लागत नाहीं. रामभक्तांचा अर्थात् श्रीरामाचा हा संप्रदाय. श्रीरामाच्याच तालमींत रामभक्त तयार होतात का नाहीं? राम-राज्याच्या प्रजेचाहि हा ध्रुवतारा असावयास पाहिजे. लहान थोर काम कांहीं। केल्या वेगळें होत नाहीं। करंट्या सावध पाहीं। सदेव होसी ॥ ६ ॥ (१२–९) श्रीसमर्थ आमची पाठ थोपटून, जागें करून, दौर्बल्य घालवून सदेव म्हणजे सर्वतोपरी भाग्यवान् होण्यास सावधपणाचा इशारा देत आहेत.

हरिदास आणि विरक्त। ज्ञाता आणि प्रेमळ भक्त। व्युत्पन्न आणि वादरहित। तरी हेहि अपूर्वता ॥ द. १४ स. ५।४. रागज्ञानी ताळज्ञानी। सकळकळा ब्रह्मज्ञानी। निराभिमानें वर्ते जनीं। तरी हेहि अपूर्वता ॥५॥

आदर्श रामराज्यांत अशी अपूर्वताच हवी. उच्च आदर्श डोळ्यापुढें ठेऊन वागणें शक्य आहे किंवा नाहीं या कल्पनेचा बागुलबुवा आम्हांस वाटावयाला नको.

अवगुण सोडितां जाती। उत्तम गुण अभ्यासितां येती। कुविद्या सांडूनि सिकती। शाहाणे विद्या ॥ द. १४ स. ६ ओ. ५ ॥ मूर्खपण सांडितां

जातें । शाहाणपण सिकतां येतें । कारबार करितां उमजतें । सकळ कांहीं ॥ ६ ॥ मान्यता आवडे जीवीं । तरी कां उपेक्षा करावी । चातुर्येंवीण उंच पदवी । कदापी नाहीं ॥ ७ ॥

देवाणघेवाण हा जगाचा न्याय आहे. 'करावें तसें भरावें' हें सर्वांनीं ओळखून वागावें. आपण वागून व वर्तवून जगांत सत्क्रिया प्रतिष्ठावी. खोल विचारानें, दूरदृष्टीनें व विवेकानें सदैव वर्तावें.

आपण दुसऱ्यास करावें । तें उसिणें सवें चि घ्यावें । जना कष्टवितां कष्टावें । लागेल बहु ॥ १२ ॥ न्यायें वर्तेल तो शाहाणा । अन्यायी तो दैन्यवाणा । नाना चातुर्याच्या खुणा । चतुर जाणे ॥ १३ ॥ जें बहुतांस मानलें । तें बहुतीं मान्य केलें । येर तें व्यर्थाचि गेलें । जगनिंद्य ॥ १४ ॥ लोक आपणासी वोळावे । किंवा अवघेचि कोंसळावे । आपणास समाधान फावे । ऐसें करावें ॥१५॥ समाधानें समाधान वाढे । मैत्रीनें मैत्री जोडे । मोडितां क्षणमात्रें मोडे । बरेपण ॥ १६ ॥ लोकीं कार्यभाग आडे । तो कार्यभाग जेथें घडे । लोक सहज चि ओढे । कामासाठीं ॥ २२ ॥ म्हणोन दुसऱ्यास सुखी करावें । तेणें आपण सुखी व्हावें । दुसऱ्यास कष्टवितां कष्टावें । लागेल पुढें ॥ २३ ॥ समजले आणि वर्तले । तेचि भाग्यपुरुष जाले । या वेगळे उरले । ते करंटे पुरुष ॥ २५ ॥ जितुका व्याप तितुकें वैभव । वैभवासारखा हावभाव । समजलें पाहिजे उपाव । प्रगट चि आहे ॥ २६ ॥ आळसें कार्यभाग नासतो । साक्षेपें होत होत होतो । दिसते गोष्टी कळेना तो । शहाणा कैसा ॥ २७ ॥ मैत्री करितां होतें कृत्य । वैर करितां होतो मृत्य । बोलिलें हें सत्य कीं असत्य । ओळखावें ॥ २८ ॥ आपण येकायेकीं येकला । सृष्टींत भांडत चालिला । बहुतांमध्यें येकल्याला । येश कैचें ॥३१॥ बहुतांचे मुखीं उरावें । बहुतांचे अंतरीं भरावें । उत्तम गुणीं विवरावें । प्राणीमात्रासी ॥३२॥ शाहाणे करावे जन । पतित करावे पावन । सृष्टीमधें भगवद्भजन । वाढवावें ॥ ३३ ॥

स्वपर उद्धाराचा व स्वपर सुखी जीवनाचा हा विवेक–उपाय आहे. आर्यांची झेप साऱ्या विश्वालाच पोहोंचते. आर्य संस्कृतीचें हें थोरपण आहे. श्रीरामचरित्राचा हा फांकलेला प्रकाश आहे. अंतरापासून वैराग्य । तेंचि जाणावें महद्भाग्य । लोलंगते येवढें अभाग्य । आणीक नाहीं ॥१४।७।१०॥ भाग्याचें लक्षण व जीविताच्या सफलतेचें हें रहस्य आहे.

समाजशास्त्राच्या दृष्टीनें व व्यावहारिक दृष्टीनें पुढच्या ओव्या विशेष मननीय आहेत.

येके संगतीनें तरती । येके संगतीनें बुडती । या कारणें सत्संगती । वरी पाहावी ॥ २६ ॥ जो दुसऱ्याचें अंतर जाणें । देशकालप्रसंग जाणें । तया पुरुषा काय उणें । भूमंडळीं ॥ २८ ॥ नीच प्राणी गुरुत्व पावला । तेथें आचारचि बुडाला । वेदशास्त्रब्राह्मणाला । कोण पुसे ॥ २९ ॥ गुरुत्व आलें नीचयाती । कांहींयेक वाढली महंती । **शूद्र आचार बुडविती** । ब्राह्मणाचा ॥ ३४ ॥

**आचारः परमो धर्मः । आचारहीनं न पुनन्ति वेदाः** । या दृष्टीनें आचाराचें प्राधान्य विशेष आहे. आणि त्यावरच घाला पडला तर.... भारताच्या सद्यःपरिस्थितीचा विचार होऊन भावी आदर्श रामराज्याची सिद्धता झपाट्यानें व्हावयाला पाहिजे. श्रीसमर्थ हे मारुतिरायांचे अवतार त्यामुळें, रामाच्या व रामराज्याच्या प्राप्त्यर्थ त्यांना विचारूनच पुढें पाऊल टाकलें पाहिजे. **अग्रे वाचयाति प्रभंजनसुतस्तत्वं मुनिभ्यः परम्** । श्रीरामसभेंत तात्त्विक विवरण वाचून दाखविण्याचा अधिकार श्रीमारुतिरायांना होता. ते चिरंजीव आहेत. त्यांचेच अवतार श्रीसमर्थ. त्यांच्या उपदेशाप्रमाणें पाऊल टाकीत गेलों म्हणजे भारतवर्षाचें राज्य खरोखरी रामराज्य होऊन आम्हां सर्वांची जीवनयात्रा सुखसंतोषाची होईल व आम्हांपासून जगाला यथार्थ मार्गदर्शन होईल.

जीव जीवांत घालावा । आत्मा आत्म्यांत मिसळावा । राहराहों शोध घ्यावा । परांतरांचा ॥द. १५ स. १ ओ. ४॥

समाजांत कार्य करावयाचें तें धाकधपटशानें नव्हे तर पोटांत शिरून, हें तत्त्व या ओवींतून दिसून येतें. समाजांत कडक शिस्त असावी, ढिलेपणानें समाज विस्कळीत होतो, हें या पुढील ओवींतून श्रीसमर्थांनीं कळविलें आहे.

जानवें हेंवडकारें झाल । ढिलेपणें हेंवड आलें । नेमस्तपणें शोभलें । दृष्टीपुढें ॥ ५ ॥

प्रेमानें व हितोपदेशानेंच समाजाची घडी बसवावी.

तैसोंचि हें मनास मन । विवेकें जावें मिळोन । ढिलेपणें अनुमान । होत आहे ॥ ६ ॥

स्पष्ट व्यवहार असावा. न्यायनिष्ठुर असावें.

अनुमानें अनुमान वाढतो । भिडेनें कार्यभाग नासतो । या कारणें प्रत्यये तो । आधीं पाहावा ॥ ७ ॥ श्रेष्ठ कार्यें करी श्रेष्ठ । कृत्रिम करी तो कनिष्ठ । कर्मानुसार प्राणी नष्ट । अथवा भले ॥ ११ ॥ राजे जाती राजपंथें । चोर जाती चोरपंथें । वेडें ठके अल्प स्वार्थें । मूर्खपणें ॥ १२ ॥

सर्वोत्तम विचारसरणी, उच्च ध्येय व सर्वोत्कृष्ट वर्तनक्रम असावा. अल्पस्वार्थानें कोणीहि कधींहि अल्प होऊं नये. श्रेष्ठ कार्यांनीं मनुष्य श्रेष्ठ होतो आणि श्रेष्ठ माणसें नेहमींच श्रेष्ठ कार्यें करतात.

जो जगदांतरीं मिळाला । तो जगदांतर चि झाला । अत्रीं परत्रीं तयाला । काये उणें ॥ १४ ॥ प्रत्येकानेंच असें असावें. लटिक्याचा साभिमान घेणें । सत्य अवघेंच सोडणें । मूर्खपणाचीं लक्षणें । ते हे ऐसीं ॥ २० ॥ सत्याचा जो साभिमान । तो जाणावा निराभिमान । न्याये अन्याये समान । कदापि नव्हे ॥ २१ ॥

अनाठायीं भावना असूं नये. आपली योग्य कल्पना असावी. अचूक खूणगांठ बांधावी. एरवीं तसें न झाल्यास कार्यच कांहीं होणें शक्य नाहीं. न्याय अन्याय दोन्ही कधीं एक करूं नयेत. न्याय आणि न्यायी आचरणाचें फळ उत्कृष्ट व तसेंच तें टिकाऊ असतें.

न्याये म्हणजे तो शाश्वत । अन्याये म्हणजे तो अशाश्वत । बाष्कळ आणि नेमस्त । येक कैसा ॥ २२ ॥

मुख्य मुख्यांना हाताशीं धरून त्यांना सुधारलें म्हणजे त्यांच्या हाताखालचा समाज आपोआपच सुधारतो व अनन्य होतो.

आचार विचारेंविण । जें जें करणें तो तो सीण । धूर्त आणि विचक्षण । तेचि शोधावे ॥ २४ ॥ उदंड बाजारी मिळाले । परी ते धूर्तीचि आळिले । धूर्तापासीं कांहीं न चले । बाजाऱ्यांचें ॥ २५ ॥ या कारणें मुख्य मुख्य । तयांसी करावें सख्य । येणें करितां असंख्य । बाजारी मिळती ॥ २६ ॥ ओळखीनें ओळखी साधावी । बुद्धीनें बुद्धि बोधावी । नीतिन्यायें वाट रोधावी । पाषांडाची ॥ ३० ॥ भेट भेटों उरी राखणें । हे चातुर्याचीं लक्षणें । मनुष्यमात्र उत्तम गुणें । समाधान पावे ॥ ३५ ॥ लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले । भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ १५।२।२६. ठाईं ठाईं उदंड तांबे । मनुष्यमात्र तितुकें झोंबे । चहुंकडे उदंड लांबे । परमार्थबुद्धि ॥ २७ ॥ उपासनेचा गजर । स्थळोस्थळीं थोर थोर । प्रत्ययानें

प्राणीमात्र । सोडविले ॥ २८ ॥ ऐसें कैवाड उदंड जाणे । तेणें लोक होती शाहाणे । जेथें तेथें प्रत्यये बाणें । प्राणिमात्रासी ॥ २९ ॥ ऐसी कीर्ति करून जावें । तरीच संसारास यावें । दास म्हणें हें स्वभावें । संकेतें बोलिलें ॥ ३० ॥

दास म्हणजे श्रीरामदास. त्यांनीं श्रीरामाच्या आवडीचा हा लोकसंग्रह केला. लोकजागृति केली. आधीं केलें मग सांगितलें, या नात्यानें दुसऱ्याच्या मार्गदर्शनार्थ लिहून ठेविलें, ' हें दास म्हणें स्वभावें ' या पदावरून स्पष्ट होतें. जेथें उदंड जाणीव । तोचि तितुके सदेव । थोडे जाणीवेनें नदेव । होती लोक ॥ १५।३।६. विशाल हृदयाचे लोक सदेव होतात असें सांगण्यांत श्रीसमर्थांचा काय हेतु आहे तो आम्ही जाणला पाहिजे. याविषयीं पुढें पाहूं.

व्याप आटोप करिती । धके चपेटे सोसिती । तेणें प्राणी सदेव होती । देखत देखतां ॥ ७ ॥ जो बहुतांस मानला । तो जाणावा शाहाणा जाला । जनीं शाहण्या मनुष्याला । काय उणें ॥ २६ ॥ रेखा तितुकी पुसोन जाते । प्रत्यक्ष प्रत्यया येतें । डोळे झांकणी करावी ते । काये निमित्य ॥ १५।६।९. उदंडाचें उदंड ऐकावें । परी तें प्रत्ययें पाहावें । खरेंखोटें निवडावें । अंतर्यामीं ॥ ११ ॥ माणूस हेंकाड आणि कच्चें । मान्य करावें तयाचें येणें प्रकारें बहुतांचें । अंतर राखावें ॥ १३ ॥ वेडे करावें शाहाण । तरीच जिणें श्लाघ्यवाणें । उगेंच वादांग वाढवणें । हें मूर्खपण ॥ १५ ॥ मिळोन जाऊन मेळवावें । पडी घेऊन उलथावें । कांहींच कळों नेदावें । विवेकबळें ॥ १६ ॥ जो दुसऱ्याच्या हितावरी । तो विपट कांहींच न करी । मानत मानत विवरी । अंतर तयाचें ॥ १८ ॥ आधीं अंतर हातीं घ्यावें । मग हळुहळु उकलावें । नाना उपायें न्यावें । परलोकासी ॥ १९ ॥ भूमंडळीं सकळास मान्य । तो म्हणों नये सामान्य । कित्येक लोक अनन्य । तया पुरुषासी ॥ २९ ॥ ऐसीं चातुर्याचीं लक्षणें । **चातुर्यें दिग्विजये करणें ।** मग तयास काय उणें । जेथें तेथें ॥ ३० ॥

हें चातुर्य त्यांच्याच कृपेनें आम्हांला प्राप्त व्हावयास पाहिजे. राज्यधुरंधरांनीं कोणत्याहि समाजाला न दुखवितां युक्तीनें लोकहिताच्या इहपर–कल्याणकारक शास्त्रोक्त सुधारणा घडवून आणाव्यात हा यांतून अर्थ निघतो. लोकजागृतीचे हे धडे आर्य संस्कृतीला अनुसरून विश्वाच्या इहपर कल्याणाचें आपलें उदात्त हृदय व्यक्त करतात, श्रीसमर्थांचा अनुभव सांगतात आणि त्याला

श्रीरामाच्याच शिकवणीचा आधार दाखवितात. भारताचें रामराज्य करतांना भारताची पूर्वपरंपरा कशी आहे व श्रीरामाचें तसेंच रामराज्याचें हृदय काय, आर्य संस्कृतीचें लक्षण कोणतें याचा विचार करून **महाजनो येन गतः स पंथाः** । म्हणून विश्वसूनच पुढें पाऊल टाकलें पाहिजे.

संगतीच्या लोकांचेंच वळण लागतें म्हणून सत्संगतींतच असावें असें श्रीसमर्थ निक्षून सांगतात. सुखमय दिव्य जीवनाचा सत्संग हा एक मुख्य घटकावयवच आहे.

उत्तम संगती धरावी । आपली आपण चिंता करावी । अंतरीं बरी विवरावी । बुद्धि जाणत्याची ॥ १७ । ७ । १२. इहलोक आणि परलोक। जाणता तो सुखदायेक । नेणत्याकरितां अविवेक । प्राप्त होतो ॥ १३ ॥ जाणता देवाचा अंश । नेणता म्हणजे तो राक्षेस । यामधें जें विशेष । तें जाणोन घ्यावें ॥ १४ ॥ जाणता तो सकळां मान्य । नेणता होतो अमान्य । जेणेंकरितां होईजे धन्य । तें चि घ्यावें ॥ १५ ॥ साक्षपी शाहाण्याची संगती । तेणें साक्षपी शाहाणे होती । आळसी मूर्खाची संगती । आळसी मूर्ख ॥ १६ ॥ उत्तम संगतीचें फळ सुख । अधम संगतीचें फळ दुःख । आनंद सांडोनिया शोक । कैसा घ्यावा ॥ १७॥ उंच नीच कळेना ज्याला । तेथें अभ्यास चि बुडाला । नाना अभ्यासें प्राणीयाला । सुटिका कैंची ॥१७ । १० । १७. वेड लागोन जाले वोंगळ । त्यांस सारखेंच वाटे सकळ । ते जाणावें बाष्कळ । विवेकी नव्हेती ॥१८॥ ईश्वरें नाना भेद केले । भेदें सकळ सृष्टि चाले । आंधळे परीक्षवंत मिळाले । तेथें परीक्षा कैंची ॥२०॥ आधीं राखावा आचार । मग पाहावा विचार । आचारविचारें पैलपार । पाविजेतो ॥ २५ ॥

सकळ जाती एकवटण्याच्या या काळीं या ओव्या बोधप्रद होतील काय ? वाईटाचा त्याग आणि उत्कृष्टाचें ग्रहण करणें हा जीवनमार्ग आहे. " अमृत विष येक म्हणती । परी विष घेतां प्राण जाती । कुकर्में होते फजीती । सत्कर्में कीर्ति वाढे ॥२८॥" हा उपदेश अगदीं प्रत्येकानें स्वतःच्या अंतःकरणांत कोरून ठेवण्यासारखा नव्हे काय ?

श्रीसमर्थ कसे कळवळून उपदेश करीत आहेत पाहा :

दुल्लभ शरीरीं दुल्लभ आयुष्य । याचा करूं नये नास । दास म्हणे सावकास । विवेक पाहावा ॥१८ । ३ । १॥ अद्वितीय आनंदघन परमात्म

स्वरूपच एक नित्य आणि तद्व्यतिरिक्त भेद व अनेकत्वांनीं युक्त व दुःखमय असें नामरूपात्मक आखिल विश्व हें अनित्य अशा विचाराला नित्यानित्य-विवेक ( असें ) म्हणतात. हरि संकल्प मुळीं होता । तो चि फळीं पांहावा आतां । नाना देह्यांतरी तत्त्वतां । शोधितां कळे ॥ १८।४।२८ ॥

'एकोऽहं ' ' एकच मी ' हें स्फुरण या जगांतल्या सकळ देहांतून सर्व-सामान्यपणें सारखें जें दिसून येतें तें निरखून बघावें. चराचर विश्व बघत असतांनाहि त्या आनंदघन परमात्मस्वरूपांतच दृष्टि खिळून असावयाला पाहिजे. **इज्याचारदमोऽहिंसा दानं स्वाध्यायकर्म च । अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम्** ।—यज्ञ, शिष्टाचार, अंतर्बाह्येंद्रिय निग्रह, कोणत्याहि दृष्टीनें परपीडा न होईल असें वागणें, धनधान्यादि जीवनोपयोगी पदार्थ सत्पात्र ब्राह्मण व दीनदुबळे यांच्या कामीं वेंचणें, नित्यशः वेदशास्त्राध्ययन, स्तोत्रपाठ इत्यादि आचारधर्म स्थानीय जरी असले तरी, ज्ञानयोगानें परमात्म्याच्या त्या आनंदघन स्वरूपाचें सर्वत्र अनुसंधान ठेवणें हा परमधर्म होय, असें याज्ञवल्क्यांनींहि उपदेशिलें आहे.

प्रगट रामाचें निशाण । आत्माराम ज्ञानघन । विश्वंभर विद्यमान । भाग्यें कळे ॥ २० । ४ । १४॥ रामराज्यांतल्या सर्व लोकांचें असें हें भाग्य उदयाला आलें पाहिजे. उदंड प्रगटला विचार । धर्मस्थापना तदनंतर । तेथेंच पूजेस अधिकार । पुण्यशरीरीं ॥१८।४।३६. पूज्य पूजेसी अधिकार । उगेचि तोषवावे इतर । दुखऊं नये कोणाचें अंतर । म्हणजे बरें ॥३८॥ ऐका फडनिसीचें लक्षण । विरंग जाऊं नेदी क्षण । समस्तांचें अंतःकर्ण । सांभाळीत जावें ॥ १८ । ५ । १०. अन्यायें बहुतांस पुरवलें । हें देखिलें ना ऐकिलें । वेडें उगे चि भरीं भरलें । असत्याचे ॥ २५ ॥ असत्य म्हणिजें तें चि पाप । सत्य जाणावें स्वरूप । दोहींमधें साक्षप । कोणाचा करावा ॥२६ ॥

सत्यस्वरूपाच्या दृष्टीनेंच जीवन व्यतीत करणें हाच श्रीरामाचा संप्रदाय. श्रीरामराज्यांत हें सर्वत्र दिसून यावयाला पाहिजे. अठराव्या दशकाच्या सहाव्या समासांतल्या ओव्या उल्लेखनीय आहेत :

न्याय नीति विवेक विचार । नाना प्रसंग प्रकार । परीक्षिणें परांतर । देणें ईश्वराचें ॥ १४ ॥ महायत्न सावधपणें । समयीं धारिष्ट धरणं । अद्भुताचि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥ १५ ॥ येश कीर्ति प्रताप महिमा।

उत्तम गुणासी नाहीं सीमा । नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥ १६ ॥ देव ब्राह्मण आचार विचार । कित्येक जनांसी आधार । सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥ १७ ॥ इहलोक परलोक पाहाणें । अखंड सावधपणें राहाणें । बहुत जनांचें साहणें । देणें ईश्वराचें ॥ १८ ॥ देवाचा कैपक्ष घेणें । ब्राह्मणांची चिंता वाहणें । बहु जनासी पाळणें । देणें ईश्वराचें ॥ १९ ॥ धर्मस्थापनेचें नर । ते ईश्वराचें अवतार । जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचे ॥ २० ॥ उत्तम गुणाचा ग्राहिक । तर्क तीक्ष्ण विवेक । धर्मवासना पुण्यश्लोक । देणें ईश्वराचें ॥२१॥

श्रीरामरायाच्या कृपेनें असें हें ईश्वरी देणें आमच्या भारतवर्षाच्या रामराज्यांत सर्वत्र प्रसृत व्हावें.

कांहींच भक्ति केली नसतां । आणि इच्छिती प्रसन्नता । जैसें कांहींच सेवा न करितां । स्वामीस मागती ॥१८।७। २॥ असें कधीं होऊं नये. धर्मरक्षणाचे कष्ट आम्ही बिनदिक्कत सोसावयास पाहिजेत. मगच आमचें हें राज्य रामराज्य होईल. कष्टेंविण फळ नाहीं । कष्टेंवीण राज्य नाहीं । केल्यावीण होत नाहीं । साध्य जनीं ॥ १८।७।३. आधीं कष्टाचें दुःख सोसिती । ते पुढें सुखाचें फळ भोगिती । आधीं आळसें सुखावती । त्यांसी पुढें दुःख ॥ ५ ॥ जेहीं उदंड कष्ट केले । ते भाग्य भोगून ठेले । येर ते बोलत चि राहिले । करंटे जन ॥ १६ ॥ परमेश्वरीं अनुसंधान । लावितां होईजे पावन । मुख्य ज्ञानें चि विज्ञान । पाविजेतें ॥ १८।८।२४. ऐसीं हीं विवेकाचीं विवर्णें । पाहावीं सुचित अंतःकरण । नित्यानित्य विवेक श्रवणें । जगदोद्धार ॥ २५ ॥

यांत पावन होण्याचा, अपरोक्ष ज्ञानाचा व जगदुद्धाराचा उपाय कोणता तें उघड करून सांगितलें आहे. यांत आर्य संस्कृतीचें हृदय प्रगट होतें.

उपाय परियाये दीर्घ प्रेत्न । विवेकबळें नाना येत्न । करील तयाचें महिमान । तो चि जाणे ॥ १८।१०।३९॥

माहात्म्यप्राप्तीचे उपाय यांत दिसून येतात. असेच पुढें जाऊं.

न्याये परियाये उपाये । मूर्खास हें कळे काये । मूर्खाकारितां चिवडा होये । मज्यालसीचा ॥४१॥ मग ते शाहाणे नीट करिती । स्वयें साहोन साहविती । स्वयें करून करविती । लोकां करवी ॥५२॥ पृथ्वीमध्यें उदंड जन । जनामधें असती सज्जन । जयांकरितां समाधान । प्राणीमात्रासी ॥ ४३ ॥ तो

मनोगतांचीं आंगें जाणे । मान प्रसंग समये जाणे । संतप्तालागीं निवऊं जाणे । नाना प्रकारें ॥ ४४ ॥ ऐसा जो जाणता लोक । समर्थ तयाचा विवेक । त्याचे करणें कांहीं एक । जनास कळेना ॥ ४५ ॥ बहुत जनास चालवी । नाना मंडळें हालवी । ऐसी हे समर्थ पदवी । विवेकें होते ॥४६॥ विवेक एकांतीं करावा । जगदीश धारणेनें धरावा । लोक आपला आणि परावा । म्हणों चि नये ॥ ४७ ॥ हेत समजोन उत्तर देणें । दुसऱ्याचें जीवींचें समजणें । मुख्य चातुर्याचीं लक्षणें । ते हे ऐसीं॥१९।२।६॥ बाष्कळामधें बैसों नये । उद्धटासीं तंडों नये । आपणाकरितां खंडों नये । समाधान जनाचें ॥ ९ ॥ नेणतेपण सोडूं नये । जाणपणें फुगों नये । नाना जनांचें ह्रदये । मृदु शब्दें उकलावें ॥१०॥ उत्तम गुण प्रगटावे । मग भलत्यासी बोलतां फावे । भले पाहोन करावे । शोधून मित्र ॥ १५ ॥ उंच नीच म्हणों नये । सकळांचें निववावें ह्रदये । अस्तमानी जाऊं नये । कोठें तरी ॥ १८ ॥ जगामधें जगमित्र । जिव्हेपासीं आहे सूत्र । कोठें तरी सत्पात्र । शोधून काढावें ॥ १९॥ ही सारी शिकवण म्हणजे श्रीसमर्थ-मुखांतून आपल्या राज्यांतल्या लोकांना श्रीरामानें दिलेले दिव्य धडे होत.

एकोणीस दशकाचा चौथा समास 'सदेव' म्हणजे भाग्यशाल्यांच्या लक्षणांनीं भरलेला आहे. सदेव म्हणजे 'देवासहित' असलेल्या. आस्तिक देवकृपेच्या माणसाचीं हीं लक्षणें होत. मूळावरूनच पाहण्यांत लाभ अधिक हें स्पष्ट आहे.

येथें चटक लागावी म्हणून थोडें थोडें देतों.उपजत गुण शरीरीं । परोपकारी नाना परी । आवडे सर्वांचे अंतरीं । सर्व काळ ॥ २ ॥ सुंदर अक्षर लेहों जाणें । चपळ शुद्ध वाचूं जाणें । अर्थांतर सांगों जाणें । सकळ कांहीं ॥ ३ ॥ कोणाचें मनोगत तोडीना । भल्यांची संगती सोडीना । सदेव लक्षण अनुमान । आणून ठेवी ॥ ४ ॥ तो सकळ जनासी व्हावा । जेथें तेथें नित्य नवा । मूर्खपणें अनुमान गोवा । कांहींच नाहीं ॥ ५ ॥ नम्रपणें पुसों जाणे । नेमस्त अर्थ सांगों जाणे । बोला ऐसें वर्तों जाणे । उत्तम क्रिया ॥ ८ ॥ जो मानला बहुतांसी । कोणी बोलों न शके त्यासी । धगधगीत पुण्यराशी । माहांपुरुष ॥ ९ ॥ तो परोपकार करितांचि गेला । पाहिजे तो ज्याला त्याला । मग काय उणें तयाला । भूमंडळीं ॥ १० ॥ बहुतजन

वास पाहे । वेळेसी तत्काळ उभा राहे । उणें कोणाचें न साहे । तया पुरुषासी ॥ ११ ॥ सकळांसी नम्र बोलणें । मनोगत राखोन चालणें । अखंड कोणींयेकाचें उणें । पडों चि नेदी ॥ १३ ॥ नीति न्याय भजन मर्यादा । काळ सार्थक करी सदा । दरिद्रपणाची आपदा । तेथें कैची ॥ १४ ॥ उत्तम गुणें शृंगारला । तो बहुतांमध्यें शोभला । प्रगट प्रतापें उगवला । मार्तंड जैसा ॥ १५ ॥ **प्रपंची जाणे राजकारण । परमार्थी साकल्य विवरण । सर्वांमध्यें उत्तम गुण । त्याचा भोक्ता** ॥ १७ ॥ जितुके कांहीं उत्तम गुण । तें समर्थाचें लक्षण । अवगुण तें करंटलक्षण । सहज चि जालें ॥ ३१ ॥

श्रीसमर्थांचें म्हणजे श्रीरामाचें व श्रीरामकृपेच्या रामदासांचें असें जाणावें. रामराज्यांत असणारे सारेच 'रामदास' हें निःसंदिग्ध आहे. आम्ही ज्यांना समर्थ म्हणतों ते श्रीरामाला समर्थ म्हणत असत.

परमार्थी आणि विवेकी । त्याचें करणें माने लोकीं । कां जे विवर विवरों चुकी । पडों चि नेदी ॥ १९।६।१. जो जो संदेह वाटे जना । तो तो कदापी करींना । आदि अंत अनुमाना । आणून सोडी ॥ २ ॥ स्वतः निस्पृह असेना । त्याचें बोलणेंचि मानेना । कठीण आहे (जनता) जनार्दना । राजी राखणें ॥ ३ ॥ उत्कट भव्य तेंचि घ्यावें । मळमळीत अवघें चि टाकावें । निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥ १५ ॥ दुर्जनासी राखों जाणे । सज्जनासी निवऊं जाणें । सकळांचे मनींचें जाणे । ज्याचें त्यापरी ॥ १९ ॥ संगतीचें मनुष्य पालटे । उत्तम गुण तत्काळ उठे । अखंड अभ्यासीं लगटे । समुदाव ॥ २० ॥ जेथें तेथें नित्य नवा । जनासी वाटे हा असावा । परंतु लालचीचा गोवा । पडों चि नेदी ॥२१॥ उत्कट भक्ति उत्कट ज्ञान । उत्कट चातुर्य उत्कट भजन । उत्कट योग अनुष्ठान । ठाईं ठाईं ॥ २२ ॥ उत्कट निस्पृहता धरली । त्याची कीर्ति दिगांतीं फांकली । उत्कट भक्तीनें निवाली । जनमंडळी ॥ २३ ॥

हीं सर्व कार्यकर्त्यांचीं लक्षणें. समाजाचें, राष्ट्राचें किंबहुना जगाचें ज्याला कल्याण साधावयाचें आहे त्याला हे गुण आंगवळणीं असावे लागतात. श्रीसमर्थांचें प्रत्येकाला काय सांगणें आहे तें पाहा:

नाहीं देहाचा भरंवसा । केव्हां सरेल वयसा । प्रसंग पडेल कैसा । कोण जाणे ॥ २५ ॥ या कारणें सावधान असावें । जितुकें होईल तितुकें

करावें । **भगवत्कीर्तीनें भरावें** । भूमंडळ ॥ २६ ॥ आपणास जें जें अनुकूळ । तें तें करावें तत्काळ । होईना त्यास निवळ । विवेक उमजावा ॥ २७ ॥ विवेकामधें सांपडेना । ऐसें तों कांहींच असेना । एकांतीं विवेक अनुमाना । आणून सोडी ॥ २८ ॥ अखंड तजविजा चाळणा जेथें । पाहतां काय उणें तेथें । येकांतेंविण प्राणीयातें । बुद्धि कैंची ॥ २९ ॥ येकांतीं विवेक करावा । **आत्माराम ओळखावा** । येथून तेथवरी गोवा । कांहीं च नाहीं ॥ ३० ॥

प्रत्येकानेंच हें हृदयाशीं बाळगून असावें कीं नाहीं ? कार्यकर्त्यास श्रीसमर्थांची किती परोपरीनें शिकवणूक आहे !

थोडें बोलोनि समाधान करणें । रागेजोन तरी मन धरणें । मनुष्य वेधींच लावणें । कोणी एक ॥१९।७।४॥. कोण कोण राजी राखिले । कोण कोण मनीं भंगिले । क्षण क्षणा परीक्षिले । पाहिजे लोक ॥ ६ ॥ जिकडे तिकडे कीर्ति माजे। सगट लोकांस हव्यास उपजे। **लोक राजी राखोन कीजे।** सकळ कांहीं ॥ १० ॥ अभ्यासें प्रगट व्हावें । नाहींतरी झांकोन असावें । प्रगट होऊन नासावें । हें बरें नव्हे ॥१७॥ मंद हळुहळु चालतो । चपळ कैसा अटोपतो । अरबी ( घोडा ) फिरविणार तो । कैसा असावा ॥१८॥ हीं धकाधकीचीं कामें । तिक्षण बुद्धीचीं वर्मे । भोळ्या भावार्थें संभ्रमें । कैसें घडे ॥ १९ ॥ जरी चढती वाढती आवडी उठे । तरी परमार्थ प्रगटे । घस घस करितां विटे । सगट लोकु ॥ २१ ॥ आपलें लोकांस मानेना । लोकांचें आपणास मानेना । अवघा विकल्पाचि मना । समाधान कैंचें ॥ २२ ॥ संगीत ( उत्कृष्टपणें ) चालला तरी तो व्याप । नाहीं तरी अवघाचि संताप । क्षणक्षणा विक्षेप । किती: म्हणौनि सांगावा ॥ २५ ॥ आतां हें आपणाचिपासीं । बरें विचारावें आपणासी । अनुकूल पडेल तैसी । वर्तणूक करावी ॥३०॥ श्रीसमर्थांनीं कशाला मोठें पाप आणि करंटपण म्हटलें आहे तें पाहा. सकळ अवगुणामध्यें अवगुण । आपले अवगुण वाटती गुण । मोठें पाप करंटपण । चुकेना कीं ॥ १९।८।८. ढाळेंचि काम होतें सदा । जें जपल्यानें नव्हे सर्वदा । तेथें पीळ पेंचाची आपदा । आढळेचिना ॥ ९ ॥ मोठीं राजकारणें चुकती । राजकारणीं वेढां लागती । नाना चुकीची फजीती । चहुंकडे ॥ ११ ॥ या कारणें चुकों नये । म्हणजे उदंड उपाये । **उपायाचा अपाये । चुकतां होये** ॥ १२ ॥ व्यापेंविण

आटोप केला । तो अवघा घसरत चि गेला । अकलेचा बंद नाहीं घातला। दूरीदृष्टीनें ॥ १५ ॥

पुढाऱ्यांना अशा प्रकारें सर्व सांगून एक शेवटची सूचना दिली आहे ती पाहा. ज्यासी उपाधी आवरेना । तेणें उपाधी वाढवावीना । सावचित करूनियां मना । समाधानें असावें ॥ १९ ॥ धांव धांवो उपाधी वेष्टी । आपण कष्टी लोकहि कष्टी । हे कामा नये गोष्टी । कुसमुसेची ॥ २० ॥ लोक वहुत कष्टी जाला । आपणहि अत्यंत त्रासला । वेर्थ चि केला गलबला । कासयासी ॥२१॥ असो उपाधीचें काम ऐसें । कांहीं बरें कांहीं काणोंसें । सकळ समजोन ऐसें । वर्तता बरें ॥ २२ ॥ शुद्ध विश्रांतीचें स्थळ । तें एक निर्मळ निश्चळ । तेथें विकार चि सकळ । निर्विकार होती ॥ २५ ॥ उद्वेग अवघे तुटोनी जाती । मनासी वाटे विश्रांती । ऐसी दुल्लभ परब्रह्मस्थिती । विवेकें सांभाळावी ॥ २६ ॥ या ठिकाणीं दुर्लभ म्हणजे अतिशय महत्त्वाची ( परब्रह्मस्थिती ) असा अर्थ करावा. कार्यकर्त्यांस विश्रांती मिळावी म्हणून पुढची सूचना आहे. कांहीं गल्वला कांहीं निवळ । ऐसा कंठित जावा काळ । जेणें कारितां विश्रांती वेळ । आपणासी फावे ॥ २९ ॥ एकांतांत अनेक उपाय सुचतात. ज्ञानी आणि उदास । समुदायाचा हव्यास । तेणें अखंड सावकाश ( यथावकाश ) । एकांत सेवावा ॥ १९।९।१. जेथें तजवीजा कळती । अखंड चाळणा निघती । प्राणीमात्राची स्थिती गती । कळों येते ॥ २ ॥ राष्ट्रांत व राष्ट्राबाहेरच्या समाजाचें सूक्ष्म निरीक्षण करीत राहावयास पाहिजे. त्या त्या माणसांची गांठ घाढून आपण नामानिराळे राहून तें तें बंड तिथल्या तिथेच मोडून टाकावें. जेणें जें जें मनीं धरिलें । तें तें आधींच समजलें । कृत्रिम अवघें चि खुंटलें । सहज चि येणें ॥ ५ ॥ हुंब्यासी हुंबा लाऊन द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा । लौंदास पुढें उभा करावा । दुसरा लौंद ॥ २९ ॥ नष्टासी नष्ट योजावे । वाचाळासी वाचाळ आणावे । आपणावरी विकल्पाचे गोवे । पडों च नेदी ॥ ११ ॥ कांटीनें कांटी झाडावी । झाडावी परी ते कळों नेदावी । कळकटेपणाची पदवी । असों द्यावी ॥ १२ ॥ या ठिकाणीं ‘ जशास तसें ’ व ‘ कांट्यानें कांटा काढावा ’ या दोन म्हणी आठवतात आणि नारदांच्या भूमिकेचें स्मरण होतें. षट्कर्णी गोष्ट झाली म्हणजे कठीण जातें. म्हणून तजविजा गुप्तच असाव्या. न कळतां करी कार्य जें तें । तें काम तत्काळचि

होतें। गचगचेंत पडतां तें। चमत्कारें नव्हे ॥ १३ ॥ कोणी एक काम करितां होतें। न करितां तें मागें पडतें। या कारणें ढिलेपण तें। असों चि नये ॥ १५ ॥ दुसरी ही सूचनाहि अत्यंत महत्त्वाची आहे. जो दुसऱ्यावरी विश्वासला। त्याचा कार्यभाग बुडाला। जो आपणाचि कष्टत गेला। तोचि भला ॥ १६ ॥ मुख्य सूत्र हातीं घ्यावें। करणें तें लोकां-करवीं करवावें। कित्येक खलक उगवावे। राजकारणामध्यें ॥ १८ ॥ आपल्या बुद्धिवैभवापुढें कारस्थानी लोकांना जागच्या जागीं गप्प बसवावें. ग्रामण्य वर्मीं सांपडावें। रगडून पीठ चि करावें। करूनि मागुती सांवरावें। बुडऊं नये ॥ २० ॥ राष्ट्राच्या व तसेंच जगाच्याच इहपर उन्नति—व सुखसोईकरितांच राजकारण असतें. एवढा उदात्त हेतु त्यांत असावयास पाहिजे. करावयाचें ते स्वपर उन्नतीकरितांच व्हावयास पाहिजे. कोणाच्याहि वाईटावर दृष्टि नसावी. समाजांतल्या कार्यकर्त्यांना समर्थांनीं दुसरी एक महत्त्वाची सूचना दिली आहे. दुर्जन प्राणी समजावे। परी ते प्रगट न करावे। सज्जन्नापरीस आळवावे। महत्व देऊनी ॥ २३ ॥ जनामध्यें दुर्जन प्रगट। तरी मग अखंड खटखट। याकारणें ते वाट बुझूनि टाकावी ॥ २४ ॥ उघड द्वेष न पत्करतां युक्तीनें दुष्टांना गौरवूनच स्वतःला अथवा समाजाला त्याच्यापासून कसली बाधा न होईल अशा रीतीनें, त्यांना होईल तर शक्य तों सुधारून अथवा त्यांचा परस्पर कांटा काढून धर्मकार्य साधावें, समाजस्वास्थ्य राखावें. दुर्जनास कोणत्याहि प्रकारें हट्टाला पेटून कांहींहि, केव्हांहि, कोणालाहि अपघात करण्यास कोठें मुळीं वावच न मिळेल अशा सर्व वाटा रोधून ठेवाव्यात. ऐसा ज्याचा दंडक। अखंड पाहणें विवेक। सावधापुढें अविवेक। येईल कैचा ॥ १९।१०।१३. जितुकें कांहीं आपणासी ठावें। तितुकें हळुहळु शिकवावें। शाहाणे करून सोडावे। बहुतजन ॥ १४ ॥

केवढी ही उदात्त भावना! **सर्वे जनाः सुखिनो भवन्तु**। “ सर्व सुखी असावे। ऐशी वासना ॥ ” आर्य संस्कृतीचें हें एक मुख्य लक्षणच आहे. श्रीरामरायाच्या कोरीव आचरणाचेंहि हेंच एक तात्पर्य आहे. श्रीरामराज्यांत नांदूं पाहणाऱ्या आम्हांला रामरायाच्या सदुपदेशानेंच वागावयास पाहिजे. श्रीसमर्थांचा उपदेश म्हणजे श्रीरामरायाचाच उपदेश होय. श्रीसमर्थ हे शिष्य आणि श्रीरामराय हे श्रीगुरु. शिष्याच्या मुखांत श्रीगुरूचाच उपदेश

असणार. अगदीं हेंच समर्थांनींहि पण स्पष्टपणें सांगितलें आहे. भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें । समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥ २०-१०-३० ॥

श्रीरामदासाग्रणी मारुतिरायाचा अवतार असणाऱ्या श्रीसमर्थांच्या तोंडून श्रीरामोपदिष्ट व्यवहारस्थिति, परमार्थरीति व राजकारणपद्धति आपण श्रवण केली, श्रीरामहृदयाचा परिचय करून घेतला व रामराज्यांत वागावयाचें कसें हें आपण शिकलों. श्रीवाल्मीकींच्या शब्दांत पुन्हां हेंच अजून एकदां भक्तिभावानें ऐकूं या. "अधिकस्याधिकं फलम् ॥"

**सुभ्रूरायतताम्राक्षः साक्षाद्विष्णुरिव स्वयम् ।**
**रामो लोकाभिरामोऽयं शौर्यवीर्यपराक्रमे** ॥४५॥ (अ. स. २)

या श्लोकांत श्रीराम हा विष्णुप्रमाणें सुंदर, सकलजननानंदकर व तसाच अतुल पराक्रमी आहे असें वर्णन आहे. **रक्षको विष्णुः** । विष्णु हा सृष्टीचा रक्षक आहे. धर्माच्या योगानेंच सृष्टीचें रक्षण व्हावें लागतें आणि यामुळेंच रामाचें हें असें कोरीव धर्माचरण आहे.

धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार । जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ १८।६।२०॥ जे सत्कीर्तीचे पुरुष । ते परमेश्वराचे अंश । धर्मस्थापनेचा हव्यास । तेथेंचि वसे ॥१७।१।२९॥

येथें ईश्वर व परमेश्वर हे शब्द विष्णुपर आहेत.

धर्मग्लानीच्या वेळीं, अधर्म जगांत फोफावला असतांना साक्षात् विष्णुच या भूतलावर अवतार धारण करून सज्जनांचें रक्षण व दुष्टांचें निर्दलन करतो व धर्मस्थापना करतो. **यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्** ॥ (भ. गीता. ४-७.) श्रीकृष्णाच्या या वचनाप्रमाणें धर्मस्थापनेकरितां घेतलेल्या विष्णूच्या अनेक अवतारांपैकीं दहा प्रमुख आहेत. त्या मालिकेंत श्रीरामाचा सातवा अवतार म्हणून गणला जातो. "नाना अवतार धरणें । दुष्टांचा संहार करणें । धर्म स्थापाया कारणें । विष्णूस जन्म ॥ १०।४।४१. म्हणोन धर्मस्थापनेचे नर । तेहि विष्णूचे अवतार ॥ ४२ ॥" अयोध्या कांडाच्या पहिल्या सर्गांतील ७ व्या श्लोकावरून श्रीराम हा विष्णूचाच अवतार आहे असें कळून येतें. **स हि देवैरुदीर्णस्य रावणस्य वधार्थिभिः । अर्थितो मानुषे लोके जज्ञे विष्णुः सनातनः ॥**

रावणाचा वध व्हावा म्हणून देवांनीं प्रार्थना केली व त्याकरितांच तो सनातन विष्णु श्रीरामरूपानें पृथ्वीतलावर अवतरला, हा अर्थ या श्लोकांतून निघतो. श्रीराम हा श्रीमहाविष्णूचाच अवतार हें स्पष्ट होतें. तो स्वतः निरंकुश असून देखील त्याचें एवढें अचूक धर्माचरण केवळ धर्ममार्ग–निदर्शनार्थच आहे हेंहि पण यामुळें कळून येतें.

## श्रीरामाची लोकप्रियता

**बलमारोग्यमायुश्च रामस्य विदितात्मनः ।**
**देवासुरमनुष्येषु सगंधर्वोरगेषु च ॥ ५२ ॥**
**आशंसते जनः सर्वो राष्ट्रे पुरवरे तथा ।**
**आभ्यंतरश्च बाह्यश्च पौरजानपदो जनः ॥ ५३ ॥**
**स्त्रियो वृद्धास्तरुण्यश्च सायं प्रातः समाहिताः ।**
**सर्वान् देवान् नमस्यन्ति रामस्यार्थे मनस्विनः ॥५४॥**

(वा. रा. अ. स. २)

श्रीरामाच्या लोकप्रियतेची कल्पना या श्लोकावरून चांगली होते. सर्व-गुणसंपन्नच लोकमान्य होतो व असा लोकमान्यच लोकप्रिय होतो. अशा रीतीनें लोकमान्य व लोकप्रिय होणें हें परम भाग्याचें उत्कट लक्षण होय. याला श्रीराम एक आदर्श आहे हें या श्लोकावरून स्पष्ट होतें. देवदानवमानव तसेंच गणगंधर्वनागादिक सर्वहि श्रीरामाला आयुरारोग्यादिकांचा सतत लाभ होवो अशी रात्रंदिवस इच्छा करीत होते. बालतरुणवृद्धादि सकळ नर-नारीहि याचकारितां अहर्निश देवाची प्रार्थना करीत व त्याला अनन्यभावें नमस्कार घालीत. रामाच्या ‘सकळह्रदयनिवासी’ या विशेषणाची येथें अशी आठवण होते.

## आर्य संस्कृतीचा आदर्श पुरुष श्रीराम

आतांपर्यंत आलेल्या श्रीवाल्मीकि रामायणांतल्या श्रीरामाच्या वर्णनां-तून त्याच्या शारीरिक, धार्मिक व आध्यात्मिक-संबंधींची माहिती अनेक प्रकारें आली आहे. आतां प्रसंगपरत्वें खुद्द श्रीरामाच्या मुखारविंदांतून बाहेर पडलेल्या त्या अमृतवचनांचा यथास्थान विचार करूं या. ज्याच्या नित्याच्या सहज आचरणांतून व प्रत्यहीं केल्या गेलेल्या स्वाभाविक विनोदांतूनहि दिव्य

विभूतिमत्व आपोआपच प्रगटतें तोच आदर्श पुरुष होय. या विधानाचें सत्यत्वहि श्रीरामचरित्रांतून पदोपदीं डोळे भरून पाहावयास सांपडतें.

**यश्च रामं न पश्येत्तु यं च रामो न पश्यति ।**
**निंदितः सर्वलोकेषु स्वात्माप्यनं विगर्हते ॥**

( वा. रा. अ. स. १७–१४ )

—जो रामाला व रामराज्याला बघत नाहीं, तो मनुष्य लोकनिंदित होतो, इतकेंच नव्हे तर तो स्वतःलाच निंद्य समजतो. त्याचें मनच त्याला खातें, त्याचें त्यालाच तें लाजिरवाणें होतें. याच्या अर्थाचा प्रत्येकानेंच विचार करावा.

**सर्वेषु स हि धर्मात्मा वर्णानां कुरुते दयां ।**
**चतुर्णां हि वयस्थानां तेन ते तमनुव्रताः ॥**

( वा. रा. अ. १७–१५ )

—श्रीराम सर्व वर्णांवरहि सारखी दया करी. सर्व वर्णांच्या वयस्थांवर त्याची दयादृष्टि अधिकच होती. यामुळेंच त्याच्या पाठोपाठ सर्व मंडळी वनाला निघाली. प्रेम द्यावें व प्रेम घ्यावें. एरवी कोण कुणाच्या पाठीमागें त्या घोर वनाला जाईल. प्रत्येकानेंच हा धडा वळविला पाहिजे.

**अतोषयन्महाराजमकुर्वन्वा पितुर्वचः ।**
**मुहूर्तमपि नेच्छेयं जीवितुं कुपिते नृपे ॥ १५ ॥**
**यतो मूलं नरः पश्येत् प्रादुर्भावमिहात्मनः ।**
**कथं तस्मिन्न वर्तेत प्रत्यक्षे सति दैवते ॥ १६ ॥**

**पितृभक्त व एकवचनी श्रीराम**

—पूज्य पितृचरणांना संतोष न देतां, त्यांची आज्ञा पालन न करतां, त्यांचा कोप संपादन करून एक क्षणहि मी जीवंत राहाण्याची इच्छा करीत नाहीं. ज्याच्यामुळें देहाची उत्पत्ति त्या प्रत्यक्ष परमेश्वराची कोण अवज्ञा करील ! त्या प्रत्यक्ष दैवताच्या आधीन कोण बरें राहाणार नाहीं !

**अहं हि वचनाद्राज्ञः पतेयमपि पावके ॥ २८ ॥**
**भक्षयेयं विषं तीक्ष्णं पतेयमपि चार्णवे ।**
**नियुक्तो गुरुणा पित्रा नृपेण च हितेन च ॥२९॥**

**तद्ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकांक्षितम् ॥**
**करिष्ये प्रतिजाने च रामो द्विर्नाभिभाषते ॥३०॥**

(वा. रा. अ. स. १८)

—हे कैकेयी माते ! पित्याच्या आज्ञेनें मी धगधगत्या अग्नींतहि उडी घेईन, हलाहल विषाचेंहि पान करीन, समुद्रांतहि शरीर झोंकून देईन. हितेच्छु पिता व गुरु असणाऱ्या या महाराजांची कोणती आज्ञा आहे तें कळव. मी पालन करीन कीं नाहीं असा संदेह धरूं नकोस. मी पितृइच्छेप्रमाणें वागण्याचें पाहिजे तर वचन देतों. माझी प्रतिज्ञा कधींहि खोटी होत नाहीं. राम कधींहि दोनदां बोलत नाहीं. या श्लोकावरून श्रीरामाची उत्कट पितृभक्ति दिसून येते व श्रीराम हा एकवचनी कसा होता हेंहि कळून येतें.

## श्रीरामाचें ऋषिजीवन व स्थितप्रज्ञत्व

**तदप्रियममित्रघ्नो वचनं मरणोपमम् ।**
**श्रुत्वा न विव्यथे रामः कैकेयीं चेदमब्रवीत् ॥ १९ ॥**
**नाहमर्थपरो देवि लोकमावस्तुमुत्सहे ।**
**विद्धि मां ऋषिभिस्तुल्यं विमलं धर्ममास्थितम् ॥ २० ॥**
**यदत्रभवतः किंचिच्छक्यं कर्तुं प्रियं मया ।**
**प्राणानपि परित्यज्य सर्वथा कृतमेव तत् ॥ २१ ॥**

(वा. रा. अ. स. १९)

इतरांना मृत्युप्रायच असणारें कैकेयीचें तें कठोर वचन ऐकून श्रीरामाची प्रसन्न मुखकांति थोडीसुद्धां कमी झाली नाहीं कीं मनाला थोडें म्हणून वाईट वाटलें नाहीं. राज्याभिषिक्त होण्याकरितां म्हणून येतांना जो एक उत्साह व आनंद मुखावर दिसत होता तोच शेवटपर्यंत कायम होता. आत्मस्थितीच्या माणसाचें त्या अनंत आनंदांत विरघळून असणारें चित्त बाह्य सुखदुःखाच्या कसल्याहि आघातांनीं थोडेंसुद्धां कधीं विचलित होत नसतें. तें केव्हांहि विकार पावत नाहीं. तें निवांत स्थळीं असलेल्या दिव्याच्या ज्योतिप्रमाणें अचल असतें. या तत्त्वाचा येथें साक्षात्कार होतो. ‘ मुखकांतिर्न नश्यति ’ या उपनिषद्वाक्याचें सत्यत्व येथें अनुभवास येतें. या ठिकाणीं आत्मनिष्ठाच्या व्यवहाराची ओळख श्रीरामांनीं सर्व जगांतील माणसांना चांगलीच पटवून दिली आहे.

—श्रीराम : माते कैकेयी ! पित्राज्ञा उल्लंघून राज्याभिषिक्त होण्यास वैभवाला हपापलेला हा राम आहे असें समजूं नकोस. ऋषिजनाप्रमाणेंच मला तूं धर्मनिष्ठ समज. मला कसल्याहि ऐहिक सुखाची यत्किंचितहि अपेक्षा नाहीं. कधींहि न ढळणारी व तशीच निरवधि अखंड आनंदाची आत्मास्थिति माझी आहे. याच्या या देहपातानें जरी तुझा उद्देश पूर्ण होत असेल तर तेंहि करण्यास हा राम सिद्ध आहे. तुझें प्रिय आचरण्यांत मला देहपाताचीहि खंती नाहीं, हें पक्कें समज. तुझें इष्ट मी करीनच करीन. **अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम्** । या तत्त्वाचा येथें आविष्कार झाला आहे. " सत्याचा जो साभिमान । तो जाणावा निरभिमान । " या श्रीसमर्थांनीं केलेल्या विधानाचीहि ही पार्श्वभूमी आहे. **इंद्रोऽपि लघुतां याति स्वयं प्रख्यापितैर्गुणैः** । —आपली आपण स्तुति केली असतां इंद्रहि हलका ठरतो असें जरी असलें तरी कित्येक प्रसंगीं आपली यथार्थ जाणीव येण्याकरितां आपल्या मुखानेंच आपला परिचय करून देण्याची वेळ येते. अशा प्रसंगीं केलेलें आत्मनिदर्शन आत्मस्तुतीच्या सदरांत येत नाहीं. यावेळीं आपला यथार्थ परिचय नाहीं करून दिला तर विपरीत भावनेनें स्वपर अनहित होण्याचा प्रसंगच येऊन ठेपतो. हेंहि या ठिकाणीं श्रीरामानें आपलें हृदय उकलून आम्हां सर्वांना कळविलें आहे. **यानि सिद्धस्य लक्षणानि । तानि साधकस्य साधनानि** । —सिद्धांच्या लक्षणांचा अभ्यासच साधकांचीं साधनें होत. ब्राह्मणांच्या ज्ञानयुक्त त्यागमय जीवनाचा आदर्श मनापुढें ठेऊन तत्कालीन राजे लोकहि कसे वागत होते हें यावरून व्यक्त होतें. एरवीं राज्योपभोगाच्या त्या सर्व वासना एकदम सोडून असाहाय्य होऊन त्या वृद्धावस्थेंत वानप्रस्थ धर्माच्या आचरणाकरितां निबिडारण्य–प्रवेश करणें त्या राजे लोकांना कधीं शक्य तरी झालें असतें का ? यांत आर्यांच्या जीवनाची दिशा उमगते.

**श्रीरामाची आत्मास्थिति**

**न चास्य महतीं लक्ष्मीं राज्यनाशोपकर्षति ।**
**लोककांतस्य कांतत्वाच्छीतरश्मेरिव क्षपा ।।२२।।**
**न वनं गन्तुकामस्य त्यजतश्च वसुंधराम् ।**
**सर्वलोकातिगस्यैव लक्ष्यते चित्तविक्रिया ।।**

( वा. रा. अ. स. १९ ).

(वनं गन्तुकामस्य वसुंधरां त्यजतश्च सर्वलोकातिगस्य रामस्य चित्तविक्रिया नैव लक्ष्यते ॥ )

या श्लोकावरूनहि श्रीरामाचें निर्विकार हृदय व्यक्त होऊन अंचल आत्मनिष्ठा दिसून येते. राज्यभ्रंशानें श्रीरामाच्या मुखकांतींत थोडाहि फरक पडला नाहीं. त्याच्या ठिकाणीं असणाऱ्या आत्मनिष्ठेचें निरुपम वैभव चंद्राच्या शांत शीतल किरणांप्रमाणें त्याला अनुसरीतच राहिलें. म्हणून श्रीवाल्मीक ऋषि आपल्या दिव्य दृष्टीनें बघितलेल्याची साक्ष पटवीत आहेत. सर्वलोकमनोहर, सर्वलोकमंगलकारक, अशा विश्वात्मरूप सर्वलोकातिशय आनंदघन श्रीरामाचें चित्त कांहीं केल्या थोडें सुद्धां त्या वेळीं विचलित म्हणून झालें नाहीं, असें सांगण्यांत आत्मज्ञान्यांची पूर्णता व्यक्त केली एवढेंच. साखरेला मुंग्या चिकटल्याप्रमाणें सर्व लोक रामाभोंवतीं आकृष्ट झाले आणि श्रीरामाबरोबर वनवासास निघाले. समुद्राला बाहेरून कोठून पाण्याचा एक बिंदुहि न मिळाला तरी तो जसा परिपूर्ण असतो त्याप्रमाणेंच श्रीरामाची मुखश्री राज्यश्रीभ्रंशानें न बदलतां परिपूर्णच होती. अशी ही आर्य संस्कृति आहे. आर्य धर्माचें हें असें वैभव आहे. **समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः । तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः । सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते** ॥ गुणातीताचें लक्षण येथें स्पष्टपणें उमटलें आहे. **न ह्यतो धर्मचरणं किंचिदस्ति महत्तरम् । यथा पितरि शुश्रूषा तस्य वा वचनक्रिया** ॥ ( वा. रा. अ. १९–२२ ) श्रीरामाची पितृभक्ति, या श्लोकावरूनहि व्यक्त होते. वडिलांची शुश्रूषा करीत त्यांच्या आज्ञेंत राहाणें यापेक्षां अधिक धर्माचरण कोणतेंहि नाहीं, हें श्रीरामाचें वाक्य धर्माची, जनहिताची व समाजस्वास्थ्याची कळकळ दाखवितें.

**अन्य सापत्न मातांनीं श्रीरामाबद्दलचे काढलेले उद्गार**

श्रीराम वनाला जाणार असें समजल्यानंतर '**आर्तशब्दो महाञ्जज्ञे**' सर्व सापत्न मातांमध्यें हाहाःकार उडाला. त्या समयीं त्यांच्या मुखांतून निघालेल्या शब्दांचा विचार केला तर श्रीरामाची सहनशक्ति, विवेक आणि समत्व या गोष्टी त्या सापत्न मातांच्या अनुभवास किती आल्या होत्या तें कळून येतें.

**कौसल्यायां यथा युक्तो जनन्यां वर्तते सदा ।**
**तथैव वर्ततेऽस्मासु जन्मप्रभृति राघवः ॥ ३ ॥**
**न क्रुध्यत्यभिशप्तोऽपि क्रोधनीयानि वर्जयन् ।**
**क्रुद्धान् प्रसादयन् सर्वान् स इतोऽद्य प्रवत्स्यति ॥ ४ ॥**

(वा. रा. अ. स. २०)

—श्रीराम कौसल्येशीं जसा सदा वागत असे त्याप्रमाणेंच बाल्यादारभ्य आम्हां सर्वांशींहि तो वागत असे. सापत्न मातांच्या दृष्टीनें तारतम्यभाव मुळीं त्याच्यांत आजपर्यंत कधीं दिसून आला नाहीं. कोणी कठोर भाषण केलें तरी तो रागवत नाहीं. क्रोधाला कारण होणारी कोणतीहि वागणूक स्वतः न करतां अन्य कोणत्याहि कारणानें अथवा मुद्दाम कोणी रागावल्यासहि तो आपल्या मृदुमधुर भाषणानें त्यांचें सांत्वन करी. त्याचे ते अमृतोपम बोल ऐकून कोणाचा राग शांत झाला नाहीं असें अजून एकहि उदाहरण आम्हांला आठवत नाहीं.

**सापत्न आदर्श**

**रामे वा भरते वाऽहं विशेषं नोपलक्षये ।**
**तस्मात्तुष्टास्मि यद्राजा रामं राज्येभिषेक्ष्यति ।**

(वा. रा. अ. स. ७-३५)

—श्रीराम आणि भरत या दोघांमध्येंहि मला भेद दिसून येत नाहीं. महाराज, श्रीरामाला पट्टाभिषिक्त करणार आहेत हें ऐकून मला मोठा संतोष वाटतो. हें कैकेयीचें वाक्य आहे. मंथरेनें कितीहि सांगितलें तरी अगोदर कैकेयीनें श्रीरामाची स्तुतीच केली होती.

**धर्मज्ञो गुरुभिर्दान्तः कृतज्ञः सत्यवाक् शुचिः ।**
**रामो राज्ञः सुतो ज्येष्ठो यौवराज्यमतोऽर्हति ॥१४॥**
**भ्रातॄन् भृत्यांश्च दीर्घायुः पितृवत् पालयिष्यति ।**
**संतप्यसे कथं कुब्जे श्रुत्वा रामाभिषेचनम् ॥१५॥**
**यथा मे भरतो मान्यस्तथा भूयोऽपि राघवः ।**
**कौसल्यातोऽतिरिक्तं च सोऽनुशुश्रूषते हि माम् ॥१८॥**
**राज्यं यदिह रामस्य भरतस्यापि तत्तथा ।**
**मन्यते हि यथात्मानं तथा भ्रातॄंस्तु राघवः ॥१९॥**

(वा. अ. स. ८)

—श्रीराम हा धर्मज्ञ, सद्‌गुणी वसिष्ठाकडून उत्तम शिक्षण घेतलेला, कृतज्ञ, सत्यभाषी,परिशुद्ध हृदयाचा व त्यांतून महाराजांचा ज्येष्ठ पुत्र असल्यामुळें यौवराज्याचा अधिकार त्याला आहे. तो चिरंजीव होवो. सिंहासनावर बसला तरी पित्याप्रमाणें तो बंधु आणि भृत्य ( चाकर नोकर ) यांचें परिपालन करील. रामराज्याभिषेकाची वार्ता ऐकून तूं कां एवढी जळत आहेस ? भरतापेक्षां श्रीरामावरच माझें प्रेम अधिक आहे. तो कौसल्येपेक्षां मलाच अधिक मानतो, माझीच अधिक सेवा करतो. रामाचें राज्य झालें तरी भरताचें राज्य झाल्यासारखेंच आहे. भरतच युवराज होणार. श्रीराम आपल्याप्रमाणेंच आपल्या बंधूंच्यावरहि प्रेम करतो. सापत्नभाव नाहींसा करण्याचें हें एक आदर्श आचरण होय.

**उपाध्यायान् दशाचार्य आचार्याणां शतं पिता ।**
**सहस्रं तु पितॄन्माता गौरवेणातिरिच्यते ॥**

( म. स्मृ. २–१४५ )

—गौरवाच्या दृष्टीनें पाहातां माता ही पित्यापेक्षां हजार पटीनें अधिक श्रेष्ठ आहे. या सिद्धांतानुरूप युक्तिवाद करून कौसल्येनें श्रीरामाला तूं वनांत जाऊं नकोस असें सांगितलें; व पित्राज्ञेच्या पालनापेक्षां आपली '**प्रलापोऽर्थशून्यः** ।' आज्ञा पाळणें अधिक धर्म्य आहे म्हणून त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. श्रीरामानें तें सर्व निमूटपणें ऐकून घेतलें व धर्मदृष्टीनेंच आपल्या मातेचें सांत्वनहि पण केलें.

मातेची योग्यता पित्यापेक्षां हजारपटीनें अधिक असली तरी सती ही पतीला अनुसरणारी असल्यामुळें, पुराणादिकांतून मातेपेक्षां पित्याची आज्ञाच पालन केल्याचीं उदाहरणें आहेत. अशा तऱ्हेनें उलट युक्तिवाद करून कौसल्यामातेची श्रीरामानें समजूत घातली.

## श्रीरामाची धर्मबुद्धि

सनकादिकांचीं, ध्रुवप्रल्हादादिकांचीं उदाहरणें पाहिलीं तर परमात्मप्राप्तीकरितां, मोक्षाकरितां व मोक्षसाधनरूपी संन्यासादिकांकरितां मातापित्याची आज्ञाहि पण उल्लंघितां येते हें सिद्ध होतें. इतक्या अधिकाराचा मनुष्यहि विरळा व हा विषयहि वेगळा आहे. परमार्थिकाच्या बाबतींत हें झालें. प्रपंच्यांतल्या व्यावहारिक दृष्टीनें मातापित्याची योग्यता सर्वांत अधिक आहे. मोक्षदाता

सद्गुरु हा मातापित्याहूनहि श्रेष्ठ असतो हें '**गुरुर्गरीयान् पितृतो मातृतश्चेति मे मतिः ।**' या वचनावरून सिद्ध होतें. या प्रसंगीं श्रीरामानें सामान्यपणें सर्वांना लागू होणारा व्यावहारिक धर्मच पुढें ठेऊन वागल्याचें दिसून येतें. सामान्यांना याचीच आवश्यकता अधिक असते. आपला अधिकार न ओळखतां अधिक उडी घेऊन सर्वसामान्य धर्माचा त्याग केल्यास '**इदं च नास्ति परं न लभ्यते**' असें होतें हें सर्वसामान्य जनाच्या निदर्शनाला आणून देण्यासच जणूं श्रीरामाच्या मुखारविंदांतून अशीं वचनें बाहेर पडलीं. सर्वसामान्य लोकांकरितां सर्वसाधारणपणें एकच नियम असतात. विशिष्टांकरितां याला अपवाद म्हणून विशेष नियम असतात. मोठ्या लाभापुढें कमी प्रतीचें इतक्या महत्त्वाचें ठरत नाहीं. 'शते पंचाशत' या न्यायानें शंभर या संख्येंत पन्नास या आंकड्याचा साहजिक अंतर्भाव होतो.

**नास्ति शक्तिः पितुर्वाक्यं समतिक्रमितुं मम ।**
**प्रसादये त्वां शिरसा गन्तुमिच्छाम्यहं वनम् ॥**

(वा. अ. स. २१-३०).

—पित्राज्ञा उल्लंघण्याचें सामर्थ्य माझ्या ठिकाणीं नाहीं. मी हा वनाला जात आहें. मला आशीर्वाद दे. पतिआज्ञा पालन केल्याचें श्रेय तुलाहि पण प्राप्त होईल. तुझी ही आज्ञा का एकदां मिळाली म्हणजे माता पिता या उभयतांची आज्ञा पाळल्यासारखें होईल. असा हा श्रीराम-कौशल्यामातेचा संवाद आहे.

**धर्मो हि परमो लोके धर्मे सत्यं प्रतिष्ठितम् ।**
**धर्मसंश्रितमप्येतत्पितुर्वचनमुत्तमाम् ॥ ४१ ॥**
**संश्रुत्य च पितुर्वाक्यं मातुर्वा ब्राह्मणस्य वा ।**
**न कर्तव्यं वृथा वीर धर्ममाश्रित्य तिष्ठता ॥ ४२ ॥**

(वा. रा. अ. २१)

—जगामध्यें सर्वांपेक्षां धर्मच श्रेष्ठ आहे. धर्मांतच सत्याचाहि अंतर्भाव होतो. धर्माप्रमाणें वागल्यास सत्याचें परिपालन अनायासेंच होतें. पित्राज्ञेचें पालन करणें हा पुत्रधर्म होय. धर्माचा आश्रय करून राहाणाऱ्यानें माता, पिता, ब्राह्मण यांची आज्ञा ऐकून ती व्यर्थ होऊं देऊं नये, असें लक्ष्मणाबरोबर बोलतांना श्रीरामानें म्हटलेलें आहे.

**यस्मिंस्तु सर्वे स्युरसन्निविष्टा । धर्मो यतः स्यात्तदुपक्रमेत ।**
**द्वेष्यो भवत्यर्थपरो हि लोके । कामात्मता खल्वति न प्रशस्ता ॥**

( वा. रा. अ. स. २१–५८. )

—धर्माचें अनुष्ठान जेथें चालतें त्यांच्या हातीं सर्व पुरुषार्थ येतात. त्यांना सर्व सुखाचा लाभ होतो. धर्मविरहित अर्थ मात्र केवळ अनर्थच. तो अनर्थ कोणालाहि प्रिय नाहीं. धर्माविरुद्ध असणारी कामना आणि कल्पनाहि केवळ यातनाच असल्यामुळें ती केव्हांहि प्रशस्त होत नाहीं. ती कोणालाहि त्याज्यच ठरणार. अधर्मानें द्रव्य संपादन करणारा अनेक तऱ्हेनें समाजाच्या द्रोहाला पात्र होतो. इतकेंच नव्हे तर त्याचा तो पैसाहि पण फार दिवस टिकत नाहीं. धर्माविरुद्ध असणारीं सारीं कर्मे नरकालाच कारण होत असल्यामुळें त्यांना प्रशस्त कोण म्हणेल ?

**यशो ह्ययं केवलराज्यकारणात् । न पृष्ठतः कर्तुमलं महोदयम् ॥**
**अदीर्घकाले न तु देवि जीविते । वृणे वरामद्य महीमधर्मतः ॥६३॥**

—केवल तुच्छ अशा या इहलोकींच्या राज्योपभोगाकरितां माझ्या मोक्षफलदायी यशाचा नाश करून घेण्यास मी केव्हांहि तयार नाहीं. विजेप्रमाणें कांहीं काल चमकून नाहींशा होणाऱ्या या क्षणभंगुर जीविताकरितां अधर्मानें या पृथ्वीचें राज्य करण्यास हा राम केव्हांहि उद्युक्त होणार नाहीं. धर्माविरुद्ध अर्थकामाची प्राप्ति अनर्थकर असते असा हा अर्थ यांतून निघतो.

**न बुध्दिपूर्वं नाबुध्दं स्मरामीह कदाचन ।**
**मातॄणां वा पितुर्वाहं कृतमल्पं च विप्रियम् ॥ ८॥**

( वा. रा. अ. स. २२ )

—जाणून वा अजाणतां मातापित्यांना अप्रिय आतांपर्यंत मी कधीं आचरलें नाहीं. हें श्रीरामवाक्य कोणाला मातृपितृभक्ति शिकविणार नाहीं ? आदर्श पुत्राचें हें पावनचरित होय.

## सत्याची महत्ता

**सत्यमेकपदं ब्रह्म सत्ये धर्मः प्रतिष्ठितः ।**
**सत्यमेवाक्षया वेदाः सत्येनावाप्यते परम् ॥७॥**

( वा. रा. अ. स. १४ )

सत्य हेंच एक मुख्य ब्रह्मपद आहे. या एका सत्यांतच सर्व धर्म प्रतिष्ठित आहे. अक्षय्य वेदांचें हें सत्यच एक स्वरूप होय. अविनाशी वेद या एका सत्याचेंच प्रतिपादन करीत आहेत. सर्वश्रेष्ठ मोक्षहि पण या सत्यानेंच प्राप्त होतो. हे कैकेयीचें वचन पाहिलें तर, ती एक सामान्य स्त्री म्हणून म्हणतां येणार नाहीं. अशा जाणत्या स्त्रीच्या तोंडून पतिविरुद्ध अशींहि वचनें निघावींत, याचा अर्थ केवळ दैवी विलासच एक होय.

## रामायणांतील एक विलक्षण प्रसंग

सकाळ होण्याचाच अवकाश. पट्टाभिषेकाची सर्व सिद्धता झाली होती. कोणाच्याहि ध्यानीं मनींहि नसलेली ही राम-वनवासाची वार्ता एकदम सर्वत्र झाली. सर्वांच्या उत्साहावर विरजण पडलें. श्रीरामाला पट्टाभिषेक होण्याऐवजीं त्याला वनवास प्राप्त झाला. अयोध्य नगरी शृंगारून श्रीरामाच्या राज्याभिषेका-करितां टक लावून बसलेल्या नगर-जनांपुढून सीतालक्ष्मणासह श्रीराम मुनिवेष धारण करून वनवासास निघाले. तसा कोणताहि विचार मनांत नसतां एकाएकीं अनुभविण्यास भाग पाडणारी विषम परिस्थिति अकस्मात प्राप्त झाली, तर दैव म्हणून मानून समाधान करून घेण्यापलीकडे दुसऱ्या कोणत्याहि कल्पनेला त्या ठिकाणीं वाव नाहीं.

## दैव

श्रीरामानें लक्ष्मणाचें सांत्वन करण्याकरितां त्याला नाना तऱ्हेनें उपदेश केला, त्या अनेक प्रसंगांपैकीं हा एक प्रसंग आहे.

**जानासि हि यथा सौम्य न मातृषु ममांतरम् ।**
**भूतपूर्वं विशेषो वा तस्या मयि सुतेपि वा ॥ १७ ॥**
**सोऽभिषेकनिवृत्त्यर्थैः प्रवासार्थैश्च दुर्वचैः ।**
**उग्रैर्वाक्यैरहं तस्या नान्यद्दैवात्समर्थये ॥ १८ ॥**

( वा. रा. अ. स. २२ )

—लक्ष्मणा, पाहा ! तुला माहीत असलेलीच ही गोष्ट आहे. माझ्यांत आणि कैकयींत अथवा माझ्यांत आणि भरतांत कोणत्याहि गोष्टीवरून मतभेद म्हणून कसला तो आजपर्यंत झाला नाहीं. भरतावर आणि माझ्यावर कैकेयीचें सारखेंच प्रेम होतें. असें असतां त्याच कैकेयीचा, मला पट्टाभिषेक होऊं नये, मी

अरण्यांतच जावें व भरतालाच पट्टाभिषेक व्हावा, याविषयींचा आग्रह पाहा ! याला काय म्हणावें ! तिच्या वात्सल्याचें वर्णन करणें शक्य नाहीं. कैकेयीहि सामान्य नाहीं. ती सर्व धर्माधर्मविचार जाणते. अशा थोर स्त्रीचें आपल्या पतीपुढें एखाद्या सामान्य हटवादी स्त्रीप्रमाणें वागणें आणि बोलणें व सापत्नभावानें माझ्या ठिकाणीं इतका अभूतपूर्व द्वेष बाळगणें बघितलें, म्हणजे **दैवी विचित्रा गतिः ।** असें म्हणण्यापलीकडे, लक्ष्मणा, दुसरें कांहींहि म्हणणें शक्य नाहीं. देवासुरसंग्रामाच्या वेळीं कैकेयीच्या साहाय्यावर संतुष्ट होऊन तिला दिलेले वरच अशा तऱ्हेनें पुढें आपल्याला बंधनकारक होतील हें दशरथ महाराजांच्या ध्यानींमनींहि नव्हतें. कैकेयीलाहि त्यावेळीं ही भावना आली नव्हती. आतां हें सर्वहि असें जुळून यावें म्हणजे हें दैव नव्हे तर काय, लक्ष्मणा !

**दुर्दम्य दैवी विलास**

**यदाचिंत्यन्तु तद्दैवं भूतेष्वपि न हन्यते ।**
**व्यक्तं मयि च तस्यां च पतितो हि विपर्ययः ॥ २० ॥**
**कश्च दैवेन सौमित्रे योध्दुमुत्सहते पुमान् ।**
**यस्य न ग्रहणं किंचित्कर्मणान्येन दृश्यते ॥ २१ ॥**
**सुखदुःखे भयक्रोधौ लाभालाभौ भयाभयौ ।**
**यस्य किंचित्तथाभूतं ननु दैवस्य कर्म तत् ॥ २२ ॥**
**असंकल्पितमेवेह यदकस्मात्प्रवर्तते ।**
**निवर्त्यारब्धमारंभैर्ननु दैवस्य कर्म तत् ॥ २४ ॥**

( वा. रा. अ. स. २२ )

—पाहा ! विचार कर ! पूर्वापार कोणतीहि सूचना नसतां एकदमच प्राप्त होणाऱ्या विषम परिस्थितीचें कारण जेव्हां सांगतां येत नाहीं तेव्हां त्याला दैव म्हणण्याची पद्धत आहे. अचिंत्य रचनात्मक असलेलेंच दैव म्हणवून घेतें. दैवी संकल्प, दैव, ईश्वरेच्छा, पूर्वकर्म, भवितव्यता, प्रारब्ध, योग इत्यादि सर्व शब्द एकार्थीच आहेत. दैव आणि दैवाचा प्रभावहि पण कसलीहि पूर्वकल्पना नसतां एकदम आपल्या घाल्यानेंच प्रगट होत असल्यामुळें त्याच्या प्रतिकाराला वेळ मिळत नाहीं व त्याचें उल्लंघनहि कोणास करवत नाहीं. सर्वांच्या जीवनांत बेसावध स्थितींत अचानक घाला घालून पराभूत केल्यानंतरच दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या या मायावी दैवाबरोबर कोण झगडूं शकेल? कैकेयीचें वात्सल्य

एकाएकीं अशा रीतीनें नष्ट होऊन पट्टाभिषेकाला मी आंचविण्यास हेंच कारण असून दुसरें कोणतेंहि नाहीं. अगोदर गुप्त असून करावयाचें तें सर्वहि करूनच प्रगट होणाऱ्या या दैवाविषयीं अगोदर जागृत तरी कसें राहावें ? याचें निवारण तरी कसें करावें ? सर्वांनींहि याच्यापुढें हात टेकले आहेत. अनपेक्षित रीतीनें येणाऱ्या दुःखशोकादिकांना, भयक्रोधादिकांना, हानिलाभादिकांना हें अदृष्ट दैवच कारण होतें. कृतसंकल्पाचा व कृतकार्याचा नाश करूनच अकस्मात् जें पुढें येऊन ठाकतें तेंच दैव अथवा भवितव्य समज. असंकल्पितपणें त्याची प्राप्ति एकदम होत असल्यामुळें तें टाळणें कोणासहि शक्य होत नाहीं. याला माझेंच एक उदाहरण. आपलेंच उदाहरण पुढें ठेऊन या ठिकाणीं श्रीरामानें दुर्दम्य दैवी विलासाचें एक कठोर चित्र रेखाटलें आहे. अचानक बिकट परिस्थितींत सांपडून रगडल्या गेलेल्या मानवी विचाराचें हें एक प्रदर्शनच आहे

**सतीधर्माचा गौरव**

माता कौसल्येला पतीच्या सेवेंतच राहण्याकरितां व तिनें आपल्या बरोबर येऊं नये म्हणून, श्रीरामानें सतीधर्म विशद केला. त्यासंबंधींची त्याच्याच मुखांतील कांहीं वाक्यें पाहूं या.

**व्रतोपवासनिरता या नारी परमोत्तमा ।**
**भर्तारं नानुवर्तेत सा च पापगतिर्भवेत् ॥ २५ ॥**
**भर्तुः शुश्रूषया नारी लभते स्वर्गमुत्तमम् ।**
**अपि या निर्नमस्कारा निवृत्ता देवपूजनात् ॥ २६ ॥**
**शुश्रूषामेव कुर्वीत भर्तुः प्रियहितेरता ।**
**एष धर्मः परो दृष्टो लोके वेदे श्रुतः स्मृतः ॥ २७ ॥**

( वा. रा. अ. स. २४ )

—व्रतोपवासादिकांचें सतत आचरण करणारी उत्कृष्ट आचारसंपन्न परमोत्तम अशी असून आपल्या पतीला अनुसरणारी जर नसेल तर त्या स्त्रीस पापगति प्राप्त होते. उलट देवपूजा, व्रतोपवास, नमनादि हातून एकवेळ नाहीं घडलें तरी केवळ पतिसेवेनेंच त्या सतीस पुण्यगति म्हणजे स्वर्गाची प्राप्ति होते. पतीला हितावह व प्रिय होईल असें आपलें आचरण ठेऊन सतीनें पति-शुश्रूषेंतच असावें, असें श्रुत्यादिकांतून दिसून येतें. सती सीतेचींहि वचनें याला अनुरूपच आहेत.

**आर्यपुत्र पिता माता भ्राता पुत्रस्तथा स्नुषा ।**
**स्वानि पुण्यानि भुंजानाः स्वं स्वं भाग्यमुपासते ॥४॥**
**भर्तुर्भाग्यं तु भार्यैका प्राप्नोति पुरुषर्षभ ।**
**अतश्चैवाहमादिष्टा वने वस्तव्यमित्यपि ॥५॥**
**न पिता नात्मजो नात्मा न माता न सखीजनः ।**
**इह प्रेत्य च नारीणां पतिरेको गतिः सदा ॥६॥**

( वा. रा. अ. स. २७ )

—पूर्वी सती, आपल्या पतीला 'आर्यपुत्र' या गौरवपूर्ण नांवानें संबोधीत असे असें यावरून दिसून येतें. सर्व आदर्श गुणांनीं युक्त अशा अर्थानेंच या शब्दाचा उपयोग करीत असत. येथील आर्यपुत्र हें संबोधन श्रीरामालाच अनुलक्षून सीतेनें उच्चारलेलें आहे—"हे आर्यपुत्रा ! मातापिता, बंधु, भगिनी, पुत्र, स्नुषा आदि सर्व आपआपलें भाग्य भोगतात. अर्धांगी म्हणून म्हटली जाणारी सती मात्र पतीच्या सुखदुःखाची भागीदार होते. इहलोकीं असो वा परलोकीं असो सतीला पती हीच गती. एरव्हीं माताहि नव्हे, पिताहि नव्हे, पुत्रहि नव्हे, कन्याहि नव्हे. मित्र बांधवादिहि पण नव्हेत. सती ही पतीचें अर्धांगच ठरल्यानंतर स्वतंत्रता कोठें उरली ! वेगळें अस्तित्व तरी कोठचें ?" यामुळें सीता श्रीरामाबरोबर अरण्यास न येतां अयोध्येंतच कशी बरें राहूं शकेल ? सती-पतीचा अनुकरणीय असा हा एक आदर्श होय.

## श्रीरामाचें गुणवर्णन अर्थात मानवांचे आदर्श सद्गुण

श्रीराम, सीता आणि लक्ष्मण हीं तिघेंहि पायानें वनाला जाण्याकरितां निघालीं तेव्हां त्यांना पाहून नगरलोकांतून नानाप्रकारचे संवाद चालले होते. श्रीरामाच्या गुणाचेंच वर्णन त्यांतून दिसून येतें म्हणून ते श्लोक आपण या ठिकाणीं पाहूं.

**निर्गुणस्यापि पुत्रस्य कथं स्याद्विप्रवासनम् ।**
**किं पुनर्यस्य लोकोऽयं जितो वृत्तेन केवलम् ॥११॥**
**आनृशंस्यमनुक्रोशः श्रुतं शीलं दमः शमः ।**
**राघवं शोभयंत्येते षड्गुणाः पुरुषर्षभम् ॥१२॥**

( वा. रा. अ. स. ३३ )

—हें घडलें तें दशरथ महाराजांच्या स्वबुद्धीनें नव्हे. कितीहि गुणहीन पुत्र जरी असला तरी कसलाहि पिता त्याला घराबाहेर घालविण्यास तयार होत नाहीं. तर मग ज्यानें आपल्या सच्चारित्र्यानें सर्वांना जिंकलें, आपल्या मृदु, सुशील वर्तनानें सर्व लोकांनाच जो अत्यंत प्रिय झाला, सर्व लोकच ज्याला वश झाले, त्या श्रीरामाला दशरथच काय पण कोणता मूर्ख पिताहि घराबाहेर काढणार नाहीं, वनवास पत्करण्यास सांगणार नाहीं. मृदुमधुर स्वभाव, दया, दाक्षिण्य, विद्वत्ता, सुशीलता, इंद्रियनिग्रह, मनोनिग्रह (चित्तशांती) या सहा गुणांनीं श्रीराम संपूर्ण अलंकृत आहे. पुरुषश्रेष्ठ व्हावयाचें झाल्यास हे सहा गुण प्रत्येकानेंच आत्मसात् केले पाहिजेत. या षड्गुणांनीं युक्त असणारा आपल्या शुद्ध चारित्र्यानें व प्रेमळ आचरणानें सर्वांनाच वश करतो असें यावरून स्पष्ट होतें. श्रीरामाचाच आदर्श पुढें ठेऊन कां वागावें यासंबंधीं त्या पौरजनांच्या तोंडून निघालेला एक श्लोक पाहूं :

**मूलं ह्येष मनुष्याणां धर्मसारो महाद्युतिः ।**
**पुष्पं फलं च पत्रं च शाखाश्चास्येतरे जनाः ॥**

(वा. अ. स. ३३-१५)

—मुख्य सारभूत असलेल्या धर्मानेंच श्रीरामाचें रूप धारण केलें आहे. फलपुष्पपत्रांनीं बहरून विस्तारलेल्या मनुष्य-वृक्षाचें मूळच हा धर्मरूपी श्रीराम होय. याच्या मुखावरील तेज अपार आहे. मनुष्य-वृक्षाचें मूळ धर्मरूप भगवान श्रीरामचंद्र आणि त्याचे पर्णपुष्पफलादि इतर जन असें झाल्यास साऱ्या वृक्षविस्ताराला मुळाचाच आधार नव्हे का ?

**श्रीरामाचा दयागुण व ब्राह्मणप्रेम**

**ब्रवीमि सत्येन न तेऽस्ति यंत्रणा धनं हि यद्यन्मम विप्रकारणात् ।**
**भवत्सु सम्यक् प्रतिपादनेन मयार्जितं चैव यशस्करं भवेत् ॥**

(वा. रा. ३)

—राम हा सदोदित सत्यच बोलतो. खरेंच सांगावयाचें म्हणजे माझी जितकी म्हणून संपत्ति आहे तितकी ती सर्व आपल्यासारख्या सत्पात्र ब्राह्मणाकरितांच आहे, यांत तिळमात्र संशय नाहीं. आपल्यासारख्या सत्पात्र ब्राह्मणांना माझी संपत्ति प्राप्त झाली तर मी मिळविलेल्या त्या संपत्तीचें खरें सार्थक झालें असें मी समजतों. उंछ वृत्तीनें जीवन व्यतीत करणाऱ्या त्रिजट नामक

ब्राह्मणाशीं बोलतांना श्रीरामांनीं काढलेले हे उद्गार आहेत. यांत दानशील क्षत्रियांचा अथवा अन्य धनिकांचा व निस्पृह ब्राह्मणांचा आदर्श व्यक्त होतो; आर्य संस्कृतींत असणारें ब्राह्मणाचें स्थान समजून येतें. रामराज्यांतहि सत्पात्र ब्राह्मणांचा गौरव असाच योग्य प्रकारें होणें अत्यवश्य आहे असें श्रीरामाच्या या तोंडच्या शब्दामुळें स्पष्ट कळून चुकतें.

## श्रीरामाचा विवेक-विचार

आपल्याला अयोध्येला परत घेऊन जाण्याकरितां बंधु भरत येत आहे. भरत म्हणजे भ्रातृप्रेमाची एक आदर्श मूर्तीच होय, ही जाणीव श्रीरामाला होती. कैकेयीवरच्या रागानें तिचा हा मुलगा असा संबंध लावून 'आनां हन्तुं समभ्येति'—आम्हांला मारून निष्कंटक पृथ्वीचें राज्य भोगण्याकरितांच हा भरत ससैन्य सज्ज होऊन येत आहे अशी भावना लक्ष्मणानें करून घेतली. युद्धाकरितां सन्नद्ध होत असलेल्या लक्ष्मणाला पाहून श्रीरामाच्या मुखारविंदांतून बाहेर पडलेले ते विवेकपूर्ण उद्गार या ठिकाणीं उद्धृत करून त्याचा विचार करूं. मनुष्याच्या ठिकाणीं आवश्यक असणाऱ्या विवेकाचा या ठिकाणीं आविष्कार झाला आहे.

**किमत्र धनुषा कार्यमसिना वासचर्मणा ।**
**महेष्वासे महाप्राज्ञे भरते स्वयमागते ॥ २ ॥**
**पितुः सत्यं प्रतिश्रुत्य हत्वा भरतमागतम् ।**
**किं करिष्यामि राज्येन सापवादेन लक्ष्मण ॥ ३ ॥**
**यद् द्रव्यं बांधवानां वा मित्राणां वा क्षये भवेत् ।**
**नाहं तत्प्रतिगृण्हीयां भक्षान्विषकृतानिव ॥ ४ ॥**
**नेयं मम मही सौम्य दुर्लभा सागरांबरा ।**
**न हीच्छेयमधर्मेण शक्रत्वमपि लक्ष्मण ॥ ७ ॥**
**यद्विना भरतं त्वां च शत्रुघ्नं चापि मानद ।**
**भवेन्मम सुखं किंचिद्भस्म तत्कुरुतां शिखी ॥ ८ ॥**

(वा. रा. अ. स. ९७)

—भ्रातृप्रेमानें विवश होऊन येणाऱ्या या भरताकरितां धनुष्य-बाणाची व त्या ढालतरवारीची आवश्यकता तीं काय आहे, लक्ष्मणा? सत्यसंध पित्याला वचनभंगाच्या पातकांत लोटून स्वतः पित्राज्ञाभंगाचें पातक

पत्करून, बंधुप्रेमानें आलेल्या भरताचा कपटानें वध करून, बंधुघातकी म्हणवून घेऊन मिळणारें तें राज्य विषामिश्रित पक्वान्नाप्रमाणेंच त्याज्य नव्हे का ? असें अपवादात्मक राज्य कोणास पाहिजे ? पित्राज्ञेनें प्राप्त झालेलें राज्य उपभोगीत असतांना भरताचा वध करून श्रीरामानें अयोध्येचें राज्य बळकावलें असा अपवाद आल्याशिवाय राहील काय ? बंधु-मित्रांच्या रक्तानें माखलेलें तें राज्य कोणाला सुखावह होईल ? (' करावें तसें भरावें ' या म्हणी-प्रमाणें ) मी दुसऱ्याचा वध करून मिळविल्याप्रमाणें माझा वध करून दुसरा कोणीतरी हें राज्य कां नाहीं मिळविणार ? मी पित्राज्ञेचें उल्लंघन केल्याप्रमाणें माझीं मुलेंहि माझ्या आज्ञेचें उल्लंघन कां नाहीं करणार ? अधर्मानें मिळविलेली राज्यसंपत्ति कोणालाहि शांतिसुखप्रद होत नाहीं. पापानें पापच वाढतें. ' यथा राजा तथा प्रजा ' या न्यायानें माझी प्रजादेखील असेंच माझ्याप्रमाणें करावयाला लागून अधर्मी बनेल. सबंध राज्यच पातकी होईल. परिणामीं त्याचें काय होईल ? किती भयंकर दृश्य तें ! राज्य नसलें तरी पत्करलें. अशा राज्यापेक्षां कंदमुळांच्या आहाराची व पवित्र अरण्यवासाची ती निर्दुष्ट दिव्यानंददायी मुनिवृत्ति किती पटीनें तरी उच्च ठरेल ! मनांत आणलें तर सर्व पृथ्वी हस्तगत करण्यास मला एक क्षण नको. या पृथ्वीचेंच काय पण त्या इंद्राच्या अमरावतीचें राज्यहि जर मला अधर्मानें मिळत असेल तर तेंहि मी पत्करणार नाहीं. भरताला, तुला व शत्रुघ्नाला सोडून राज्य करण्याची थोडीदेखील जर मला इच्छा असेल तर या क्षणींच माझा हा देह जळून भस्म होवो. आम्हांपैकीं कोणालाच अशी बुद्धि नाहा. तुझ्याप्रमाणेंच भरताचेंहि निःसीम प्रेम माझ्यावर आहे. आजपर्यंत तो कधीं माझ्याविरुद्ध गेला आहे का ? सत्यस्थितीचें परिज्ञान करून न घेतां अनाठायीं कल्पना करून झालेल्या विपरीत भावनेमुळेंहि कित्येकदां वितुष्ट माजतें, खडाजंगी होते, मारूं का मरूं येथपर्यंत येऊन बेततें. पूर्वापर विचारानें सत्यस्थिति जाणून यथायोग्य वर्तण्याचें चातुर्य अंगीं बाणलें असलें म्हणजे स्वतःला व तसेंच दुसऱ्यालाहि सुख होतें. ओघानें या ठिकाणीं ' सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदांपदम् ' या वचनाचें स्मरण होतें. यांत पुष्कळच शिकण्यासारखें आहे. कानांनीं ऐकलें आणि डोळ्यांनीं पाहिलें तरी त्याच्या बुडाशीं काय आहे याचा खोलवर विचार करूनच मग काय तें ठरवावें लागतें. नाहींतर एकदम

वृत्ति बेफाम होऊन पुष्कळ वेळां कांहींचें कांहींच होतें. ‘ दिसतें तसें नसतें ’ अशी एक म्हणहि पण आहे.

## भरताच्या योगक्षेमाची चौकशी

प्रथम भेटीच्या वेळीं उद्भवलेली ती उद्दाम प्रेमाची अनावर लाट थोडी शांत होऊन चित्ताच्या समपातळीवर आल्यानंतर श्रीरामानें भरताच्या योगक्षेमाची चौकशी करण्यास सुरुवात केली. बरेच श्लोक आहेत. एकूण सर्व मिळून सत्तर इतकी या श्लोकांची संख्या भरेल. यांत सर्व कांहीं सांठविलें आहे. यांत राजकारणाचे, धर्मकारणाचे, व्यवहाराचे, परमार्थाचे तसेच वैयक्तिक धर्माचे व सामाजिक व्यवस्थेचे धडे आहेत. स्वराज्याचें रामराज्य करूं पाहाणाऱ्या आम्हांला यांत सारेंच शिकण्यासारखें आहे. नुसत्या कांड–सर्गांचा व लागल्यास श्लोकसंख्यांचा उल्लेख करून मोकळें व्हावें असें विस्तारभयानें मनांत आलें तरी ते सर्व शोधून, वाचून त्यावर विचार करणाऱ्यांची संख्या फारच कमी हा विचार येऊन त्यांच्याकरितां कांहीं श्लोक देऊन त्यावर अल्पस्वल्प विचार करावा व याचें बळेंच बाळकडु पाजावें असें वाटतें. मोह वाढीस लागून अधिक विस्तारहि होतो. द्विरुक्तीहि होते. हें सारें खरें असलें तरी हें अमृताचें भोजन आहे. अनेक वेळा अधिक प्रमाणांत अमृत पोटांत गेलें तर काय बिघडतें ? यथेच्छ पान करूं या.

श्रीरामानें आपल्या प्रिय भरताकडे बघितलें. छत्रचामरादि कांहीं दिसून आलें नाहीं. अशुभ ओढवल्याची कल्पना आली. कसला तरी अपघात झाला असावा असें वाटलें. कोणत्या अपघातामुळें हें असें झालें हें भरताच्या तोंडूनच उलगडून घेण्याकरितां ज्याच्यामुळें राजांना अपघात होतो, तीं सर्व कारणें एकेक अशीं पुढें ठेऊन प्रश्न विचारण्यांत आले आहेत. **कच्चिद्धारयते तात राजा यत्त्वमिहागतः । कच्चिन्न दीनः सहसा राजा लोकान्तरं गतः ॥**

सर्वप्रथम राजा दशरथाच्या क्षेमसमाचाराविषयींची विचारणा केली. नंतर कोणी राज्य बळकावलें का म्हणून विचारलें. पित्याचा कोप होऊन असें कांहीं झालें नसेल ना म्हणून पित्याची शुश्रूषा उत्तम प्रकारें करतोस ना म्हणून विचारपूस केली. अधर्मयुद्धानें व अधर्माचरणानें राज्य नष्ट होतें तेव्हां असें कांहीं झालें नसावेंना म्हणून राजा दशरथाविषयीं ‘ **सत्यसंगरः** ’ व ‘ **धर्मनिश्चयः** ’ या दोन विशेषणांनीं चौकशी केली. कौसल्यादि आर्यांची

चौकशी केली. त्यांचें कुशल विचारलें. पुरोहित व तत्पुत्रादिकांचीहि चौकशी झाली. ' अग्नी 'ची चौकशी झाली. मग ' कच्चिद् देवान् पितॄन् भ्रातॄन्... ' या अनुक्रमानें विचारावयास सुरुवात केली. वडिलांच्या चौकशीचा ६ वा श्लोक आहे. इथून जी ' कच्चित् ' म्हणून प्रश्न विचारावयाला सुरुवात झाली ती " **कच्चित्स्वादुकृतं भोज्यमेको नाश्नासि राघव । कच्चिदाशंसमानेभ्यो मित्रेभ्यः संप्रयच्छसि ॥** " या ७५ व्या श्लोकापर्यंत येऊन ठेपली. हे ७० श्लोकहि देण्यासारखेच आहेत. मूळावरून याचा विचार प्रत्येकानें करावा. कांहीं या ठिकाणीं उद्धृत करून त्यांवर विचार करूं.

**कच्चिद्देवान्पितॄन्भृत्यान्गुरून्पितृसमानपि ।**
**वृद्धांश्च तात वैद्यांश्च ब्राह्मणांश्चाभिमन्यसे ॥१३॥**

( वा. रा. अ. स. १०८ ).

—बाळ भरता ! देवांविषयीं, गुरुजनांविषयीं, पितरांविषयीं, पितृसमान पूज्य जनांविषयीं, ब्राह्मणांविषयीं, वृद्धांविषयीं, वैद्यांविषयीं, परिजनांविषयीं प्रेमादरानें वागून त्यांच्या विश्वासास पात्र झाला आहेस ना ? यांच्या उद्वेगानें व अवमानानें अपाय पोहोंचतो. या श्लोकांत अगदीं प्रथम देवांविषयींची पृच्छा आढळून येते. याचा विचार करण्यासारखा आहे. देवस्थानांचा जीर्णोद्धार करणें, तेथील नैवेद्यादि व्यवस्थित चालतात का नाहीं हें पाहाणें, विध्युक्त पूजादि आराधना होते कां नाहीं हें पाहाणें, अर्चक योग्य आहेत किंवा नाहींत हें पाहाणें, देवस्थानांचें सर्वतोपरी पावित्र्य राखणें, देवस्थानांचें उत्पन्न कमी न करणें, देवस्वाचा अपहार न करणें, आपआपला कुळधर्म कुळाचार चालविणें हीं सर्व ' देवता कार्यें ' होत. याशिवाय यज्ञादिकांनीं देवांना संतुष्ट करणें, नित्य वैश्वदेव करणें हेंहि देवकार्यांतच मोडतें. श्रौतस्मार्त कर्मानुष्ठानें चालविणें, षोडषोपचारानें पूजा करणें इत्यादिकांनीं देवतातृप्ति होते. श्राद्धपक्ष, पितृतर्पण, दानधर्म इत्यादि पितृकार्य म्हणवून घेतें. यांनीं पितृवर्ग तृप्त होतो. अतिथि-सेवा करणें, असहाय दीनदुबळ्यांची सोय करणें, संत-साधु-ब्रह्मनिष्ठांची शुश्रूषा करणें, योग्य गृहस्थधर्म पाळणें इत्यादि हीं कार्यें पितृतृप्तिकर होतात. पाण-पोई, अन्नछत्र, लोकोपयोगी धर्मशाळादि हीं कार्येंसुद्धां पितृवर्गाला संतोष उत्पन्न करतात. अध्ययन, सदाचरण, विरक्ति, आत्मविचार, निर्विकारता, आत्मनिष्ठा इत्यादिकांनीं श्रीगुरु प्रसन्न होतात. श्रीगुरूच्या आश्रमांची, तेथील

परिजनांची, शिष्यांची, विद्यार्थ्यांची व तेथें आल्यागेल्यांची व्यवस्था राखणें, तेथल्या गोधनाची जोपासना करणें, लाभल्यास जवळ राहून त्यांची प्रत्यक्ष सेवा करणें, त्यांनीं सांगितलेल्या मार्गावर विश्वास ठेऊन साधन करणें इत्यादि श्रीगुरुसंतोषकारक होतात. पितृसमान पूज्यजनांची आज्ञा पाळणें, केलेल्या हितोपदेशाचें आस्थेनें श्रवण करून तदनुसार आचरण ठेवणें, त्यांची सेवा-शुश्रूषा करणें, नांवलौकिक संपादणें इत्यादि कार्यांनीं ते संतुष्ट होतात. चुलते व तत्समान वृद्धजन पितापितृव्यांचे इष्टमित्र यांच्या ठिकाणीं आदरबुद्धि ठेऊन त्यांच्या आज्ञेंत असणें, तदुपदेशाचें पालन करणें, आजारपणीं व त्यांच्या कष्टकालीं शक्यतों त्यांची शुश्रूषा करणें, वृद्धाप्यकाळीं त्यांचा हितोपदेश ऐकणें इत्यादिकांनीं ते संतुष्ट होतात. वृद्धांची नित्यच सेवा करणें अथवा करविणें, सर्व वृद्धांशींच विनयानें वागणें, त्यांना प्रेमादरानें वागविणें, त्यांच्या आशीर्वादास पात्र होणें हा श्रेयोमार्ग आहे. वैद्यांना योग्य वर्षासन ठेवणें, त्यांच्या श्रमायोग्य द्रव्य देणें, लग्नमुहूर्तीं विशेष आहेरादिकांनीं द्रव्यसाहाय्यानें त्यांना संतुष्ट राखणें, गौरवानें वागविणें, त्यांच्या श्रमाचें चीज करणें इत्यादिकांच्या योगें वैद्य संतुष्ट होतात. वैद्य, स्वयंपाकी चाकर नोकर यांच्याशीं वितुष्ट पत्करलें तर वेळीं प्राणालाच अपाय होण्याचा संभव असतो. त्यांना सदाच संतुष्ट ठेवावें. ते सर्वहि विश्वासास पात्र असावेत. सत्पात्र सदाचारी ब्राह्मणांना दान-दक्षिणेनें संतुष्ट राखावें. त्यांचें व विद्यार्थ्यांचें जीवन सुखानें व्यतीत होईल अशी द्रव्य, भूमि, गोदान यांनीं व्यवस्था करावी. अग्रहार नेमावेत. त्यांना अन्न-वस्त्राची उणीव न भासतां, सुखानें अध्ययन-अध्यापनादि तपांत त्यांचा काळ जाईल असें करावें. यज्ञयागादि व इतर अनुष्ठानें त्यांच्याकडून करवून यथोक्त दानमानांनीं त्यांना तृप्त करावें. त्यांच्या शापानुग्रह-सामर्थ्याकडे लक्ष देऊन कोणत्याहि प्रकारें त्यांच्या मनस्तापाला बळी पडूं नये; व ब्रह्मस्वाचा अपहार करूं नये. गोब्राह्मणांचें सदैव संगोपन करीत असावें.

## सुराज्य व सुसमाजाची घटना

अयोध्याकांडाचा १०० वा सर्ग फार महत्त्वाचा असून हा आर्य संस्कृतीच्या जिज्ञासूंना व राज्यसूत्रधारांना अवश्य विचारणीय आहे. यांत राज्यकारभाराचे धडे आहेत, त्याचें मार्गदर्शन आहे. राज्य चालवावें कसें हें यामुळें कळून येतें. राजकारणांत भाग घेणाऱ्यांनीं याचा अवश्य अभ्यास केलाच पाहिजे. हा श्रीरामाचाच उपदेश आहे. श्रीरामाच्याच मुखारविंदापासून याचा

जन्म आहे. आदर्श रामराज्यांत नांदूं पाहाणाऱ्या आम्हां सर्वांनाच याचें अवलोकन, आलोचन व अभ्यसन अत्यवश्य आहे. पुरोहित अथवा कुलगुरु, म्हणून एक जसा कुटुंबाला अवश्य असतो त्याप्रमाणें तो राष्ट्रालाहि एक हवा. बृहस्पत्याचार्य हे देवगुरु असल्याप्रमाणें शुक्राचार्य हे दैत्यगुरु आहेत. दैत्यांनाहि जर यांची आवश्यकता भासते तर मग कोणाला भासणार नाहीं ? मनुष्यांना तर याची फार आवश्यकता असते. राज्यधुरंधरांना याचेंच मार्गदर्शन असल्यामुळें या राजगुरुवरच राज्यधुरंधरांच्या व राष्ट्राच्या इहपर उन्नतीची जबाबदारी येते. पर्यायानें राजगुरुच राष्ट्रगुरु होतो. श्रीरामाचे वसिष्ठ हे कुलपुरोहित, गुरु व तसेच राजकारणांतलेहि पण सल्लागार होते. राजगुरु सार्वांगीक, ज्ञानपूर्ण, सिद्ध असला म्हणजे आपोआपच राजकारणांतहि त्याचा सल्ला घ्यावासा वाटतो व तो घेतला जातो. श्रीराम-वसिष्ठांचा आदर्श पुढें ठेऊन याचा विचार केला म्हणजे पुरे. या बाबतींतलें अगदीं ताजें उदाहरण शिव—समर्थांचें आहे. **इष्वस्त्रवरसंपन्नमर्थशास्त्रविशारदम् । सुधन्वानमुपाध्यायं कच्चित्त्वं तात मन्यसे ।। १४ ।।** शस्त्रास्त्र व शास्त्र-विशारद उपाध्यायांचा सत्कार राखतोस ना, भरता ? म्हणून श्रीरामानें विचारलें आहे. उपाध्याय ' शापादपि शरादपि ' सामर्थ्यवान असावेत.

## कुलगुरु, राजगुरु व राष्ट्रगुरु

प्रत्येक कुटुंबाचा कुलगुरु, राजगुरु व राष्ट्रगुरु हा ब्राह्मण, सत्कुलप्रसूत जितेंद्रिय, त्यागी, ब्रह्मनिष्ठ, सदा स्वधर्मनिरत, धर्माच्या अध्ययन-अध्यापनादि स्वकर्मानुष्ठानपर, ब्रह्मवर्चस्वी, निरहंकारी, बहुश्रुत, असूयारहित, वेदमतानुसारी, होमहवनादिकांत श्रद्धाळु, वेदवेदांगनिष्णात, निखिल शास्त्रकोविद, इतिहासपुराणज्ञ, विमर्षात्मक बुद्धीचा, आचार, विचार, उच्चार यांत एकसूत्रीपणा असणारा, सरल स्वभावाचा, देवगुरुपितृमातृभक्त असा असला पाहिजे. पूर्वकालीन बहुतेक सर्वच ब्राह्मण वर दिलेल्या अखिल लक्षणांनीं युक्त होते. नियमाला अपवाद म्हणून कोठें कदाचित् एखादा सांपडला तर सांपडला नाहीं तर नाहीं. अशा पुरोहितांना व ब्राह्मणांना मोठ्या गौरवानेंच वागवावें, नाहीं तर त्यांच्या अपमानानें कुटुंबाला व राष्ट्रालाच धक्का पोहोंचतो.

**कच्चिदात्मसमाः शूराः श्रुतवंतो जितेंद्रियाः ।**
**कुलीनाश्चेंगितज्ञाश्च कृतास्ते तात मंत्रिणः ।।१५।।**

**मंत्रो विजयमूलं हि राज्ञो भवति राघव ।**
**सुसंवृत्तो मंत्रिधुरैरमात्यैः शास्त्रकोविदैः ॥१६॥**

( वा. रा. अ. कां. स. १०० )

—भरता ! तुझ्यासारखेच शूर, श्रुतिस्मृतिज्ञ, जितेंद्रिय, कुलीन, इंगितज्ञ असे मंत्री केले आहेस ना ? शस्त्रास्त्र व शास्त्र-पारंगत अशा जनहितदक्ष युक्तिबुद्धिसंपन्न अमात्यांनीं परिवेष्टित असा शोभायमान होतोस ना ? राजा व प्रजा यांना सुमंत्र्यांनीं यश, कीर्ति व कुमंत्र्यांनीं भ्रष्टता आणि अपयश यांची प्राप्ति होते.

**कच्चित्सहस्रान्मूर्खाणामेकमिच्छसि पण्डितम् ।**
**पण्डितो ह्यर्थकृच्छ्रेषु कुर्यान्निश्रेयसं महत् ॥२२॥**
**सहस्राण्यपि मूर्खाणां यद्युपास्ते महीपतिः ।**
**अथवाप्ययुतान्येव नास्ति तेषु सहायता ॥२३॥**
**एकोऽप्यमात्यो मेधावी शूरो दक्षो विचक्षणः ।**
**राजानं राजपुत्रं वा प्रापयेन्महतीं श्रियम् ॥२४॥**

—हजारों लाखों मूर्खांपेक्षां एखाद्या पण्डिताचें साहाय्य अचूक लाभदायक होतें, मोठेंच फायदेशीर होतें. मेधावी, शूर, दक्ष, विद्वान असा एकच एक अमात्य असला तरी पुरे. तो फार मोठें यश, कीर्ति, वैभव राजाला प्राप्त करून देतो. इथे ' **एकोऽपि वेदविद्धर्मं यं व्यवस्येद्द्विजोत्तमः । स विज्ञेयः परो धर्मो नाज्ञानामुदितोऽयुतैः ॥** ' ( मनु. १२।११३ ) या मनूक्त श्लोकाची आठवण होते.

## मंत्री कसे असावेत ?

राजाला जितका आपला विश्वास असतो तितका किंबहुना त्याहून अधिक विश्वासार्ह असा मंत्री असला पाहिजे. मंत्री म्हटले म्हणजे ते धीर, वीर, शूर असे असले पाहिजेत, विद्वान असले पाहिजेत. अर्थशास्त्रज्ञ, नीतिशास्त्रज्ञ, जितेंद्रिय, मातापित्याप्रमाणें सर्वांचें हित साधणारे, मृदुमधुरभाषी, निरहंकारी, बहुश्रुत, कुलीन, प्रामाणिक, धर्मनिष्ठ, आत्मतत्त्वज्ञ, वर्णाश्रमधर्माप्रमाणें लोकांना त्यांच्या त्यांच्या कर्मांत नियुक्त करणारे, सदाचारसंपन्न, प्रीतिपात्र होऊन सर्वांच्या उत्कर्षाकारितां कायावाचामनेंकरून प्रयत्न करणारे, धर्माधर्मरहस्य जाणणारे, दयाशील, व्यवहार-परमार्थ कुशल, दूरदृष्टीचे, समाजांत

ऐहिक व तशाच पारलौकिक सुखसाधनांची वाढ करणारे, विश्वबंधु, इंगितज्ञ, समयसूचक उपाय योजणारे, प्रसंगावधानी इत्यादि लक्षणांनीं युक्त असेच मंत्री असावेत. प्रजेचें इहपर सुख अधिकांशानें मंत्र्यांवरच अवलंबून असतें. प्रसंगोपात्त या ठिकाणीं श्रीसमर्थांच्या याविषयींच्या ओव्या आठवतात. श्रीराम, श्रीरामदास या दोघांचेंहि मिळतें जुळतें मत आपल्याला एकदम पाहावयाला सांपडेल.

धीर उदार सुंदर । दक्ष व्युत्पन्न चतुर । सकळ प्रयत्नीं तत्पर । अत्यादरें ॥ १ ॥ दूरदृष्टी दीर्घ प्रयत्नीं । समय प्रसंग जाणें चिन्हीं । नासला फड नेटका वचनीं । वोलोन करिती ॥ २ ॥ जाणती दुसऱ्याचें अंतर । सावधानता निरंतर । नेमस्त न्यायाचें उत्तर । बाष्कळ नाहीं ॥३॥ पवित्र वासनेचे उदास । केवळ भगवंताचे दास । सारासार विचारें वास । हृदयीं केला ॥ ४ ॥ अगाध अव्यग्र धारणा । मिळोनि जाती राजकारणा । कार्यभागाची विचारणा । यथायोग्य योजिती ॥ ५ ॥ न्याय नीति मर्यादेचा । स्नान संध्या पवित्रतेचा । सत्यवादी बहुतांचा । अन्याय क्षमित ॥ ६ ॥ चुकणें विसरणें असेना । मत्सर पैशून्य दिसेना । कोप क्षणिक असेना । विवेकी पुरुष ॥ ७ ॥ हरिकथानिरूपण । तेथें प्रेमळ अंतःकरण । पाहों जातां उत्तम लक्षण । सकळ असे ॥ ८ ॥ ऐशा प्रकारचें पारिपत्य । करूं जाणती सकळ कृत्य । धन्य धन्य कृतकत्य । निष्कामतेनें ॥ ९ ॥ ऐसे भले परमार्थी । श्रवण मनन अर्था अर्थीं । जे परलोकींचे स्वार्थी । परोपकारी ॥ १० ॥

## आरोग्यादि बोध

**कच्चिन्निद्रावशं नैषि कच्चित्कालेऽवबुद्ध्यसे ।**
**कच्चिच्चापररात्रेषु चिन्तयस्यर्थनैपुणम् ॥ १७ ॥**

—फार झोंपत नाहींस ना? प्रातःकालींच उठतोस ना? अपरात्रीच्या शांत वातावरणांत अर्थप्राप्तिविषयक विचार करतोस ना? 'लौकर निजे लौकर उठे, तया ज्ञान आरोग्य संपत्ति भेटे.' रात्रीं दहा वाजतां झोंपून तीन चार वाजण्यापूर्वींच उठावें. लौकर निजून लौकर उठल्यानें आरोग्य वाढतें, अंगांतला उत्साह वाढतो, कामाचा तकवा येतो, थकवा जातो, कोणताहि उद्योग झपाट्यानें होतो. प्रातःकालीं उठल्यानें बुद्धि तरतरीत असते. प्रातःकालची वेळ व वातावरण नितांत शांत असतें. हवा आरोग्यदायी असते. शरीर

उत्साहपुलकित होतें. रात्रभर देहाला विश्रांति मिळाल्यामुळें मेंदू व शरीर प्रातः-कालीं ताजेतवाने होतात. कोणत्याहि विषयाचा अभ्यास, पाठांतर, कसलाहि गहन विचार करण्यास, योगाभ्यासाला, ध्यानाला प्रातःकालच अनुकूल असतो. त्यावेळीं मनाची एकाग्रताहि अधिक होते. म्हणूनच " **प्रत्यहं प्रातरुत्थाय चिंतयेदात्मनो हितं** " असें लघुआश्वलायन स्मृतीचें वाक्य आहे. प्रातःकालीं शरीराच्या आंतबाहेर स्वाभाविकच शांतता नांदत असल्यामुळें मनाची धांवपळहि कमी असते. शरीराची हालचालहि अधिक नसते. शांत वातावरणांत सूक्ष्म विचार सुचतो. **प्रातरुत्थाय यो नित्यं संध्यास्नायी भवेद्द्विजः । सप्त-जन्मकृतं पापं त्रिभिर्वर्षैर्व्यपोहति ॥** (दक्ष. २।१२)—प्रातःकालीं उठून जो प्रातःस्नान करतो तो तीन वर्षांतच सात जन्माचें पाप नष्ट करतो. **गुणा दश स्नानपरस्य साधो रूपं च तेजश्च बलं च शौचं । आयुष्यमारोग्य-मलोलुपत्वं । दुःस्वप्नघातश्च तपश्च मेधा ॥ १३ ॥ मनः प्रसादजननं रूपसौभाग्यवर्धनम् । दुःखशोकापहं स्नानमानंदज्ञानदं तथा ॥ १४ ॥** —रूप, तेज, बल, पावित्र्य, आयुष्य, आरोग्य, अलोलुपत्व, दुःस्वप्नदोषनाश, तप, मेधा हे दहा गुण प्रातःस्नानापासून लाभतात. प्रातःस्नान मन प्रसन्न राखतें, सौंदर्य आणि सौभाग्य वाढवितें, दुःखशोक नाहींसें करतें, मान आणि ज्ञान देतें.

**कच्चिन्मंत्रयसे नैकः कच्चिन्न बहुभिः सह ।**
**कच्चित्ते मंत्रितो मंत्रो राष्ट्रं न परिधावति ॥**

——सर्वांनीं मिळून विचार करावयाच्या प्रसंगीं एकटा विचार करीत नाहींस ना ? एकट्यानेंच विचार करावयाच्या वेळीं घोळका जमवीत नाहींस ना ? तुझे गुप्त विचार राष्ट्रभर होत नाहींत ना ? कांहीं प्रसंगीं एकट्यालाच विचार करावा लागतो व कांहीं वेळां समुदायानिशीं विचार करावयाचा असतो. गौप्य असलेलें दुसऱ्याला कळवितां कामा नये. चार जणांचें मत घेऊन ठरवावयाच्या वेळीं व कोणतेंहि कार्य करण्याच्या प्रसंगीं आपण एकट्यानेंच आपल्या मनाप्रमाणें तें ठरवूं नये व करूं नये. असें झालें असतां कदाचित् आपल्या कोत्या विचारांनीं व संकुचित वर्तनानें जनांचें नुकसान होण्याचा संभव असतो. स्वीय गुणदोषांचा, गृहछिद्राचा व अशाच गुप्त गोष्टीच व मसलतीचा आपण एकट्यानेंच विचार करावा लागतो. षट्कर्णीं झालेलें कार्य व मसलत नासते.

**कच्चिदर्थं विनिश्चित्य लघुमूलं महोदयं ।**
**क्षिप्रमारभसे कर्म न दीर्घयसि राघव ।।**

—कोणत्याहि महाफलाच्या सत्कार्याची प्रेरणा झाल्याबरोबर अल्प प्रमाणानें कां होईना ' अल्पारंभः क्षेमकरः ' या न्यायानें त्या कार्याला वेळ न लावतां लौकरच प्रारंभ करतोस ना? महाफलाच्या संकल्पित सत्कार्याचा अल्पारंभ शीघ्र करून हातीं घेतलेलें तें कार्य चिकाटीनें शेवटास नेलें पाहिजे; तें झपाट्यानें यशस्वी रीतीनें पार पाडलें पाहिजे; त्यांत दीर्घसूत्रीपणा नसावा. **श्वःकार्यमद्यकुर्वीत पूर्वाण्हे चापराण्हिकम् । न हि प्रतीक्षते कालः कृतं वाऽपि न वा कृतम् ।। निमिषः क्षणशश्चैव विद्यामर्थं च साधयेत् । गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत् ।।** इत्यादि सुभाषितांचें इथे स्मरण होतें. संकल्पित कार्यें आपल्याला वा दुसऱ्याला हितकारी व मंगलप्रद असावींत. आरंभिलेलें कार्य शीघ्रफलदायी होण्यासाठीं झटावें. शतप्रयत्न करून हातीं घेतलेलें सत्कार्य तडीस न्यावें. कोणतेंहि कार्य संपूर्ण होण्यापूर्वींच त्याचा स्फोट करूं नये. मध्येंच स्फोट झाल्यास कार्य सिद्धीला जात नाहीं म्हणून कठीण कार्य गुप्तपणेंच साधावें. सर्व विचार धर्मशास्त्राला सोडून केवळ तर्ककर्कश असा असूं नये. विचाराच्या बाबतींत एकसूत्रीपणा असावा. विश्वासार्ह कार्यकारी मंडळ असावें. कोणत्याहि रीतीनें चाललेल्या गुप्त मसलतीचा कधीं स्फोट होऊं नये. कांहीं क्रियेनेंच दर्शवावें लागतें. कांहीं खुणेनेंच पटवावयाचें असतें. कांहीं लिहूनच कळवावयाचें असतें व कांहीं उघड बोलूनच दाखवावयाचें असतें. हजारों लाखों अप्रबुद्ध लोकांशीं उगीच दीर्घकाल घासाघासी करीत बसण्यापेक्षां एखाद्याच खऱ्या पंडिताशीं अल्पकालच केलेला विचार धर्मसंकटकालीं अथवा कार्याकार्यप्रसंगीं अचूक श्रेयस्कर ठरतो. त्या त्या कार्याचा व त्या त्या विषयाचा अनुभव असणाऱ्याशीं त्याचा त्याचा विचार केल्यास अल्प द्रव्यांत, अल्पावधींत उत्कृष्ट कार्य होतें व अचूक उपाय सांपडतो. सभासदांची निवड करावयाची झाल्यास ती सद्वृत्त अशा मातापित्यांच्या पोटीं आलेल्या उच्च जातींतील घरंदाज अशा सच्छील विद्वानांचीच करावी. वरच्या जातींतील कुलीन घराण्यांत उच्च संस्कारांचें रक्त परंपरागत आल्यामुळें, अधिक पुटें दिलेल्या औषधाप्रमाणें, अशांचा सहयोग अचूक फलदायी होतो. सहवासांत असलेल्या लोकांच्या लक्षणांवरून त्यांचे त्यांचे पूर्व व सांप्रतचे संस्कार समजून येतात. मनुष्याची भूमिका त्याच्या सहजगत्या आचरणांवरून अनायासें दिसून

येते. चालरीत, चालचालणूक, आचारविचार, आहारविहार यांच्या योगानें मनुष्याचें लक्षण चटकन् कळून येतें. पूर्वार्जित नीचोच्चकर्माप्रमाणें व त्याच्या त्या त्या संस्काराप्रमाणें त्याला त्याला त्या त्या नीचोच्च जातींत जन्म येतो. मनुष्याचें चारित्र्य त्याच्या जन्मावरून, कुलशीलावरून, मातापित्यावरून परिवारावरून, साधनसामुग्रीवरून, अभ्यासावरून, संग–सहवासावरून व विविध कार्यकलापावरून पक्कें समजून येतें. मनुष्य कायावाचामनें व वर्तनें-करून परिशुद्ध असणाराच चारित्र्यसंपन्न असतो. अशाच्या विचारांत, वाणींत व क्रियेंत सद्भावनांचा उत्कर्ष उठून दिसतो व तो विश्वसनीय वाटतो.

## समाजशास्त्राचे कांहीं नियम

**कच्चिन्मुख्या महत्स्वेव मध्यमेषु च मध्यमाः**
**जघन्याश्च जघन्येषु भृत्यास्ते तत्र योजिताः ॥२५॥**

( अ. स. १०० )

—त्यांच्या त्यांच्या जातिकुलशील आणि विद्वत्तेच्या योगानें उत्तम, मध्यम व कनिष्ठ असणाऱ्या त्या त्या सेवक जनांना त्यांच्या त्यांच्या योग्यते-प्रमाणें त्यांना त्यांना अनुरूप असणाऱ्या त्या त्या उत्तम, मध्यम व कनिष्ठ कार्यांमध्यें त्यांची त्यांची बिनबोभाट नेमणूक करतोस ना, भरता ? म्हणून श्रीरामानें विचारलें आहे. या ठिकाणीं समाजशास्त्राचा एक सिद्धांत प्रगट झाला आहे. शीलभ्रष्ट किंवा हीन जातीच्या माणसाला अधिकारपद दिलें असतां तो सज्जनांचे व उच्च वर्णियांचे आचारविचार नीतिनियम मुद्दाम बिघडवितो. त्याची मर्जी संपादण्याकरितां कांहीं मुद्दामच त्याच्याप्रमाणेंच वागूं लागतात. जो म्हणून त्याला विरोध करतो त्याचा तो डावच धरतो. अधिकाराचा दुरुपयोग करून बळजबरीनें त्याला बिघडविल्याशिवाय तो राहात नाहीं. असेंच अधिक प्रमाणांत होऊं लागलें म्हणजे क्रमशः उच्च आदर्शाचा उच्च वर्ण व सज्जनांचें अनुकरणीय दिव्य आचरण राष्ट्रांतून नष्ट होण्याच्या मार्गाला लागतें. समाजांतील नीतीचाच नाश होऊं लागल्यामुळें त्या राष्ट्राला सर्वतोपरी उतरती कळा लागते. उच्च संस्काराच्या श्रेष्ठ माणसांना आपल्या-सारखेंच सर्वांनीं व्हावें म्हणून जसें वाटतें तसेंच हीन संस्काराच्या कनिष्ठ माणसांनाहि पण आपल्यासारखेंच सर्वांनीं व्हावें असें वाटत असतें. त्यामुळें राष्ट्राची उन्नति व्हावी असें इच्छिणाऱ्या राष्ट्रचालकांनीं अधिकारीवर्गाची

नेमणूक फारच खोल विचारानें करावी. अधिकाराचीं पदें श्रेष्ठांना मिळालीं म्हणजे तदनुषंगानें सबंध राष्ट्रच श्रेष्ठ बनतें, समाजाचा उत्कर्ष होतो. उच्च अधिकारीवर्ग आपल्या संस्काराप्रमाणें कायदे बनवतो व सबंध राष्ट्र आपल्याकडे ओढतो. उंच घरांत खुजा मनुष्य वाटेल तसा फिरला तरी त्याच्या डोक्याला लागत नाहीं. याच्या उलट खुजा घरांत मात्र उंच नी धिप्पाड माणूस वावरूं शकत नाहीं हें लक्षांत ठेवावें. अधिकार पाहून कार्य सोपवावें, मोठ्यामध्यें लहानांचा समावेश होतो, पण लहानांत मात्र मोठ्यांचा समावेश होत नाहीं. अशक्तांना खांद्यावर घेऊन चढून जाणाराहि समाजांत लागतो. सर्वच अशक्त बनून भागत नाहीं. मनुष्य हा अनुकरणप्रिय आहे. वरच्या माणसाला पाहून खालचा माणूस वर जाऊं लागतो. माणसापुढें केव्हांहि उच्च आदर्श असावा लागतो. विहिरींतून काढणारा विहिरीवरच असावयाला पाहिजे. विहिरींतल्या माणसांबरोबर राहून त्यांना काढतां येणें कसें शक्य होईल? आड आलेल्यांना बाजूला सारूनच पुढें जावें लागतें. बांडगुळांचा नाश केला नाहीं तरी झाडच वाळून जातें. कीड नाहींशी केली नाहीं तर पीकच हातीं लागत नाहीं. औषध देऊन रोग घालवावाच लागतो. अनिष्टाची निवृत्ति करून इष्टाची जोपासना करणें हा जगण्याचा उपाय आहे. वाईटाचा नाश करून 'चांगलें' प्रयत्नानें वाढवावें लागतें. बिना मशागत वाढलेल्या निवडुंग, शेर, लाजाळू इत्यादि पिकांची नासाडी करून जमिनीस हिणकस करणाऱ्या या झाडा-झुडपांना पार मुळासहित उपटून टाकूनच खत घालून पीक वाढवावें लागतें. चांगल्या पिकाची वाढ करण्याकरितां मात्र कुंपणाची आवश्यकता असते. पीक नष्ट करणाऱ्या लाजाळूस मात्र त्याची कांहीं जरुरी नसते. वाईट आपोआप वाढतें व चांगलें प्रयत्नानें वाढवावें लागतें. वाचकांना इथे "दया तिचें नांव भूतांचें पाळण। आणि निर्दळण कंटकांचें।" या तुकारामांच्या उक्तीचें सहज स्मरण होईल.

मागासलेल्यांनीं दिव्य जीवनाच्या लोकांकडे धांव घ्यावी व दिव्य जीवनाच्या लोकांनीं त्यांना हळुहळू आपल्यासारखें करावें. रोगट हवेच्या दुर्गंधी व घाणेरड्या प्रदेशांत राहून सर्वथैव उबगलेल्या रोगी माणसांची दया येऊन जर त्यांच्या बरोबरच राहूं लागलें तर त्या निरोगी माणसांचीहि स्थिति त्यांच्यासारखीच होईल, यांत संशय नाहीं. खरोखरीच त्यांचें हित करावयाचें असेल तर त्यांच्याबरोबर स्वतः न राहातां त्यांनाच तिथून काढून उत्कृष्ट

हवेच्या, अनेक पुण्यपुष्पांच्या सुगंधानें दरवळून राहिलेल्या सुंदर उद्यानांनीं सुशोभित अशा परम रमणीय व परमपवित्र असणाऱ्या आपल्या उत्तम हवा-पाण्याच्या निरोगी प्रदेशांत नेऊन जसें तिथेंच ठेऊन घ्यावें लागेल, त्याप्रमाणेंच मागासलेल्या लोकांची दया येऊन त्यांच्यांत मिळून मिसळून आपणहि त्यांच्या पंक्तींत बसण्यापेक्षां त्यांना त्या स्थितींतून वर काढण्याकरितां आपल्या अबाधित दिव्य आचरणाचे धडे त्यांना शिकवीत शिकवीत त्यांच्या प्रगतिपर जीवना-करितां सर्वथैव झटणें हेंच त्यांच्या अधिक हिताचें ठरेल. एकाच प्रवाहांत सांपडून दोघांनींहि प्राण देण्यांत काय अर्थ आहे ? सांसर्गिक स्पर्श-रोग्याची प्रकृति आपल्याला तो रोग न लावून घेतांच सुधारली पाहिजे, हें वैद्यानें विसरतां कामा नये. सूर्य जसा डबक्यांतलें पाणी शोषून घेऊन पवित्र पाण्याचा पाऊस पाडतो त्याप्रमाणेंच पवित्र माणसांनीं मागसलेल्यांचे दुर्गुण घालवून आपल्या दिव्य पवित्र आचरणांचे भरपूर धडे त्यांना द्यावेत. दूरचा प्रवास जसा अनेक टप्प्यांनीं पूर्ण होतो त्याप्रमाणेंच अनेक जन्मांच्या परिश्रमांनीं जीवांना पुढें यावें लागतें.

मागासलेल्यांना श्रेष्ठांनीं पुढें सरसावण्यास प्रोत्साहन देणें, साहाय्य करणें योग्यच आहे. पुढें गेलेल्यांचा आदर्श मागें राहिलेल्यांसाठीं असावा. चढत्यांचे पाय खालीं ओढूं नयेत. प्रगतीच्या शिखरावर पोहोंचण्याकरितां मानवांची मोठी यात्राच निघाली आहे. कांहींनीं तें स्थळ गांठलेलें असतें तर कांहीं जवळ पोहोंचलेले असतात. कांहीं मध्यें असतात तर कांहीं चढून थोडे वर आलेले असतात. कांहींनीं चढण्यास सुरुवात केलेली असते, तर कांहीं अजून त्या विचारांत असतात. पुढें आलेल्यांनीं मागासलेल्यांच्या बरोबरच चाललें पाहिजे असा आग्रह धरणें, तशी त्यांच्यावर बळजबरी करणें मात्र अनुचित आहे. तसें करणें श्रेयस्कर ठरणार नाहीं. उच्च आदर्श डोळ्यापुढें ठेऊन श्रेष्ठांच्या सेवेनें कनिष्ठ श्रेष्ठ बनतात. म्हणून श्रेष्ठांच्या सेवेला कनिष्ठच लावणें योग्य होईल. तो कनिष्ठांच्या उद्धाराचा खरा मार्ग आहे. याच्या उलट कनिष्ठांच्या सेवेला श्रेष्ठांना लावणें म्हणजे श्रेष्ठांपुढें कनिष्ठांचा आदर्श ठेवणें होय. यानें समाजाची प्रगति होत नाहीं. पुढच्या आदर्शाप्रमाणें लोक बनतात. पुढच्यांना गांठण्याकरितां मागचे लोक झपाट्यानें चालूं लागतात, म्हणून पुढच्यांना मागें खेचूं नये. अनेक कालच्या प्रगतिपर जीवनाचे ‘ वर्णाश्रम ’ हे टप्पेच होत.

**अमात्यानुपधातीतान्पितृपैतामहाञ्छुचीन् ।**
**श्रेष्ठाञ्छ्रेष्ठेषु कच्चित्त्वं नियोजयसि कर्मसु ॥२६॥**

—भरता ! मंत्रीजन धर्मात्मे आहेत कीं अर्थातुर आहेत, मुक्तात्मे आहेत कीं कामी आहेत, प्रामाणिक आहेत कीं लबाड आहेत, स्वामीभक्त आहेत कीं स्वामीद्रोही आहेत, राष्ट्राचे संवर्धक आहेत कीं राष्ट्राला पिळून आपली पोळी पिकविणारे आहेत, राष्ट्राचें हित पाहातात कीं आपल्या पोळीवरच तूप ओढून घेतात हें नीट परीक्षून जातिनीति व कुलपरंपरा यांनीं श्रेष्ठ असणाऱ्या वेदवेत्त्यांनाच अमात्यादि सर्व श्रेष्ठ अधिकारावर नेमतोस ना ? नेमल्यानंतरहि त्यांच्या चारित्र्याकडे दृष्टि ठेवतोस ना ?

सर्व खात्यांतून त्या त्या खात्यांना अनुरूप अशा योग्य माणसांचीच निवड झाली पाहिजे. मोठमोठीं कामें करून दाखविलेल्यांचा आदर करून त्यांना बक्षिसें दिल्यानें मोठमोठ्या कार्याची धमक समाजांतून वाढते व गुणाचा गौरव केल्यासारखा होतो व सत्कार्यांना प्रोत्साहन मिळतें. गुणांचा गौरव केला पाहिजे; तसें नाहीं केलें तर समाजांतून सद्‌गुणांची वाढ होत नाहीं. महिन्याचे शेवटीं प्रत्येकाला त्याचें त्याचें योग्य वेतन मिळेल अशी राज्यांतून व्यवस्था ठेवावी. वेळेवर पगार न मिळाल्यास कर्जाऊ अथवा उसनवार पैसे काढावे लागतात. तेहि सर्वांनाच मिळतात असें नाहीं; न मिळाल्यास उपासमार होते. मिळाल्यास व्याजाचे पैसे पगारांतून खर्च होऊन कुटुंबाचा खर्च भागत नाहीं. आणि मग ' **दारिद्र्यदोषाच्च करोति पापं** '— दारिद्र्यामुळें लांच खाण्याची संवय लागते आणि असे लोक इतर फंदांत पडतात. पगार भरपूर ठेवावेत. राष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न करावी. राष्ट्राच्या पैशाचा विनियोग योग्य व्हावा ही भावना प्रत्येकांत उत्पन्न व्हावी. नैतिक शिक्षणानें हृदयाची पातळी सर्वसम, प्रामाणिक व परम पवित्र व्हावी. लांचलुचपतीचा प्रतिबंधक कायदा करणारे व ती चालूं नये म्हणून त्यावर नेमले जाणारेच लांच खाणारे झाले, धर्म शिकविणारेच अधर्मी बनले व नीतीचे धडे गिरवावयास लावणारेच अनीतीनें वागूं लागले म्हणजे सर्व कारभारच आटोपला. समाज सुधारण्याची जोखीम घेऊन वागणाऱ्या मंडळींचेंच गलिच्छ आचरण झाल्यानंतर समाज सुधारण्याची आशाच नको. असें न होईल अशी पूर्वीपासूनच काळजी घेत आलें पाहिजे. योग्य न्याय, तोहि त्वरित मिळण्याची व्यवस्था राज्यांतून सर्वत्र असावी. अर्ज केलेल्या

मनुष्याच्या अर्जाचा निकाल त्याच्या निधनानंतर मिळाल्यास त्याचा काय उपयोग ?

**कच्चिन्नोग्रेण दण्डेन भृशमुद्विजते जनाः ।**
**राष्ट्रे तवावजानन्ति मंत्रिणः कैकयीसुत ॥२७॥**

अधिकाऱ्यांच्या स्वार्थपरतेमुळें अथवा अपराधाची शिक्षा म्हणून त्यांनीं दिलेल्या अत्युग्र दण्डानें प्रजा पुनः पुनः उद्विग्न होते कीं काय म्हणूंन तुझे मंत्री फार बारकाईनें पाहात असतात ना ? अपराध करणाऱ्यांना उग्र शिक्षा देणें हें एक दुष्ट वृत्तींना आळा घालण्याचें तात्कालिक साधन झालें तरी ती प्रवृत्तीच घालवून टाकण्याकरितां त्याच्या अंतःकरणाचें परिवर्तन करणारें नीतिशिक्षण त्यांना देणें अवश्य असतें. स्त्रीजित, लोभी व सज्जन-बहिष्कृत निंद्य आचरणाचें असें राष्ट्रांत कोणी असूंच नये. मूलतःच समाज उत्कृष्ट व्हावा म्हणून बाल्यावस्थेपासूनच पृथक् पृथकपणें स्त्रीपुरुषांना तत्तदनुसार नीति, धर्म इत्यादिकांचें उच्च शिक्षण देऊन राष्ट्राच्या अंतःकरणाची भूमिका पवित्र राखणें अधिक हिताचें होतें.

**उपायकुशलं वैद्यं भृत्यं संदूषणे रतम् ।**
**शूरमैश्वर्यकामं च यो न हन्ति स हन्यते ॥२९॥**

—रोगाचें निदान करणें, त्याला अनुरूप अशा औषधाची निवड करणें व योग्य अनुपानावर रोग्यास ठेवणें हें ज्या वैद्यास माहीत नसतें त्या वैद्यास, स्वामीनिंदक सेवकास व ऐश्वर्याच्या पाठीमागें लागलेल्या सेनापति आदि शूरवीरांस जो नाहींसें करीत नाहीं, त्याचें जीवित यांचेपासून धोक्यांत येतें.

**कच्चिद्धृष्टश्च शूरश्च धृतिमान्मतिमाञ्छुचिः ।**
**कुलीनश्चानुरक्तश्च दक्षः सेनापतिः कृतः ॥३०॥**
**बलवन्तश्च कच्चित्ते मुख्याः युद्धविशारदाः ।**
**दृष्टा पदानां विक्रान्तास्त्वया सत्कृत्य मानिताः ॥३१॥**
**कच्चिद्बलस्य भक्तं च वेतनं च यथोचितम् ।**
**संप्राप्तकालं दातव्यं ददासि न विलम्बसे ॥३२॥**
**कालाति क्रमणाच्चैव भक्तवेतनयोर्भृताः ।**
**भर्तुरप्याति कुप्यन्ति सोऽनर्थः सुमहान्स्मृतः ॥३३॥**

—भरता! धष्ट, पुष्ट, शूर, धीर, युक्ति-बुद्धि-बलसंपन्न, निग्रही, जितेंद्रिय, पवित्र, कुलीन, निःसीम स्वामीभक्तीचा, अतिदक्ष असा सेनापति हवा. तुझा सेनापति असाच आहे ना? तुझे युद्धविशारद असे मुख्य अधिकारी बलिष्ठ असून आलेल्या आपत्तीचें झपाट्यानें निवारण करण्यांत अति कुशल, बुद्धिमान व शूर असे आहेत ना? योग्य सन्मानानें अशांचा गौरव तूं राखतोस ना? सैनिकांना व सर्व इतर खात्याचे अधिकारी व चाकरनौकर यांना अन्नवेतनादि वेळच्यावेळीं पोहोंचण्याची व्यवस्था राज्यांतून ठेवली आहेस ना? विलंब होत नाहीं ना? अन्नाच्छादन, वेळच्या वेळीं पोहोंचलीं नाहींत म्हणजे पोषिंद्यावरच पोष्य वर्ग तुटून पडावयाला मागें पुढें पाहात नाहीं, हा फार मोठा अनर्थ.

**अधिकारीवर्गाचें लक्षण**

व्यवहारनिपुण, प्रसंगावधानी, समयसूचक, रिपुनिग्रहकोविद, अनेक युक्तिप्रयुक्त्यांनीं प्रयत्न करणारे, बुद्धिमान, आज्ञाधारी, दूरदृष्टि असणारे, ज्या त्या देशांतील लोकांशीं वागण्याची पद्धत, त्यांचें त्यांचें सुखदुःख माहीत असणारे, मधुरभाषी, धैर्यशाली, अंतर्बाह्य शुद्ध, स्वामीभक्त, देवभक्त, कुलीन, धर्माभिमानी, धर्माकरितां देहार्पण केलेले, कार्यकुशल, प्रामाणिक, सत्यसंध, इंद्रियमनोनिग्रही, आचारविचारशील, न्यायप्रिय,आत्मनिष्ठ अशाच सर्व अधिकारी-वर्गाची तूं नेमणूक करतोस ना, भरता? कार्यसाधक अशा बुद्धिमान गुप्तचरांकडून स्वपरराष्ट्राची अंतर्बाह्य परिस्थिति समजून घेऊन उपायांची योजना करीत असावें. अनुकूल साधनें निर्माण करीत असावें. गुप्तचरांचा विभाग अत्यवश्य व अति महत्त्वाचा असतो. स्वपरराष्ट्रांतील दूत पंडित, प्रतिभासंपन्न व अतिविश्वासू असावेत. साक्षर, आस्तिक व सात्त्विक प्रजा असावी.

**दुर्जनसहवास**

वाईटावर असलेले लोक किती दुर्बळ असले तरी त्यांच्यावरचें लक्ष कमी करूं नये. चांगली परीक्षा केल्याशिवाय कोणावरहि पूर्ण विश्वास ठेवूं नये. तशा कोणावरहि महत्त्वाचें कार्य सोपवूं नये. बंडखोराबद्दल नेहमीं जागरूक असलें पाहिजे. थट्टामस्करी वा विनोद यांतहि नास्तिक मतांचा पुरस्कार करूं नये. नास्तिकांची संगत असूं नये. दुर्जन, व्यसनी लोकांचा सहवास करूं

नये. बहुसंख्य दुर्जनांत असलेले मुष्टिभर सज्जनहि बिघडतात. **दुःसंगः सर्वथैव त्याज्यः** । सर्वथैव दुर्जनांचा त्यागच केला पाहिजे. चांगल्या फळांच्या राशींत एखादेंच नासकें फळ असलें तरी पुरे. तो सबंध ढीग क्रमाक्रमानें नासून जातो. त्याप्रमाणें चांगल्याच्या समूहांत एखादा जरी वाईट असला तरी पुरे. सर्वहि क्रमानें बिघडतात. त्यामुळें राजानें व राष्ट्राच्या अधिकाऱ्यांनीं याकडे चांगलें लक्ष दिलें पाहिजे. नासकें फळ काढून टाकून देणें म्हणजेच चांगल्याचें रक्षण करणें होय. बहिष्कार हा शब्द सुद्धां अशा अर्थींच रूढ झालेला आहे. अशासाठींच स्पृश्यास्पृश्यतेची भावना निर्माण झाली.

**कच्चिन्न लोकायतिकान्ब्राह्मणांस्तात सेवसे ।**
**अनर्थकुशला ह्येते बालाः पण्डितमानिनः ॥३८॥**
**धर्मशास्त्रेषु मुख्येषु विद्यमानेषु दुर्बुधाः ।**
**बुध्दिमान्वीक्षिकीं प्राप्य निरर्थं प्रवदन्ति ते ॥३९॥**

—देहाभिमानी लोकांच्या भौतिकवादाला बळी पडला नाहींस ना ? हे स्वतःला पंडित मानणारे असे अत्यंत बालिश बुद्धीचे अप्रबुद्ध लोक आहेत. होईल तितका अनर्थ व अपाय करण्याच्या बाबतींत मात्र हे अतिकुशल असतात. सर्व दृष्टीनेंहि निर्दुष्ट असें जगत्कल्याणकर, स्वतःसिद्ध वेदशास्त्राचें दिव्य वाङ्मय इतकें प्रगट असूनहि निरर्थक चिकित्सेची बुद्धि उगींच लढवत, व्यर्थ वितंडवाद हे निर्माण करतात. अवैदिक संप्रदायांवर कदापि विश्वास ठेवूं नये.

## अयोध्येचें वर्णन

श्रीरामानें अयोध्येचें वर्णन याच अयोध्या कांडाच्या १०० व्या सर्गांतल्या ४० व्या पासून ते ४६ व्या श्लोकापर्यंत केलें आहे. अयोध्या ही एक अति वैभवसंपन्न राजधानी होती. सर्व तऱ्हेच्या संपत्तीनें ही परिपूर्ण भरलेली होती. दाट वस्तीची ही सुंदर राजधानी अति विस्तृत होती. अति उंच अशा मनोहर प्रासादांनीं हिची शोभा दुणावली होती.

**ब्राह्मणैः क्षत्रियैर्वैश्यैः स्वकर्मनिरतैः सदा ।**
**जितेंद्रियैर्महोत्साहैर्वृतामार्यैः सहस्रशः ॥ ४१ ॥**
**प्रासादैर्विविधाकारैर्वृतां वैद्यजनाकुलाम् ।**
**कच्चित्सुमहितां स्फीतामयोध्यां परिरक्षसि ॥ ४२ ॥**

—या अयोध्या नगरींतील सर्व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्यादि प्रजाजन आपापल्या नियत कर्मांचेंच अनुष्ठान करीत होते, असें यांत वर्णन आहे. यावरून रामराज्यांत वर्णाश्रम पद्धति हीं कडक असावयाला पाहिजे हें उद्घोषित होतें. सर्वच जितेंद्रिय व अति उत्साहपूर्ण असे होते, हें या वर्णनांतून दिसतें. रामराज्यांतील प्रजा अशीच असावयास पाहिजे हा सिद्धांत इथे प्रगटतो. ४६ व्या श्लोकांत 'विवर्जितो नरैः पापैः' असा शब्दप्रयोग आहे. या आधुनिक रामराज्यांत सुद्धां अगदीं असेंच व्हावयाला पाहिजे. एखादा पापी देखील इथे असतां कामाचा नाहीं. मागील ४३ व्या श्लोकाच्या उत्तरार्धांत '**देवस्थाने प्रपाभिश्च तटाकैश्चोपशोभितः ।**' असें वर्णन आलें आहे, यावरून त्यावेळींहि मोठमोठीं देवस्थानें होतीं हें स्पष्ट होतें. देवस्थानें होतीं असें झाल्यास त्यावेळीं मूर्तिपूजाहि होती असें सिद्ध होतें व बौद्धकाला-नंतर मूर्तिपूजेचा प्रघात पडला हें मत निराधार ठरतें. पुराणश्रवण, वेदांत-प्रवचन त्या त्या देवळांतून व ऋष्याश्रमांतून ठराविक वेळीं नित्य होई. तिथे तिथे चालत असलेल्या वेदघोषानें अयोध्या भरून जाई. तिथे तिथे असणाऱ्या पवित्र पावन ऋष्याश्रमाचें दृश्य अति मनोवेधक होत असे. त्या त्या आश्रमांतील ऋषि व ऋषिपत्न्या यांचे वैदिक आचार, त्यांचे तें त्यागमय परम पवित्र दिव्य जीवन, तो विद्यार्थ्यांचा सात्विक समूह मनावर अनिर्वचनीय पावित्र्याचा व अनंत आत्मीय आनंदाचा ठसा उमटवीत असे. त्या त्या वेळीं स्वाहास्वधाकाराचे घोष सर्वत्र ऐकूं येत असत. अयोध्येंतील सारेच तें शुद्ध सात्त्विक दृश्य दिव्य, आत्मीय आनंदाच्या त्या अपार वैभवानें अत्यंत सुशोभित दिसे.

### आदर्श राज्य

आश्रित लोक सुखानें असले पाहिजेत. त्यांचा योगक्षेम उत्तम चालला पाहिजे. सर्व प्रजेच्या ठिकाणीं सुखशांतीचें साम्राज्य पसरलें पाहिजे. त्यांच्यांत ऐक्य असावें. त्यांची सुस्थिति दिवसेंदिवस वाढीला लागली पाहिजे. त्यांच्या आस्तिक्यबुद्धीचा दिवसेंदिवस विकास होत गेला पाहिजे. अध्यात्मनिष्ठेचें दिव्य तेज सर्वत्र फांकत असावें. प्रत्येकाच्या हृदयांत प्रकाशत असलेल्या विश्वबंधुत्वाचें दिव्य दर्शन सर्वांना निववीत असावें. विविध विद्यांनीं व कलांनीं राष्ट्र अलंकृत, सुंदर पुरुषाप्रमाणें सदैव शोभत असलें पाहिजे. सौहार्द व

सहानुभूति सर्वत्र नांदत असावी. जनीं वनीं निर्धास्तपणें उशाशीं पैशाच्या थैल्या घेऊन कुणालाहि कुठेहि सुखानें झोंपतां यावें, इतकी विश्वासार्ह भूमिका लोकांची असावी. अन्य स्त्रियांकडे पूज्य दृष्टीनें पाहण्याचा सर्वांस अभ्यासच झालेला असावा. त्यांच्या त्यांच्या वयाप्रमाणें कुठे माता तर कुठे भगिनी, कुठे कन्या या नात्यानें परस्त्रियांबरोबर वागण्याचा सर्वांना सरावच पडलेला असावा. वाटेंत अंधार पडून शेजारच्या अनोळखीच्या गांवीं एखादी स्त्री गेली असतां तेथील माणसांच्या वर्तनावरून तिच्या माहेरच्या माणसाप्रमाणेंच तिला तेथें वाटावें, इतकें कोणत्याहि स्त्रीला कुठेहि प्रेमानें व निर्भयानें राहातां यावें. राष्ट्रांतील कोणत्याहि धर्माच्या व कोणत्याहि जातीच्या प्रत्येक व्यक्तीचें हृदय इतकें परिशुद्ध व निष्पाप असावें, इतकें बंधुत्वानें ओथंबलेलें असावें. रामराज्यांतील प्रजेचें हें एक लक्षण आहे. मनुष्याचा हा आदर्श आहे. स्वराज्याचें हें सौभाग्य आहे. प्रजेची ही उन्नति आहे. हेंच खरें सुखासमाधानाचें दिव्य जीवन आहे. प्रजेंत कुठे चुकूनहि प्राणिहिंसा होऊं नये. आईप्रमाणेंच गाईवर सर्व धर्मांच्या व जातीच्या प्रत्येक आबालवृद्धाचें प्रेम असावें. आपल्या शरीरावर प्रत्येकाचें जितकें प्रेम असतें तितकेंच तें किडामुंगीपासून प्रत्येक प्राण्याचें आपल्या शरीरावर असतें. आपल्या शरीराचें संरक्षण व्हावें म्हणून प्रत्येकजण जसा दुसऱ्याच्या साहाय्याची अपेक्षा करतो, त्याप्रमाणेंच प्रतिप्राणी दुसऱ्याच्या साहाय्याची अपेक्षा करीत असतो. जागतिक जीवनाचें हें एक सामान्य लक्षण प्रति माणसाच्या आंगवळणी पडून रामराज्यातल्या प्रतिव्यक्तीला 'आत्मवत्सर्वभूतेषु' झालें पाहिजे. हिंसा म्हणून ती कसली कुठें, मनानें व वाणीनेंहि होतां कामाची नाहीं. प्रजा आणि अधिकारी यांच्यांत लबाडी म्हणून कसली नसावी. सर्वत्र हिताचा व हार्दिक प्रेमाचा व्यवहार असावा. लांच खाणेंच कोणाला ठाऊक नसावें. आपुलकीनें सर्व कामें व्हावींत. एखाद्याच्या नेतृत्वाखालीं होऊं पाहणाऱ्या कोणत्या एका कामाकरितां म्हणून इतक्या अशा पैशाचा अंदाज झाला असला तर एक पैहि व्यर्थ खर्च न करतां श्रमोचित वेतनाचा मात्र स्वीकार करून बाकीचा पैसा राष्ट्राचा म्हणून तो परत करण्याचा प्रामाणिकपणा व राष्ट्रप्रेम प्रत्येकांत असलें पाहिजे. राष्ट्रांतील कोणाचाहि एक पै-पैसाहि अनाठायीं खर्च होऊं नये की तो अन्यायानें मिळविलेला असूं नये. प्राप्तीपेक्षां कोणाचाहि खर्च अधिक असूं नये. एकहि कर्जबाजारी नसावा. राष्ट्रांत अनेक चित्रविचित्र पशुपक्ष्यांच्य

संग्रहानें तिथे तिथे परम रमणीय उद्यानें शोभत असावींत; व तीं आपल्या निरुपम शोभेनें जनमनाच्या शांतिसमाधानाचीं निकेतनेंच होऊन राहावींत. जागजागीं वस्तुसंग्रहालयें असावींत. अलंकारप्राय अशा अनेक सुखसोयींनीं राष्ट्र परम शोभायमान असावें. ठिकठिकाणीं गोधनाचीं खिल्लारें राष्ट्रभर असावींत. घरीं दुभतें नसलेल्या राष्ट्रांतलि प्रत्येक कुटुंबाला इथून अपेक्षित दुधाची सोय होत असावी. गोदुग्ध हें भूतलावरचें अमृत आहे. यांत षड्रस असतात. यानें सर्व धातूंची पुष्टी होते. **सद्यः शुक्रकरं पयः** ।—यानें वीर्याचा सांठा होतो, देहाची कांति वाढते, मेंदूची शक्ति वाढते. यानें मनुष्य निरोगी राहून दीर्घायुषी होतो. ( चहा, कॉफी, गांजा, तंबाखू, अफू, धूम्रपान अशीं देखील कसलींहि व्यसनें राष्ट्रांत नसावींत. मग मद्यमांससेवन तर दूरच राहिलें. ऐकूनहि तें कोणास ठाऊक नसावें. ) सबंध राष्ट्रांतूनच मादक द्रव्याच्या सेवनाची सक्त मनाई अमलांत आलेली असावी. सरकारनें प्रजेच्या सर्वतोपरी हिताकरितांच सर्व कायदे करावेत व ते आपल्या हिताकरितां आहेत असें प्रजेनें मानावें. चोरून मारून कुठेंहि कांहीं कायद्याविरुध्द व्यवहार होऊं नये व तो करण्याची प्रवृत्तीहि लोकांत असूं नये. राष्ट्रांतील पुण्यपावन पवित्र तीर्थक्षेत्र, मठ व आश्रम म्हणजे परमात्म्याच्या दिव्य साक्षात्काराचीं दैवी केंद्रेंच होत. राष्ट्रांतल्या मठाधिपतींवर व महंतांवर राष्ट्राच्या दिव्य जीवनाची अधिक भिस्त असते. ते राष्ट्राच्या जीवनानौकेचे कर्णधार आहेत. त्यांनींहि आपली जबाबदारी ओळखून असावें व तसें वागावें. तशी त्यांची तयारी असावी. ते मंगलमय आत्मीय आनंदाच्या दिव्य जीवनाचे आदर्श होत. राष्ट्राच्या भव्य वैभवमंदिराचे मठ व देऊळें व त्यांतील संन्याशी व महंत हे आधारस्तंभ होत. त्यांच्या सुस्थितीवरच राष्ट्राचें भवितव्य अवलंबून असतें. विश्वधर्माचें यथार्थ ज्ञान करून देणारीं विश्वविद्यालयेंच हीं. मठाधिपति आणि महंत यांच्या संदर्शन–संभाषणानें उच्च कोटीच्या पवित्र जीवनाचे दिव्य पाठ इतर जनांना मिळावेत व त्यांचें शांतिसमाधान व्हावें. यांच्या दर्शनमात्रेंकरूनच आसुरी भावनांच्या दुष्प्रवृत्तींना आळा पडून दैवी संपत्तीचें साम्राज्य सर्वत्र पसरलें पाहिजे. सर्व साधु, संन्यासी यांच्यावर याचें उत्तरदायित्व असतें. आपल्या तपोबलानें त्यांनीं समाज सुधारला पाहिजे. अशा शुध्दात्म्यांच्या संदेशाप्रमाणें वागून मुक्त होणें हेंच मानवदेहाचें सार्थक ही भावना लोकांच्या नसानसांतून प्रवाहीत असावी. राष्ट्रामध्यें कोणालाहि दैन्य, दारिद्र्य नसावें. आजारपणाच्या

वेळीं व अडीअडचणीच्या वेळीं परस्परांनीं परस्परांना साहाय्य करतांना त्यांच्या व्यवहारांत पाहूं म्हणून प्रयत्न केल्यासहि कुठे आपला, परका हीं भावना व किंचित्मात्र उदासीनताहि कोणाला आढळूं नये. एखादा माणूस रस्त्यानें जात असतां मार्गांतच असाहाय्य होऊन पडलेला जर आढळला तर त्याला खांद्यावर घेऊन रुग्णालयांत पोहोंचवितांना कोणाला कसल्या तऱ्हेचेंहि 'मीपण' आड येऊं नये. मी मोठा, मी सावकार, मी आचारशील ब्राह्मण, हा हीन, हा दरिद्री, हा अधिकारी, ( हा यवन, हा ख्रिश्चन, हा अस्पृश्य ) अशा तऱ्हेची भावना त्यावेळीं कोणाच्याहि अंतःकरणांत साहाजिकच उत्पन्न न होईल इतकी भूतदया सर्वत्र असली पाहिजे. ते अस्पृश्यादि असतील तर प्रायश्चित्त घेऊन शुद्ध होण्याइतकें आचारप्रेमहि ब्राह्मणादि उच्च वर्णांत असलें पाहिजे. हेंच भारतांत असणाऱ्या उन्नत मनुष्यजातीचें आदर्श जीवन होय. अन्याय, विषमता आणि फसवणूक हीं कोठेंहि दिसून येऊं नयेत. प्रजा आणि अधिकारी यांच्यांत परस्पर प्रेमाचा व आपुलकीचा हितसंबंध असावा.

## श्रीसमर्थांचा मुखप्रसाद

श्रीरामाचा उपदेश श्रवण केला. याचेंच प्रतिबिंब श्रीसमर्थ रामादासांच्या उपदेशांतून पाहावयास मिळतें. श्रीसमर्थांच्या मुखप्रसादाचें माधुर्य चाखत, त्या शब्दांचें सौंदर्य पाहात, त्यांच्या हृदयसिंहासनावर ठाव देऊन वदवीत असलेल्या त्या मंगलमय प्रभु श्रीरामाच्या आनंदघन स्वरूपाचें दर्शन घेत अजून कांहीं वेळ इथेच काढूं.

निश्चयाचा महामेरु । बहुत जनांस आधारु । अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥ १ ॥ परोपकाराचिया राशी । अखंड घडती जयासी । तयाचे गुणमहत्वासी । तुलणा कैंची ॥ २ ॥ नरपति हयपति गजपति । गडपति भूपति जळपति । पुरंदर आणि छत्रपति । शक्ति पृष्ठभागीं ॥३॥ यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत । पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ॥४॥ आचारशीळ विचारशीळ । दानशीळ धर्मशीळ । सर्वज्ञपणें सुशीळ । सकळां ठायीं ॥ ५ ॥ धीर उदार गंभीर । शूर क्रियेसी तत्पर । सावधपणें नृपवर । तुच्छ केले ॥ ६ ॥

श्रीरामाचेंच हें वर्णन पुढें ठेऊन श्रीशिवाजीला श्रीसमर्थांनीं उपदेश केला व असेंच होण्याविषयीं आशीर्वाद दिला. " देव धर्म गोब्राह्मण । करावया

संरक्षण । हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥ " श्रीसमर्थ व श्रीशिवराय यांच्या पवित्र हृदयाचें हें सुंदर दृश्य आहे. त्यांचे बोल व क्रिया हृदयस्थ नारायणाच्या प्रेरणेनें 'देवधर्मगोब्राह्मण' यांच्या संरक्षणार्थ होत्या. अशीच आम्हां सर्वांनाहि त्या हृदयस्थ नारायणाची प्रेरणा होऊन असेंच उत्कृष्ट कार्य आमच्या हातूनहि जर होईल तर आम्ही किती भाग्यवान होऊं! तीर्थक्षेत्रें मोडिलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झालीं । सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ १ ॥ अगदीं अशीच स्थिति आज आली आहे.

एकवचनी एक बाण । एक पत्नी अभंग ठाण । अजिंक्य राक्षसां निर्वाण । कर्ता समर्थ एक ॥ २ ॥ धार्मिक पुण्य परायण । शांत लावण्य सुलक्षण । जेणें त्र्यंबक परम कठीण । भग्न केलें ॥ ३ ॥ जो लावण्याचा जनक । जो सौंदर्याचा नायक । जो मार्तंड कुळदीपक । चातुर्य निधी ॥ ४ ॥ ऐसा राम राजीव नयन । साधुजनांचें भूषण ।

असें त्या प्रभु रामरायाचें ध्यान श्रीसमर्थांनीं आमच्या हृदयांत ठसविलें आहे. या ठशाचा आम्ही योग्य उपयोग करून घ्यावा.

राम जीवाचा जिव्हाळा । राम मनाचा कोंवळा । राम जाणे अंतःकळा । निजदासांची ॥ २४ ॥ राम पुण्य परायण । राम त्रैलोक्याचा प्राण । रामें दास बिभीषण । चिरंजीव अक्षय केला ॥ २५ ॥ वैभवें रावण राक्षस माजले । तेणें सकळ देव गांजले । ऐसें जाणूनि धांवणें केलें। वैकुंठाहूनि राघवें ॥ रामापायीं आहिल्या शिळा । दिव्य रूप झाली बाळा । रामें गणिकेसी सोहळा । विमानाचा दाखविला ॥ राम खाय भिल्लणीचीं बोरें । रामप्रतापें वानरेश्वरें । राज्य केलें सहोदरें । गांजिला होता जो ॥ राम सुरवरांचा कोंवसा । राम मंडन सूर्यवंशा । रामजप भवानीशा । सप्रेम चित्त रामनामें ॥ राम सकळ प्राणिमात्रांचा । आणि कैवारी देवा ऋषीश्वरांचा । सारथि अडलियांचा । समया आपंगी ॥ श्रीराम जय राम जय जय राम । ऐसा कांहीं एक करूनियां नेम । जप कीजे तेणें आत्माराम । जोडेल नियमें ॥

सकळ विश्वजनांना आपलेपणा उत्पन्न करणारें कसें हें गोड वर्णन आहे. किती यानें आधार वाटतो !

चतुर्थमानांत श्रीसमर्थांनीं श्रीरामाचा तात्त्विक परिचय करून दिला आहे. त्याचाहि थोडा अनुग्रह घेऊं.

राम तो जाणिजे आत्मा । सर्वांतरात्मा तो चि तो । त्रिलोक्य चालवीतो तो । आतां हि रोकडा पाहा ॥ १ ॥ देखवी ऐकवीतो तो । चाखवी दाखवी सदा । बोलवी चालवीतो तो । देहपुरासि वर्तवी ॥ २ ॥ बहुदेहीं देहाकारें वर्ततो तो दिसेचिना । कळतो तोचि तो त्याला । जाणतो आप आपणा ॥ ३ ॥

हें वर्णन वाचतांना 'शुकरहस्योपनिषदा'च्या "**प्रज्ञानं ब्रह्म**" यांवरील व **येनेक्षते शृणोतीदं जिघ्रति व्याकरोति च । स्वाद्वस्वादु विजानाति तत्प्रज्ञानमुदीरितम् । चतुर्मुखेंद्रदेवेषु मनुष्याश्वगवादिषु । चैतन्यमेकं ब्रह्मातः प्रज्ञानं ब्रह्ममय्यपि** ॥ या विवरणाची आठवण होते. श्रीसमर्थ हे श्रीरामाचे एकांतिक भक्त श्रीमारुतिरायांचे अवतार. मारुतिराय तर श्रीरामभक्तांचे आचार्य. त्यांनीं श्रीसमर्थरूपानें केलेला उपदेश आम्हांला प्रपंच—परमार्थीं तारक आहे. श्रीरामकृपा प्रापक आहे यांत संशय नाहीं. प्रासंगिक उपदेशांत एके ठिकाणीं " प्रपंचा कारणें स्वभावें । बोलिलों मी" असें श्रीसमर्थ उद्गारले आहेत. " प्रपंचीं जो शाहाणा । तो परमार्थ करील जाणा ॥ " असें त्यांचेंच वचन आहे. तेव्हां यापैकीं कांहीं ओव्यांचें मनन करूं. या उपदेशांतून रामाचाच स्वर ऐकूं येईल.

सावधपणें प्रपंच केला । तेणें सुखाचि पावला । दीर्घ प्रयत्नें मांडला । कार्य भाग साधे ॥३॥ आधीं मनुष्य ओळखावें । योग्य पाहून काम सांगावें । निकामी तरी ठेवावें। एकीकडे ॥४॥ पाहोन समजोन कार्य करणें । तेणें कदापि न ये उणें । कार्यकर्त्याच्या गुणें । कार्यभाग होतो ॥५॥ कार्यकर्ता प्रयत्नीं जाड । कांहीं एक असला हेकाड । तरी समर्थपणें पाठवाड । केली पाहिजे ॥ ६ ॥ मनुष्य राजी राखणें । हीं चि भाग्याचीं लक्षणें । कठीणपणें दुरी धरणें । कांहीं एक ॥ ८ ॥ समयीं मनुष्य कामा येतें । तया कारणें सोशिजे तें । न्याय सांडितां मग तें । सहजचि खोटें ॥ ९ ॥ न्याय सीमा उल्लंघूं नये । उल्लंघितां होतो अपाये । न्याये नसतां उपाये । होईल कैंचा ॥ १० ॥ उपावीस जो कंटाळला । तो भाग्यापासून चेवला । समयीं धीर सांडिला । तोहि खोटा ॥ ११ ॥ संकटीं कंटाळों नये । करावे अत्यंत उपाये । तरी मग पाहतां काये । उणें आहे ॥ १२ ॥ बंध बांधावे नेटके । जेणें करितां चतुर तुके । ताब न होतां फिके । कारभार होती ॥ १३ ॥

**धुरेनें युद्धासी जाणें । अशीं नव्हेत कीं राजकारणें । धुराच करोनि सोडणें । कित्येक लोक ॥ १४ ॥**

किती अचूक आणि उदात्त असा हा उपदेश आहे! आस्तिक्यतेबद्दलची पुढची ओवी पाहा.

" देव मात्र उच्छेदिला " हें पाहून उगीच बसणाऱ्याला "जित्या परीस मृत्यु भला । " देवाचा उच्छेद म्हणजे " आपुला स्वधर्म बुडविला । ऐसें समजावें ॥ १२ ॥ देवद्रोही तितुके कुत्ते । मारूनि घालावे परते । देवदास पावती फत्ते । यदर्थीं संशय नाहीं ॥ १७ ॥ देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा । मुलुख बडवावा कीं बुडवावा । धर्मस्थापनेसाठीं ॥

' राजधर्मा 'तील या ओव्या श्रीशिवाजी राजाला व अमात्य वर्गाला श्रीसमर्थांनीं उपदेशिल्या आहेत. यावरून देवधर्माचा त्यांना किती जाज्ज्वल्य अभिमान असावा हें व्यक्त होते. इथे श्रीकृष्णाच्या ' स्वधर्मे निधनं श्रेयः ।' या वचनाचीहि आठवण होते. ' सेवकधर्मा 'तील कांहीं ओव्या पाहूं.

**सेवकधर्म**---जो आपुलें हित न करी । तो आपुला आपण वैरी । येथें कांहीं कोणावरी । शब्द नाहीं ॥ ४ ॥ श्रेष्ठांचें मनोगत राखेना । बळेंच करी वल्गना । युक्ति प्रयुक्ति नाना । प्रकारें करी ॥ ५ ॥ श्रेष्ठांचें केलें मोडावें । आपुलेंचि पुढें प्रतिष्ठावें । तरी मग लागे भ्रष्टावें । वैभवापासूनी ॥ ६ ॥ पुढें पुढें काम करी । मागें कांहींच न करी । कार्यातें नासतां उरी । नाहींच पुढें ॥ ७ ॥ कार्य करितां कांहीं न मागे । तयाची चिंता प्रभूस लागे । ऐसें जाणूनि विवेक जागे । म्हणिजे बरें ॥ १२ ॥ स्वामींनीं जें जें बोलावें । तेंचि सेवकीं प्रतिष्ठावें । वेळ चुकवूनि बोलावें । विनीत होवोनी ॥१४॥ कळेल तरी सांगों नये । वडिलाशीं बुद्धि शिकवों नये । **नेणपणेंचि उपाये । विवेकीं करावा** ॥ १६ ॥ पुढें पुढें करूं नये । आज्ञेवेगळें वर्तों नये । ( आज्ञा ) न मानितां अपाये । नेमस्त आहे ॥ १७ ॥ मी करतों ऐसें पुसणें । तें पुसणें न पुसणें । करूं न करूं हें विचारणें । हें उत्तमोत्तम ॥ १८ ॥ ज्याकरितां प्राणी वाढले । त्यासीच आडवूं लागले । ते कैसे म्हणावे भले । नीतिवंत ॥ २५ ॥ सेवक तोचि अडेना । शब्द भुईस पाडेना । काम चुकलें घडेना । कदाकाळीं ॥ २८ ॥ अपस्वार्थ उदंड करणें । आणि स्वामीकार्य बुडाविणें । ऐसीं नव्हेत कीं लक्षणें । सेवकाचीं ॥ २९ ॥ सेवक विश्वास दाविती । वैरियाकडे मिळोनि

जाती । त्या चांडाळासी गति । कोठेंचि नाहीं ॥ ३८ ॥ प्रत्येकानेंच मनन करण्यासारख्या या ओव्या आहेत. प्रत्येकजण कोणाचा ना कोणाचा चाकर असतोच. आईबाप, गुरुदेव यांचे तर सर्वजणच चाकर आहेत. या ओव्या नीट लक्षांत ठेऊन न चुकतां वागणें हें रामराज्यांतल्या लोकांचा सहज-स्वभाव होतो.

'सेवकधर्मा'च्या दुसऱ्या समासाच्याहि कांहीं ओव्या बघूं. किती

चुकती चांचू घेती । पदरीं घालितां न घेती । अन्याय करूनि म्हणती । अन्याय नाहीं ॥३॥ उदंड हांसती दुसऱ्यासी । तोचि गुण आपणापाशीं । अखंड वर्णिती आपणासी । समर्थांदेखतां ॥४॥ आपणावेगळें कार्य न व्हावें । अवघें आपणाचि असावें । आपलें केलें न मोडावें । ऐशी वासना ॥ ६ ॥ व्याप आटोप करावा । समर्थ वेळेस आडवावा । आपुला हेका वाढवावा । अत्यादरें ॥७॥ स्वयें आपणासी कळेना । समर्थें सांगितलें ऐकेना । सत्य असेल तरी मानेना । अभिमानें ॥ ८ ॥ आज्ञेप्रमाणें असतां । बहुत दुःख वाटे चित्ता । आपुले इच्छेनें वर्ततां । बरें वाटे ॥ आपुले अवगुण लपवी । श्रेष्ठापुढें जाणीव दावी । धीटपणेंचि दटावी । कोणीएकासी ॥१३॥ काम सांगतांचि अडे । मिष करूनि वेळेसी दडे । कुकर्मीं आदरें पवाडे । नाना यत्नें ॥ १४ ॥ मजवेगळें काम न चाले । ऐसें मागें पुढें बोले । कित्येक लोकाचि ते फोडिले । आपणाकडे ॥ १९ ॥ समर्थासी कांहीं कळेना । मी सांगतों ऐकेना । शहाणपण दाखवी जना । नाना प्रकारें ॥२०॥ समर्थाशी सांडूनि जे कां जन । सेवकाकडे लाविती मन । ते जाणावे परम हीन । नीच काठींचे ॥ २६ ॥ कामाकारणें ठेविले । काम पाहूनि वाढविले । तेहि उगेच गर्वें फुगले । कोण्या हिशोवें ॥ २९ ॥ या कारणें वदलीत जाणें । सेवक आज्ञेच्या गुणें । तरीच समर्थपण जाणें । समर्थासी ॥३०॥ काम नासलें तरी नासावें । परी सेवकाधीन न व्हावें । दास म्हणे स्वभावें । बोलिलों न्याय ॥ ३१ ॥

या ओव्या वाचतांना कित्येकांना दुसऱ्या कोणाचें चित्र डोळ्यापुढें उभें राहिल्यास कित्येकांना आपलेंच चित्र डोळ्यापुढें येईल. सर्व समाजच सुधारल्यास अशा प्रकारचें कोणतेंच उदाहरण डोळ्यापुढें उभें राहाणार नाहीं. नेत्यांनीं लक्षांत बाळगण्यासारख्या ओव्या कांहीं उद्धृत करतों. 'सावधता' प्रकरणाच्या या ओव्या आहेत.

**सावधता**—धुरेनें धीर सोडूं नये । मुख्य प्रसंग चुकों नये । उद्योगरहित कामा नये । पशु जैसे ॥ जेथें बहु विचार । तेथें ईश्वर अवतार । मागें झाले थोर थोर । धके चपेटे सोसोनी ॥ आपल्या मनासी रोधावें । परांतर शोधावें । क्षणक्षणा सांभाळावें । वदलेल म्हणोनी ॥ **इशारतीचें बोलतां नये । बोलावयाचें लिहूं नये । लिहावयाचें सांगूं नये । जबानीनें** ॥१२॥ अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें । तजविजा करीत बसावें । एकांत स्थळीं ॥ कांहीं उग्रस्थिति सांडावी । कांहीं सौम्यता धरावी । चिंता लागावी परावी । अंतर्यामीं ॥ राजी राखतां जग । मग कार्यभागाची लगबग । ऐसें जाणोनिया सांग । समाधान राखावें ॥

आम्ही आतांपर्यंत श्रीरामांनीं स्वतः सांगितलेल्या व आपल्या दासांकडून वदविलेल्या उपदेशाचे कांहीं चुटके वाचले ते अमृताचे घुटकेच आहेत. आधुनिक भारताच्या राज्यपध्दतीला रामराज्य म्हणून गौरवास्पद नांव दिलेलें आहे. मर्यादापुरुषोत्तम श्रीरामाचें आदर्श आचरण आणि त्याचीं सर्वांनाहि हितकर असलेलीं वचनें भारतवासियांपुढें सदैव असलीं पाहिजेत. हा एक आचरणाचा श्रेष्ठ दर्जा म्हणून सर्वांच्या मनांत बिंबलें पाहिजे. साऱ्या अनर्थ-परंपरेला कारण काय म्हणून विचारलें असतां तत्त्वविचाराचा आणि तात्त्विक व सात्विक आचरणाचा अभाव हें एकच एक कारण सांगतां येईल. स्वार्थामुळें निर्माण होणाऱ्या सर्व अनर्थपरंपरेचा त्याग करून भारतीय लोक सर्व सद्‌गुणांनीं युक्त असे आखिल मानवजातीलाहि अनुकरणीय आदर्श होऊन राहिले पाहिजेत. यासाठींच श्रीरामाच्या तत्त्वविचाराचें आणि त्याच्या सात्विक आचरणाचें परिशीलन आपण येथें करीत आहोंत.

### भरताला श्रीरामाचा उपदेश

" तमेवं दुःखितं प्रेक्ष "—भरताला दुःखित पाहून श्रीरामानें त्याच्या दुःखपरिहारार्थ केलेला हा उपदेश आतां आपण पाहूं. दुःखाचें सांत्वन कर-णारी हीं वाक्यें ऐकून त्यावर विचार करून आपलीं दुःखेंहि हलकीं होतील यांत संदेह नाहीं.

**' मनुष्य हा अस्वतंत्र आहे— '**

**नात्मनः कामकारोऽस्ति पुरुषोऽयमनीश्वरः ।**
**इतश्चेतरतश्चैनं कृतान्तः परिकर्षति** ॥ १५ ॥

( वा. रा. अ. स. १०५ )

—भरता ! उगीच खिन्न होऊं नकोस. माझ्या वनवासाला कारण जननी कैकेयीहि नव्हे किंवा वडील दशरथ महाराजहि नव्हेत; योगायोग हाच एक कारण आहे. **भवितव्यं भवत्येव नारिकेलफलांबुवत् । गंतव्यं गच्छति सदा गजभुक्तकपित्थवत्** ।। योगायोग कोणाला तरी पुढें करून आपलें कार्य साधतो. हरएक प्रयत्नानें आपल्याला अनुकूल असें वातावरण तो निर्माण करतो. या योगायोगालाच ईशसंकल्प, भवितव्य, दैव, प्रारब्ध इत्यादि नांवें आहेत. प्रत्येकालाच यांतून जावें लागतें. याच्याकडे लक्ष न देतां स्वतंत्रतेनें मनाला येईल तसें वागूं म्हटलें तर तें कोणासहि शक्य होत नाहीं. ही 'भवितव्यता' आपल्याला पाहिजे तसें 'मना'ला प्रेरते आणि पालटून टाकते. मनुष्याच्या ऐहिक जीवनांत एकदम येऊन आदळणाऱ्या सुखदुःखांना व हानिलाभांना हेंच कारण आहे. तूं आईवर रागावूं नकोस. मी योगायोगा-संबंधीं जें आत्तां सांगितलें तें लक्षांत घेऊन तूं दुःख करूं नकोस. मनुष्याला स्वातंत्र्य असतें तर त्याच्या इच्छेप्रमाणें सारें होतें. होत नाहीं म्हणूनच त्याला अस्वतंत्र म्हणावें लागतें. या श्लोकांत 'कामकारः' म्हणजे इच्छेप्रमाणें करणें; 'अनीश्वरः' म्हणजे अस्वतंत्र; 'आत्मा' म्हणजे याठिकाणीं देहधारी; आणि 'कृतान्तः' म्हणजे दैव अथवा भवितव्य म्हणून समजलें पाहिजे. कोणत्याहि देहधाऱ्यास इच्छेप्रमाणें सर्व कांहीं करण्याचें स्वातंत्र्य नाहीं. भवितव्यता त्याला आपल्या कलाप्रमाणें नाचविते. भवितव्यतेप्रमाणें त्याला बुद्धि सुचते. सर्वांचें जीवन ईशसंकल्पाच्या अथवा भवितव्यतेच्या आधीन आहे. हा या उपरिनिर्दिष्ट श्लोकाचा अर्थ.

**सर्वे क्षयान्ता निचयाः पतनान्ताः समुच्छ्रयाः ।**
**संयोगा विप्रयोगान्ता मरणान्तं च जीवितम् ॥१६॥**

(वा. रा. अ. कां. स. १०५)

—नाशावधि सर्व पदार्थ असतात. एकहि जगांतलें शाश्वत नाहीं. कष्टानें मिळविलेलें द्रव्य त्याची अवधि संपतांच अकस्मात नाहींसें होतें. (**चञ्चला चपला लक्ष्मीः** ।) प्रयत्नानें किती उच्च पद मिळवो तें पतनावधि असतें.

**नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वे मंलोकं हीनतरं वा विशन्ति ॥**

(मुं. उप २–१०)

—कितीहि उन्नतपद प्राप्त झालें तरी तें नाश होईपर्यंतच अस्तित्वांत असतें. कर्म करून जसें नष्ट होतें, त्याप्रमाणेंच कर्मफल भोगून नष्ट होतें. कर्मफलरूप लोकांतराची प्राप्तिहि तोंपर्यंतच असते. लोकांत मिळून असण्याचाहि एक काळ असतो. वियोग होण्याचा काल आला म्हणजे पिता-पुत्र, आई–मुलगा, सती–पति, इष्ट–मित्र आपोआप दूर होतात. शेवटीं मरण तर कोणालाच चुकत नाहीं. मरणावधिच प्रत्येकाचें जीवित असतें.

**क्षणभंगुर जीवन**

( पितृविरहानें दुःखित झालेल्या भरताला पाहून )

—भरता ! शाश्वत असें इथे काय आहे ? गेलेल्या वस्तूचा शोक कां करावा ? एके दिवशीं नष्ट होऊन जाण्याचाच, 'क्षणिकताच' या सर्व पदार्थांचा स्वाभाविक धर्म अथवा स्वभावच असें कळून आल्यानंतर या क्षणभंगुर पदार्थांच्या लाभानें हर्ष मानणें व नाशानें शोक करणें, यांत काय अर्थ आहे ? यांत कोणता शहाणपणा आहे ? यानें होणारें प्रयोजन तरी कोणतें ? हें असलें आणि नसलें तरी दोन्ही सारखेंच. तत्त्वनिष्ठ माणसें नसलेल्याची अपेक्षा व असलेल्याची उपेक्षा दोन्ही करूं पाहात नाहींत. नष्ट झाल्याची खंतीहि पण त्यांना नसतें. अति पिकलेलें फळ देठापासून वेगळें होऊन खालीं पडतें. अति जीर्ण झालेलें घर आपोआप खालीं कोसळतें. दिवस सरून रात्र होते. नदीचा प्रवाह नेहमीं बदलतो. सूर्यचंद्रहि उदय पावून अस्ताला जातात. '**जातस्य मरणं ध्रुवं** ।' '**यज्जन्यं तदनित्यम्** ।' उत्पत्ति म्हणून ज्याला आहे त्याला नाश ठेवलेलाच. दुःख केल्यानें का मेलेला मनुष्य परत येतो ? दुःख करण्यांत व्यर्थ वेळ कां घालवावा ? ते गेले आणि आम्ही का शाश्वत राहाणार आहों ? जन्मलेल्या क्षणापासूनच आयुष्य घटत जातें. क्षणक्षणां क्षीण होत जाऊन शेवटीं नाश पावणाऱ्या देहादि अखिल दृश्य पदार्थांच्या ठिकाणीं शाश्वततेचा आरोप करून त्याची आशा राखल्यानेंच मनुष्याला दुःख होतें. एरवी दुःखाला कांहीं कारणच नाहीं. देहाला षड्भाव-विकार आहेत. जन्मतो, वाढीस लागतो, मोठा होतो, क्षीण होऊं लागतो व असा कांहीं दिवस राहून शेवटीं नष्ट होऊन जातो. नवयौवनाचें सौंदर्य वृद्धाप्यीं नसतें. केंस पांढरे होतात. शरीराला सुरकुत्या पडतात. कातडी लोंबूं लागते. डोळ्यांत चिपडे दाटतात. नाकांत मेकडें भरतात. लाळ गळूं लागते, बघवत नाहीं. इतकें होतें कीं, स्मरणशक्तिहि नसते.

या म्हातारपणाच्या आंतच मुक्तीचें कांहीं साधन झालें तर झालें ! या म्हातारपणीं काय होणें शक्य आहे ? म्हणून तारुण्यांतच कांहीं प्रयत्न करावा. तारुण्यदशेंत शाहाण्यानें ऐहिक अशा या कसल्या भोगसुखांतहि मन न गुंतवितां राहावें. आपल्याबरोबर येणारें यांत कोणतेंहि नाहीं. जन्मल्यानंतर मरण चुकत नाहीं. असें झाल्यास जन्मच येणार नाहीं असें कांहीं करावें, भरता ! पित्याकरितां शोक करूं नकोस व आपलें जीवनहि शाश्वत मानूं नकोस. ऐहिक वैभवांत मन गुंतवूं नकोस. जन्ममरण पुन्हां प्राप्त होणार नाहींत असें कांहीं कर. मुक्तिकरिता झट.

**नन्दंत्युदित आदित्ये नन्दंत्यस्तमिते रवौ ।**
**आत्मनो नावबुध्यन्ते मनुष्या जीवितक्षयम् ॥ २४ ॥**

( वा. रा. अ. कां. स. १०५ )

## जीवितक्षयाच्या कल्पनेचा अभाव

सूर्योदयकालीन व सूर्यास्तकालचें तें अवर्णनीय चमत्कृतीचें सुंदर दृश्य पाहून लोक आनंदित होतात, हर्ष पावतात. पण ही जीवितक्षयाची एक सूचना आहे, असें मानीत नाहींत; आयुष्याचा एक दिवस गेला म्हणून आपल्या जीवितक्षयाचा मात्र विचार करीत नाहींत. मोठ्या हर्षानें जीवनाच्या उद्योगाला लागतात. सूर्योदय झाल्याबरोबर चैतन्ययुक्त, डोळे बांधलेल्या घाण्याच्या बैलाप्रमाणें विवेकदृष्टी नसलेले हे दिवसभर राबतात. सूर्यास्त झाल्याबरोबर त्या मुग्धांच्या मुखावर कामोपभोगाच्या कल्पनेचें हास्य विलसूं लागतें. पण सच्छिद्र घटांतून पाणी झिरपून गेल्याप्रमाणें हें जीवित नाश पावत आहे, ही जाणीव मात्र त्यांच्या ठिकाणीं निर्माण होत नाहीं. ऋतूंच्या परिवर्तनांनीं नवीन नवीन परिवर्तित झालेल्या दृश्यांना पाहूनहि ते रमतात, आनंद मानतात; पण जीवितक्षयाचा विचार करीत नाहींत.

## क्षणिक संबंध

**यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महार्णवे ।**
**समेत्यत्तु व्यपेयातां कालमासाद्य कश्चन ॥२६॥**

**एवं भार्याश्च पुत्राश्च ज्ञातयश्च धनानि च ।**
**समेत्य व्यवधावन्ति ध्रुवो ह्येषां विनाभवः ॥२७॥**

( वा. रा. अ. कां. स. १०५ )

—कोठून तरी आलेलीं दोन काष्ठें समुद्रांत कांहीं कालपर्यंत एकत्र होऊन वेगळीं होतात व दूर वाहून जातात. त्याप्रमाणेंच कोठून तरी या संसारांत एकत्र मिळालेले हे सर्वहि जीव कांहीं काळ एकत्र राहून वेळ आल्याबरोबर स्त्री, पुत्र, धन–धान्यादि संपत्ति, इष्टमित्र यांना सोडून त्यांपासून वेगळे होतात व कोठें तरी दूर निघून जातात. मृत्युनंतर कोणाचा संबंध कोणाशीं राहात नाहीं.

**नात्र कश्चिद्यथाभावं प्राणी समभिवर्तते ।**
**तेन तस्मिन्न सामर्थ्यं प्रेतस्या स्त्यनुशोचतः ॥२८॥**
**यथा हि सार्थं गच्छन्तं ब्रूयात्कश्चित्पथि स्थितः ।**
**अहमप्यागमिष्यामि पृष्ठतो भवतामिति ॥ २९ ॥**
**एवं पूर्वैर्गतो मार्गः पितृपैतामहैर्ध्रुवः ।**
**तमापन्नः कथं शोचेद्यस्य नास्ति व्यतिक्रमः ॥ ३० ॥**

—कधींच मरण नसतांना या जगांत बायकामुलें, इष्टमित्र यांच्या समवेत नेहमीं राहावें, असलेलें वैभव मनमुराद आनंदानें अनुभवावें अशी जरी सर्वांची इच्छा असली तरी तसें घडत मात्र नाहीं. मरणाराला कोणी वाचवूं शकत नाहीं. तसेंच सामर्थ्य असतें तर तो रडता कां? शोक करीत बसतां येईल पण त्यांना वांचवितां येत नाहीं. पुढें जाणाऱ्यांना उद्देशून ‘ तुम्ही पुढें व्हा, मीहि तुमच्या पाठीमागून हा आलों ’ म्हणून जसें म्हणतो व तसेंच करतो, त्याप्रमाणेंच ज्या मृत्युमार्गानें त्याचे आजे, पणजे, वडील, चुलते यापूर्वीं गेले त्याच मार्गाचा अवलंब करून त्यांच्यामागून तोहि जात असतो. ज्याला टाळतां येणें शक्य नाहीं अशा मृत्यूकरितां व्यर्थ शोक करीत आयुष्याचा नाश करून घेण्यापेक्षां तेवढ्याच काळांत जन्मजरामरणांतून सुटण्याकरितां कांहीं अचूक साधन केलें तर कोण बरें त्या मृत्यूपासून कायमचाच मुक्त होणार नाहीं?

या ठिकाणीं श्रीसमर्थांचा “ **मरे एक त्याचा दुजा शोक वाहे । अकस्मात तोही पुढें जात आहे ॥ पुरेना जनीं लोभ रे क्षोभ होतो । म्हणोनी जनीं मागुता जन्म घेतो ॥**” हा श्लोक वाचकांना बिनचूक आठवेल.

**पूर्ववयांत मोक्षसाधन**

**वयसः पतमानस्य स्रोतसो वाऽनिवर्तिनः ।**
**आत्मा सुखे नियोक्तव्यः सुखभाजः प्रजाः स्मृताः ॥ ३१ ॥**

—प्रवाहतः प्राप्त होणाऱ्या वृद्धावस्थेला टाळतां येणें अशक्य असें समजून तारुण्यांतच त्या शाश्वत ब्रह्मानंदाची प्राप्ति करून घ्यावी. आपल्याप्रमाणेंच प्रजेलासुद्धां तें ब्रह्मसुख प्राप्त करून देणाऱ्या मोक्षसाधनास लावावें. या श्लोकांत राजा, मंत्री, अधिपति, पुढारी या सर्वांनीं मृत्यु व वृद्धाप्य यांचें स्मरण ठेवून आपल्याप्रमाणेंच सर्व प्रजेला पूर्ववयांतच मोक्षमार्गास लाविलें पाहिजे, असा श्रीरामाचा आशय स्पष्ट होतो.

**चातुर्वर्णांचें पालन**

भरतानें श्रीरामाला अयोध्येला परत घेऊन जाण्याकरितां परोपरीनें जो युक्तिवाद लढविला त्यांतलाच हा पुढील एक श्लोक. यांत एक गंभीर विनोद आहे. चारी वर्णांच्या रक्षणाकरितां त्या वेळीं असणारी कर्तव्यबुद्धि यावरून व्यक्त होते. चारीहि वर्णांचें रक्षण थोडें कष्टप्रद वाटलें तरी तें सोडतां कामा नये, हें या श्लोकांतून उद्‍घोषित होतें.

**भरताचा प्रश्न—**

**अथ क्लेशजमेव त्वं धर्मं चरितुमिच्छसि ।**
**धर्मेण चतुरो वर्णान् पालयन् क्लेशमाप्नुहि ॥२१॥**

( वा. रा. अयो. १०६ )

—प्रभो श्रीरामा ! कष्टप्रद धर्माचें पालन करावें, म्हणून अशा अरण्यांत तूं राहिला असल्यास, धर्मपालनांतल्या कष्टाची तुला इतकी आवड असल्यास इतक्याच कष्टानें पाळला जाणारा दुसरा एक धर्म आहे. राज्यांत राहून सुद्धां तुला इतक्याच कष्टानें त्याचें पालन करतां येईल. अरण्यवास करूनच असे कष्ट भोगले पाहिजेत असें नाहीं. धर्माप्रमाणें ब्राह्मणादि चारी वर्णांचें परिपालन करावयाचें म्हटलें तरी इतकेच कष्ट होतात. अयोध्येला येऊन चातुर्वर्णांचें परिपालन कर. तिथे आल्यानें हे इतके कष्ट नाहींसे होतील ही शंका नको.

## श्रीराम-जाबालि संवाद

याप्रमाणें अनेक प्रकारें युक्तिवाद करूनहि भरताला श्रीरामाचें मन अयोध्येला परत जाण्याविषयीं वळवितां आलें नाहीं, तेव्हां श्रीरामाला मागें परतविण्याकरितां जाबालि ऋषि पुढें सरसावले. सरळ युक्तिवादानें काम होत नाहीं म्हणून जाबालि ऋषींनीं नास्तिकवादाचें अवलंबन केलें. त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. नुसत्या संपर्कानेंच सोनें करून टाकणाऱ्या परिसाला आपलें स्वरूप देण्याचा लोखंडानें कितीहि आग्रह धरिला तरी तें त्याला कधीं शक्य होईल काय ?

**आश्वासयन्तं भरतं जाबालिर्ब्राह्मणोत्तमः ।**
**उवाच रामं धर्मज्ञं धर्मापेतमिदं वचः ॥ १ ॥**

( वा. रा. अयो. १०९ )

१८ श्लोकांच्या या सबंध सर्गांत जाबालीचेंच भाषण आहे. यांपैकीं कांहीं निवडक श्लोक घेऊं. हें लोकायत–मत चार्वाक–मताला मिळतेंजुळतें आहे. डोळ्याला दिसतें तेंच खरें, चैतन्य शरीराहून भिन्न नाहीं, तें शरीराच्या नाशाबरोबरच नष्ट होतें. मोक्षसुख म्हणजे शारीरिक सुखच. उचित अथवा अनुचित मार्गानें कां होईना एकंदरींत सर्वाधिक देहसुख मिळविणेंच परम पुरुषार्थ होय. स्वर्गनरकादि सर्व कल्पना मूर्खांच्या आहेत. ईश्वर म्हणून कांहीं सत्ता नाहीं. धर्म, कर्म, सदाचार, वर्ण, आश्रम, यज्ञयागादि अनुष्ठानें, हें सर्व स्वार्थानें बुद्धिमान् ब्राह्मणांनीं मूर्खांना लुबाडण्याकरितां उठविलेल्या कल्पना आहेत. पूजापाठ, श्राद्धपक्षादि वेडगळपणा सूचित करणाऱ्या भावना आहेत. इत्यादि. या मताचें रामानें खंडन केलें आहे. म्हणून रामराज्यांत हें मत कोठेंहि राहणें योग्य नाहीं. ‘ धर्मापेतमिदं वचः ’ धर्म म्हणून कसला तो यांत आढळणार नाहीं.

**जाबालि ऋषिः—**

**साधु राघव माभूत्ते बुद्धिरेवं निरर्थिका ।**
**प्राकृतस्य नरस्येव ह्यार्यबुद्धेर्मनस्विनः ॥२॥**
**कः कस्य पुरुषो बन्धुः किमाप्यं कस्य केनचित् ।**
**एको हि जायते जन्तुरेक एव विनश्यति ॥३॥**

**तस्मान्माता पिता चेति राम सज्जेत यो नरः ।**
**उन्मत्त इव स ज्ञेयो नास्ति कश्चिद्धि कस्यचित् ॥४॥**
**यथा ग्रामान्तरं गच्छन्नरः कश्चिद्बहिर्वसेत् ।**
**उत्सृज्य च तमावासं प्रतिष्ठेतापरेऽहनि ॥५॥**
**एवमेव मनुष्याणां पिता माता गृहं वसु ।**
**आवासमात्रं काकुत्स्थ सज्जन्ते नात्र सज्जनाः ॥६॥**
**राजभोगाननुभवन्महार्हान्पार्थिवात्मज ।**
**विहर त्वमयोध्यायां यथा शक्रस्त्रिविष्टपे ॥७॥**

( वा. रा. अयो. १०९ )

—हे साधु स्वभावाच्या रामा ! तुझी बुद्धि इतकी विशाल असून सर्व तुला समजत असूनहि एखाद्या प्राकृत माणसाप्रमाणें हें काय चालविलें आहेस ? तुझ्यासारख्याला हें कांहीं शोभत नाहीं. असे हे निरर्थक विचार स्वतंत्र बुद्धि नसणाऱ्या या भोळ्या भाबड्यांना मात्र शोभतील. अशा या मातापित्यांच्या, देवाधर्माच्या भोळ्या भावना उगीच कां बाळगाव्यात ? यांत काय अर्थ आहे ? आपल्या देहापुरता मात्र आपण विचार करावा. इथे कोणी कुणाचा नाहीं. प्राणी एकटाच जन्मतो आणि एकटाच मरतो. कोण कुणाचा बंधु आणि कोण कुणाचा मित्र ? कोणापासून काय मिळवावयाचें आहे ? उगीच आई-वडील म्हणून मूर्खाप्रमाणें या मोहांत जो निरर्थक पडतो, त्याला काय म्हणावें ? खरें सांगावयाचें म्हणजे कोणी कुणाचा नाहीं. कुठे बाहेर गांवीं जातांना एखाद्या धर्मशाळेंत मुक्काम पडतो. तिथे असेपर्यंत तिथल्या ओळखीपाळखी, सहवास थोडा वेळ असतो. तिथून निघालें कीं कोणी कुणाचा नाहीं. कोणी इकडे तर कोणी तिकडे. चार दिशांकडे चार पांगतात. उरलेलें तिथेच टाकून जातात. याचप्रमाणें कांहीं काळ एका कुटुंबांत आई–वडील, बंधु–बहीण, सती –पति, संतति–संपत्ति, घरदार, जमीनजुमला हा व्यवहार असतो. मार्गांतल्या एका ठिकाणच्या मुक्कामाप्रमाणें थोड्या वेळाच्या जीवनसौकर्याकरितां मात्र याचें प्रयोजन. म्हणून सज्जन यांत कधीं गुंतून पडत नाहींत. हे राजपुत्रा रामा ! सामान्य जनांना दुर्लभ अशा सकळ राजभोगांचा अनुभव घेत स्वर्गांतल्या इंद्राप्रमाणें अयोध्येंत यथेच्छ विहार करीत ऐस.

**न ते कश्चिद्दशरथस्त्वं च तस्य न कश्चन ।**
**अन्यो राजा त्वमन्यस्तु तस्मात्कुरु यदुच्यते ॥१०॥**

**गतः स नृपतिस्तत्र गंतव्यं यत्र तेन वै ।**
**प्रवृत्तिरेषा भूतानां त्वं तु मिथ्या विहन्यसे ॥१२॥**
**अर्थधर्मपरा ये ये तांस्ताञ्शोचामि नेतरान् ।**
**ते हि दुःखमिह प्राप्य विनाशं प्रेत्य भेजिरे ॥१३॥**
**अष्टकापितृदैवत्यमित्ययं प्रसृतो जनः ।**
**अन्नस्योपद्रवं पश्य मृतो हि किमशिष्यति ॥१४॥**
**यदि भुक्तमिहान्येन देहमन्यस्य गच्छति ।**
**दद्यात्प्रवसतः श्राद्धं न तत्पथ्यशनं भवेत् ॥१५॥**
**दानसंवनना ह्येते ग्रंथा मेधाविभिः कृताः ।**
**यजस्व देहि दीक्षस्व तपस्तप्यस्व संत्यज ॥१६॥**
**स नास्ति परमित्येतत्कुरु बुद्धिं महामते ।**
**प्रत्यक्षं यत्तदातिष्ठ परोक्षं पृष्ठतः कुरु ॥१७॥**

( वा. रा. अयो. १०९ )

—रामा, आतां तुझा दशरथाशीं कांहीं संबंध नाहीं आणि दशरथाचा तुझ्याशीं कांहीं संबंध नाहीं. राजा वेगळा तूं वेगळा; जेथें जावयाला पाहिजे होतें तेथें तो राजा गेला. त्याचें काम आटोपलें. उत्पन्न झालेल्या सर्व प्राणि-वर्गाचीच ही अंतिम गति. उगीच तूं कां 'हाडाचीं काडें' करून घेत आहेस? वाटेल तसा, रेलचेल पैसा मिळवून सुखानें राहावयाचें सोडून, न्यायानें पैसा मिळवून धर्मानें वागावें, देवाकारितां झिजावें म्हणून उगीच कष्ट सोसणाराला पाहून मनाला फार वाईट वाटतें. कुठला देव नि कुठला धर्म ! असेतोंपर्यंत दुःखच भोगून बिचारे व्यर्थ मरून जातात. असेतोंपर्यंत सुख नाहीं व मेल्यावर तर तें नाहींच नाहीं. मेल्यावर काय उरणार आहे ? इथलेंहि सुख नाहीं व तोहि नाश पावतो· प्रत्यक्ष जळून राख झालेली बघून देखील पुन्हां त्याची आशा धरतात. त्याला पितृदैवत म्हणून मानतात. त्याचें श्राद्ध करतात. उगीच अन्न वायां घालवितात. जेवावयाला तो असला पाहिजे का नाहीं ! मेलेल्याचें काय उरतें ? ' गाडगें फुटलें तें फुटूनच गेलें ' कोणाला तरी जेवावयाला घातल्यानें कोणाचें तरी पोट भरावयाचें झाल्यास दुसऱ्या गांवीं गेलेल्याचें श्राद्ध करून इथें ब्राह्मणाला जेवावयाला घातलें म्हणजे झालें, तिथें त्याचें पोट भरेल ! असें कुठें होतें का ? दानधर्मपर असे हे ग्रंथ आपली पोळी पिकावी म्हणून बुद्धिमानांनीं केले आहेत. स्वार्थाकरितां अशी मंडळी ' यज्ञ कर, दान दे, दीक्षा घे, तप कर,

संन्यास घे म्हणून सांगत सुटतात. दुसऱ्याचें जावो आणि आपल्याला येवो हें यांचें धोरण असतें. तेव्हां यांत कांहीं अर्थ नाहीं, म्हणून तूं निश्चित समज. प्रत्यक्षांकडे तोंड करून अप्रत्यक्षाकडे पाठ फिरव. जाबालीचा नास्तिकवाद आपण थोडक्यांत ऐकला. श्रीरामाचें यावरचें उत्तर आतां बघूं.

**श्रीरामः—**

**भवान्मे प्रियकामार्थं वचनं यदिहोक्तवान् ।**
**अकार्यं कार्यसंकाशमपथ्यं पथ्यसंनिभम् ॥ २ ॥**

(वा. रा. अयो. ११०)

—हे जाबालि ऋषिवर्या ! मला होणारें या वनवासाचें दुःख चुकवून मला कसेंतरी अयोध्येच्या सिंहासनावर एकदां बसवावें या सदुद्देशानें आपण हें असें उपदेशिलें असलें तरी यामुळें अकार्य तेंच कार्य व अपथ्य तेंच पथ्य म्हणून उघड उपदेशिल्याप्रमाणें झालें आहे. अकर्तव्य तेंच कर्तव्य व आहित तेंच हित म्हणून आपण मला कळवीत आहां.

**निर्मर्यादस्तु पुरुषः पापाचारसमन्वितः ।**
**मानं न लभते सत्सु भिन्नचारित्र्यदर्शनः ॥ ३ ॥**

—धर्माचें बंधन तोडून मन मानेल त्याप्रमाणें पापकर्में आचरणारा चारित्र्यहीन होतो. सज्जनांत त्याची छीःथू होते. सर्वच त्याची निंदा करूं लागतात. जगांत त्याचें तोंड काळें होतें. इहपरसुखांनाहि तो आंचवतो.

**कुलीनमकुलीनं वा वीरं पुरुषमानिनम् ।**
**चारित्र्यमेव व्याख्याति शुचिं वा यदि वाऽशुचिम् ॥ ४ ॥**

—मनुष्याची त्याच्या चारित्र्यावरूनच परीक्षा होते. हा कुलीन वा अकुलीन, वीर वा भ्याड, पवित्र किंवा गलिच्छ हें त्याच्या आचरणावरूनच स्पष्ट होतें.

**अनार्यस्त्वार्यसंस्थानः शौचाद्धीनस्तथाशुचिः ।**
**लक्षण्यवदलक्षण्यो दुःशीलः शीलवानिव ॥ ५ ॥**
**अधर्मं धर्मवेषेण यद्यहं लोकसंकरम् ।**
**अभिपत्स्ये शुभं हित्वा क्रियाविधिविवर्जितम् ॥ ६ ॥**
**कश्चेतयानः पुरुषः कार्याकार्यविचक्षणः ।**
**बहु मन्येत मां लोके दुर्वृत्तं लोकदूषणम् ॥ ७ ॥**

(वा. रा. अयो. कां. स. ११०)

—अनार्यांचें आचरण ठेवून घेऊन आर्यांच्या वर्तनाचा डोलारा माजविला, अशुद्ध आचरण आंत ठेवून वरपांगी शुद्ध आचार दाखविला, अवलक्षणी असून वरवर महान् लक्षणसंपन्न म्हणून बतावणी केली, दुःशील असून सुशील म्हणून मिरविलें, धार्मिकाच्या वेषानें मी लोकसंकरकारक अधर्म जगांत वाढविला, शुभकारक शास्त्रीय क्रिया सोडून बुद्धिपुरःसर अशास्त्रीय क्रियांकडे वळलों, तर अशा मला दुर्वृत्ताला कार्याकार्यविचक्षण असा कोण तेजस्वी पुरुष मान देईल ?

हे जाबालि मुनि महाराज ! मनुष्य एकटाच जन्मून एकटाच मरतो, कोणाकडून काय व्हावयाचें आहे ? मातापिता, गुरुदेव, बंधुबांधव यांची भीड ठेवून तरी काय उपयोग, शेवटीं कोणाचा कोण ? आपलाच आपण. जन्माला कारण असणाऱ्या मातापित्यांचें वचन कसें उल्लंघावें म्हणाल, तर मातापिता हे जन्माला कारण नव्हेतच; रजोरेताच्या मिश्रणानेंच गर्भ राहतो; खरें म्हटलें म्हणजे याला कामच कारण आहे. इत्यादि जें तुम्हीं सांगतां तें पटण्यासारखें नाहीं.

**अथाधिप्रजम् । माता पूर्वरूपम् । पिता उत्तररूपम् । प्रजा संधिः । प्रजननꣳ संधानम् । इत्याधिप्रजम् ॥** ( तैत्तिरीय शिक्षा अ. ३।३ ). **क्षेत्रभूता स्मृता नारी बीजभूतः स्मृतः पुमान् । क्षेत्रबीजसमायोगात् संभवः सर्वदेहिनाम् ॥** ( मनु. ९।३३ ). —पीक यावयाला सुक्षेत्र व उत्तम बीज या दोन्हींची आवश्यकता असल्याप्रमाणें प्रत्येकालाच आईवडिलांची अपेक्षा असते. कामानेंच सृष्टि होते, तर कांहीं व्यंग नसतांनाहि कित्येकांना कां पुत्र होत नाहींत ? राजा दशरथानें शेवटीं पुत्रकामेष्टि याग संपादूनच आम्हां पुत्रांचा लाभ करून घेतला कीं नाहीं ? नवमास वागवून लहानाचे मोठे करून जे इतके कष्ट आई सोसते, वडील संगोपन करतात तें व्यर्थच का ? त्यांच्याशिवाय मुलाला जगणें तरी शक्य आहे का ? आपल्या तळहाताचा फोड करून, आपल्या पोटाला चिमटा घेऊन, आपल्या तोंडचा घांस काढून, वाऱ्यांत, पावसांत, उन्हांत, आपलें नेसलेलें वस्त्र पांघरून, आईबाप जे मुलाला इतक्या मोहानें वाढवितात त्या उपकाराचें स्मरण मुलानें ठेवलें नाहीं तर तो कृतघ्न होणार नाहीं का ?

**यं मातापितरौ क्लेशं सहेते संभवे नृणाम् ।**
**न तस्य निष्कृतिः शक्या कर्तुं वर्षशतैरपि ॥**

मुलाच्या बाबतींत आईबापांनीं जें कष्ट सहन केलेले असतात, शेंकडों वर्षांच्या सेवेनेंहि पण त्यांची निष्कृति होणें शक्य नाहीं. **मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्यदेवो भव** । आईच्या ठिकाणीं देवताबुद्धि ठेव, वडिलांच्या ठिकाणीं देवताबुद्धि ठेव, आचार्यांच्या ठिकाणीं देवताबुद्धि ठेव म्हणून जें श्रुति सांगते तें उगीच का ? ‘ **आचार्यः प्लावयिता** ’ आचार्य हा भवसमुद्रतारक असतो आणि म्हणूनच ‘ **गुरुर्गरीयान् पितृतो मातृतश्चेति मे मतिः** ।’ तो आईबापापेक्षांहि श्रेष्ठ असतो. संसारतारक वेदज्ञान ब्राह्मणापासून मिळतें, देवापितृकार्यें त्याच्यामुळेंच होतात. इतर वर्गांचें तें एक छत्र असतें. त्यांच्या तपःशक्तीनें इतरांचें रक्षण होतें. म्हणून ब्राह्मणांना ‘ भूसुर ’ अथवा ‘ भूदेव ’ असें म्हणतात. **आचार्यं च प्रवक्तारं पितरं मातरं गुरुम् । न हिंस्याद् ब्राह्मणान्गाश्च सर्वांश्चैव तपस्विनः ॥** ( मनु. ४।१६२ ) उपनयनपूर्वक वेद शिकविणारा म्हणजेच आचार्य, वेदार्थ विवरून सांगणारा प्रवक्ता, गायत्रीचा उपदेश देणारा पिता, प्रथमगुरु म्हणवून घेणारी माता व महावाक्याचा उपदेश देऊन परमात्मैक्य साधून देणारा सद्‌गुरु, सदाचरणी वेदविद् ब्राह्मण आणि गोमाता व सारेच तपस्वी यांना विरुद्ध वागवूं नये कीं यांच्याविरुद्ध जाऊं नये, म्हणून मनु महाराजांनीं सांगितलें आहे. आमच्या सूर्यवंशाचा आद्य पुरुष म्हणजेच मनु. याची ही अशी आम्हांला शिकवण आहे. ब्रह्मदेवाच्या दक्षिणांगापासूनच याची उत्पत्ति मग याचें महत्त्व किती असणार. तोच म्हणतो—**तयोर्नित्यं प्रियं कुर्यादाचार्यस्य च सर्वदा । तेष्वेव त्रिषु तुष्टेषु तपः सर्वं समाप्यते ॥** ( मनु. २।२२८. )–प्रति दिवशीं आईवडिलांचें प्रिय आचरावें, सदैव आचार्यांचें प्रिय करावें. या तिघांची तृप्ति झाली कीं सर्व तपाची पूर्ति झाली. **तेषां त्रयाणां शुश्रूषा परमं तप उच्यते । न तैरनभ्यनुज्ञातो धर्ममन्यं समाचरेत् ॥** (मनु. २।२२९. )–या त्रिवर्गाची शुश्रूषाच श्रेष्ठ तप आहे. त्यांच्या संमतीशिवाय त्यांची शुश्रूषा सोडून इतर धर्माचें आचरण करूं नये. **त्रिष्वप्रमाद्यन्नेतेषु त्रींल्लोकान्विजयेद्गृही । दीप्यमानः स्ववपुषा देववद्दिवि मोदते ॥** ( मनु. २।२३२. ) यांच्या शुश्रूषेंत कसला प्रमाद नाहीं झाला म्हणजे तीन्ही लोकांत त्या गृहस्थाश्रम्याचा जयजयकार होतो. तीन्ही लोकांत तो विजयी होतो. सूर्याप्रमाणें दिव्य तेज प्राप्त होऊन त्या दिव्य देहानें तो स्वर्गांत आनंदानें नांदतो. **त्रिष्वेतेष्वितिकृत्यं हि पुरुषस्य समाप्यते । एष धर्मः परः**

**साक्षादुपधर्मोऽन्य उच्यते ॥२३७॥ आचार्यो ब्रह्मणो मूर्तिः पिता मूर्तिः प्रजापतेः । माता पृथिव्या मूर्तिस्तु भ्राता स्वो मूर्तिरात्मनः ॥ २२६ ॥ पिता वै गार्हपत्योऽग्निर्मातााग्निर्दक्षिणः स्मृतः । गुरुराहवनीयस्तु साग्नित्रेता गरीयसी ॥२३१॥** ( मनु. २ ) इत्यादि असे आई, वडील, गुरु, आचार्य व बंधु यांबद्दलचे अजून कितीतरी श्लोक मनूनें लिहून ठेवले आहेत. मनूला कांहीं समजत नव्हतें का ? **यन्मनुरवदत्तद्भेषजम् ।** मनूनें सांगितलें तें निःसंशय भवरोगाचें औषध म्हणूनच समजावें, असें उगीच का श्रुति सांगते ?

**गुरोर्यत्र परीवादो निन्दा वाऽपि प्रवर्तते । कर्णौ तत्र पिधातव्यौ गंतव्यं वा ततोऽन्यतः ॥ २०० ॥ परीवादात्खरो भवति श्वा वै भवति निंदकः । परिभोक्ता कृमिर्भवति कीटो भवति मत्सरी ॥२०१॥** (मनु. २) गुरुनिंदेविषयीं मनूनें किती सांगितलें आहे तें पाहा ! गुरुची थट्टा अथवा निंदा चाललेली असली तर ती ऐकूं नये, कान झांकून घ्यावेत व सरळ तेथून निघून जावें. गुरूची थट्टा केल्यानें पुढच्या जन्मीं शिष्य गाढव होतो, निंदा केल्यानें कुत्रा होतो. सेवेविरहित गुरूच्या धनअन्नादिकांनीं जगणारा कृमी होतो आणि गुरूच्या मत्सरानें किडा होतो, हेंहि सर्वांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तुमचें सांगणें मी मानणें म्हणजे अकुलीनाप्रमाणें वागून कुलीन, अनार्याप्रमाणें वागून आर्य, अपवित्राप्रमाणें वागून पवित्र, कुलक्षणी मनुष्याप्रमाणें वागून सुलक्षणी, दुःशील मनुष्याप्रमाणें वागून सुशील म्हणवून घेणें होय. धर्माच्या पडद्याआड लोकसंकरकारक, अविधि व अनाचाराचें धर्मशून्य आचरण, मीं चालविलें तर, कोणता कार्याकार्याचें ज्ञान असणारा सन्मान्य विद्वान् दुर्वृत्त व लोकानिंद्य अशा मला सन्मान देईल ? राजा म्हणून माझी श्रेष्ठता मानील ? माता, पिता, गुरुदेव इत्यादींना मानून राज्यसुखाचा त्याग करून माझ्याप्रमाणें असल्या वनवासाचे कष्ट अनुभविणारा केवळ मूर्खच होय ! त्याचें डोकें ठिकाणावर नाहीं म्हणून तुम्ही मला म्हणतां ! मातापिता यांचें वचन खरें केलें पाहिजे, त्यांची आज्ञा पालन केली पाहिजे, हें वेड डोक्यांत ठेवून विनाकारण दुःख भोगणें हा एक भ्रमच नव्हे का ? असें मला विचारतां ? मातापित्यांचें वचन, त्यांची आज्ञा, त्यांची संपत्ति, त्यांचें राज्य, या सर्व भावना टाकून दिल्या पाहिजेत; वयांत आल्यावर या सर्व संपत्तीचा स्वतः मालक व्हावें म्हणून सांगतां ! राज्य इत्यादि सर्व सोडून, गृहस्थाश्रमाला अयुक्त असें अति कष्टप्रद वानप्रस्थाश्रमाचें आचरण

करीत अरण्यांत तूं कां राहावेंस, म्हणून प्रश्न करतां ! याला मी काय म्हणावें ? वडिलांचें वचन सत्य करण्याकरितां व सापत्न आईची इच्छा पूर्ण व्हावी म्हणून त्याप्रमाणेंच मी प्रतिज्ञा केली; व ती प्रतिज्ञा तडीस नेण्यास या तापसवेशानें मी अरण्यांत आहें. '**सत्यं वद, धर्मं चर।**'–सत्य बोल, धर्मानें चाल म्हणून श्रुतीची आज्ञा आहे. सत्य आणि धर्म हे दोन्ही अजीबात नष्ट होतील तर जगद्व्यापारच थांबेल. एकहि कार्य पार पडणार नाहीं. येतों, जातों, राहतों, करतों या दुसऱ्याच्या वचनावर विश्वासूनच सर्व व्यवहार करतात. सारेच खोटें बोलावयाला लागले, बोलण्याविरुद्ध वागूं लागले तर परस्परांचें जीवनच खुंटेल. थोडया फार सत्याच्या आचरणानेंच मनुष्य-व्यवहार टिकून असतो.

**अनुव्रतः पितुः पुत्रो मात्रा भवति संमतः ।**
**जायापत्ये मधुमतीं वाचं वदतु शांतिवाम् ॥१॥**
**मा भ्राता भ्रातरं द्विक्षन् मा स्वसारमुत स्वसा ।**
**सम्यञ्चः सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया ॥२॥**

( अ. वे. पै. शाः ५।१९. )

––पित्याच्या व्रताचें व वचनाचें पुत्रानें पालन करावें. आईची आज्ञा पाळावी. पत्नीनें आपल्या पतीशीं शांतिसमाधानाचें मृदुमधुर भाषण करावें. बंधुबंधूंतून द्वेष नसावा. बहिणीबहिणींतून द्वेष नसावा. सर्वांनीं ऐक्यमतानें राहावें. अव्याभिचार, सत्य इत्यादि व्रतांनीं सर्वहि युक्त असावेत व सर्वांशीं सर्वांनीं शुभ आणि गोड बोलावें, असें श्रुति सांगते.

' सर्व वैभवांनीं समृद्ध अशा अयोध्येंत पट्टाभिषेक करून घेऊन स्वर्गांत असणाऱ्या इंद्राप्रमाणें सुखानें राहा. तुझा दशरथाशीं कांहीं संबंधहि नाहीं; तो वेगळा तूं वेगळा. तो मरण पावून जिकडे जावयाचें तिकडे निघून गेला. त्याच्या मरणानंतर तोच नाहीं असें झाल्यावर त्याचा संबंध काय राहातो ? पंचभूतात्मक देह पंचभूतांत मिळून गेल्यावर मेलेला शिल्लक कुठें राहातो ? तोच शिल्लक नसतांना त्यानें स्वतःच्या पत्नीला दिलेल्या वचनाचें पालन तूं केलें नाहींस तर त्याला तरी नरक कसा प्राप्त होणार ? ' असा प्रश्न आपण घालतां. ' रजरेतांच्या मिश्रणानेंच गर्भांत जन्म होतो. खरें म्हटलें म्हणजे याला कामच कारण आहे, ' असा सिद्धांत आपण स्थापतां याला काय

म्हणावें ? **शरीरं वाव किलेदं म्रियते न जीव इति** ।–शरीर मात्र मरण पावतें त्यांत असणारा जीव मरत नाहीं. **अविनाशी वा अरेऽयमात्मा** ।– हा आत्मा अमर आहे. **स इह प्रविष्ट आनखाग्रेभ्यः** ।–तो अविनाशी आत्माच शरीराच्या नखशिखांत व्यापून आहे. **देहोहमिति मिथ्याध्यासवशाज्जीवः** ।–त्या अशरीर अविनाशी आत्म्याला केवळ '**मी देह**' या कल्पनेनें जीवभाव येतो. **पुण्येन पुण्यं लोकं गच्छति पापेन पापमुभाभ्यामेव मनुष्यलोकम्** ।–पुण्यकर्माच्या योगानें तो स्वर्गादि पुण्यलोकांना जातो. पापकर्माच्या योगानें नरक लोकांना जातो. पापपुण्याचें समप्रमाण झालें असतां तो मर्त्य लोकाला येऊन मनुष्य होतो. **ज्ञात्वा तं मृत्युमत्येति** । —याला स्वरूपभूत चित्सुख परमात्म्याचें ज्ञान झालें असतां तो मृत्यूला ओलांडून जातो. म्हणजे अविनाशी परमात्माच होतो. **न तस्य प्राणा उत्क्रामन्ति अत्रैव समवलीयन्ते** ।—त्याचे प्राण कोणत्याहि लोकाला न जातां ठायींच्या ठायीं विरघळतात. **न स पुनरावर्तते न स पुनरावर्तते पुनर्नाभिजायते पुनर्नाभिजायते** । पुन्हां तो जन्माला कधींच येत नाहीं, पुन्हां तो कधींच जन्माला येत नाहीं म्हणून श्रुति दोनदोनदां सांगते. जीवाचें 'मी' हें भान सर्व देहांत व्यापून असतें. **अहं कर्ता, अहं भोक्ता, अहं बद्धः, अहं मुक्तः** । —मी कर्ता, मी भोक्ता, मी बद्ध, मी मुक्त म्हणून त्याचा व्यवहार असतो. देह जड आहे त्यामुळें हा 'मी' म्हणणारा देह नव्हे. शवांत मीपण दिसून येत नाहीं. देहामुळेंच 'मी' उद्भवतें, असें म्हटल्यास तो देह दहनापर्यंत तिथेंच निश्चेष्ट पडून असतो. त्यांत 'मी' ही भावना कां दिसून येत नाहीं ? यावरून 'कांहीं तरी' प्रवेशून कांहीं काळ देहांत राहातें व शेवटीं देहाला सोडून जातें व तें 'मी' या आपल्या जाणीवेनें देहाहून विलक्षण असें देहांत असतें, असें युक्तीनेंहि कळून येतें. **कर्मानुगो गच्छति जीव एकः** । देहाची व देहसुखाची कल्पना असेपर्यंत तो वस्त्राप्रमाणें देह सोडून कर्माप्रमाणें फळ भोगण्यास, इच्छेनें दुसऱ्या गांवास गेल्याप्रमाणें लोकांतरास जातो व देहात्मभावाचा निरास होऊन देहसुखाची कल्पना नष्ट झाली कीं या वासनेनें लाभणारें जन्ममरण नाहींसें होऊन परमात्मस्वरूप ज्ञानानें त्या चित्सुख स्वरूपाशीं अभिन्न होऊन राहातो व त्या वेळीं तो मुक्त म्हटला जातो. हें युक्तीनेंहि, श्रुतिप्रमाणानेंहि व माहात्म्यांच्या अनुभवानेंहि सिद्ध होतें व तुमचा देहात्मवाद सूर्योदयाच्या नंतर निशा नष्ट झाल्याप्रमाणें शिल्लक राहात नाहीं. पुढें कोणतें तरी मोठें सुख

मिळेल त्यासाठीं धर्माचरण मुख्य आहे इत्यादि भावना करून त्याच्या आशेनें सहजगत्या मिळालेलें सुख सोडून दुःख अनुभवीत विनाकारण कां मरावें ? जिवंत असतांनाच दुःख. भोगणारे मेल्यावर तर तिथे हें कोणतेंहि सुखाचें साधन नसल्यामुळें कसचें सुख अनुभवितात ? त्यांना जिवन्त असतांनाहि दुःख आणि मेल्यावरहि दुःखच हें धर्मशास्त्राचें वचन मानणें अगदीं फोल आहे म्हणून तुमचें सांगणें कोणालाहि पटत नाहीं. **त्याग एवातिरिच्यते ।** यज्ञदानप्रजननादि सर्व साधनांपेक्षां त्यागच श्रेष्ठ म्हणून श्रुतीचें सांगणें आहे. आनंदस्वरूपांत दुःखरूप प्रपंचाचा केवळ आरोप आहे व त्याच्या त्यागानें केवळ आनंदाची प्राप्ति होते, हें युक्तीलाहि पटून त्यागाचें महत्त्व जाणवतें. प्रपंचांत दुःखाचेच अनुभव येत असल्यामुळेंहि याहून विलक्षण सुखाची इच्छा होणें व त्याकरितां हें सर्व सोडून प्रयत्न करणेंहि ऐहिक जीवनांत सहज दिसून येणारा धर्म आहे, हेंहि पण लक्षांत येतें.

मेल्यानंतर त्याचें श्राद्ध करावयाला तोच राहात नाहीं असें झाल्यावर, त्याला पोहोंचावें म्हणून या ब्राह्मणांना अन्न घालण्यांत काय अर्थ आहे ? आणि तेंहि त्याला मिळत नाहीं असें एकदां ठरल्यावर ब्राह्मणांना पोटभर जेवण घालून आपलें अन्न व्यर्थ खर्च करणें हें कोणतें व्यवहारचातुर्य ! एकाच्या जेवण्यानें दुसऱ्याचें पोट भरतें तर मरण पावल्यानंतर केलेले हें श्राद्ध जिवंत असतांनाच केलें तर काय हरकत आहे ? दूर प्रवासांत असणाऱ्याच्या नांवानें घरांत कोणाला तरी पोटभर वाढलें तर तिथे त्याचें पोट कां भरूं नये ? या तुमच्या प्रश्नाला उत्तर म्हणून आईबापांच्या उपकाराची फेड करावी या दृष्टीनें असे तोंपर्यंत ऋणी होऊन अन्नपानादिकांनीं त्यांची सेवा केल्याप्रमाणें त्यांच्या मरणोत्तरहि देह असेपर्यंत श्रुतीच्या विधानाप्रमाणें श्राद्धपक्षादि मुलगा करतो. पितर मुक्त होऊन पितरांच्या नांवानें श्राद्धपक्षादि केल्यास अर्यमादि नित्य पितरांची ती उपासना होते व त्यांच्या कृपेनें गृहस्थांना संतति-संपत्तीचा लाभ होतो असें शास्त्रवचन असल्यामुळें व पुन्हां मुक्त न झालेले पितर पितृलोकांत असतात व मनुष्यमानाचें एक वर्ष म्हणजे पितृमानाचा एक दिवस होत असल्यामुळें वर्षोवर्षीं केलेलें श्राद्ध म्हणजे त्यांना रोजचें भोजन होतें असें श्रुतीचें सांगणें आहे. **यमराज्ञः पितॄन्गच्छ** ( शतपथ १८।२।४६ ) **यमाय पितृमते स्वधा नमः ।** ( शतपथ २८।२।७४ ) **अधामृता पितृषु संभवन्तु ।** ( अथर्व. १८।४।४८ ). इत्यादि

वाक्यांवरून मरणोत्तर पितरांचें आस्तित्व सिद्ध होतें. **देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम्** । म्हणून तैत्तिरीय उपनिषदामध्येंहि आज्ञापिलें आहे. हीं धर्मशास्त्राचीं वचनें तुला कशाला हवींत ? दानधर्माच्या विधानांनीं युक्त असे सर्व ग्रंथ आपलें जीवन सुखानें चालावें म्हणून ब्राह्मणांनीं करून ठेविले आहेत. यज्ञ करा, दान द्या, कष्ट करा, सर्व सोडा हे सर्व बुद्धिवंतांनीं आपल्या स्वार्थाकरितां सांगितलेले विचार आहेत हें सर्व खरें धरून बसून उपयोग नाहीं. प्रत्यक्ष येथें मिळणारें सुख सोडून कांहीं तरी कष्ट सोसले तर, पुढें सुख मिळेल अशी कल्पनाहि करूं नये ' चल ! अयोध्येला येऊन सुखानें राज्य कर ' म्हणून हे जाबालि मुने ! हें तुमचें बोलणें म्हणजे केवळ नास्तिकपणाचें आहे. हें मत व वर्तनक्रम ऐकून कोणाला चांगला म्हणून वाटला तरी विषमिश्रित पक्वान्नाप्रमाणें तो त्याज्य आहे. तुमच्या विधानाला खरें सुख आणि खरी शांति देणाऱ्या दिव्य वेदशास्त्रांचा आधार नाहीं.

**देवपितृमनुष्याणां वेदश्चक्षुः सनातनम्** ।—देव, पितृ, मनुष्य या सर्वांना वेद म्हणजे डोळेच आहेत असें मनु महाराज म्हणतात.

वेदविरुद्ध असलेलें वर्तन करण्यास गेलें तर, चांगलें सोडून जाणून बुजून वाईट व अशुभ मार्गास लागल्याप्रमाणें होईल. अशा अधर्माचा मार्ग धरून सज्जनांच्या द्रोहाला पात्र होणारा मी भ्रष्ट होईन, दुःशील होईन, दुःखी होईन, आपलें हित गमावून दुसऱ्यालाहि कंटकप्राय होईन. श्रीरामाचें पवित्र जीवनच यामुळें नासून जाईल. विवेक–विचार असणारा कोणीहि माझा गौरव करणार नाहीं. माझें त्या वेळचें आचरण लोकांना तारक न होतां मारक होईल. मी स्वतः नासून दुसऱ्यांनाहि नासून टाकीन. येथेंहि अपकीर्ति होऊन मेल्यावरहि मला नरकप्राप्ति चुकणार नाहीं. तुम्हीं सांगितलेलें सर्वहि अविधीनें आहे.

## निषिद्ध कर्मांपासून होणारे दुष्परिणाम

**अविधिकृन्नरकमश्नुते** । अविधिप्रमाणें वागणाऱ्यास नरकप्राप्ति होते, म्हणून श्रुतीचें सांगणें आहे. नरकप्राय असलेल्या निषिद्ध भोगांत अधिकाधिक आसक्ति निर्माण होते, ती अविधीच्या वर्तनानेंच. निषिद्ध कर्मांनीं अत्याधिक वाढलेला विषयोपभोगाचा दाह गवताच्या राशीला ( गंजीला ) लागलेल्या धगधगायमान अग्निप्रमाणेंच कर्त्याचें हृदय जाळीत असतो. इंद्रियनिग्रहाची

पकड शिथिल झाली कीं मस्त घोडे लगाम सैल झाल्यामुळें जसे मनसोक्त रथ ओढून खड्डयांत घालतात त्याप्रमाणें अनिर्बंध ओढाळ इंद्रियें मन मानेल त्याप्रमाणें अवश करून देहाला विषयाकडे ओढीत शेवटीं शोचनीय दुःखाच्या खड्डयांत पाडतात. अविधि विषयोपभोग आरोग्याचा नाश करतो, विषयवासनेचा दाह अधिक करतो, मनाची शांति नष्ट करतो, समाधान अजिबात नाहींसें करतो. आचरलेलें पापकृत्य तुषाग्नीप्रमाणें आंतल्या आंतच पापकर्त्याला भाजून काढीत असतें. खग्रास ग्रहणांतील चंद्रबिंबाप्रमाणें त्याचें जीवित निस्तेज होतें. निराशा आणि दुःख यांच्या आवरणाखालीं तो संपूर्ण झांकला जातो. निषिद्ध कर्माच्या अनुष्ठानामुळें निषिद्ध वासना वाढूं लागतात. निषिद्ध कामोपभोगाची वावटळच उठून परमार्थमार्गाची दिशाच दिसत नाहीं. बुडत्याचा पाय अधिक खोलांत, या म्हणीप्रमाणें तो अधिकाधिक निषिद्ध कर्में आचरूं लागतो. नीतिभ्रष्ट पहिल्या पहिल्यानें पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें मोठ्या आवेशानें वाटेल त्याच्या अंगावर जाऊन मार खातो. त्यानंतर हळु-हळू बलहीन होऊन महारोगाच्या माणसाप्रमाणें तो सर्वत्र तिरस्कृत होतो. कृतकर्माचीं फळें अनुभविण्यास लावण्याकरितां त्याच्या देहांत अनेक रोगांनीं ठाण दिलेलें असतें. तळमळून तळमळून अशा नाना तऱ्हेच्या अनेक नरक-यातना इथे भोगून मरणानंतर यमधर्माच्या शासनानें घोर घोर नरकांत त्याचा वास होतो व तिथे तो नीतिभ्रष्ट अनंत दुःखें भोगतो.

श्रीराम वनवासाची प्रतिज्ञा मोडून अयोध्येच्या सिंहासनावर बसला तर तो नष्टप्रतिज्ञ होणार नाहीं का ? त्या अप्रत्यक्ष केवळ सुखाची आशा सोडून यातनेच्या राज्यभोगादिकांचें प्रत्यक्ष सुख अनुभविण्याकरितां नुसत्या तुमच्या वचनावर भार ठेवून का एकदां सिद्ध झालों, तर, हे ( जाबालि ) ऋषि महाराज ! कुत्राहि खाणार नाहीं इतके माझे हाल होतील. दुर्वृत्त दुराचारी राजा दुसऱ्यांना कसला धडा घालून देईल ? प्रजा कोणत्या मार्गानें जाईल ? त्या राजाप्रजेचें पुढें काय होईल ? कोणत्या कर्मानें त्यांना इथे राहीपर्यंत तरी, सुखासमाधानाची आशा राहील ?

## राज्यकर्त्यांची जबाबदारी

**कामवृत्तः स्वयं लोकः कृत्स्नः समुपवर्तते ।**
**यद्वृत्ताः सन्ति राजानस्तद्वृत्ताः सन्ति हि प्रजाः ॥**

—स्वाभाविकतःच सर्व लोक स्वेच्छाचारी असतात. राजानेंच आपल्या अधिकाराच्या बळानें व शासनाच्या भीतीनें त्यांना देवधर्मपर व नीति न्यायपर करावयाचें असतें. असें असतां राजानेंच जर देवधर्म व नीतिन्यायांचा त्याग केला, राजाच जर स्वेच्छाचारी बनला तर प्रजेला शासन करणारा कोण? ‘यथा राजा तथा प्रजा.’ राजाप्रमाणें प्रजाहि भ्रष्टाचारानें वागूं लागते. अशा रीतीनें प्रजेच्या अधोगतीला राजाच कारण होतो. दुर्वृत्त राजा प्रथम स्वतः बिघडून नंतर आपल्या सर्व प्रजेलाहि तो बिघडवितो.

**सत्याचा महिमा**

**सत्यमेवानृशंसं च राजवृत्तं सनातनम् ।**
**तस्मात्सत्यात्मकं राज्यं सत्ये लोकः प्रतिष्ठितः ॥**

—सत्याचें सरळ आचरण व हिताचें प्रेमळ शासन हा राजाचा सनातन धर्म होय. सत्याचें राज्य असलें पाहिजे. सत्याच्या पायावर जगाची प्रतिष्ठा आहे.

**ऋषयश्चैव देवाश्च सत्यमेव हि मेनिरे ।**
**सत्यवादी च लोकेस्मिन् परमं गच्छति क्षयम् ॥**

—ऋषींनीं आणि देवतांनीं सत्यालाच मान दिला, सत्यच एक उत्कृष्ट मानलें. सत्यभाषी जगांत मोक्ष मिळवितो. मोक्षांत दुःखाचा परमक्षय म्हणजे अत्यंताभाव असतो. म्हणून मोक्षास परमक्षय असें नांव आहे. इंद्रिय, वाणी व मन यांनीं जें जसें जाणलेलें असतें तसेंच प्रगट करणें हें व्यावहारिक सत्य होय. ब्रह्म हें जगाचें अंतिम सत्य असल्यामुळें ब्रह्मनिरूपण करणेंहि सत्य होय.

**उद्विजन्ते यथा सर्पान्नरादनृतवादिनः ।**
**धर्मः सत्यं परो लोके मूलं स्वर्गस्य चोच्यते ॥**

—खोटें बोलणाऱ्याकडे सर्पाइतक्याच प्रेमानें लोक बघतात; तितकेंच ते त्याला चाहतात. जगांतच सत्य हा एक श्रेष्ठ धर्म आहे. स्वर्गाचें तसेंच मोक्षाचें सत्य हेंच एक मूलकारण आहे.

**सत्यमेवेश्वरो लोके सत्यपद्माश्रितः सदा ।**
**सत्यमूलानि सर्वाणि सत्यान्नास्ति परं पदम् ॥**

जगामध्यें सत्यच ईश्वर होय–( सत्य पाळणाऱ्याच्या अंगांत ईश्वराइतकें सामर्थ्य येतें ). सत्याच्या पायावरच धर्माचें मंदिर स्थिर असतें. लक्ष्मीहि

( संपत्तिहि ) सत्याचाच आश्रय करून राहते, सत्याबरोबरच असते, सत्यपालनानेंच प्राप्त होते. निखिल मोक्षसाधनाचें सत्य हेंच एक मूळ आहे. सत्यापेक्षां अधिक उत्तम गति कोणतीच नाहीं आणि सत्यापेक्षां अधिक श्रेष्ठ पद दुसरें नाहीं.

**दत्तमिष्टं हुतं चैव तप्तानि च तपांसि च ।**
**वेदाः सत्यप्रतिष्ठानास्तस्मात्सत्यपरो भवेत् ॥**

( वा. रा. अयो. स. १०९।१३।१४ )

—दान, यज्ञ, होम, अनेक प्रकारचीं तपें, सर्व वेद या सर्वांचा आधार एक सत्यच असल्यामुळें सर्वांनीं सत्यपरायण झालें पाहिजे. " बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाउलें । " श्रीरामालाच इतकें आदर्श पुरुष म्हणून कां मानावयाचें, श्रीरामालाच इतकें वंद्य म्हणून कां मानावयाचें तें या तुकारामोक्तींत स्पष्ट आहे. " जैसें बोलणीं बोले । तैसोंचि चालणीं चाले । योगी ज्यानें तोषिविले । तो महापुरुष " हा श्रीराम आहे. **अनृतं नोक्तपूर्वं मे न वदिष्ये कथंचन ।**—असत्य मी कधीं पूर्वीहि बोललों नाहीं आणि पुढेंहि बोलणार नाहीं, म्हणून आपल्या जीवनाची साक्ष ठेवून श्रीरामानें कैकयीचें समाधान केलें होतें. **सत्यान्न प्रमदितव्यम् ! कुशलान्न प्रमदितव्यम् ।** म्हणून श्रुति सांगते. कोणीं किती आग्रह केला तरी श्रीरामाचें वसिष्ठादि सर्वांना हें असें एकच सांगणें होतें. ही श्रीरामाच्या सत्यप्रतिज्ञेची घोषणा आहे.

**लक्ष्मीश्चन्द्रादपेयाद्वा हिमवान्वा हिमं त्यजेत् ।**
**अतीयात्सागरो वेलां न प्रतिज्ञामहं पितुः ॥**

— चंद्राची मुखश्री त्याला सोडून जाऊं शकेल, हिमालय पर्वत आपलें हिम सोडून राहूं शकेल, समुद्र आपली मर्यादा उल्लंघूं शकेल पण मी मात्र तीर्थस्वरूपी पित्याचें वचन थोडेंहि भंगविणार नाहीं. खऱ्या पितृभक्तीच्या सत्यसंधाचा हा एक आदर्श आहे. पित्याशीं किती कृतज्ञ असलें पाहिजे याचा धडाच अशा रीतीनें श्रीरामानें घालून दिला आहे.

## पुनर्जन्म हा कर्मफलरूप होय

जीवनांत कर्में करूनच त्यांचें फळ अनुभवावें लागतें. अनुभवलेलीं सारीं पूर्वकर्मेंच होत. अनुभविलें जाणारें सर्व कर्मफलच असतें. कशाचीहि

प्राप्ति कर्मफलरूपच म्हणून ठरलें तर लाभलेला जन्मसुद्धां कर्मफलरूपच झाला. त्या त्या योनींत, त्या त्या जातींत, एकेका वैशिष्ट्यानें प्राप्त होणारा जन्म तत्पूर्वजन्मकर्माचेंच फल म्हणून मानावें लागतें. लाभलेला जन्म पुढें त्या जन्मांत होणाऱ्या कर्माचें फल म्हणून कोणीहि म्हणूं शकत नाहीं. या दृष्टीनें उत्तरोत्तर लाभणारे जन्म पूर्व-पूर्व जन्मांचें कर्मफल म्हणून मानणें सहज ओघानेंच प्राप्त होतें. जगामध्यें दिसून येणाऱ्या विविधतेला आणि वैचित्र्याला त्या त्या कर्मकर्त्यांचीं मागचीं भिन्न भिन्न कर्मेंच कारण होत असें मानल्या-शिवाय गत्यंतर नाहीं. विविध जातींत लाभणारा जन्म, जन्मादारभ्य असलेलें वैगुण्य व वैशिष्ट्य, जीवनांत दिसून येणारें अकारण वैषम्य व अकारण प्रेम, कल्पना नसतांना प्राप्त होणारें सुखदुःख इत्यादिकांना या जन्माचें कर्मच कारण होत नाहीं असें दिसत असल्यामुळें अशा तऱ्हेच्या अनुभवांना मागचें जन्म-कर्मच कारणीभूत होतें असें म्हणावें लागतें. या जन्मीं केलीं जाणारीं कर्में पुढच्या जन्माला कारण झाल्याप्रमाणें प्रकृत जन्माला मागील जन्माचें कर्मच कारण होतें हें ओघानेंच आलें. मागच्या जन्माचें कर्म या जन्माला, या जन्माचें कर्म पुढच्या जन्माला, त्या जन्मांत घडलेलें कर्म त्याच्या पुढील जन्माला कारणीभूत होऊन, जन्ममरणांची ही सांखळी विशिष्ट फल अनुभविण्याच्या इच्छेनें जोंपर्यंत तीं तीं कर्में करण्याची प्रवृत्ति असते, तोंपर्यंत अखंड चालून, ही जन्ममरणांची परंपरा चुकत नाहीं असें कळून येईल. हातून झालेलें अभुक्त कर्म केव्हांतरी आपलें फल दिल्याशिवाय राहात नाहीं, असें एकदां झाल्यानंतर कर्माचें फळ प्राप्त होणें आणि तें या जन्मीं अथवा पुढच्या जन्मीं अनुभवून संपवावें लागणें हा निसर्गसिद्ध नियम ठरतो. या जन्मीं केलेलीं, अभुक्त कर्में भोगण्यास या दृष्टीनें पुढचे जन्म अपरिहार्य ठरतात. इच्छापूर्वक केलेल्या सर्व कर्मांचें फळ या जन्मींच अनुभवून संपत असतें तर, तें अनुभविण्याकरितां पुढचा जन्म घ्यावाच लागला नसता ! लिहिण्याचें, वाचण्याचें, करण्याचें कोणतेंहि एक काम शिल्लक राहिलें असतां आपण झोंपून उठल्यानंतर ज्याप्रमाणें तें पूर्ण करतों त्याप्रमाणें मरणरूपी निद्रेच्या विस्मृतींत कांहीं काल घालवून ( झोंपून ) मागील जन्माच्या अपूर्ण कर्मांच्या पूर्तीकरितां, अपूर्ण कर्मवासनेच्या पूर्तीकरितां, अथवा केलेल्या कर्माचें फळ भोगण्याकरितां पुढच्या भोगसाधक जन्मांत तदनुरूप कर्में हातून होतात. **मृत्युरत्यन्तविस्मृतिः** ।–मृत्यु म्हणजे एक

विस्मृतिच असल्यामुळें आपल्याला केलेल्या कर्मांची जाणीव नसते. तरी पण त्याचें फळ अनुभवावें लागतें. या दृष्टीनें सर्वज्ञ परमात्माच त्या कर्मांचीं फळें देतो असें मानावें लागून कर्म–फळ–दाता एक परमेश्वर आहे असें उघड होतें. विशिष्ट फलाकरितां जसें विशिष्ट कर्म करावें लागतें त्याप्रमाणें तें कर्मफल भोगण्याकरितां सुद्धां विशिष्ट कर्मच करावें लागतें. विशिष्ट प्राप्तिकरितां केलें जाणारें विशिष्ट साधनहि कर्मच, आणि त्या साधनानें प्राप्याची प्राप्ति झाल्यानंतर त्याचा फलभोगाहि कर्मच. अनेक फलांच्या म्हणजे अनेक सुखांच्या वासनांनीं कर्में करीतच राहणाऱ्या जीवांना त्या त्या कर्मफलाच्या वासनांचा पूर्ण क्षय होईपर्यंत जन्म तरी कसा चुकणार? त्या त्या कर्मफलांच्या अनुभवाला ते ते जन्म आवश्यक असणार कीं नाहीं?

## जन्माला कारण वासना

बाह्य पदार्थांशीं इंद्रियांचा संयोग घडून निर्माण होणाऱ्या देहसुखाच्या वासनेनें हातून झालेल्या कर्मांना तत्तत्फलरूपी जन्म प्राप्त होत असल्याकारणानें ती वासना असेतोंपर्यंत आलेला एक जन्म संपून आणखी असेच एकामागून एक अनेक जन्म प्राप्त करून घेतच राहिलें पाहिजे. भिन्न भिन्न सुखाची कल्पना, हीच भिन्न भिन्न सुखाची वासना बनते. त्या त्या भिन्न भिन्न वासनेच्या पूर्तीकरितां त्या त्या कर्मफलप्राप्तीच्या उद्देशानें भिन्न कर्माचरण अपरिहार्य ठरतें. या भिन्न भिन्न कर्माचरणांचीं भिन्न भिन्न फलेंहि लाभावीं लागतात आणि अशाप्रमाणें प्राण्याला भिन्न भिन्न जातींतून व भिन्न भिन्न योनींतून जन्म घ्यावे लागतात. अशा रीतीनेंच पशुपक्ष्यादि अनेक योनी आणि वर्णविभागानें व धर्मविभागानें अनेक मनुष्यांच्या जाती जगांत रूढ झाल्या हें तर्कानेंहि जाणतां येतें. इच्छेविरुद्ध फलांचीं कर्में हातून घडलीं तरी ईश्वरी संकल्पानुसार त्या त्या कर्मांचें तें तें फळ निमूटपणें जीवाला अनुभवावयाला लागतेंच, हेंहि विचारानें समजून येतें. स्वइच्छेनें अथवा अनिच्छेनें विस्तवाला शिवल्याबरोबर चटका बसतोच. एवंच जन्ममीमांसेच्या दृष्टीनें भिन्न सुखाची कल्पना, नंतर त्याची वासना, त्यानंतर त्या त्या कर्माचा उद्देश, तें तें कर्म, त्याचें तें तें फल आणि त्या फलानुरूप प्राप्त होणाऱ्या भिन्न भिन्न धर्मकर्माच्या भिन्न भिन्न योनी व त्यांतहि त्या त्या योनींतल्या भिन्न भिन्न जाती व पोटजातींतील होणारे विविध जन्म अशा एका पाठीमागून एक लागलेल्या पायऱ्या दिसून येतात. एवंच

जन्माला मुख्य कारण वासना म्हणजे पूर्वकाल्पनिक अथवा आनुभाविक भोगसंस्कारानें उत्पन्न होत असलेली त्या त्या विषयाची तीव्र इच्छाच हें स्पष्ट होतें.

विषयभोगाच्या वासनेनें येणारा एक जन्म आणि दुसरा पारमार्थिक वासनेनें येणारा असे यांत दोन प्रकार आहेत. मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात या म्हणीप्रमाणें पूर्वजन्माचे संस्कार त्याच्या बाल्यांतच प्रगट होतात, नव्हे गर्भांतच प्रगट होतात याला बरींच उदाहरणें आहेत. उत्कट संस्कार गर्भांतूनच प्रगट होतात असें झाल्यानंतर जन्माला पूर्वसंस्कार, पूर्ववासना, पूर्व-कर्म कारण असतें हें सिद्ध करण्यास दुसरें प्रमाणच द्यावयाला नको. डोहाळे गर्भाचे संस्कार दाखवितात, गर्भाची योग्यता दर्शवितात, हें तत्त्व सर्वविदित आहे. पूर्वजन्माच्या वासनेनें पनर्जन्म होतो असें न झाल्यास गर्भांतच वाम-देवानें '**अहं मनुरभवँसूर्यश्चेति**' असा आपला सर्वात्मभाव बोलून प्रगट केला नसता. जडभरताचेंहि या बाबतींत एक उदाहरण घेतां येईल. बाह्य ज्ञानवैराग्याचें कपिल मुनी हें एक उदाहरण आहेत.

अशा ओघानें जन्माला कारण विषयवासनाच असें जर आढळून येतें तर ती वासना असेपर्यंत जन्म कसा बरें चुकेल? पंचभूतात्मक देह पंचभूतांत विरून गेला तरी आचरलेल्या भिन्न भिन्न कर्मफलाप्रमाणें भिन्न भिन्न सुखाची व त्या सुखाच्या दृष्टीनें लाभणाऱ्या भिन्न भिन्न देहाची वासना दुसरा देह धारण करते. वस्त्रें वापरण्याची वासना असेपर्यंत जुनीं वस्त्रें भूमीवर टाकून नवीन धारण केलीं जातात, त्याप्रमाणें देहसुख अनुभविण्याची इच्छा असेपर्यंत जीर्ण देह सोडून नवीन देह धारण केला जातो. पसंत न पडलेली मूर्ति मोडून त्या मातीनेंच पुन्हां मनपसंत अशी दुसरी मूर्ति बनविल्याप्रमाणें पसंत न पडलेला देह लीन करून टाकून दुसरा एक देह त्या पंचभूतांनींच बनविला जातो.

## पुनर्जन्माविषयीं श्रुतीचें प्रामाण्य

**तद्यथा पेशस्कारी पेशसो मात्रामपादाय अन्यन्नवतरं कल्याणतरं रूपं तनुते, एवमेवाऽयमात्मा इदँ शरीरं निहत्य अविद्यां गमयित्वा अन्यन्नवतरं कल्याणतरं रूपं कुरुते पित्र्यं वा गांधर्वं वा दैवं वा प्राजापत्यं वा ब्राह्मं वाऽन्येषां वा भूतानाम् ॥** ( बृ. अ. ४ ब्रा. ४।४ )

—सोनार पहिल्या दागिन्याचा आकार मोडून त्या सोन्यानेंच आपल्याला पाहिजे तसा दुसरा नवीन दागिना जसा तयार करतो त्याप्रमाणेंच जुना देह सोडून जीव नवीन असा पितृ, गंधर्व, देवता, प्रजापति, ब्रह्मदेव यांसंबंधीं अथवा अन्य मानवादि प्राण्यांसंबंधीं यांपैकीं कर्मप्राप्त कोणता तरी सुंदर देह धारण करतो.

**अथो खल्वाहुः काममय एवायं पुरुष इति । स यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति यत्क्रतुर्भवति तत्कर्म कुरुते यत्कर्म कुरुते तदभिसंपद्यते ॥** ( बृ. अ. ४ ब्रा. ५ )

## जीव कर्मांप्रमाणें होतो

जीव वासनामय असतो. वासनेप्रमाणें त्या त्या सुखसंस्कारांच्या ठिकाणीं त्याचा निश्चय होतो. त्या निश्चयाप्रमाणें त्याच्या प्राप्तीकरितां तीं तीं कर्में तो करतो व त्याचें त्याचें फळ भोगतो. **यथाकारी यथाचारी तथा भवति । साधुकारी साधुर्भवति पापकारी पापो भवति पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन इति ।** ( बृ. अ. ४ ब्रा. ४–५ )

—कर्मांप्रमाणें व आचरणाप्रमाणेंच जीव बनतो. सत्कर्में करणारा सच्छील व सज्जन होतो. दुष्ट कर्में करणारा दुःशील व दुर्जन होतो. पुण्यकर्मांनीं पुण्यात्मा व पापकृतींनीं पापात्मा बनतो.

**तदेव सक्तः सह कर्मणैति लिंगं मनो यत्र निषिक्तमस्य । प्राप्यान्तं कर्मणस्तस्य यत्किंचेह करोत्ययम् ॥ तस्माल्लोकात्पुनरैत्यस्मै लोकाय कर्मण इति नु कामयमानः ।** ( बृ. अ. ४–४–६ )

—जीवाचें मन जिथे तिथे गुंतलेलें असतें, त्याच्या आसक्तीनें तें तें कर्म तो करतो. त्या त्या कर्मांचें फल अनुभवण्याकरितां त्या त्या लोकास जातो व कर्मफल भोगून संपेपर्यंत तिथे राहातो. त्या त्या लोकींचें सुख अनुभविण्याकरितां तो तो देह त्याला प्राप्त होतो. त्या त्या देहानें त्या त्या लोकींचें कर्मप्राप्त सुख अनुभविल्याप्रमाणें परिक्षीण होत होत संपूर्ण नष्ट झाल्यानंतर त्या त्या लोकांतून भोगाच्या इच्छेनें पुन्हां कर्म करण्यास या कर्मभूमीस येऊन पोहोंचतो. येथें कर्मांप्रमाणें तो नीचोच्च योनींतून जन्म घेतो, नीचोच्च जातीचा

होतो. देहसुखाच्या वासनेनें बाह्य पदार्थोपभोगाची इच्छा असेतोंपर्यंतच तो या जन्ममरणाच्या रहाटगाडग्यांत सांपडून असतो.

**निष्कामी–यास ब्रह्मैक्याची प्राप्ति**

**अथाकामयमानो योऽकामो निष्काम: आप्तकामो न तस्य प्राणा उत्क्रामन्ति ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति ॥**

( बृ. अ. ४–४–६ )

—ज्याला देह धारण करून बाह्य पदार्थांचें सुख अनुभविण्याची इच्छा नाहीं अशा अकाम, निष्काम, आप्तकाम, आत्मकाम असणाऱ्याचे प्राण देहावसानाच्या समयीं कुठे बाहेर जात नाहींत. त्याला कोणत्याहि लोकांतराची प्राप्ति नसते. आत्मसुखानेंच तो तृप्त असतो. इथेच तो ब्रह्मरूप होतो, व देह-पातानंतरहि ब्रह्मरूपानें ब्रह्मस्वरूपांत एकरूप होऊन अर्थात् ब्रह्मच होऊन असतो. असें बृहदारण्यक श्रुति उपदेशीत आहे.

**अविद्वानास पुनर्जन्म**

**अनन्दा नाम ते लोका अन्धेन तमसाऽऽवृताः ।**
**ताँस्ते प्रेत्याभिगच्छन्त्यविद्वांसोऽबुधा जनाः ॥**

( बृ. अ. ४ ब्रा. ४. ११. )

—आत्मज्ञान नसलेला अविद्वान्, अनात्मसुखाची म्हणजे इंद्रियजन्य विषयसुखाची इच्छा असणारा अज्ञ मात्र इथे असतांना व मरणोत्तरहि खऱ्या सुखास मुकतो. देहांतानंतर विषयोपभोगयुक्त अशा आत्मस्वरूपाच्या अज्ञानांध-कारानें व्याप्त असलेल्या आनंदशून्य, अनित्य व दु:खमय मर्त्यलोकास तो प्राप्त होतो, तेथें जन्म घेतो. ईशावास्य उपनिषदांत देखील अशाच तऱ्हेचा एक मंत्र आहे.

**असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसाऽवृताः ।**
**ताँस्ते प्रेत्याभिगच्छन्ति येके चात्महनो जनाः ॥**

( इशा. ३ )

या मंत्राचा विचार चालला असतां “ **ज्ञानेंविण प्राणियांसी । जन्म मृत्य लक्ष्य चौऱ्यांशी । तितक्या आत्महत्या त्यासी । म्हणोनि आत्महत्यारा** ॥” ८ । ७ । २८ ॥ ही समर्थांची ओवी आठवते.

आत्मज्ञानशून्य हेच आत्मघाती म्हणवून घेतात. असे जन मरणोत्तर अन्धतमानें व्याप्त असणाऱ्या असुर्या नामक लोकांना जातात असा मंत्रार्थ झाला. ईशावास्यांत " असुर्या नाम ते लोकाः " असें आहे व बृहदारण्यांत " अनंदा नाम ते लोकाः " असें आहे. यावरून असुर्या व अनंदा हे दोन्ही शब्द एकार्थबोधक आहेत हें कळून येतें. निर्विषय आत्मज्ञानानें निरवधि आत्म-सुखाची प्राप्ति न करून घेतां विषयलोलुपतेनें पुन्हां जन्म घेणाऱ्या जीवाला अबुध, अविद्वान व आत्मघातकी म्हणून म्हटलें आहे. इथें भागवतांतलि—

**नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारम् ।**
**मयानुकूलेन नभस्वतेरितं पुमान्भवाब्धिं न तरेत्स आत्महा ॥**

( भागवत स्कं. ११ )

या श्लोकाची आठवण होते.

—मुमुक्षुतेनें व भगवद्भक्तीनें सुलभ व विषयेच्छेनें दुर्लभ होणारा, अत्यंत महत्त्वाचा हा नरदेह म्हणजे भवसमुद्राचें एक सुदृढ तारूच होय. इथला नाविक म्हणजे सद्गुरु. यांत सुकृतानें ठाव मिळून सद्गुरुनावाड्याचा लाभ होऊनहि व त्यांतूनहि माझ्या ईश्वरी कृपेच्या अनुकूल वाऱ्याचा लाभ होऊनहि जो हा भवसिंधू पार जात नाहीं तो आत्मघाती होय हा या श्लोकाचा अर्थ.

## देह आत्मा नव्हे

**तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्** । ( तै. ) **स इह प्रविष्टः आनखाग्रेभ्यः** । ( बृ. ) इत्यादि उपनिषद्वाक्यांधारें देह निर्मून देहांत आत्मा प्रवेश करतो व देहाच्या नखशिखांत व्यापून असतो असें स्पष्ट होतें. कठोपनिषदांत हा आत्मा देह, इंद्रिय, मन, बुद्धि यांपेक्षां भिन्न आहे हें सांगण्याकरितां, देहाला रथाची, बुद्धीला सारथ्याची, मनाला लगामाची व इंद्रियांना घोड्यांची उपमा दिली आहे. या आत्म्याला यांच्या संगसंबंधांनींच शब्दादि विषयद्वारा मृत्युलोकाचा प्रवास, कर्तृत्वादि, भोक्तृत्वादि, आगंतुक लक्षणें व अनात्म देहादि विशिष्टोपाधि, यांचा कल्पित संबंध जडत असतो आणि असा इंद्रिय-मनांनीं युक्त आत्माच भोक्ता होतो, असें सांगितलें आहे. ती काठक श्रुति अशी.

**आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु ।**
**बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥**

**इंद्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान् ।**
**आत्मेन्द्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥**

(कठ. अ. १ मंत्र ३–४)

या कठोपनिषदांतील दुसऱ्या दोन वाक्यांचा अर्थ पाहूं.

**संसार आणि मोक्ष**

**यस्त्वविज्ञानवान् भवत्यमनस्कः सदाऽशुचिः ।**
**न स तत्पदमाप्नोति संसारं चाधिगच्छति ॥**
**यस्तु विज्ञानवान् भवति समनस्कः सदा शुचिः ।**
**स तु तत्पदमाप्नोति यस्माद्भूयो न जायते ॥**

(क. ३–७, ८)

—जो तात्त्विक बुद्धिरहित, मनोनिग्रहशून्य व देहसुखाच्या वासनेनें अपवित्र असतो त्यास ब्रह्मपद न मिळतां, तो संसाररूपी जन्ममरण-परंपरेंतच सांपडतो. याच्याविरुद्ध, जो तात्त्विक बुद्धियुक्त, मनोनिग्रहशाली व देहसुखाची वासना नसल्यामुळें अति पवित्र असतो तो मात्र ज्याची प्राप्ति झाली असतां पुन्हां जन्मास यावें लागत नाहीं अशा परमपदास पोहोंचतो, पराकाष्ठेचें सुखात्मपद म्हणजे ब्रह्मस्वरूप मिळवितो, असा या दोन मंत्रांचा अर्थ आहे. जन्ममरण चुकविण्याकरितां विषयवासनाशून्य होणेंच मुख्य होय. विषयवासना असेतोंपर्यंत कधींहि जन्म चुकत नाहीं असें यावरून समजून येईल.

**संपूर्ण वासनाक्षय हाच मोक्ष**

**यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः ।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥**
**यदा सर्वे प्रभिद्यन्ते हृदयस्येह ग्रन्थयः ।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्येतावदनुशासनम् ॥**

(कठ. २–६–१४,१५)

या मंत्रांत जीवी सर्व विषयकामनाशून्य झाल्यानंतर ब्रह्मरूपाची प्राप्ति करून घेऊन अमर होतो, असें सांगितलें आहे.

**या जन्मींच मुक्ति**

**इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः ।**
(केन. खंड. २।५)

**इह चेदशकद्बोद्धुं प्राक् शरीरस्य विस्रसः ।**
**ततः सर्गेषु लोकेषु शरीरत्वाय कल्पते ॥**
(कठ. २–६–४)

इथेंच आत्मरूप जाणलें तर मोक्षाचा लाभ झाला, सत्य आत्मसात् केलें, ओळखलें असें होतें; न जाणल्यास मोठें नुकसान होतें, पुन्हां जन्म घ्यावा लागतो. जोंपर्यंत हें ब्रह्मात्मरूप जाणून मुक्त होत नाहीं तोंपर्यंत तो पुनः पुनः अनेक लोकांत जन्म घेतो. असें या मंत्रावरून स्पष्ट कळून येईल. या ठिकाणीं संदर्भानें " याचि देहीं एणोंचि काळें । संसारीं होईजे निराळें । मोक्ष पाविजे निश्चळें । स्वरूपाकार ॥ " ही श्री समर्थांची ओवी आठवते.

**तमेव विदित्वातिमृत्युमेति । तमेवं विद्वानमृत इह भवति ॥** इत्यादि श्रुति ज्ञानानेंच मोक्ष होतो हें सिद्ध करतात. या ठिकाणीं "ज्ञानान्मुक्तिः" या सूत्राची आठवण होते.

**यम–नचिकेत–संवाद**

**येयं प्रेते विचिकित्सा मनुष्येऽस्तीत्येके नायमस्तीति चैके। एतद्विद्यामनुशिष्टस्त्वयाहं वराणामेष वरस्तृतीयः** (कठ. १–१–२०)

—पुनर्जन्माच्या बाबतींत " येयं प्रेते—" ही श्रुति फार महत्त्वाची आहे. देहांत असणारें चैतन्य देहाहून विलक्षण असल्यामुळें तें चैतन्य देहपातानंतर देखील असतें असें कांहीं म्हणतात, तर देहाहून चैतन्य वेगळें नसल्यामुळें देहाबरोबरच तें नष्ट होतें असें कांहीं म्हणतात. यांतून कोणाचें खरें हें मी तुझ्या उपदेशानें जाणावें हाच एक सर्व वरांत मुख्य असा वर तूं मला द्यावास ही प्रार्थना आहे. असें नचिकेतानें श्रीयमधर्मास विनविलें आहे. यम हा मृत्यूचें अधिदैवत होय. जीवाच्या अस्तिनास्तित्वाबद्दल यालाच नचिकेतानें जो प्रश्न विचारला तो समर्पकहि आहे. यमाला त्याची माहिती असणारच. त्याचें विवेचन जन्ममरणाच्या बाबतींत विश्वसनीय नाहीं असें कोण म्हणेल ? वासनेच्या योगानें जन्म घेणारा जीव, देहाशिवाय, देहावेगळा राहातो किंवा नाहीं हा प्रश्न आहे.

**यमाचें नचिकेतास उत्तर**

**हन्त त इदं प्रवक्ष्यामि गुह्यं ब्रह्म सनातनम् ।**
**यथा च मरणं प्राप्य आत्मा भवति गौतम ॥**
( कठ. २–२–६ )

—देहाला मरण आल्यानंतर अतिगुह्यतम असें सनातन ब्रह्म आत्मरूपानें कसें शिल्लक राहतें तें मी तुला विवरून सांगणार आहें, अशी प्रतिज्ञा त्या मंत्रांत यमधर्मानें केली आहे. यांत देहाहून विलक्षण असें अविनाशी ब्रह्मच आपलें स्वरूप असें जाणून निष्काम होण्यास शिकविलें आहे.

**योनिमन्ये प्रपद्यन्ते शरीरत्वाय देहिनः ।**
**स्थाणुमन्येऽनुसंयन्ति यथाकर्म यथाश्रुतम् ॥**
( कठ. ६–७ )

—केलेल्या कर्माप्रमाणें व संपादिलेल्या ज्ञानाप्रमाणें जीवाला गति होते. निषिद्ध पापाचरणाच्यां जीवाला अंतीं नरकाची प्राप्ति होऊन तो नंतर स्थावर योनींत पण जन्म घेतो. आंतून भूमि भेदून वर येणारे वृक्षगुल्मलतादि सर्व स्थावर म्हणवून घेतात. अशा स्थावर जन्माला नाहीं गेला आणि त्याहून पुण्यवान असला तर तो चेतन म्हणजे हालचालींच्या प्राण्यांतून जन्म पावतो. पापाधिक्यानें स्थावर व तिर्यग् योनींतून जन्म घेतो व अधिक पुण्यानें देव–लोकीं देवतारूप देह धारण करतो व पापापुण्याच्या समप्रमाणानें जीव मनुष्य होतो. या सर्व योनी कर्मरूप आहेत. मोक्ष हा कर्माधीन नाहीं. तो निष्कर्म आत्मरूपाच्या आनंदघनतेच्या परिज्ञानानें मात्र लाभतो आणि असा हा मोक्ष का एकदां लाभला, म्हणजे मग त्याला जन्ममरण कांहीं प्राप्त होत नाहीं. अनादि अनंत चित्सुखरूपच तो होतो. असा या मंत्राचा भावार्थ आहे. अपरोक्ष ज्ञान्यांना देहपातानंतर जन्म येत नाहीं. ते निष्काम असतात. निष्काम नसलेल्याला मात्र विषयसुखाची इच्छा करून, केलेल्या त्या त्या कर्मास अनुरूप असें तें तें फळ अनुभविण्याकरितां त्या त्या स्थावरजंगमात्मक योनींतून जन्म घ्यावा लागतो. त्यांनीं त्यांनीं केलेलें कर्म आणि मिळविलेलें ज्ञान हेंच त्यांच्या त्यांच्या त्या त्या स्थित्यंतराला कारणीभूत होतें. **यथाप्रज्ञं हि संभवाः** । ज्ञानाच्या तारतम्याप्रमाणें जीव उच्च नीच योनीमध्यें जन्म घेतो. ज्ञानाच्या तारतम्याप्रमाणेंच कर्माचें तारतम्य व कमाच्या

तारतम्याप्रमाणें जन्माचें तारतम्य दिसून येतें. **अथैकयोर्ध्व उदानः पुण्येन पुण्यं लोकं नयति पापेन पापमुभाभ्यामेव मनुष्यलोकम्** ॥ ( प्रश्नो. प्र. ३-७. ) देहपातानंतर पंचप्राणांपैकीं एक उदानच पुण्यवंतांना पुण्यलोकीं व पापी लोकांना पापलोकीं नेतो; पापपुण्य समान असलें तर मात्र त्याला मनुष्यलोकींच पुन्हां घेऊन येतो. असें प्रश्नोपनिषदांत सांगितलें आहे. **उत् अनतीति उदानः** । वर वाहणाराच उदानवायु. त्यामुळें लोकांतरगमन यामुळें होतें हें ओघानेंच प्राप्त होतें.

**न सांपरायः प्रतिभाति बालं प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् । अयं लोको नास्ति पर इति मानी पुनः पुनर्वशमापद्यते मे ॥** ( कठ अं. १ व २ )

वैभवाची लालसा ठेवून कामानें कामिनीवश होऊन मोहांत गटंगळ्या खाणाऱ्या अज्ञ तशा तज्ज्ञालाहि मोक्षमार्ग गोचर होत नाहीं. दिवांधाप्रमाणें त्याला ज्ञानवैराग्याचें महत्त्व कळून येत नाहीं. हाच एक लोक असून यांतच सारें सांठविलें आहे. येन केन प्रकारेण पराकाष्ठेचें विषयसुख संपादून तें मनमुराद अनुभविणें म्हणजेच मोक्ष म्हणणारे अशा तऱ्हेचा हा प्राणी मिथ्या सुखावर विश्वसून पापपुण्यानें मिळणारे दुसरे लोक नाहींतच व ज्ञानानें मिळणारा मोक्षहि नाहीं, अशी भावना करून माझ्या हातांत पुनः पुनः पडतो, म्हणजे जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतो, गुरफटतो. असें हें नास्तिकांना मिळणाऱ्या गतीचें उद्घाटन करून यमानें दाखविलें आहे.

**कर्मानुरूप फलप्राप्ति**

—जगांतील मानव समाजांत कांहीं केवळ विरक्त तर कांहीं केवळ विषयी, कांहीं शुद्ध नीतिमंत तर कांहीं शुद्ध नीतिभ्रष्ट, कांहीं अति शांत तर कांहीं अति कोपी, कांहीं श्रीमान् कांहीं दरिद्री, याचप्रमाणें कांहीं पुण्यवंत कांहीं पापिष्ट, कांहीं बुद्धिमान कांहीं मंद, कांहीं उद्योगी कांहीं आळशी, याहून वेगळे कांहीं मध्यम वर्गाचे अशी विषमता व वैचित्र्य दिसून येतें. संस्कार, वासना, कर्म, संग-सहवास यांच्या विभिन्नतेनें जशी इथल्या जीवनांत विभिन्नता दिसून येते, तशी मरणोत्तर प्राप्त होणाऱ्या स्थितींतहि विभिन्नता स्वाभाविकच असणार. आपआपल्या कर्माचें स्मरण मरणोत्तर राहात नसल्यानें त्या त्या जीवाला या या कर्माचें हें फळ म्हणून तें समजून देण्याकरितां कोणी

न आलें तरी सर्वज्ञ परमात्मा त्या त्या कर्माप्रमाणें तें तें फळ त्या त्या जीवाला देत असतो. अखिल राज्याचा राजा जरी आधिपति असला तरी त्या त्या खात्याची, भिन्न भिन्न विषय-विभागांची व्यवस्था वेगवेगळ्यांना देऊन निरनिराळे अधिकारी वर्ग तो निर्माण करतो. ती सर्व सत्ता एका राजांतच एकवटलेली असते. त्याप्रमाणेंच या सर्व जगांचा जरी परमात्मा हा अधिपति असला तरी तो त्या त्या विषय-विभागाची व्यवस्था वेगवेगळ्यांना देऊन निरानिराळे अधिकारीवर्ग निर्माण करतो. निरनिराळ्या विषय-विभागांची जबाबदारी त्यांच्यावर असते. या परमात्म्याकडून नियुक्त झालेले ते ते भिन्न भिन्न अधिकारी या राज्यांत आपआपलें कर्तव्य निमूटपणें पार पाडीत असतात. या सर्वांवर देखरेख करण्याचा अधिकार मात्र परमात्म्याचाच आहे, यांत संशय नाहीं.

## विश्वाचा अधिकारीवर्ग

**एको विश्वस्य भुवन राजा ।** ( ऋग्वेद ६।३६।४ )

—एखाद्या राज्यांतील प्रजा आपापल्या कामाकरितां त्या त्या वेळीं आपल्याला आवश्यक अशा खाते-कचेरीस आपणहून गेल्याप्रमाणें या परमेश्वराच्या राज्यांतहि आपापल्या कामाकरितां त्या त्या वेळीं आपल्याला आवश्यक अशा अधिकाऱ्याकडे त्या त्या स्थळीं जावें लागतें. ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, अष्ट दिक्पालादि सर्व हा अधिकारी वर्ग होय. त्यांचें त्यांचें स्थान-मान वेगवेगळें आहे. सत्यलोक, वैकुंठ, कैलास, स्वर्गादि हे लोक प्रसिद्ध आहेत. न्यायाधीशापुढें प्रत्येकाची तपासणी झाल्याप्रमाणें यमधर्माकडे प्रति व्यक्तीचीहि तपासणी होते. आपल्या शक्तीबाहेरचीं सत्कार्यें चिकाटीनें पार पाडून आपली पात्रता दाखविलेल्यांना बढती व गौरवाचें पारितोषक आणि अपराध्यांना व नालायकांना खालच्या दर्जावर ढकलून मानवी राज्यांत वेळीं दंडहि केल्याप्रमाणें शक्तीबाहेरचीं मोठमोठीं सत्कर्में चिकाटीनें पार पाडून आपली पात्रता दाखविलेल्यांना वरवरच्या अधिकाधिक पुण्यलोकांची ( प्राप्ति ) बढती, अधिक सुखाचें पारितोषिक व ( अधिकारानुसार मोक्षहि ) दिला जातो. याच्या उलट निषिद्ध कर्म केलेल्या अपराध्यांना व नरदेहाचें सार्थक वेळींच करून न घेतलेल्या नालायकांना खालच्या दर्जाच्या योनी दिल्या जातात व यमदंडहि होतो. नरकांत खितपावें लागतें. स्वर्ग-कामनेनें कर्म

केलेल्यांना स्वर्ग, निष्काम कर्म करणाऱ्या विरक्ताला ब्रह्मलोक, ऐहिक सुखाच्या लालसेनें कर्म करणाऱ्या लोकांना हा मृत्युलोक आणि निंद्य-निषिद्ध कर्म करणाऱ्या लोकांना नरक अपरिहार्य असतो.

## परलोकाचे दोन मार्ग

**संवत्सरो वै प्रजापतिस्तस्यायने दक्षिणं चोत्तरं च तद्येह वै तदिष्टा पूर्तें कृतमित्युपासते ते चांद्रमसमेव लोकमभिजयन्ते त एव पुनरावर्तन्ते तस्मात् एते ऋषयः प्रजाकामा दक्षिणं प्रतिपद्यन्ते एषः वै रयिर्यः पितृयाणः** ॥ (प्रश्नो. १–९)

—उत्तरायण आणि दक्षिणायन, देवयान आणि पितृयान, अर्चिरादि आणि धूमादि मार्ग, शुक्ल-कृष्णगति, हे सर्वहि एकार्थी शब्द आहेत. जे इष्टापूर्त म्हणजे देवता आणि पितृ यांच्या तृप्तीकरितां कर्में करतात ते चंद्रलोकी जाऊन पोहोंचतात. चंद्रलोकापासूनच स्वर्गाचा मार्ग आहे. अशा रीतीनें काम्यकर्मांचें अनुष्ठान करून चंद्रलोकद्वारां स्वर्गलोकास गेलेले आपापल्या संचित कर्मांप्रमाणें पुनः उच्चनीच योनींतून जन्मास येतात. प्रजेची इच्छां करणारे ऋषी दक्षिण-मार्गानुसारी होतात. हा इंद्रियसुखाचा, विषय-वैभवाचा पितृयाण मार्ग होय. इथे—

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥२४॥**
**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥२५॥**
**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।**
**एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ॥२६॥**

(भ. गीता)

या गीतेच्या आठव्या अध्यायाच्या २४, २५, २६ व्या श्लोकांची वाचकांना आठवण होईल.

## इष्टापूर्त कर्म

**अग्निहोत्रं तपः सत्यं वेदानां चानुपालनं ।**
**आतिथ्यं वैश्वदेवश्च इष्टमित्यभिधीयते** ॥ अत्रि सं. ४३ ॥

**वापीकूपतडागादि देवतायतनानि च ।**
**अन्नप्रदानमारामः पूर्तमित्यभिधीयते ॥४४॥**
**इष्टं पूर्तं प्रकर्तव्यं ब्राह्मणेन प्रयत्नतः ।**
**इष्टेन लभते स्वर्गं पूर्तेन मोक्षमाप्नुयात् ॥४५॥**

—अग्निहोत्र, कृच्छ्रचांद्रायणादि तपाचरण, सत्यपालन, वेदांच्या अध्ययन–अध्यापनांनीं वेदांचें रक्षण, आतिथ्य आणि वैश्वदेव इत्यादि कर्मांना ‘ इष्टकर्म ’ आणि विहिरी, तळीं, देवालयें, अन्नछत्रें, पुष्पवाटिका इत्यादि कर्मांना ‘ पूर्तकर्म ’ असें नांव आहे. दानप्रधान कर्मास ‘ दत्त ’ असें म्हणतात.

**ब्रह्मलोकगमन**

**अथोत्तरेण तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया विद्ययाऽऽत्मानमन्विष्याऽऽदित्यमभिजयन्ते एतद्वै प्राणानां आयतनमेतदमृतमभयमेतत् परायणमेतस्मान्न पुनरावर्तन्ते ॥** ( प्रश्नो. १–१० )

—अरण्यादि एकांतस्थळीं तप केल्यानें इंद्रियजयाच्या योगानें, ब्रह्मचर्यानें, मोक्ष आणि मोक्षसाधनाच्या ठिकाणीं श्रद्धा ठेवल्यानें विशेषतः अध्यात्मशास्त्राच्या अभ्यासानें ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. असे हे आत्मप्राप्तीच्या मार्गावर असणारे सर्वहि आदित्य लोकास जातात. येथून ब्रह्मलोकाचा मार्ग आहे. अखिल प्राणिजातांना आधारभूत असणारा इतर लोकांच्या मानानें बहुकाल टिकणारा, भयरहित असा हा ब्रह्मलोक ज्यांना प्राप्त होतो, त्यांना पुन्हां जन्मास यावें लागत नाहीं. ब्रह्मैक्याच्या तीव्र इच्छेनें विरक्त असणारा मरणोत्तर ब्रह्मलोक प्राप्त करून घेतो व शिल्लक राहिलेला अभ्यास तिथे पूर्ण करून चतुर्मुख ब्रह्मदेवाबरोबरच कल्पांतीं विदेहमुक्त होतो. सत्य अथवा ब्रह्मलोक ज्ञानप्रधान आहे. तिथे अखंड आत्मविचार चालतो. ब्रह्मदेवाच्या गुरुत्वाखालीं व नेतृत्वाखालीं चालत असलेला हा ज्ञानप्रधान लोक केवळ मोक्षासाठींच आहे. प्राणाग्निहोत्राचें “ **एतद्वै जरामर्यमग्निहोत्रं सत्रं य एवं विद्वानुदगयने प्रमीयते** ”...पासून...“ **चे ते ब्रह्मणो महिमानम्** ” एथपर्यंतचे मंत्र याच अर्थाचे आहेत.

**वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्वाः ।**
**ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥**

( म. नां. उ. )

या मंत्राचा भावार्थ वर दिला आहे. हाच विषय मुंडकोपनिषदाच्या द्वितीय मुंडकांतल्या १०-११ व्या मंत्रांत आला आहे.

**तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्षचर्यां चरन्तः ।**
**सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ॥**

बृहदारण्यकाच्या सहाव्या अध्यायांतील दुसऱ्या ब्राह्मणांतहि हाच विषय दिसून येतो.

**ते य एवमेतद्विदुर्ये चामी अरण्ये श्रद्धाँ सत्यमुपासते ।**
**तेऽर्चिरभिसम्भवन्ति...तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो**
**वसन्ति तेषां न पुनरावृत्तिः ॥ १५ ॥**

**अथ ये यज्ञेन दानेन तपसा लोकाञ्जयन्ति ते धूममभिसंभवन्ति... एवमेवानुपरिवर्तन्ते ॥** "ब्रह्मलोकेषु" असा इथे बहुवचनी प्रयोग असल्यामुळें वैकुंठ—कैलासादि लोकांचेंहि या ठिकाणीं ग्रहण आहे असें वाटतें. छांदोग्याच्या १० व्या अध्यायांतील चतुर्थ खंडांतहि याचें दिग्दर्शन झालें आहे. **एते ब्रह्मलोकं ब्रह्मचर्येणानुविन्दान्ति ।** ब्रह्मचर्यानेंच ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. बृहदारण्यकांत त्या त्या लोकांतून मृत्युलोकीं जन्म घेण्यास येतांना मध्यें कोणते टप्पे लागतात त्याचें विवरण आहे. ( ६।२।१६ ) ओघानेंच इथे ब्रह्मसूत्राच्या चतुर्थाध्यायाच्या चतुर्थपादाची विद्वान वाचक मंडळींना आठवण होईल. "**अर्चिरादिना तत्प्रथितेः ।**" या सूत्रापासून "**विशेषं च दर्शयति ।**" या शेवटच्या १६० व्या सूत्रापर्यंत सबंध या चतुर्थ पादभर या विषयाचीच वाटाघाट आहे. सगुणोपासक विरक्त परोक्षज्ञानी आपल्या उपास्य देवतांच्या लोकांना प्राप्त होऊन तदवसानसमयीं त्या दैवतावरोबर ब्रह्मैक्य पावतात. हें "**कार्यात्यये तदध्यक्षेण सहातः परमभिधानात् ।**" या पादाच्या दहाव्या सूत्रांत ग्रथित केलें आहे. हिला क्रममुक्ति म्हणतात.

**तस्य वा एतस्य पुरुषस्य द्वे एव स्थाने इदं च परलोकस्थानं च ।**
( शतपथ ब्राह्मण १४-७-१-९ )

'शतपथ ब्राह्मणां'त जीवाला इथलें व परलोकाचें अशीं दोन स्थानें आंहेत असें सांगितलें आहे. या परलोकांत गंधर्वलोक, पितृलोक, देवलोक, ब्रह्मलोक इत्यादि लोकांचा अंतर्भाव होतो. इहलोक म्हणजे मनुष्यलोक 'शतपथ ब्राह्मणा'च्या १४-७-१-३५ यांत देवलोकाचें वर्णन आहे,

१७ ग्यांत गंधर्वलोक, १४–७–१–१९ ग्यांत पितृलोक आणि ३–७–१–२५ यांत मनुष्यलोकाचें वर्णन आहे. **अथ त्रयोवाव लोका मनुष्यलोकः पितृलोको देवलोक इति सोऽयं मनुष्यलोकः पुत्रेणैव जय्यो नान्येन कर्मणा। कर्मणा पितृलोको विद्यया देवलोको देवलोको वै लोकाना ँ श्रेष्ठस्तस्माद्विद्यां प्रश ँ सन्ति ॥** ( बा. अ. १ ब्रा. ५ )

——मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक असे तीन लोक आहेत. प्रवृत्तिमार्गाच्या दृष्टीनें पुत्रोत्पादनानंतर गृहस्थाश्रम पूर्ण होतो. पारमार्थिक वासना सोडून मनुष्यदेहाच्या अभिमानानें व सामान्यतः कामोपलक्षित पुत्रवासनेनें या मनुष्यलोकाची, मनुष्यदेहाची प्राप्ति होते व पुत्रलाभानें या ठिकाणीं सफलता प्राप्त होते. या अर्थीं हा मनुष्यलोक पुत्रप्राप्तीनेंच जय म्हणजे पूर्ण होतो असें म्हटलें आहे. " **अपुत्रस्य गतिर्नास्ति** " या आधारानें अन्य कोणत्याहि कर्मानें गृहस्थाश्रम पूर्ण होत नाहीं; प्रवृत्तिमार्गाचा मनुष्य पितृऋणांतून मुक्त होत नाहीं. स्वधर्माच्या, स्ववर्णाच्या व अन्य गोत्राच्या. वैदिक विधीला अनुसरून लग्न झालेल्या सुशील अशा सतीस स्वपतीपासून झालेला पुत्रच पुत्र म्हणवून घेतो. अशा पुत्रामुळेंच गृहस्थाश्रम पूर्ण होतो व हा लोक जिंकला जातो. इष्टापूर्त कर्मांनीं, श्राद्धपक्षादिकांनीं भोगप्रधान पितृलोकाची प्राप्ति होते, विरक्तिप्रधान अध्यात्मविद्येच्या अभ्यासानें देवलोकाची म्हणजे ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. या सर्व लोकांत ब्रह्मलोक श्रेष्ठ असल्यामुळें त्याची प्राप्ति करून देणाऱ्या अध्यात्मविद्येची महती गायिली जाते, असें बृहदारण्यकांत आलें आहे.

**आयुः पृथिव्यां द्रविणं ब्रह्मवर्चसं मह्यं दत्वा व्रजत ब्रह्मलोकम् ।**
( १९–७१–१ )

या अथर्वण मंत्रांत ब्रह्मलोकाचा उल्लेख आला आहे. यजुर्वेदीय महानारायण उपनिषदांमध्येंहि हा मंत्र थोडयाशा पाठभेदानें आला आहे. त्या त्या देवता हविर्ग्रहणानंतर पुन्हां ब्रह्मलोकास जातात असें यावरून स्पष्ट होतें. **तद्विष्णोः परमं पदम्** । (सामवेद आरार्चिक १८।२।१।५ ) या मंत्रांतहि विष्णुपदाचा उल्लेख आहे; हाच विष्णुलोक. " **ऊर्ध्वो नाकस्याधिरोह विष्टपं स्वर्गो लोक इति यं वदन्ति** । ( अथर्व ११–१–७ ) या मंत्रांत स्वर्गलोकाचा उल्लेख आहे. **पितृणां लोकमपि गच्छन्तु ये मृताः** । ( अथर्व. १२–२–४५ ) या मंत्रांत पितृलोकाचा उल्लेख आहे. **अनाहुर्नारकं लोकम्** ।

( १२–४–३६ ) या मंत्रांत नरकलोकाचा उल्लेख आहे. **इदं यमस्य सादनम् ।** ( ऋग्वेद १०–१३५–७ ) या ऋग्वेदमंत्रांत यमलोकाचें वर्णन आहे. या सर्वांच्या उल्लेखावरून अन्य लोकांच्या अस्तित्वाविषयीं व जीवाला मरणोत्तर प्राप्त होणाऱ्या लोकांविषयीं कोणालाहि विश्वास उत्पन्न होईल असें वाटतें. कर्मानुसार फल भोगण्यास त्या त्या लोकांना जीवाला जावें लागतें व तें कर्म अनुभवून संपल्यानंतर पुन्हां या अथवा इतर लोकीं जन्मास यावें लागतें यावर विश्वास असणाराच **आस्तिक.** परलोकाच्या ठिकाणीं विश्वास न ठेवणारा आणि परमात्म्याशीं ऐक्य प्राप्त होईपर्यंत वासनेप्रमाणें प्राप्त होणाऱ्या पुनर्जन्माविषयीं विश्वास नसणारा **नास्तिक** होय. **अस्ति नास्ति दिष्टं मतिः** । ( पा. सू. ४।४।६० ) **अस्ति इत्यस्य मतिरास्तिकः नास्ति इत्यस्य मतिर्नास्तिकः । परोलोकोऽस्तीति मतिर्यस्य स आस्तिकः तद्विपरीतो नास्तिकः** । परलोकप्रतिपादक अशीं अनेक श्रुतिस्मृतिवाक्यें आहेत. **आप्नोति इमं लोकं आप्नोति अमुम्** । ( अ. वे. शौ. सं. ९।११।१३. ) **इमं च लोकं परमं च लोकम्** । ( अ. वे. १९।५४।५. ) **अयं लोको नास्ति पर इति मानी पुनः पुनर्वशमापद्यते मे** । ( कठ. ) कठोपनिषदाच्या या मंत्रांत–'हा एकच लोक आहे, इथे खाऊन पिऊन मजा करावी, दुसरा लोक आणि दुसरा जन्म कुठे आहे ? धर्म म्हणजे काय ? त्याची आवश्यकता कुठे आहे ? ' असें म्हणणारा पुनः पुन्हां माझ्या ताब्यांत सांपडतो, असें नचिकेताबरोबर बोलतांना यमधर्मानें सांगितलें आहे.

**परलोकसहायार्थं नित्यं संचिनुयाच्छनैः ।**
**धर्मेण हि सहायेन तमस्तरति दुस्तरम् ॥** ( मनु. ४।२३८ )
**नामुत्र हि सहायार्थं पिता माता च तिष्ठतः ।**
**न पुत्रदारा न ज्ञातिः धर्मस्तिष्ठति केवलः ॥** ( ४।२३९ )

––उत्तम परलोकप्राप्त्यर्थ धर्मानुष्ठान अत्यवश्य आहे. धर्माच्या साहाय्यानें ( मनुष्य ) दुस्तर तम ( अज्ञान ) सहज तरून जातो. मरणानंतर प्राप्त होणाऱ्या परलोकांतून आईबाप, आप्तेष्ट, बायकामुलें, यांचें साहाय्य प्राप्त होणें शक्य नाहीं. तिथे धर्मच एक उपयोगी पडतो. या स्मृतिवाक्याधारेंहि परलोकाची व धर्माची कल्पना बळावल्याशिवाय राहाणार नाहीं; इहलोकींच्या साह्यकांचें अकिंचित्करत्व सिद्ध झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

**यस्त्वविज्ञानवान्भवत्यमनस्कः सदाऽशुचिः ।**
**न स तत्पदमाप्नोति सं॰ सारं चाधिगच्छति ॥**
(कठोप. १।३।७)

**यस्तु विज्ञानवान्भवति समनस्कः सदा शुचिः ।**
**स तु तत्पदमाप्नोति यस्माद्भूयो न जायते ॥८॥**
**विज्ञानसारथिर्यस्तु मनःप्रग्रहवान्नरः ।**
**सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परमं पदम् ॥९॥**

या कठोपनिषदाच्या मंत्रातून संसार शब्द आला आहे. अज्ञानी, मनाधीन व विषयवासनेचा अशुद्ध माणूस मुक्त न होतां जन्मास येतो. ज्ञानी, मनोजयी मात्र, जिथे पोहोंचल्यानंतर पुन्हां जन्माला येत नाहींत, त्या पदाला जाऊन पोहोंचतो. या पदालाच 'विष्णुपद' म्हणतात. हें पुढच्या मंत्रांतून स्पष्ट होतें. ज्ञानविज्ञानसंपन्न, मनोनिग्रही, या संसारमार्गाच्या पैलतीरास म्हणजे त्या परमश्रेष्ठ विष्णुपदास जाऊन पोहोंचतो, असा या मंत्रांचा सामान्य अर्थ आहे. यांत विष्णुपद असा शब्दप्रयोग आहे. ' विष्णुपद ' या शब्दाचे दोन अर्थ होतील. एक मोक्षरूप ब्रह्मैक्य; हा मोक्ष पूर्ण ब्रह्मनिष्ठांना मिळतो. दुसरा विष्णुलोक म्हणजे वैकुंठ; मुमुक्षुतेच्या व वैराग्याच्या बळानें अपरिपक्व ज्ञान्यांना, पण उत्कृष्ट भक्तांना या लोकाची प्राप्ति होते असें मानावें लागतें. यामुळें **न तस्य प्राणा उत्क्रामंति क्वचन गच्छति** । या श्रुतिवाक्याचा सरळ अर्थ लागतो.

**स्वर्गकामो ज्योतिष्टोमेन यजेत** । स्वर्गाची इच्छा करणाऱ्यांनीं ज्योतिष्टोम नांवाचा यज्ञ करावा, इत्यादि श्रुतिवाक्यानेंहि जीवाचें स्वसंकल्पित परलोकगमन व तसेंच त्याचें अविनाशित्व सिद्ध होतें. जन्ममरणशील देहाहून हें ' चैतन्य ' सर्वथैव विलक्षण असून, तें सदाचेंच जन्ममरणरहित आहे, हें युक्तीनेंहि निश्चित समजून येतें. **स्वसंकल्पवशाद्बद्धः निःसंकल्पात्प्रमुच्यते** । ' तें ' देहादिकाहून वेगळें असूनहि, केवळ त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या अहंकार-ममकारानें, मी माझें या संकल्पानें तें बद्ध होतें व हा संकल्प नष्ट झाला कीं ' तें ' मुक्त होतें. केवळ चैतन्यरूप असणाऱ्या जीवाला, त्याच्या नुसत्या संकल्पानेंच, देह मी अशा कल्पनेनेंच जन्ममरणादिक, उगीच विनाकारण त्याच्या पाठीमागें लागतात. व हाच जेव्हां आत्मनिश्चयानें आपलें देहादि विलक्षण स्वरूप, गमनागमनशून्य, जन्ममरणरहित आहे असें जाणतो

व जेव्हां तो निःसंकल्प व निष्काम होतो, त्या वेळीं या अध्यासाच्या निवृत्तीनें आपोआपच मुक्त होतो; चिन्मात्र आनंदघन ब्रह्म होतो. मग त्याचें जन्ममरण थांबतें, लोकांतरगमन खुंटतें; असल्याप्रमाणेंच स्वतःस समजून असणें म्हणजेच ‘आत्मज्ञान’ व या आत्मज्ञानानेंच मुक्ति लाभते. वेगळ्या देहादिकांच्या ठिकाणीं मी, माझें अशी कल्पना उत्पन्न होणें, यालाच अध्यास म्हणतात. **यदन्यदन्यत्र विभाव्यते भ्रमादध्यासमित्याहुरमुं विपश्चितः । असर्पभूतेऽहि विभावनं यथा रज्वादिके तद्वदपीश्वरे जगत् ॥** ( रा. गी. ३७ ) वेगळ्या देहादि पदार्थांच्या ठिकाणीं मी, माझें म्हणून भ्रमानें स्वतःची विरुद्ध भावना करून असणें, या आपल्या आनंदघन परमात्म्याच्या ठिकाणीं तद्भिन्न जगाची कल्पना करणें, याचेंच नांव अध्यास. या अध्यासाची कल्पना म्हणजे दोरीच्या ठिकाणीं, तद्विरुद्ध सर्पाची भावना करून घेऊन बसणें होय. याला अविद्याच कारण होते. **अनित्याऽशुचिदुःखानात्मसु नित्यशुचिसुखात्मख्यातिरविद्या ।** ( पा. यो. सू. ) अनित्य, अशुद्ध, दुःखरूप आणि अनात्म देहादिकांच्या ठिकाणीं नित्य, शुद्ध, सुखरूप अशी जी आत्मभावना उत्पन्न होते, तिलाच ‘अविद्या’ म्हणतात. **देहोहमिति या बुद्धिः सैवाविद्येति कथ्यते ।** देह ‘मी’ म्हणून होणाऱ्या कल्पनेलाच ‘अविद्या’ असें म्हणतात. **अनात्मनां देहादीनामात्मत्वेन यदाभिमन्यते सोऽभिमान आत्मनो बंधः । तन्निवृत्तिर्मोक्षः । या तदभिमानं कारयति सा अविद्या । सोऽभिमानो यथा निवर्तते सा विद्या ।** ( सर्वसार उ. ) अनात्मरूप असणाऱ्या देहादिकांच्या ठिकाणीं ‘मी’ हा मिथ्या अभिमान जेव्हां उत्पन्न होतो, तेव्हां जीव ‘बद्ध’ म्हणवून घेतो. तो मिथ्या अभिमानच त्याचा बंध; याची संपूर्ण निवृत्तीच मोक्ष. जी कल्पना तसा अभिमान उत्पन्न करते तीच अविद्या व ज्या आत्मीय भावनेनें हिची अत्यंत निवृत्ती होते ती विद्या.

## उपनिषदांतील दोन प्रार्थना

**भवे भवे नातिभवे भवस्व माम् ।** ( तै. म. ना. उ. )

— हे रुद्रा ! **ऋजंद्रावयतीति रुद्रः ।** भवरोग नष्ट करणाराच रुद्र, असा रुद्र या शब्दाचा अर्थ आहे. तेव्हां हे रुद्रा ! तूं आपल्या नांवाप्रमाणें मला या जन्ममरणांतून काढणाराच हो. माझ्या जन्ममरणाचें राहाटगाडगें पुनश्च सुरू करणारा कधींहि होऊं नकोस. अशी प्रार्थना या वैदिक मंत्रांत

आहे. रुद्र हें सृष्टिलयकारक दैवत आहे. याला 'महाकाळ' असेंहि म्हणतात. देह पडल्यानंतर काय शिल्लक राहातें? म्हणून यमधर्माला जसें विचारावयाचें, तसेंच या देहासकट सर्व प्रपंचाचा लय झाल्यानंतर काय शिल्लक उरतें? म्हणून विचारावयाचें झाल्यास, रुद्रालाच तें विचारावयाचें. पिंडब्रह्मांडाचा लय झाल्यावर: शिल्लक काय राहातें, तें सांगण्यास त्यांच्या उपाधीच्या अधिकारानुसारेंहि यांना अधिकार पोहोंचतो. या बाबतींत रुद्र म्हणजेच ईश्वर आणि यमधर्म हे सर्वथैव प्रमाण आहेत. वेदांनीं कसल्या तरी एका निमित्ताला पुढें करून त्यांच्या आधारें तात्त्विक विचार प्रगट केला आहे.

**योऽसौ सर्वेषु वेदेषु पठ्यते ह्ययमीश्वरः । ***
**अकायो निर्गुणो ह्यात्मा तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥**

(महान्यास शिवसंकल्प २२)

—सर्व वेदांतून ज्या जन्मरहित अविनाशी परमात्म्याचें वर्णन केलें आहे, जो निर्गुण निराकार आहे, त्या परमात्म्याशीं माझें मन तद्रूप होवो. माझ्या मनांत सदासर्वदा मंगलमय संकल्पच उत्पन्न होत असावेत अशी प्रार्थना यजुर्वेदांत आहे. देहामध्यें दिसून येणारी 'मी'पणाची ही आत्मीय भावना जेव्हां नष्ट होते, जेव्हां देह, प्राण, मन, बुद्धि यांच्याशीं कांहीं संबंध राहात नाहीं, तेव्हां केवल सच्चिदानंद रूपानेंच हा जीव राहातो. तोच मोक्ष. अविद्येनें उत्पन्न होणाऱ्या वासनेच्या द्वारा, देहादिकांकडून अनुभविल्या जाणाऱ्या असत् जड, दुःखरूप विषयाच्या भ्रामक अनुभवाकरितां देहपरिग्रह जीवास होतो. अविद्या असेतोंपर्यंत एक देह सुटला तरी वासनेचा आश्रय करून त्या त्या लोकीं, त्या त्या योनींत, तो तो दुसरा देह, तो धारण करतो. पण अशा रीतीनें किती जरी जन्म प्राप्त झाले, तरी मूलतः मीपणाच्या स्मृतीनें युक्त असें सच्चिदानंदरूप, सर्व जीवांतून कायम असतेंच. देहादिकांचा अध्यास नष्ट होऊन, विषयसुखाची कल्पना ओसरून, जन्ममरणाची, लोकलोकांतराची व मनाची कल्पना मावळली आणि तदर्थ कर्म थांबलें आणि हेंच केवल आनंदमात्र ब्रह्मच मी म्हणून ज्ञान झालें म्हणजे "**तदाविद्या स्वकार्यैश्च नश्यत्येव न संशयः ।**" (रामगीता) अविद्या आपल्या सर्व कार्यासह

---

* (पठ्यते ह्यज ईश्वरः । पाठभेद)

त्याच्यापुरती नष्ट होते. या जन्ममरणाच्या चक्रांतून तो सुटून, परमात्म्याची सायुज्य मुक्ति त्याला मिळते. श्रुतिशास्त्रांचा अभिप्राय हा असा आहे.

मेलेला परत जन्मत नाहीं, असें व्हावयाला अशा एवढ्या घटनेची अपेक्षा आहे. सर्वांनाच हा नियम लागू करून, मेलेला पुन्हां कसला जन्मास येतो, तो राहतोच कुठे, मातीचें गाडगें जें फुटून गेलें तें फुटूनच गेलें, मातींत मिसळून गेल्यानंतर पुन्हां जसें तें यावयाला राहात नाहीं. त्याप्रमाणेंच पंच-भूतांचा देह पंचभूतांत विरघळून गेल्यानंतर तो पुन्हां जन्मावयाला राहात नाहीं. पुनर्जन्मच नाहीं, देहाहून वेगळें चैतन्य आहेच कुठे ? इत्यादि विधानें प्रमाणभूत होऊं शकत नाहींत, श्रुति-युक्तीच्या कसाला उतरत नाहींत. हे जाबाली ऋषि महाराज ! तुमचें स्वतःचें हें जरी मत नसलें तरी तुमच्या तोंडून आलेले विचार लोक निश्चित धरून चालतील व त्यामुळें पुढें मागें अनर्थ कोसळेल. या दृष्टीनें त्याचें मी असें थोडें निराकरण करीत चाललों आहे. मातृपितृभक्ति, आस्तिक्यबुद्धि, सदाचार, दुराचार, पुनर्जन्म, स्वर्ग-नरकादि गति, ब्रह्मलोकादि उत्तम लोकांची प्राप्ति, लोकान्तरगमन इत्यादि विषयांचें विवेचन केलें, आतां श्राद्धावर जो तुम्ही आक्षेप घेतला आहे त्याविषयीं थोडा विचार करूं.

## श्राद्ध व त्याचा उद्देश

**श्रद्धया दत्तं श्राद्धम्** । श्राद्ध या शब्दांत ‘ श्रद्धा ’ हा शब्द मुख्य आहे. आपला जन्म ज्या कुलांत झालेला असतो, त्या कुलांतील मृत पूर्वजांच्या तृप्तिकरितां व तसेंच त्यांच्या तृप्तीनें लाभणारी सत्संतति आणि चिरसंपत्ति यांकरितां, तिलदर्भादिकांनीं दिलेल्या अन्नोदकरूप पितृयज्ञाला ‘ श्राद्ध ’ असें नांव आहे.

हेंच पितृकार्य होय. धर्म, अर्थ, काम, मोक्ष अशा चार पुरुषार्थांची प्राप्ति गृहस्थांना व्हावयाची असते. श्रुतिस्मृत्युक्त धर्माचरणानें दैवी सामर्थ्य, सत्पात्रता, सत्कीर्ति, आरोग्य, मनःसमाधान, सूक्ष्म बुद्धि, कार्याकार्यविवेक इत्यादिकांची प्राप्ति करून, समाजांत गौरव प्राप्त करून घेणें, सर्वप्रिय होणें, हा प्रथम पुरुषार्थ. धर्माचरणानें अर्थप्राप्ति व अर्थप्राप्तीनें धर्मानुष्ठान करीत, या दोन्हींचा उपयोग करून घेऊन सुखानें नांदणें हा द्वितीय पुरुषार्थ होय. धर्मार्थांच्या साहाय्यानें वंशपरंपरेच्या अविच्छिन्नतेकरितां व पितृऋणांतून

मुक्त होण्याकरितां, विध्युक्त कामाचा आश्रय करून सत्प्रजा निर्माण करणें, हा गृहस्थांचा तृतीय पुरुषार्थ आहे. चौथा पुरुषार्थ मोक्ष हा होय. पुरुषार्थत्रयाच्या प्राप्तीनें सांसारिक विषयांकडची धांव शांत करून, गुरु-देवतांच्या अनुग्रहानें प्राप्त झालेल्या आत्मविचारावर सारखे प्रयत्न चालू ठेऊन, आत्मसाक्षात्कार करून घेणें, हा मोक्षरूप चतुर्थ पुरुषार्थ आहे. श्राद्धपक्षादिकांच्या अनुष्ठानानें गृहस्थांना पित्राशीर्वादेंकरून या चारी पुरुषार्थांची प्राप्ति होते.

**आयुः प्रजां धनं विद्यां स्वर्गं मोक्षं सुखानि च ।**
**प्रयच्छन्ति तथा राज्यं प्रीतानॄणां पितामहाः ॥**

—श्राद्ध करणाऱ्यावर संतुष्ट होऊन त्याचे पितामह त्याला आयुरारोग्य, प्रजा, धनविद्या, इतर सुखें, वाटल्यास राज्य, स्वर्ग तसा मोक्ष पण आनंदानें देतात.

**पुत्रो वा भ्रातरो वाऽपि दौहित्रः पौत्रकस्तथा ।**
**पितृकार्यप्रसक्ता ये ते यान्ति परमां गतिम् ॥**

( अत्रिसंहिता )

—पुत्र, भाऊ, कन्यासंतति अथवा पुत्रसंतति जर पितृकार्यांत अर्थात् श्राद्ध-पक्ष-तर्पणादिकांत यथाकाल आसक्त राहिलीं तर तीं निश्चयानें परमगतीला प्राप्त होतात.

**अरोगः प्रकृतिस्थश्च चिरायुः पितृपुत्रवान् ।**
**अर्थवानर्थयोगी च श्राद्धकामो भवेदिह ॥**
**परत्र च परां तुष्टिं लोकांश्च विविधान् शुभान् ।**
**श्राद्धकृत् समवाप्नोति श्रियं च विपुलां नरः ॥**

( देवलस्मृति )

—श्राद्धादि पितृकार्यें श्रद्धेनें करणारा या लोकीं निरोगी, स्वस्थ, दीर्घायु, सुपुत्रवान्, श्रीमान्, धनोपार्जक असा होतो व परत्र अति तृप्त होतो. अनेक शुभ लोकांची त्याला प्राप्ति होते, अनंत वैभवाचा तो भागीदार होतो. कोणत्या गृहस्थाला हें नको आहे? या सर्वांची प्राप्ति जर पितृकार्यानें होते तर तें कां बरें करूं नये? साधन सोडून साध्याची प्राप्ति कशी बरें होईल?

**ये यजन्ति पितॄन् देवान् ब्राह्मणांश्च हुताशनान् ।**
**सर्वभूतान्तरात्मानं विष्णुमेव यजन्ति ते ॥** ( यमस्मृति )

—जे देव, पितृ, अग्नि, ब्राह्मण यांची पूजा करतात ते सर्वांतर्यामी सर्वात्मरूप विष्णूचीच पूजा करतात. हे सर्व विष्णूच्या विभूती आहेत. गृहस्थाश्रम म्हणजे पितरांचीच आराधना आहे. गृहस्थाश्रमाच्या पूर्तीस या पितरांचा अनुग्रह अत्यवश्य असतो. स्वतःच्या आईवडिलांना मुक्ति मिळाली असली अथवा पुनर्जन्म झाला असला तरी गृहस्थाश्रमाच्या पूर्णतेकरितां व कृतज्ञतार्थ केली जाणारी पितरोपासना अर्यमादि नित्य पितृदेव स्वीकारतात व आराधकाच्या अडीअडचणी दूर करून त्याला संतति, संपत्ति देऊन त्याचा गृहस्थाश्रम पूर्ण करतात आणि मोक्षाला सद्गुरुद्वारां मार्ग दाखवितात. यांच्या कृपेनेंच श्रेष्ठ सद्गुरूची प्राप्ति होते, साक्षात् जगत्पालक विष्णुहि तृप्त होतो. कांहीं पितर पितृलोकांत अथवा स्वर्गलोकांत राहातात. नेमक्या वर्षश्राद्धाच्या दिवशीं ते आपल्या त्या वंशजाकडे येतात. भाद्रपद मासाच्या कृष्णपक्षांत मृतपितराच्या तिथीस श्राद्ध करावेंच. या श्राद्धास पक्ष म्हणतात. ( यालाच महालय म्हणतात ). या पितृपंधरवड्यांत सर्व पितरांना पिंडदान असतें. भाद्रपद अमावास्येस ' सर्वपित्री अमावास्या ' म्हणतात. पितरांची मृततिथि ठाऊक नसल्यास निदान या दिवशीं तरी श्राद्ध करावें, नाहींतर पितृशापास बळी पडावें लागतें.

**वृश्चिके समनुप्राप्ते पितरो दैवतैः सह ।**
**निःश्वस्य प्रतिगच्छन्ति शापं दत्वा सुदारुणम् ॥**

—वृश्चिक राशीच्या आगमनानंतर अर्थात पितृपक्षांत श्राद्ध तर्पण झालें नाहीं तर गृहाप्रत आलेले देव देवतांसह पितृगण क्रुद्ध होऊन सुदारुण शाप देतात व विन्मुख निघून जातात. पितृशापानें संततिविच्छेद होतो, दारिद्य येतें व कुटुंबांतले लोक धर्मभ्रष्ट तसेंच नीतिभ्रष्ट होतात. घरची कळाच नष्ट होते. याच्या उलट—

**पुत्रानायुस्तथाऽऽरोग्यमैश्वर्यमतुलं तथा ।**
**प्राप्नोति पञ्चमे कृत्वा श्राद्धं कामांश्च पुष्कलान् ॥**

—पितृपक्षांत श्राद्ध केल्यानें पुत्र, आयुष्य, आरोग्य, अतुल ऐश्वर्य व तशीच अभिलाषित अनेक कामनांची प्राप्तिहि होते. **श्राद्धं श्रद्धान्वितः कुर्वन् प्रीणयत्यखिलं जगत् ।**—श्रद्धाभक्तीनें श्राध्द केल्यानें अखिल जगालाच तृप्त केल्यासारखें होतें असेंहि एक वचन आहे. श्राध्दानें पितृतृप्ति, कर्त्याची अनिष्टनिवृत्ति, इष्टप्राप्ति व अखिल जगाची तृप्ति होते, हें यावरून कळून येईल. या

दृष्टीनें श्राध्दपक्ष प्रत्येकानें करावेंच. जिवन्त असेपर्यंत पितरांना अन्नपानादिकांच्या दानानें जसें संतुष्ट करावें तद्वतच मरणानंतरच्या स्थितींत अन्नादिकांच्या दानानें पितरांना संतुष्ट करण्याचा एक विधि ' श्राध्द ' या नांवानें प्रसिध्द आहे.

**देशे काले च पात्रे च श्रद्धया विधिना च यत् ।**
**पितृनुद्दिश्य विप्रेभ्यो दानं श्राद्धमुदाहृतम् ॥**

—पितरांच्या उद्देशानें पवित्र स्थलीं, योग्य कालीं, सत्पात्र पाहून विध्युक्त प्रकारें जें अन्नाहार–द्रव्यादि अति श्रद्धेनें दिलें जातें, त्याला ' श्राद्ध ' असें नांव आहे. पित्रार्जित संपत्तीच्या प्राप्तीकरितां त्यांची सेवा केल्याप्रमाणें मरणोत्तरहि त्यांच्या अर्यमादि पितृदेवांकरितां आणि जगत्पालनकर्त्या विष्णुप्रीत्यर्थ, तसेंच सत्संतति व चिरसंपत्ति यांच्या लाभानें पूर्ण होणाऱ्या गृहस्थधर्माकरितांहि श्राद्धविधीचें अनुष्ठान प्रथम वेदानेंच निर्णीत केलें आहे. श्राद्धान्तीं पितरांची प्रार्थना केली जाते ती—

**भवत्प्रसादतो भूयाद्धनधान्यादिकं मम ॥६६॥**
**दातारो नोऽभिवर्धन्तां वेदाः संततिरेव नः ।**
**श्रद्धा च नो मा व्यगमद्बहुधेयं च नोऽस्त्विति ॥६७॥**
**अन्नं च नो बहु भवेदतिथींश्च लभेमहि ।**
**याचितारश्च नः सन्तु मा च याचिष्म कंचन ॥६८॥**

( लघ्वाश्वलायन स्मृ. )

—आपल्या प्रसादानें या कुळांत सदा धनधान्यादि समृद्धि असावी, दाते निर्माण व्हावेत, वेदाध्ययन व वेदोक्त कर्म अधिक प्रमाणांत चालावें, वंशतंतु अखंड चालावा. गुरु, देवता, माता, पिता, वेदशास्त्र यावर आमची अचल श्रद्धा असावी. पुष्कळ दान द्यावयाला धनधान्याची भरपूर सामुग्री आमच्यापाशीं असावी, याचनावृत्ति नसावी. यावरून आर्य संस्कृतीचा परिचय होतो.

## पितृलोक व पितृयज्ञ

**अधामृताः पितृषु संभवन्तु ॥** ( अथर्व. १८-४-४८ )
**पितृणां लोकमपि गच्छन्तु ये मृताः ॥** ( अथर्व. १२-२-४५ )

या वेदाच्या आधारानें मृत पितर पितृलोकीं अर्यमादि पितृदेवतांच्या सान्निध्यांत वास करतात हें स्पष्ट होतें.

या पितृलोकांतील अथवा स्वर्गलोकांतील पितरांना वेदमंत्रांनीं आमंत्रण करून, सत्संतति, चिरसंपत्ति व धर्मप्रवृत्ति यांकरितां जलतर्पण, पिंड आणि ब्राह्मणभोजन याद्वारां तृप्ति देणाऱ्या कर्मविशेषाला पितृयज्ञ, पितृकार्य अथवा श्राद्ध असें म्हणतात.

## अग्नि हा देवतांचें मुख होय

**अग्निर्हि देवानां मुखम्** । ( शतपथ ब्रा. ३–७ )

अग्नीमध्यें आहुति घातल्या असतां देवतांची तृप्ति होते. अग्नि हेंच देवतांचें मुख होय असें वेदांचें सांगणें आहे. क्षुधा, पचन हें सर्वहि अग्नीच्या योगानेंच होतें असें असल्यानें बाह्याग्नींत टाकलेली आहुति आधिदैविक दृष्ट्या सर्व देवतांना पोहोंचते. सर्वांचा जठराग्नि या बाह्याग्नीचा अंशच होय. मुळांशीं पाणी घातलें तर तें सर्व शाखोपशाखांना पोहोंचतें त्याप्रमाणें बाह्याग्नींत दिलेली आहुति सर्वांच्या जठराग्नीस पोहोंचते. त्या त्या देहाच्या नांवानें अग्नींत समर्पण केलेल्या आहुतीनें त्या त्या देहांत असणाऱ्या जठराग्नीला त्या आहुति तृप्तीकर ठरतात. याशिवाय वायुरूप सूक्ष्म शरीरधारी देवता, पितर हे कुंडगत अग्नींत आविर्भूत होऊन हव्यकव्यांचा स्वीकार करतात.

**ये निखाता ये परोप्ता ये दग्धा ये चोद्धिताः ।**
**सर्वांस्तानग्न आवह पितॄन् हविषे अत्तवे ॥**

( अथर्व. १८-२-३४ )

——अनेक कारणांनीं पुरलेल्या, दहन केलेल्या, वेड लागून व मारणादि प्रयोगांनीं मृत झालेल्या सर्व पितरांना या कव्यानें तृप्त होण्याकरितां ‘ हे अग्ने, तूं त्यांना बोलाव ’ असा या मंत्राचा भावार्थ आहे. देवतांच्या प्रीत्यर्थ दिलेल्या हविगाला ‘ हव्य ’ आणि पितरांप्रीत्यर्थ दिलेल्या हविगाला ‘ कव्य ’ असें म्हणतात, हें सर्वांना माहीतच आहे. देवतांना आहुति घालावयाची झाल्यास ‘ स्वाहाकार ’ व पितरांना आहुति द्यावयाची झाल्यास ‘ स्वधाकार ’ म्हणतात.

**मुखादिन्द्रश्चाग्निश्च** । परमात्म्याच्या मुखापासून झालेला अग्नि परमात्म्याच्या मुखकमलांतच असल्यामुळें अग्नि हें परमात्म्याचें मुख म्हणून म्हटलें

आहे. तसेंच **ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्** । ब्राह्मण हे देखील परमात्म्याच्या मुखापासून उत्पन्न झाल्यामुळें त्यांनाहि परमात्म्याचें मुख असेंच म्हणतात.

त्या त्या देवतापितरांच्या उद्देशानें ब्राह्मणांना जेवूं घातलें म्हणजे त्या त्या देवपितरांच्या तृप्तीकरितां आदिभौतिकदृष्ट्या परमात्म्याच्या मुखांत हव्य-कव्य अर्पण करणेंच होय. अग्नि, इंद्र, ब्राह्मण हे तिघेहि परमात्म्याचे मुख-स्थानीय असल्यामुळें ब्राह्मणभोजनानें परमात्मा, अग्नि, इंद्र व सर्व देवदेवता तृप्त होतात. अप्रत्यक्षपणें अखिल विश्वच तृप्त होतें यांत संशय नाहीं. वेद-संस्कृत विप्रमुखसुद्धां पवित्र अग्निच होय. असें झाल्यास या ठिकाणीं समर्पण केलेलें हव्यकव्य देवपितरांना पोहोंचतेंच.

**विद्यातपःसमृद्धेषु हुतं विप्रमुखाग्निषु ।**
**निस्तारयति दुर्गाच्च महतश्चैव किल्बिषात् ॥**

(मनु. अ. ३-९८)

——विद्या—तपादिकांनीं समृद्ध असणाऱ्या ब्राह्मणाच्या मुखाग्नींत समर्पण केलेलें अन्न हव्यकव्यरूप होऊन यजमानास अखिल पाप-तापापासून सोडवून मरणोत्तर प्राप्त होणाऱ्या नरकापासूनहि मुक्त करतें. इतकेंच नव्हे तर नरकांत पडलेल्या यजमानाच्या पितरांचाहि तें उद्धार करतें. मनुमहाराजांनीं सांगितलेलें हें वचन आहे. आपल्या स्वार्थाकरितां ब्राह्मणांनीं केलेलें मनसोक्त विधान तर हें नव्हे ना ?

मनुष्याचा स्थूलदेह अन्नमय असल्यामुळें, देह असेतोंपर्यंत त्यास अन्नाच्या आहाराची जरूरी असते. देहपातानंतर हें पार्थिव शरीर राहात नाहीं. त्यावेळीं स्थूल देहाला आवश्यक अशा अन्नाची जरुरी नसते, असें जरी असलें तरी, अन्नाची वासना मृतपितरांना असते. इथे वंशजाकडून दिलेलें अन्न त्यांना रूपांतरित होऊन म्हणजे त्यांचें अन्न होऊन त्यांना मिळतें अशी परमेश्वराच्या राज्यांतील व्यवस्था आहे. ऐहिक राज्यांत टपालाची जशी व्यवस्था असते त्याचप्रमाणें ही व्यवस्था समजावी. ज्याच्या नांवानें पत्र लिहिलें असेल त्यालाच नेमकें मिळाल्याप्रमाणें ज्याच्या नांवानें इथे पिंड अर्पण केला असेल त्यालाच तो त्यांच्या त्यांच्याकडून मिळतो. टपालाच्या मनुष्याला पैसे दिले म्हणजे कितीहि दूरच्या मनुष्याला पत्र इत्यादि मिळण्याची जशी व्यवस्था राज्यांत असते, त्याचप्रमाणें परमेश्वराच्या राज्यांत ब्राह्मणाला दिलेला शिधा अथवा जेवूं घातलेलें अन्न, नेमकें त्या संकल्पित पितरांना जाऊन

पोहोंचतें. विद्युत्संदेशाप्रमाणें ( Telegram ), बिनतारी तारायंत्राप्रमाणें ( Wireless Telegraphy ) मनःसंकल्पित विचार दुसरीकडे जाऊन पोहोंचतात व त्यांच्या त्यांच्या उद्देशाप्रमाणें त्यांना त्यांना कळतात.

**स यत्क्रतुरस्मिंल्लोके भवति तदेतत्प्रेत्य भवति ।**

**अथ खलु क्रतुमयः पुरुषः** । जीवित असतांना झाललें संस्कार, असलेला निश्चय, विशिष्ट देहाच्या ठिकाणीं असणारा मीपणाचा अभिमान मृत्युनंतरहि असतो. जीव हा त्याच्या भावनेप्रमाणें, कल्पनेप्रमाणें व निश्चयाप्रमाणें बनतो. **मनोमयः प्राणशरीरनेता ।** असें जीवाला उद्देशून उपनिषदांतून सांगितलें गेलें आहे. जीव हा मनोमय म्हणजे वासनामय आहे, तो वासनेप्रमाणें शरीर धारण करतो व वासनेप्रमाणें शरीराला वागवितो व सर्व क्रिया करतो. देहपातानंतर सूक्ष्य देहाचें प्राधान्य असतें. हा सूक्ष्म देह वासनामय असतो. **वासनात्मकं मनः** । वासना मनोमय असते व मन वासनामय असतें. स्थूळ देह नष्ट झाल्यानंतर प्राप्त होणारा आतिवाहिक सूक्ष्म देह केवळ मनोमय असतो.

## संकल्पानें दिलेलें पोहोंचतें

**संकल्पात्मकं मनः** । मन संकल्परूप असतें व संकल्प मनोमय असतो. मृतपितरांचा मनोमय सूक्ष्मदेह संकल्परूप असल्यानें त्याच्या संकल्पानें व त्यांच्या नांवानें दिलेलें अन्न ब्राह्मणद्वारें अथवा कव्य अग्नीद्वारें त्या त्या पितरांना हुंडी पटविल्याप्रमाणें मिळतें; त्या अन्नानें व कव्यानें त्यांची तृप्ति होते. देह पडल्यानंतर पितरांना त्या देहाची नुसती भावनाच असल्यामुळें त्यांच्या भावनेनें दिलेली वस्तु त्यांना पोहोंचते; त्यानें त्यांची तृप्तीहि होते. आपल्याकरितां त्यानें अन्न दिलें, एवढें त्यांना समजल्याबरोबरच ते तृप्त होतात. सर्व स्थूल देहांतून सूक्ष्म देह असतो. त्या त्या स्थूल देहांत असणाऱ्या सूक्ष्म देहानेंच तो तो स्थूल देह वर्तत असतो. त्या त्या कर्मसंस्काराप्रमाणें झालेल्या वासनेनें तसा तसा देह जीव संकल्पून धारण करतो. ईश त्या त्या जीवांत त्याच्या त्याच्या कर्मफलानुरूप संस्कारवासना व संकल्प निर्माण करतो. ईशसृष्टीचा असा हा व्यवहार आहे. या दृष्टीनें सर्वांचेच देह वासनारूप, संकल्परूप व मनोमय असले तरी संकल्पानेंच कुठे स्थूल देहाचें व कुठे सूक्ष्म देहाचें प्राधान्य असतें. जिवंत असतांना स्थूल देहाचें प्राधान्य

असल्यामुळें स्थूल देहाच्या माणसाला त्यांच्या संकल्पानें दिलेलें अन्न प्रत्यक्ष पोहोंचत नाहीं. देणारा व ग्रहण करणारा दोघेहि इथे स्थूलप्रधान जीव असतात. त्यामुळें स्थूल क्रियेनें त्याच्या त्याच्या तृप्तिकरितां त्याला त्यालाच जेवूं घालावें लागतें. इथे जिवंत माणसांना जेवूं घातलें तरी, त्यांच्या नांवानें आहुति दिली तरी, ती पोहोंचत नाहीं म्हणून ती पितरांना पोहोंचत नाहीं असें मानूंहि नये आणि म्हणूंहि नये. याला त्यांच्या त्यांच्या ठिकाणीं असणारें तें तें स्थूल सूक्ष्म देहांचें प्राधान्यच कारण होय. इथे अन्न जरी पोहोंचत नसलें तरी त्यांच्या त्यांच्या ग्रहपीडा, रोग व बाधा यांच्या निवारणार्थ आयुष्यवृध्यर्थ ब्राह्मणांना दिलेल्या दानानें व जेवूं घातलेल्या अन्नानें व ब्राह्मणांकडून करविलेल्या अनुष्ठानानें त्यांची त्यांची ग्रहपीडा, रोग व बाधा नष्ट होतात हा अनुभव आहे. इथे मात्र सूक्ष्म देहाचें प्राधान्य गृहीत धरलें जातें. पूर्वजन्म-कर्मानेंच ग्रहबाधा, रोगबाधा व भूतबाधा होत असते. व पूर्वकर्म सूक्ष्म देहरूपानेंच इथे असतें व तें त्याचें फळ सूक्ष्म देहानेंच इथे देत असतें. म्हणून संकल्पानें दिलेलें संकल्परूप वासनामय सूक्ष्म देहावर परिणाम करूं शकतें.

**जन्मान्तरकृतं कर्म व्याधिरूपेण बाधते ।**
**तच्छान्तिरौषधैर्दानैर्जपहोमसुरार्चनैः ॥**

—पूर्वजन्माचें कर्म व्याधिरूपानें बाधत असतें व त्याची शांति औषध, दान, जप, होम आणि देवता-अनुष्ठान यांनीं होते.

## सर्व मनोमयच

अन्न खाल्यानंतर तृप्ति ही मनालाच होते. देहाचें सूक्ष्मकारण मन हें अति सूक्ष्म आहे, देह हा स्थूल आहे. देहाचा आणि देहपोषणास आवश्यक अशा अन्नादि भोगांचा साक्षात् संबंध देहाशींच असला, या मनाशीं जरी नसला तरी स्थूल देहाच्या केवल अध्यासानेंच, देहाच्या उपचारानें तें संतुष्ट होतें. अनुकूल प्रतिकूलतेनें मनावरच सुखदुःखाचे परिणाम होतात. देहसुखाकरितां आहारादि पदार्थांची इच्छा मनालाच होते. ते मिळाले असतां संतोषहि मनालाच होतो. मनाच्याच भावना देहकृतींत व मुखमुद्रेवर उमटतात. मनाची खिन्नता व प्रसन्नता मुखावर स्पष्ट उमटून दिसते. दुसऱ्याच्या बोलण्याचा व क्रियेचा इष्टानिष्ट परिणाम मनावरच होतो. स्थूल देहधारी मनुष्याच्या बाबतींतहि इतकें हें असें तंतोतंत पटतें तर तें सूक्ष्म देहधारी पितरांच्या बाबतींत कां पटूं नये ?

हें सर्व जग मनोमयच आहे. सर्व देह मनोमयच आहेत. सर्व क्रिया मनोमयच आहेत. सर्व इच्छा, सर्व संकल्प मनोमयच आहेत. **यन्मनसा मनुते तद्वाचा वदति तत्कर्मणा करोति । यद्यत्कर्म कुरुते तत्तत्फलमनुभवति ।** क्रियेपूर्वीं त्याची इच्छा आणि संकल्प मनांतच उत्पन्न होतो. मनानें ज्याची इच्छा करतो व जसा संकल्प करतो तसेंच तो बोलून दाखवितो व त्याप्रमाणेंच वागतो. मनानेंच क्रिया घडतात. मनानेंच भोग घडतो. तृप्तिहि पण मनालाच होते. हें जरी खरें असलें तरी वासनेनें व संकल्पानें उमटलेलें स्थूल देहाच्या प्राधान्यानेंच तडीस नेतां येतें म्हणून स्थूल देहाचें या ठिकाणीं विशेष महत्त्व आहे.

**स यदा मनसा मनस्यति मन्त्रानधीयीयेत्यथाधीते कर्माणि कुर्वीयेत्यथ कुरुते पुत्राᳫश्च पशूᳫश्चेच्छेयेत्यथेच्छत इमं च लोकममुं चेच्छेयेत्यथेच्छते मनो हि लोकः** ॥ ( छां. अ. ७ खं. ३. )

--मंत्राचा उच्चार करावा म्हणून मनांत येतें तेव्हां मंत्राचा उच्चार करतो. जेव्हां अध्ययन करावें म्हणून मनांत येतें तेव्हां अध्ययन करतो. जेव्हां कर्म केलें पाहिजे म्हणून मनाला वाटतें तेव्हां कर्म करतो. द्रव्यदारां पुत्रपश्वादिकांची आवश्यकता मनांत भासूं लागली कीं, त्यांची इच्छा करतो. इहलोकाचा अथवा परलोकाचा संकल्प मनांत उत्पन्न झाला कीं, मग त्यांची इच्छा करतो. **मन एव हि लोकाश्च** । हे सर्व लोकहि मनच आहेत. **मनोमात्रमिदं सर्वम्** । मनच सर्व कांहीं आहे. मनच सर्व कारण आहे. सर्व व्यवहार मनोमयच आहेत. परमात्म्याच्या संकल्पानें, इच्छेनें म्हणजे मनानेंच ही सृष्टि उत्पन्न झाली. त्यामुळें तदंशभूत जीवालाहि सर्व सृष्टि मनानेंच प्रतीत होते व सर्व क्रिया संकल्पानें, इच्छेनें, म्हणजे मनानेंच घडतात. मनाची वासनाच देहाकार होते. कृतकर्मांचें तदनुरूप फल परमेश्वराकडून दिलें जातें व मग जन्म येतो. **अन्यत्रमना अभूवं नाऽपश्यम् । अन्यत्रमना अभूवं नाश्रौषम्** । माझें मन दुसरीकडे असल्यामुळें मी बाघितलें नाहीं, दुसरीकडे माझें मन गेलें होतें त्यामुळें मी ऐकलें नाहीं, इत्यादि ऐकावयास सांपडतें. आपल्यालाहि असा अनुभव येतो व आपणहि वेळीं असेंच म्हणतों. एकंदरीत दुसरीकडे मन गेलें असल्यास समोर असून देखील ती वस्तु दिसत नाहीं, म्हणजे दृश्याचें परिज्ञान होत नाहीं या अनुभवावरूनहि हें सर्व मनोमय आहे हें स्पष्ट होतें. स्वप्नामध्यें मनोमयच सृष्टि असते. सुषुप्तींत कल्पना आणि सृष्टि दोन्हीहि

दिसून येत नाहींत, यावरून त्या ठिकाणीं मन, जरी भासत नसलें, जरी तें (पुन्हां जागृत्-स्वप्न या अवस्थेंत यथास्थित अनुभवास येत असल्यामुळें) संपूर्ण नष्ट झालें असें म्हणतां येत नसलें, तरी तें इतक्या सूक्ष्म स्थितींत असतें कीं त्याच्याकडून कसलीच कल्पना तिथे करवत नाहीं व त्यामुळेंच स्वपरदेहादि कोणतेंच दृश्य सुषुप्तींत दिसत नाहीं. असें जरी मानलें तरीहि मनाच्या कल्पनेनेंच तें सर्व होतें असें सिद्ध होऊन सर्व हें मनोमयच ठरतें. या ठिकाणीं तेजोबिन्दूपनिषदाच्या पांचव्या अध्यायाचा ९७ वा श्लोक आठवला तो इथे देतों. त्याच्यामुळें या विषयाला पुष्टि मिळते.

**कामं क्रोधं बंधनं सर्वदुःखं विश्वं दोषं कालनानास्वरूपम् ।**
**यत्किञ्चेदं सर्वं संकल्पजालं तत्किञ्चेदं मानसं सौम्य विद्धि ॥९७॥**

—काम, क्रोध, बंधन, सर्व दुःख, अखिल विश्व, निखिल दोष, काल-विविधरूपें सर्वहि हें जितकें म्हणून संकल्पाचें जाळें तें सर्व मानसिकच आहे असें समज, म्हणून ऋभूनें निदाघाला उपदेशिलें आहे. सर्व प्रपंचच मनोमय ठरला तर मनाच्या कल्पना म्हणजेच हे सारे पदार्थ, मनाच्या कल्पनेचाच हा सर्व व्यवहार, तर मग येथें मनाहून दुसरें काय राहिलें? मनाच्या कमीअधिक संकोच-विकासानेंच जागृदादि त्रयावस्था होतात. तिन्ही अवस्था मनोमयच ठरतात. कमीअधिक कालाच्या प्रमाणानें जागृतस्वप्न दृश्य मनोमयच होतें. सुषुप्ति मनाची सूक्ष्म स्थिति ठरते. ते ते पदार्थ, त्या त्या जाती, तो तो जातिस्वभाव, तो तो जातिधर्म, त्या त्या जातीचा व्यवहार, त्या त्या जातीशीं जातींचा इतर व्यवहार, सबंध दृश्य, सबंध जीवन एका ईश्वराच्या व तदंशभूत जीवाच्या मनःसंकल्पांतच मोडतें व दिसूनहि येतें.

## अपरिहार्य ईशसृष्टि

ईशसंकल्पाप्रमाणें प्रत्येक प्राणीपदार्थांना एकेका स्वरूपाची प्राप्ति झाली आहे. त्याला त्याला एक व्यावहारिक सत्यत्व आलें आहे. या सत्यत्वाच्या आधारें जगाचा व्यवहार चालला आहे. निर्वाह होत आहे. मनोमय म्हणून आपल्या इच्छेनें या ईशसृष्टीला वाटेल तें वेगळें रूप देणें कोणालाहि शक्य नाहीं. असें झालें असतें तर आतांपर्यंत ही सृष्टि राहतीच ना! जग उत्पन्न करणें, त्यांत प्रवेश करणें, त्याचें पालनपोषण करणें, नियमन करणें, त्याच्या कालावसानीं आपल्यांत त्याचा लय करून घेणें, त्यांच्या त्यांच्या कर्मांचें तें तें फळ त्यांना

त्या त्या वेळीं बिनचूक देणें, इत्यादि ईशकार्यांत ढवळाढवळ करतां येत नाहीं व कोणालाहि हा अधिकार संपादितां येत नाहीं. एकाच वेळीं सर्वस्वतंत्र असे दोन ईश्वर असूं शकत नाहींत. सर्वश्रेष्ठत्व एकालाच असूं शकतें. सर्वांनाच तो अधिकार मिळाला व तें सामर्थ्य आलें तर व्यक्ति तितक्या प्रकृति होऊन प्रत्येक-जण आपापली सृष्टि नवीन नवीन निर्माण करील व कोणी कुणाच्या सृष्टींत राहाणारच नाहीं. निर्माण केलेल्या सृष्टींतहि प्रतिव्यक्ति पुनः पुनः सृष्टि उत्पन्न करीत राहील आणि एकाहि सृष्टीला नियमबद्धता आणि स्थायित्व राहाणार नाहीं, एकसूत्रीपणा राहाणार नाहीं. त्या सृष्टीची व्यवस्थाहि असूं शकणार नाहीं. एकसूत्रीपणा राहावयास सर्व सत्ता एकाच्याच हातीं असावी लागते, एकचालका-नुवर्तित्व असावें लागतें. नाहींतर एकाला सृष्टि उत्पन्न करावी वाटते न वाटते तोंच दुसऱ्याला ती नष्ट करावी असें वाटेल. एकाहि सृष्टीला व सृष्टीच्या एका पदार्थालाहि स्थिरस्थायित्व लाभणार नाहीं. उत्पत्ति व लय अशा परस्परविरुद्ध घटना एकापाठीमागून एक त्वरेनें होऊं लागतील. समबलामुळें कुणालाहि आपली सृष्टि दुसऱ्याच्या आघाताविरुद्ध आणि इच्छेविरुद्ध कायम ठेवतां यावयाची नाहीं. एकहि सृष्टि टिकाव धरून राहणार नाहीं. तशी ती राहावयाची झाल्यास दुसऱ्याच्या स्वतंत्रतेला आळा घालणारा आणि दुसऱ्याच्या आघात-इच्छेविरुद्ध आपली सृष्टि अबाधितपणें यथास्थित राखूं शकणारा, सर्वतोपरि सर्वाधिक शक्तीचा असा कोणी तरी एक असावा लागतो; व यामुळेंच सृष्टि चालते. असें झालें कीं ' एकेश्वर'सिद्धि होते. आखिल विश्वाला ' कर्तुमकर्त-मन्यथा कर्तुं ' समर्थ असा एकच एक परमेश्वर आहे असें मानावें लागतें व त्याच्या सत्तेंत इतरांना वागावें लागतें व अपरिहार्यशील ईशसृष्टि होते. **स एष एक एक वृदेक एव** । (अथर्व. १३–५–७)—ईश्वर हा एक खरोखरच एक आहे. **एक एव नमस्यो विश्वीऽयः** । (अथर्व. २।२।१ ) – सर्व प्रजेंत एक परमेश्वरच सर्वतोपरि वंद्य व स्तुत्य आहे. **न तु तद्द्वितीयमास्ति**।–त्याला प्रति-स्पर्धी नाहीं. त्याचे अबाधित नियम पाळावयालाच पाहिजेत. आकाश, वायु, अग्नि, जल व भूमि अशा या पंचभूतांची ही सृष्टि अन्यथा कोण करूं शकेल? **य ईशेऽस्य द्विपदश्चतुष्पदः** ।–अखिल द्विपाद, चतुष्पादादि सृष्टीवर त्याचेंच एक प्रभुत्व चालतें. दोन आणि दोन चार असेंच म्हटलें पाहिजे; मनोमय म्हणून सहा म्हणतां येणार नाहीं; व सहा धरून व्यवहार सुरळीत चालणार नाहीं. ईशसृष्टीचे नियम उल्लंघिण्यास कोणीहि समर्थ नाहीं. हें एक पंचभूतांच्या

गुणधर्मावरूनहि दिसून येण्यासारखें आहे. पेरलेलें बी उगवून, वृक्षरूपानें फोफावतें. त्याला गोड फळें लागतात. नऊ महिने गर्भांत वाढ होऊन कर-चरणादि अवयवांनीं युक्त होऊन प्राणी जन्माला येतो. श्रवण, नयन, कर, चरणादि अवयवांनीं जगत्-व्यवहार चालवितो. त्याचा देह अनेक कार्य-क्षेत्रांत वावरण्यास कार्यक्षम होतो. मनुष्यांत विवेकशक्ति उत्पन्न होते. हे सर्व परमात्म्याच्या सृष्टीचे आश्चर्यकारक नियम आहेत. ईशप्रणीत कायदे मानावे लागतात. कायदे म्हणून असावेच लागतात. त्याविषयींच्या नियमावलीचा एक ग्रंथहि असावाच लागतो. श्रुतिशास्त्रवचन हितकर असतें. त्यांत सांगितलेल्या ग्राह्याग्राह्य विचाराचेंच अवलंबन केलें पाहिजे. श्रुतिस्मृति या परमेश्वराच्या आज्ञा आहेत; ते शासनग्रंथ आहेत.

## श्रुतिस्मृतिवचन

**श्रुतिस्मृत्यदितो धर्मो ह्यधर्मस्तद्विपर्ययः ।**

—श्रुतिस्मृतींनीं सांगितलेला, निर्णित केलेलाच धर्म होय आणि त्यांनीं निषेधिलेलाच अधर्म होय. **श्रुतिस्मृत्युदितं धर्ममनुतिष्ठन् हि मानवः । इह कीर्तिमवाप्नोति प्रेत्य चानुत्तमं सुखम् ।** (मनु. अ. २।९)—श्रुतिस्मृतींनीं निर्धारिलेल्या धर्माचेंच आचरण केलें असतां, यालोकीं मनुष्य सत्कीर्ति मिळवून सुखानें नांदतो व देहान्तीं त्या परिशुद्ध परमात्म्याच्या अनंतानंत आनंदस्वरू-पाच्या ठिकाणीं एकरूप होऊन मोक्ष प्राप्त करून घेतो. वेदांत देवपितृकार्याला विशेष महत्त्व दिलें आहे. यानें सृष्टि चालते, 'देवाण घेवाण' हा सृष्टीचा नियम आहे. यज्ञादि कर्मांपासून देवतांची तृप्ति आणि श्राद्धादि कर्मांपासून पितरांची तृप्ति होऊन जगामध्यें धनधान्य, पाऊसपाणी, संततिसंपत्ति, आरोग्यभाग्य लाभून सर्वांचेंच जीवन दिव्य सुखासमाधानाचें होतें. **यज्ञो विश्वस्य भुवनस्य नाभिः ।** यज्ञ हा विश्वाच्या स्थितीला कारण आहे. **इच्छन्ति देवाः सुन्वन्तं न स्वप्नाय स्पृहयन्ति ।** ( ऋग्वेद ८-२-१८) देवता यज्ञकर्त्या, सदाचारसंपन्न, पुरुषार्थशील, आस्तिक व विद्यासंपन्न भक्तांवर प्रेम करतात. नास्तिक लोकांवर त्यांचें प्रेम असत नाहीं. **शुद्धाः पूता भवत यज्ञियासः ।** ( ऋ. ५-५१-१ )—तुम्ही शुद्ध व्हा, पवित्र व्हा, आस्तिक व्हा, याज्ञिक व्हा, संघटित व्हा, भक्त व्हा, परोपकारी व्हा, सदाचरणी व्हा, असा श्रुति बोध करीत आहे. **ऋतस्य पथा प्रेत ।**

( यजु. ७-४५ ) सत्यमार्गाचें अवलंबन करा व त्याचें फळ मिळवा, म्हणून श्रुतीचें सांगणें आहे. जीवनाचा राजमार्ग श्रुतीनें दाखविला आहे. **सत्यस्य नावः सुकृतमपीपरन्** । ( ऋ. ९-७३-१ ) धर्मनिष्ठ सत्त्वशीलाला त्याच्या सत्याची नावच, त्याचें सत्याचरणच तारक होते. सत्कर्माच्या नावेंत बसलेलाच भवसमुद्र तरून जातो. **संश्रुतेन गमेमहि** । (अथर्व. १-१-४)— आपण वेदाच्या उपदेशाप्रमाणें वागूं या.

## श्रुतीचा एकात्म उपदेश

**तद् यद् इदमाहुः अमुं यज अमुं यज-इति एकैकं देवं एतस्यै सा विसृष्टिः एष उह्येव सर्वे देवाः** । ( शतपथ १४-४-२-१२ )—याची आराधना करा. याच्या याच्या प्रीत्यर्थ यज्ञ करा म्हणून एकेका दैवतांना पुढें करून अनेक विधानें सांगितलीं असलीं तरी हे सर्व त्या एका परमात्म्याचेंच अंश असल्यामुळें, ही सर्व तद्रूप अशी त्याचीच सृष्टि असल्यामुळें हें सर्व कांहीं त्या परमात्म्याचेंच स्वरूप आहे. तोच सर्व दैवतरूपानें आहे हें ठसविण्या-करितांच, हें लक्षांत ठेवावें. सृष्टींतल्या विविध दैवतांचा व झालेल्या अखिल कार्याचा इकडे निर्वाह होऊन तिकडे एकात्मभावाचाहि निश्चय व्हावा हा श्रुतीचा उद्देश आहे, हें यावरील श्रुतिवाक्यावरून स्पष्ट होतें. एक परमात्माच सर्वांच्या ठिकाणीं व्यापून आहे. त्याच्यापासूनच हें सर्वहि झालें. तोच सर्व जीवांचें, सर्व जीवांच्या देहाचें यथार्थ एक सच्चिदानंदघन स्वरूप होय. हें तात्त्विक ज्ञान पटवून झालेल्या कार्याच्या निर्वाहाकरितां यज्ञादिकांचें अनुष्ठान व त्या त्या दैवतांचें आराधन त्या त्या विषयीं अधिकारभेदानें अवश्य असल्या-मुळें तें निष्कामानें व निश्चयानें शास्त्रोक्तरीत्या यथासांग पार पाडा व तें इहपर सुखाकरितां पार पाडलेंच पाहिजे असा श्रुतीचा उपदेश आहे.

## आर्यांची जीवनदिशा

**स्वस्ति पन्थामनुचरेम** । आपण सर्वत्र श्रुतिप्रतिपादित अशा सन्मा-र्गानेंच जाऊं या. **ऋतस्य पन्था न तरंति दुष्कृतः** । ( ऋ. ९।७३।६ )— दुर्मार्गी व दुष्कर्मी सत्याला, सत्कीर्तीला, सन्मार्गाला व इहपर सुखालाहि आंचवतात ( म्हणून आम्ही दुर्मार्गी होऊं नये, दुष्कर्म करूं नये. ) **देवानां सख्यमुपसेदिमा वयम्** । ( ऋ. १।८९।२ ) आम्ही देवाचें सख्य संपादावें.

**न ऋते श्रान्तस्य सख्याय देवाः** ( ऋ. ४।३३।११ ) परिश्रम केल्याशिवाय देवाची मैत्री होत नाहीं, देवांचें साहाय्य लाभत नाहीं. **न देवानामतिव्रतं शतात्मा च न जीवाति ।** देवतांप्रीत्यर्थ यागहवनादि सत्कर्म न करतां, त्यांचीं स्थळें पवित्र पावन न राखतां, तेथील विनियोग योग्य प्रकारें न चालवितां, नास्तिकपणानें देवदेवतांचे नियम मोडून, देवताविषयक कर्म न करून जो देवद्रोही होतो त्याचें आयुष्य क्षीण होतें. शंभर वर्षांचें आयुष्य असलें तरी त्या दोषानें, थोड्याच काळांत तो मरण पावतो, म्हणून देवताविषयक द्रोहास पात्र होऊं नये. **स्थिरैरंगैस्तुष्टुवा ँसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ।** (यजु. २५-२१) —सबल इंद्रियांनीं व धष्टपुष्ट शरीरांनीं आम्हीं ज्यामुळें देवांना आनंद होईल अशीं शुद्ध पवित्र सत्कर्मे करीत देवांना हितावह होईल असें दिव्य जीवन चालवावें. **अदीनाः स्याम शरदः शतम् ।** ( यजु. ३६–२४ ) देवतांचे सर्व नियम पाळून आम्ही शंभर वर्षेपर्यंत कसलेंहि दैन्य नसतां सुखानें जगावें. **अयज्ञियो हत वर्चा भवति ।** ( अथर्व. १२।२।३ ) यज्ञहीन मनुष्य तेजोहीन होतो. **वयं देवानां सुमतौ स्याम ।** ( अथर्व ६–४७–२ ) आम्ही देवांच्या मंगलमय उपदेशाप्रमाणें वागावें. **वयं सर्वेषु यशसः स्याम ।** (अथर्व. ६।५८।२) सर्व सत्कार्यांत आम्हांला यश प्राप्त व्हावें, धर्मप्रचारार्थ गेलों असतां सर्व जगांत आम्ही यशस्वी व्हावें. **मानो द्विक्षत कश्चन ।** ( अथर्व. १२।१।२४ ) आमचा कोणीहि द्वेष करूं नये. **आरोहणमाक्रमणं जीवतो जीवतोऽयनम् ।** वर चढणें आणि पुढें जाणें प्रत्येक जिवंत मनुष्याचें ‘ लक्ष्य ’ ( ध्येय ) असतेंच. **सर्वान् पथो अनृणा आक्षियेम ।** ( अथर्व. ६।११७।३ ) यज्ञयागांनीं देवऋणापासून, वेदाध्ययनानें ऋषिऋणापासून व सुपुत्रप्राप्तीनें पितृऋणापासून मुक्त होऊन, सकल सन्मार्गांनीं आम्हीं जावें. **परैतु मृत्यु रमृतं नएतु ।।** (अथर्व. १८।३।६२) आमचा मृत्यु टळून आम्हांला अमृतत्वाची प्राप्ति व्हावी. **सर्वमेव शमस्तु नः ।** ( अथर्व. १९।९।१४ ) आमच्या बाबतींत सर्वहि मंगलप्रद कल्याणकारी होवो. यावरून आर्यांची जीवनदिशा उमगते.

### तीन धर्मस्कंध–( यज्ञ, दान, तप )

**त्रयो धर्मस्कंधा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एव द्वितीयो ब्रह्मचार्याचार्यकुलवासी त्रितीयोत्यन्तमात्मानमाचार्यकुलेऽवसादयन्सर्व एते पुण्यलोका भवन्ति ब्रह्मस ँस्थोऽमृतत्वमेति** ( छांदोग्य. अ.

२।२३।१ )—धर्माचे तीन विभाग आहेत–यज्ञ, ( वेदांचें ) अध्ययन, दान हा पहिला विभाग. यांत गृहस्थाश्रमाचा अंतर्भाव होतो. तप हा दुसरा विभाग. यांत वानप्रस्थांचा अंतर्भाव होतो. तिसरा ब्रह्मचर्य. यांत वेदाध्ययन करणाऱ्या ब्रह्मचाऱ्यांचा व आमरण ब्रह्मचर्य पाळून अखंड गुरुकुलवास करणाऱ्या नैतिक ब्रह्मचाऱ्यांचा अंतर्भाव होतो. हे सर्वहि सत्कीर्तीचे पुण्यशीलच होत. अशा तत्तदाश्रमोचित रीतीनें शास्त्रीय अनुष्ठान प्रथम करून नंतर संन्यास घेऊन जो ब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार करून घेतो त्याला अमृतत्वाची प्राप्ति होते म्हणजे मोक्ष मिळतो. एवंच ब्रह्मस्थितींत असणारा अविनाशी ब्रह्मरूप होतो.

## यज्ञाचें महत्त्व

**यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ।**
**ते हनाकं माहिमानः सचन्ते यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ॥**

—परमात्म्याची सेवा या दृष्टीनें भक्तिपुरःसर स्वस्वधर्मोचित यज्ञ करून त्या यज्ञाच्या बळानें पूर्वजांनीं स्वर्गाची प्राप्ति करून घेतली व तिथलें वैभव अनुभविलें. ज्या देवत्वाकरितां अनुष्ठान केलें ते देव ज्या ठिकाणीं होते त्या ठिकाणीं जाऊन तेहि आपापल्या अनुष्ठित कर्माच्या तारतम्यानें ते ते देव आले. इतका माहिमा संपादन केला. अमुक यज्ञ अशा इतक्या वेळां केला म्हणजे त्याला अमुक पदाची प्राप्ति होते असे धर्म, पूर्वींच वेदांनीं सांगितले आहेत. शंभर अश्वमेध यज्ञ केले, तर प्रत्यक्ष तो इंद्रच होतो, हें सर्वांनाहि ऐकून माहीत आहे. स्वर्गाची इच्छा असणाऱ्यानें ज्योतिष्टोम नांवाचा यज्ञ करावा अशा अर्थाचें " **स्वर्गकामो ज्योतिष्टोमेन यजेत** " असें एक श्रुतिवाक्य आहे, द्रव्ययज्ञ व ज्ञानयज्ञ असें यज्ञांत दोन प्रकार आहेत. द्रव्ययज्ञानें दिव्य भोगाच्या स्वर्गादिलोकांची प्राप्ति होते व ज्ञानयज्ञानें मोक्षाची प्राप्ति होते. लोकांतरप्राप्तीची व दिव्य भोगांची इच्छा न बाळगतां निष्कामानें यज्ञानुष्ठान केल्यास तें चित्तशुद्धीस म्हणजे वासनाक्षयास कारण होऊन तें क्रमानें ज्ञानद्वारां मोक्षास कारणीभूत होतें.

**यज्ञेना हि देवा दिवंगता यज्ञेनासुरानुपानुदन्त यज्ञेन द्विषन्तो मित्रा भवन्ति यज्ञे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्यज्ञं परमं वदन्ति ॥** ( म. ना. उ. ७९ )
—यज्ञाच्या योगानेंच मनुष्य देवरूप होऊन स्वर्गास गेले. देवांनीं यज्ञाच्या

बलानेंच असुरांचा नाश केला. यज्ञानें शत्रु असणारे देखील मित्र होतात. या यज्ञानेंच देव जगाचे अधिकारी झाले. यज्ञरूप सत्कर्मानेंच सुख लाभतें, दुःख नष्ट होतें व दुष्टांचा संहार होतो. त्यामुळें यज्ञ श्रेष्ठ म्हणून सांगतात. काम्य यज्ञानें स्वर्ग, निष्काम यज्ञानें चित्तशुद्धि आणि ज्ञानयज्ञानें मुक्ति मिळते.

**शतं क्रतूनामाहृत्य देवराट् त्रिदिवं गतः ।**
**तपांस्युग्राणि चास्थाय दिवं प्राप्ता महर्षयः ॥**

( वा. रा. सा. ११०–२९ )

—शंभर अश्वमेध यज्ञ करून मनुष्य इंद्र झाला आणि त्यानें स्वर्गाचें आधिपत्य मिळविलें. इंद्राला ‘ शतक्रतु ’ असेंहि नांव आहे. क्रतुः म्हणजे यज्ञ. शंभर यज्ञ ज्यानें केले तो ‘ शतक्रतु ’. उग्र तप आचरून कांहीं महर्षि स्वर्गाला तर कांहीं ब्रह्मलोकालाच गेले. हा या श्लोकाचा अर्थ. शंभर अश्वमेध यज्ञांनीं इंद्र होतां येतें व केलेल्या सकाम निष्काम उग्र तपानें स्वर्गापासून ब्रह्मलोकापर्यंत जातां येतें, याला हा रामायणाचाहि श्लोक प्रमाण आहे.

### तपाचें महत्त्व

**ऋतं तपः सत्यं तपः श्रुतं तपः शान्तं तपो दमस्तपः ।**
**शमस्तपो दानं तपो यज्ञं तपो भूर्भुवस्सुर्ब्रह्मैतदुपास्यैतत्तपः ॥**

( म. ना. उ. १–१० )

—पारमार्थिक सत्य बोलणें म्हणजे ब्रह्मनिरूपण करणें. व्यावहारिक सत्य बोलणें म्हणजे जसेंच्या तसें सांगणें. श्रीगुरुमुखानें श्रवण करणें, कोणत्याहि प्रसंगीं शांत राहणें, बाह्य देहेंद्रियांचा निग्रह करणें, अंतर्मनोबुद्ध्यादिकांचा निग्रह करणें, सत्पात्रीं यथाशक्ति दान देणें, होमहवनादि करणें ( देवपूजा करणें, लोकांत ऐक्य निर्माण करणें ), सच्चिदानंदात्मक ब्रह्मस्वरूपाची उपासना चालविणें, हें सर्वहि तपच होय.

विद्याभ्यास, गुरुशुश्रूषा व ब्रह्मचर्य हें ब्रह्मचर्याश्रमाचें तप; दान, दया, विध्युक्त कर्म, उपासना, पातिव्रत्य व एकपत्नीव्रत हें गृहस्थाश्रमीयांचें तप; देहदंडनपूर्वक कर्म–उपासना चालवून मुक्त होण्याकरितां ज्ञानविचार करणें हें वानप्रस्थांचें तप; व सर्वत्यागपुरःसर केवल ब्रह्मानुसंधानपर असणें हें संन्याश्यांचें तप होय.

**ब्राह्मणस्य तपो ज्ञानं तपः क्षत्रस्य रक्षणं ।**
**वैश्यस्य तु तपो वार्ता तपः शूद्रस्य सेवनम् ॥ ३३५ ॥**
**ऋषयः संयतात्मानः फलमूलानिलाशनाः ।**
**तपसैव प्रपश्यन्ति त्रैलोक्यं सचराचरम् ॥ ३३६ ॥**
**औषधान्यगदो विद्या दैवी च विविधा स्थितिः ।**
**तपसैव प्रसिध्यन्ति तपस्तेषां हि साधनम् ॥ ३३७ ॥**
**यद्दुस्तरं यद्दुरापं यद्दुर्गं यच्च दुष्करम् ।**
**सर्वं तत्तपसा साध्यं तपो हि दुरतिक्रमम् ॥ ३३८ ॥**

( मनुधर्म अ. ११ )

—ज्ञानच ब्राह्मणांचें तप, प्रजारक्षणच क्षत्रियांचें तप, धनार्जनच वैश्यांचें तप व सेवाच शूद्रांचें तप. फलमूलवायुभक्षणशील, मनोजयी, जितेंद्रिय ऋषि तपोबलानें बसल्या ठिकाणींच, सहज साऱ्या त्रैलोक्याच्या प्राणिमात्रांना एकदम पाहात असत. सामान्य औषधीं, दिव्यौषधि, आरोग्यसाधन, सर्व विद्या, सर्ववेदशास्त्रप्राविण्य, सकलदिव्यसिद्धि, लोकांतरगमन इत्यादि सर्वहि तपानेंच ते संपादन करीत असत. तपच एक त्यांचें सर्वसाधन असे. कष्टानें उल्लंघनीय ठरणारा संसारसमुद्र, कष्टानेंच प्राप्त होणारें ब्रह्मपद, कष्टानें पूर्ण केली जाणारी संसारयात्रा, करण्यास अतिकठीण जाणारें मोक्षसाधन हें व असें सर्वहि एक तपानेंच सुसाध्य होतें. तपःशक्ति ही अत्यंत दुर्दम्य आहे. **तपसा चीयते ब्रह्म ।** ( मुंडक १–८ ) तपोबलानेंच परमेश्वरानें सृष्टि उत्पन्न केली. **सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ॥** ( मुंडक ३–१–५ ) सत्यानें, तपानें, अपरोक्षज्ञानानें व ब्रह्मचर्यानें आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो. ब्रह्मनिरूपण आणि सत्य भाषण, शरीराच्या व मनाच्या शुद्ध्यर्थ केलेलें कृच्छ्रचांद्रायणादिकांचें शारीरिक तप, इतर व्रतनियमांचें पालन, ईश व सद्गुरु यांची सेवा, सत्संग व आत्मविचार, आवरणविक्षेपरहित सदाच चिन्मात्र असणारें केवळ आनंदघन स्वरूपच मी असा निश्चय करून कल्पनाशंकारहित असणें, त्या त्या आश्रमधर्माप्रमाणें उत्कट ब्रह्मचर्य पाळणें, इत्यादिकांच्या अविरत साधनानें अचूक आत्मसाक्षात्कार होतो.

तैत्तिरीय भृगुवल्लींत " **तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व** " " **तपो ब्रह्मेति** " ' तपानें ब्रह्म जाण ', असें सांगितलें आहे. तपानेंच ब्रह्म समजून येत

असल्यामुळें औपचारिकरीत्या तपच ब्रह्म म्हणून येथें म्हटलें आहे. ब्रह्मस्वरूप समजून घेण्यास आवश्यक अशा तात्त्विक तपाचें लक्षणहि इथे सांगितलें आहे. **यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति । यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति । तद्विजिज्ञासस्व । तद्ब्रह्मेति ॥** जेथून या चराचराची उत्पत्ति होते, ज्याच्यामुळें हें चराचर विश्व जगतें व अंत्यसमयीं जिथे जाऊन विलीन होतें, जें या चराचराच्या उत्पत्तिस्थितिलयकाळींहि एकरूप असतें, समुद्रतरंगाप्रमाणें आपल्या उत्पत्तिस्थितिलयकाळींहि हें चराचर विश्व, हे सर्व प्राणीपदार्थ ज्याला सोडून राहात नाहींत, असें तें काय व कोणतें याचा छडा लाव. तेंच ब्रह्म आहे. असें वरुणानें आपल्या भृगु नांवाच्या पुत्राला इथे सांगितलें आहे. या ठिकाणीं ब्रह्मप्राप्तिकर साधनाचा उल्लेख आहे. ब्रह्मप्रापक तप कोणतें तें या ठिकाणीं उघड करून सांगितलें आहे. भृगु एकान्तांत उक्त लक्षणाची ती वस्तु कोणती म्हणून विचार करूं लागला. अन्न, प्राण, मन व विज्ञान अशा क्रमानें त्यानें विचार केला. उक्त लक्षणांचें साम्य त्याला यांतून प्रथम प्रथम भासलें पण पित्याकडे जाऊन त्याचें क्रमाक्रमानें निवेदन केल्यानंतर पुन्हां अधिक खोल विचार करून 'तें जाण' म्हणून एकच एक उत्तर प्रत्येक वेळां मिळाल्यामुळें पुनः पुन्हां त्यावर विचार करून 'हें नव्हे', 'हें नव्हे', अशा निर्णयाला येऊन शेवटीं, उक्त लक्षणांनीं युक्त असणारा एक आनंदच आहे व तें ब्रह्म केवल आनंदरूपच आहे, असें त्यानें निश्चयानें जाणलें. ही आख्यायिका या उपनिषदांतून आली आहे. **तपःप्रभावाद्देवप्रसादाच्च ब्रह्म ह श्वेताश्वेतरोऽथ विद्वान् ॥** (श्वेताश्वे० ६।२१)—अचूक तपाच्या योगानें व देवाच्या प्रभावी अनुग्रहानें, श्वेताश्वेतर ऋषीनें तें ब्रह्म जाणलें. असा या मंत्राचा अर्थ आहे. ब्रह्मज्ञानाला ईश्वर-कृपेचीहि जोड लागते, हें या उपनिषद्प्रमाणावरून स्पष्ट होतें.

जाबालि ऋषिवर्या ! तुमच्या सर्व प्रश्नांना उत्तरें देण्याचा हा जो मी उपक्रम चालविला आहे, तो सकल क्लृप्त असणाऱ्या तुम्हांकरितां नव्हे. बनेल त्या मार्गानें कसेंहि करून मला अयोध्येच्या सिंहासनावर बसवावें व मी आनंदपूर्वक न्यायानें चालविलेला राज्यकारभार डोळे भरून पाहून आनंदावें, ही तुमची इच्छा व त्याकरितां हा तुमचा उलटा सुलटा प्रयत्न चाललेला आहे हें मी जाणतों. पण तुम्ही केलेल्या नास्तिकवादाचा दुष्परिणाम लोकांच्या कोंवळ्या मनावर होऊं नये म्हणून, तुम्ही प्रतिपादिलेल्या एकेका विषयाचें निराकरण मी करीत

आहे. आतांपर्यंत सत्याचें पालन, सदाचार, मातापिताआचार्यादि गुरु-जनांवरचा विश्वास, त्यांच्या आज्ञेचें पालन, पितृयज्ञ, देवयज्ञ " **देहो म्रियते न जीव इति** " हें तत्त्व म्हणजे जीवाचें अनश्वरत्व व देहाचें नश्वरत्व, श्राद्ध, तप, आदि विषयांवर श्रुतियुक्तींनीं थोडक्यांत विचार केला. आतां अन्नदान व त्याग यांवर जो तुम्ही आक्षेप घेतला आहे त्याच्यावर थोडा विचार करूं.

## दानाचें महत्त्व

अन्नदानाचें महत्त्व फार आहे. अन्नदान म्हणजे एक जीवनदानच आहे. प्राणी भुकेनें कासावीस होतो व अगदीं लाचार बनतो. धन आणि धान्य यांची जोडी आहे. मनुष्याला दोन्हींचीहि अति आवश्यकता असते हें बोलून दाखवावयालाच नको. **अन्नं प्राणमुत जीवातुमाहुः** । अन्नच प्राण, अन्नच जीवन. अतिशय कडकडून भूक लागली असतां केव्हां दोन घांस अन्न खाईन असें होतें. डोळ्यांना अंधारी येते, प्राणांतिक समय वाटतो. भुकेनें जीव अतिशय व्याकुळ होतो. कधीं कधीं अतिक्षुधेनें मूर्छा सुद्धां येते. एकंदरींत क्षुधेचा तो माध्यान्हसमय म्हणजे एक प्रलयकाळच होय. देवानें भूक एक अनुभवावयाला लावून, प्राण्यांना प्राणांतिक वेदनांचा अल्पसा परिचयच करून दिला आहे. वेळेवर अन्न न मिळाल्यास प्राण कासावीस होऊन मेल्याचींहि उदाहरणें आहेत. दारांत आलेल्या क्षुधिताला अमृतोपम अन्न घालून जो ही क्षुधाज्वाला शांत करतो व नवजीवन देतो तोच खरा **दाता** होय. सर्व दात्यांत अन्नदात्याची योग्यता मोठी. असहाय दीन जनांच्या क्षुधेची ज्याला कल्पनाहि येत नाहीं, दीन होऊन, तोंड वेंगाडून, केविलवाण्या शब्दानें, हात तोंडाकडे नेऊन, अन्नाची याचना करणाऱ्याला पाहून, ज्याचें हृदय पिळवटून येत नाहीं, त्या दीन याचकाला, चांगल्या प्रकारची अनुकूलता असूनहि, जो अन्न देत नाहीं, त्याला पाहून दयेनें लौकर वाढण्याऐवजीं जो त्याच्यावर वसकन रागावतो, क्षुधित व्याघ्राप्रमाणें त्याच्यावरच तुटून पडतो, अपशब्द बोलून व दंडाला धरून, त्याला जो बाहेर हांकून लावतो, अन्नार्थी दीन क्षुधिताविषयीं आपलें हृदय इतकें पाषाणवत् कठोर करतो, ऐन माध्यान्हकाळीं दारीं उभा राहिलेल्या क्षुधित अतिथीची विचारपूसहि न करतां दार लावून, आपण मात्र आंत एकटा व्यवस्थितपणें बसून, आग्रह करकरून वाढत असलेलें मिष्टान्न, अति आनंदानें ( व आढ्यतेनें ) आकंठ जेवतो, त्याला, त्या

क्षुधित याचकांचा व अतिथींचा तळतळाट लागतो. यांच्या या क्षुद्बाधेचा परिचय, त्याला त्याच्या प्राणान्तकाळीं यम करून देतो. त्याचे अन्नान म्हणून प्राण जातात. कर्म करतांना तो हंसत करतो, पण त्याचे परिणाम भोगतांना मात्र रडत भोगतो. याहूनहि अधिक शिक्षा त्याला त्या यमपुरींत भोगावी लागते. अन्नदात्याचें अन्न असो वा धनदात्याचें धन असो, तें सत्पात्रीं दान केल्यानें कधीं कमी न होतां उलट वाढतेंच. त्याला परमात्मा आणखी अधिक देतो. ' द्यावें तसें घ्यावें, ' अशा न्यायाच्या या जगांत जो दुसऱ्याला देत नाहीं त्याला दुसऱ्यापासून मिळत पण नाहीं. ' करावें तसें भरावें. ' त्यानें इतरांच्या बाबतींत केल्याप्रमाणेंच त्याच्या कष्टकालीं, त्याला इतर लोक करतात. त्याच्याशीं एखादा शब्द बोलावयालाहि कोणी तयार नसतो. कोणीहि त्याला असा भेटत नाहीं कीं, जो त्याची कींव करील. ऋग्वेदांतल्या ' धनान्नदान ' सूक्तांत अशा तऱ्हेचा विषय आला आहे. यांपैकीं कांहीं मंत्रांचा इथे विचार करूं.

**न वा उ देवाः क्षुधमिद्वधं ददुरुता–शितमुपगच्छन्ति मृत्यवः ।**
**उतो रयिः पृणतो नो–पदस्यत्युतापृणन् मर्डितारं न विन्दते ॥ १ ॥**

( ऋ. १०।११७ )

—भूक नव्हे भुकेच्या रूपानें, प्राण्यांचा वधच देवानें केला आहे. भुकेच्या रूपानें साक्षात् मृत्युच क्षुधिताकडे येत असतो. दारीं आलेल्या अशा क्षुधिताला जो अन्न देत नाहीं, त्या क्षुधिताच्या प्राणासारखेच त्याचेहि प्राण, एक दिवस तो यम घेऊन जातो. दात्याचें धनधान्य कधीं कमी होत नाहीं. जो दुसऱ्याला धनधान्य न देतां आपणच उपभोगितो त्याला जगांत कोणी आप्त मिळत नाहीं, सुखाचा शब्दहि कोणी त्याच्याशीं बोलूं इच्छीत नाहीं.

**य आध्राय च कमानाय पित्वोऽन्नवांस्त्वन्रफितायोपजग्मुषे ।**
**स्थिरं मनः कृणुते सेवते पुरोतो चित्समर्डितारं न विन्दते ॥ २ ॥**

—भुकेनें व्याकुळ होऊन ' देहि ' म्हणून दाराशीं उभा राहिलेल्या दीन याचकाला, जो दुरुत्तरानें अधिक व्यथित करतो; अशा भुकेनें कासावीस होत असलेल्या केंविलवाण्या याचकाबद्दलहि, जो मन कठोर करतो; पाहिजे तितकें अनुकूल असतांहि अशा याचकांना त्रासवून व अनेक प्रकारें व्यथित करून, ऐन माध्यान्हाच्या वेळींहि त्यांना कांहीं न देतां, त्यांच्यापुढें आपण मात्र पोट

भरून सुग्रास अन्न खातो; त्या क्रूर पाप्याला जगांत कोणी सुखदाता मिळत नाहीं व अंतीं अनेक यमयातना भोगाव्या लागतात.

**स इद् भोजो यो गृहवे ददात्यन्न–कामाय चरते कृशाय ।**
**अरमस्मै भवति यामहूता उता परीषु कृणुते सखायम् ॥ ३ ॥**

—भुकेनें व्याकुळ होऊन अन्नाच्या इच्छेनें, दाराशीं आलेल्या कृश अतिथ्याला, जो मृदुमधुर भाषणांनीं गौरवून, सुग्रास अन्नानें संतुष्ट करतो, तोच खरा **दाता** व तोच खरा गृहस्थाश्रमी. त्याला यज्ञाचें संपूर्ण फळ मिळतें, धन-धान्याची समृद्धि होते. तो आपल्या शत्रूंनाहि मित्र करूं शकतो. जाईल तिथे त्याचा गौरव होऊन त्याला कांहीं कमी पडत नाहीं; तो लोकप्रिय व लोक-मान्य होतो. इथे उत्तम कीर्ति संपादून आत्मज्ञानानें अंतीं मुक्त होतो.

**पृणीयादिन्नाधमानाय तव्यान् द्राघीयांस–मनुपश्येत पन्थाम् ।**
**ओहि वर्तन्ते रथ्येव चक्राऽन्यमन्यमुपतिष्ठन्त रायः ॥५॥**

—धनाढ्यानें याचकांना धनदान अवश्य करावें. धनधान्याचें दान करणाऱ्याला आपोआपच सर्वांत श्रेष्ठ असा मोक्षमार्ग दृग्गोचर होतो. धांव-णाऱ्या रथाच्या चक्राप्रमाणें धनधान्यादि संपत्ति, एक वेळ एके ठिकाणीं तर दुसऱ्या वेळीं दुसऱ्या ठिकाणीं जात असते. अशा अशाश्वत संपत्तीचा भरवंसा न बाळगतां, अनुकूल असतांनाच जो दानधर्म करून आपल्या जन्माचें सार्थक करून घेतो तो धन्य, असें श्रुतीचें सांगणें आहे.

**मोघमन्नं विन्दते अप्रचेताः सत्यं ब्रवीमि वध इत् स तस्य ।**
**नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी ॥६॥**

( ऋ. १०।११७ धनान्नसूक्त )

—ज्याचें मन इतकें उदार असत नाहीं, त्यानें विनाकारणच गृहादि धनधान्यांचें संपादन केलें असें समजावें. अशानें मिळविलेलें सर्व धनधान्य व्यर्थच होय. खरें सांगावयाचें म्हणजे, दानाशिवाय असलेला हा त्याचा धनधान्यसंग्रह, त्याला ( अनेक प्रकारानें ) मृत्युरूपच होतो. जो आपल्या धन-धान्यादिकांनीं देवदेवता, मातापिता, इष्टमित्र, दीनदुबळे, गोरगरीब, अतिथि-याचक, यांना तृप्त करीत नाहीं; जो केवळ आपल्यापुरतेंच पाहातो; तो, अन्न नव्हे त्या अन्नाच्या रूपानें, केवळ पापच भक्षण करतो असें समजावें.

तैत्तिरीय भृगुवल्लींतहि अन्न आणि अन्नदान यांचें महत्त्व सांगितलेलें आढळतें. '**अन्नं न निंद्यात्**'–अन्नाची निंदा करूं नये. '**अन्नं न परिचक्षीत**'– अन्नाचा तिरस्कार करूं नये. '**अन्नं बहु कुर्वीत**'– अन्नाचा म्हणजे धान्याचा पुष्कळ संग्रह करावा.

**न कंचन वसतौ प्रत्याचक्षीत । तद्व्रतम् । तस्माद्यया कया च विधया बव्हन्नं प्राप्नुयात् । अराध्यस्मा अन्नमित्याचक्षते ।** ( भृगु. १० )

——कोणी परस्थ जर वसतीला घरीं आला, तर त्याला पावसांत, थंडींत, उन्हांत, तसेंच उभें ठेऊन नुसती कोरडी चौकशीच करीत, त्याला त्रस्त न करतां त्याच्या त्याच्या अधिकारानुसार आदरातिथ्य करावें. एकदम नाहीं म्हणून अंगावर धांवून जाऊं नये; किंवा अर्धचंद्र देऊं नये; किंवा त्याला टाळण्यासाठीं घरांतून स्वतः पाय काढूं नये. घरीं आलेल्यांशीं आदराचें व प्रेमाचें वर्तन ठेऊन, अन्नोदकांनीं आतिथ्य करणें, हें एक 'गृहस्था'चें व्रतच आहे. अशा रीतीनें आलेल्या अतिथींना व गोरगरिबांना लागतें म्हणून आधींच या अन्नदानाकरितां, गृहस्थांनीं नाना तऱ्हेच्या धान्यादिकांचा संग्रह करून ठेवलेला असला पाहिजे. घरीं आलेल्यांना सत्कारून, आदरानें, 'भोजन करूनच जावें,' म्हणून म्हणत असलें पाहिजे. माध्यान्हीं भोजनाच्या वेळींच आल्यास, 'स्वयंपाक सिद्ध झाला आहे, उशीर नाहीं, जेवूनच जा' म्हणून ठेवून घेत असलें पाहिजे. हा आर्यांचा प्रघात आहे. अतिथिसत्कार, आल्यागेल्याचें आदरातिथ्य व अन्नदान, भारताच्या, आर्य संस्कृतीच्या व सनातन धर्माच्या अनेक वैशिष्ट्यांपैकीं वैशिष्ट्य आहे.

**एतद्वै मुखतोऽन्नँ राद्धम् । मुखतोऽस्मा अन्नँ राध्यते ॥ एतद्वै मध्यतोऽन्नँ राद्धम् । मध्यतोऽस्मा अन्नँ राध्यते ॥ एतद्वा अंततोऽन्नँ राद्धम् । अंततोऽस्मा अन्नँ राध्यते ॥**

——सिद्ध झालेलें अन्न अतिथीला योग्य सत्कारपूर्वक द्यावें. आपल्या घरीं कोणीं आलें असतां, त्याला जितक्या प्रेमानें व सत्कारानें जो जेवूं घालतो, तितक्याच प्रेमानें व सत्कारानें त्यालाहि गेल्या ठिकाणीं, दुसरे जेवूं घालतात. त्यानें मध्यम प्रतीच्या सत्कारानें दुसऱ्याला अन्न घातलें, तर त्यालाहि इतरांकडून तसेंच घडतें. अति तुच्छतेनें व तिरस्कारानें अतिथीला अन्न दिल्यास, दुसरेहि त्याला त्याप्रमाणेंच अन्न देतात. दुसऱ्यास जसें करावें, तसेंच दुसऱ्याकडून परतपावतीनें लाभतें. आपण दिल्याप्रमाणेंच दुसऱ्याकडूनहि आपणास

प्राप्त होतें हें कोणीहि विसरूं नये. क्रिया आणि प्रतिक्रिया, उलट त्याच प्रमाणांत परत मिळतात. आपल्या ध्वनीप्रमाणें प्रतिध्वनि येतो."पेरिलें तें उगवतें । बोलण्यासारखें उत्तर येतें ।" हें तत्त्वच इथे दाखविलें आहे.

**स्वर्णकं प्राणरूपकम्** । अन्नाच्या खालोखाल दुसरें दान म्हणजे द्रव्यदान होय. हें सुद्धां प्राणरूपच म्हणून सांगितलें आहे. **दक्षिणावन्तोऽमृतं भजन्ते** ॥ ( ऋ. १-१२५-६ ) ऋग्वेदांत, ब्राह्मणांना दक्षिणा देऊन सत्कार करणारे, अमृतत्व मिळवितात असें सांगितलें आहे. **एतत्खलु वाव तप इत्याहुर्यत्स्वं ददातीति** । ( तै. सं. ) या मंत्राचा भावार्थ पाहूं. देश, काल आणि पात्र पाहून, सत्कारपूर्वक व शुद्धबुद्धिपुरःसर, प्रतिफलाची आशा न ठेवतां दिलेलें दानच खरें दान. हेंच गृहस्थाचें मोठें तप होय. असा या मंत्राचा भावार्थ आहे.

## हाच खरा त्याग

आतां त्यागाविषयीं बघूं – या आखिल कार्याचें कारण म्हणून असणारें, तें आनंदघन परमात्मस्वरूप स्वतःपूर्ण आहे. आनंदघन स्वरूपाला कशाची आवश्यकता व अपेक्षा असणार ? तें सदाचेंच अन्यनिरपेक्ष आहे. आनंदघन रूपाला कशापासूनच कांहीं प्रयोजन नसतांना, तें कशाची इच्छा करील ? त्या स्वयंपूर्ण असणाऱ्या आनंदमात्र रूपाला, या स्थिरचर विश्वापासून कसलें प्रयोजन साधावयाचें आहे ? कारणाला कार्याची कसलीहि जरुरी नसते; सर्वपूर्व असणारें अद्वितीय कारण आपल्या स्वभावानेंच सदैव सर्वकार्यशून्य असतें. कारण पूर्ण असतें; कार्य हें अल्प असतें. पूर्ण कधीं अल्प होत नाहीं व पूर्णांत अल्प कधीं राहूं शकत नाहीं. कारण सदोदितच निर्मेळ असतें. तें सर्वथैव अद्वितीयच असतें. एकापासून सर्व संख्या मोजतात. तरी सर्वपूर्व या एक आंकड्यांत दोन आंकडा नाहीं व दोहोंपासून पुढें क्रमाक्रमानें वाढत जाणाऱ्या अनेक संख्याहि पण नाहींत. तो एक जसा अगदीं सबंध एकच असतो, तसेंच हें कारण एकच एक असून तें स्वरूपानें आनंदघन आहे. माया म्हणजेच दुसरी कल्पना. **मायामात्रमिदं द्वैतम्** । तिथे न मायेचें द्वैत, न मायेपासून झालेलें विविध अनेकत्व. **प्रपञ्चोपशमं शान्तं शिवमद्वैतम्** । तें मुळांतूनच द्वैतशून्य, प्रपंचशून्य आणि म्हणूनच नितांत शांत, परम सुखघन व निखिल अद्वितीय असें आहे. अशा द्वैतशून्य व प्रपंचशून्य आनंदघन

कारणस्वरूपांत, द्वैत-मूळ हा, या विविध प्रपंचाचा केवळ अध्यारोप आहे. **एकस्मिन्वस्तुनि अन्यस्यारोपः अध्यारोपः।**—एका अखंड अपरिछिन्न वस्तूवर अन्याचा झालेला आरोप (अनाठायीं कल्पना) अध्यारोप म्हणवून घेते. एकाद्या मुळीवर झालेली सर्पाची कल्पना समूळ नष्ट झाल्याशिवाय, मुळीचें यथार्थ असलेलें रूप दृग्गोचर होणार नाहीं. मुळीला आपल्या विरुद्ध झालेल्या सर्पाच्या कल्पनेनें कसलेंहि प्रयोजन नाहीं; व कांहीं बाधकहि पण नाहीं. ती मुळी त्रिकालींहि कधीं सर्प झाली नाहीं व होतहि पण नाहीं. यथार्थ मुळीचें दर्शन घ्यावयाचें झाल्यास, सर्पाच्या भावनेचा कांहींच अवशेष शिल्लक राहातां कामाचा नाहीं. सर्पाची भावना संपूर्ण ओसरल्यानंतरच यथार्थ मुळीचें अचूक ज्ञान होतें. मुळी आपल्या रूपानें दृग्गोचर होते. असेंच कारणांत कार्य नसल्यामुळें व कारण कधीं कार्य होत नसल्यामुळें, त्यावर अनाठायीं झालेली कार्याची कल्पना, हा अध्यारोप मुळांत नसून भासत असल्यामुळें, हा अशेष नष्ट झाल्याशिवाय, त्या कारणाची यथार्थता प्रगटणार नाहीं; त्याचें आहे तशा मूळ स्वरूपाचें दर्शन होणार नाहीं. झालेली विरुद्ध कल्पना समूळ नष्ट झाल्याशिवाय वस्तुस्थिति कशी निदर्शनास येईल? केवळ स्वरूपानेंच असणाऱ्या त्या आनंदरूप कारणब्रह्मावर, तदन्य वस्तूचा म्हणजे अखिल कार्यजाताचा केवळ आरोप आहे. अशा रीतीनें नसून भासणाऱ्या अशेष कार्याची निःशेष निवृत्ति हाच **खरा 'त्याग'**. स्वरूपाच्या प्राप्त्यर्थ निजानंदाच्या प्राप्त्यर्थ, याची अत्यंतावश्यकता आहे. अशेष कार्याच्या अजिबात विरुद्ध असणाऱ्या, याच्या अगदीं पूर्वील केवल आनंदरूपांत, या निव्वळ आरोपित कार्याचें आस्तिक्य नाहीं असें सिद्ध झाल्यानंतर, या सर्वपूर्ण कारणरूप यथार्थ आनंदाच्या प्राप्त्यर्थ, निष्प्रयोजक भ्रामक सुखाची व तत्कार्याची दृष्टि, अजिबात नष्टच व्हावयाला पाहिजे. भ्रामक सुखोत्पादक निःशेष कार्याचा समूळ त्यागच सत्यसुखरूप कारण-स्वरूपाचें त्रिकालाबाधित अचूक साधन होऊं शकतें.

**नेति-प्रमाणेन निराकृताखिलो हृदा समा-स्वादित-चिद्घनामृतः।**
**त्यजेदशेषं जगदात्तसद्रसं पीत्वा यथांऽभः प्रजहाति तत्फलम्॥**

(रामगीता ३४)

—अतद्व्यावृत्तिरूपानें, 'नेति प्रमाणा'नें, हें तें नव्हे म्हणून सर्व कार्याचें निराकरण करून शुद्ध आत्मीय वृत्तीनें त्या चित्सुखामृताचा स्वाद घेत जो

जन्ममरणरहित नित्य अविनाशी होऊन राहिला आहे, त्यानें शहाळ्यांतलें सारभूत पाणी पिऊन, निःसार नरोटी फेंकून दिल्याप्रमाणें, या जगांतलें सार आत्मसुख सेवून सकल नामरूपात्मक जगत्, देहवासना व सारी भोगवासना संपूर्णपणें त्यागावी; आणि तो त्यागतोच. खऱ्याच्या लाभानें खोट्याच्या त्यागाप्रमाणेंच, तो त्यागहि आपोआपच अमलांत येतो.

**सा तैत्तिरीयश्रुतिराह सादरं न्यासं प्रशस्ताखिलकर्मणां स्फुटम् ।**
**एतावदित्याह च वाजिनां श्रुतिर्ज्ञानं विमोक्षाय न कर्म साधनम् ॥२१॥**

कृष्ण यजुर्वेदाच्या महानारायण उपनिषदांत **तानिंवा एतान्यवराणी परा ँसि न्यास एवात्यरेच यत तस्मान्न्यासमेषां तपसामतिरिक्तमाहुः ।** प्रजननादि सांगितलेलीं सर्व साधनें गौण आहेत. या सर्व साधनांपेक्षां व या सर्व तपापेक्षां त्यागच एक मोक्षाचें साक्षात् साधन आहे. न्यास म्हणजे त्याग. या त्यागाचीच या इतर सर्व साधनांवर ताण आहे.

**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ।**

—विविध कर्मानुष्ठान, पुत्रोत्पादन, द्रव्यसंपादन यापैकीं कांहींच न करतां, यांच्या त्यागानेंच मोक्ष मिळविला आणि ते अमर झाले; असें वाजसनीय श्रुतीचेंहि सांगणें आहे. उदाहरणार्थ श्रीदत्तात्रेय, सनकसनंदनादि, शुक, वामदेव, आरुणी, श्वेतकेतु, ऋहु व जडभरत इत्यादिकांचा यांत अंतर्भाव होतो. **प्रपंचाप्रवर्तकं लयोन्मुखीकरणं साधनम् ।** वृत्तीला प्रपंचाभिमुख न करतां, प्रपंचाकार होऊं न देतां, चिदानंदाहून वेगळी राहूं न देतां, त्यांत ती कायमचीच समरसून टाकून, ज्ञातज्ञानज्ञेयरहित निर्विकल्प आनंदमात्र, संविन्मात्र, केवळ एक सत्तामात्र असणेंच, मोक्षसाधन म्हणून म्हटलें आहे. भरीव अशा केवल आनंदमात्रतेंत, त्याच्या जाणिवेचा भावसुद्धां अन्यभास उत्पन्न करून तद्विलक्षणरूप निर्माण करतो. असें झाल्यास, कुठे या देहाची, देहसुखाची, जगाची व इहलोकाच्या ऐश्वर्याची निःसार भावना ! कैमुनिक न्यायानें याची इच्छाच कोण करील ? **सर्वव्यापारमुत्सृज्य अहं ब्रह्मेति भावय । अहं ब्रह्मेति निश्चित्य त्वहंभावं परित्यज ।** —अखिल बाह्यसुखाच्या व्यापाराचा संपूर्ण त्याग करून त्या केवल आनंदरूपाची भावना कर; तेंच मी म्हणून मान, ते निर्विकल्प आनंदब्रह्मच मी, म्हणून मीपणाच्या वृत्तीचा त्याग कर. निर्विकल्प आनंदरूप होऊन राहा. असा साधनमार्ग श्रुतीनें दाखविला आहे. **सुप्तेरुत्थाय**

**सुप्त्यन्तं ब्रह्मैकं प्रविचिन्त्यताम्। दद्यान्नावसरः किंचित्कामादीनां-मनागपि।** झोंपून जागें झाल्यापासून, तें पुन्हां कडकडून झोंप घेऊन इकडचें भानच नाहींसें होईपर्यंत अद्वितीय चिन्मात्र आनंदघन ब्रह्मरूपाचेंच अनुसंधान, ध्यान ठेवावें. वृत्ति उठूंच देऊं नये, कामादि विकारांची व अन्य कशाची मुळीं कल्पनाच न उठेल, अशा त्या आनंदमात्रतेंत सदाच समरसून सहज राहावें असा श्रुतीचा उपदेश व आदेश आहे. **तमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति ॥** ( बृ. उ. अ. ३. ब्रा. ५ )

—आपल्या त्या शुद्ध आत्मरूपाला जाणून स्त्रीपुत्रांच्या, वित्ताच्या व इहपरलोकांच्या इच्छांचा त्याग करून, भिक्षेनेंच केवळ आपला निर्वाह ब्राह्मण चालवीत असतात, एके ठिकाणींहि पण कुठे राहात नाहींत असा या मंत्राचा अर्थ होतो. आत्मज्ञानोत्तर असा त्याग आंगीं बाणतो, याची साक्ष या मंत्रानें पटते. विरक्तीच आत्मज्ञानाचें एक मुख्य लक्षण आहे, हें तत्त्व इथे स्पष्ट होतें. **अयं लोकः पुत्रेणैव जेयः नान्येन कर्मणा आत्मा वै पुत्रनामासि।** अशा संकुचित अर्थाच्या गौण श्रुतींचा पारदर्शी संन्याश्याच्या पक्क हृदयावर परिणाम होत नाहीं. संभोगसुखापेक्षां या लोकीं कोणतेंहि अधिक सुख नाहीं, पुत्रप्राप्तीनें सर्व सुखाची संप्राप्ति होते, एका पुत्रप्राप्तीशिवाय अन्य कोणत्याहि कर्मसाधनानें, या लोकींचें समग्र सुख अनुभविलें असें होत नाहीं, हा लोक पुत्रानेंच एक जिंकिला जातो, पुत्रप्राप्तीनेंच केवळ इहलोकींचें कर्तव्य संपतें, माझा आत्माच तूं पुत्र नांवानें आहेस या आधारानें, या लोकीं पुत्राच्या रूपानेंच आत्मप्राप्ति होते. अशा या कल्पना संन्याश्यांच्या प्रौढ विचारापुढें अत्यंत बालिश ठरतात. मुलांची सारखी रांग लागून उलट अन्नान्नदशा अधिक झालेली, पै–पैशाकरितां हात पसरत, ज्याच्या त्याच्यापुढें अन्नाकरितां तोंड वेंगाडत, अनेक आपदांनीं गांजलेलीं व खंगून गेलेलीं, दीन, कृश अशीं केंविलवाणीं कितीतरी आढळतात. त्यांना पाहिल्याबरोबर नसली तरी दुःखाची कल्पना येते; मग ते पुत्रप्राप्तीनें किती सुखी झाले असतील तें उघडच दिसतें.

**एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छंतः प्रव्रजान्ति। एतद्धस्म वै तत्पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्माऽयं लोक इति ते हस्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति।** ( बृ. अ. ४ ब्रा. ४ )

—वेगळें म्हणून थोडेंसुद्धां ज्या ठिकाणीं शिल्लक राहात नाहीं त्या आनंदमात्र असणाऱ्या, आत्मप्राप्तीची इच्छा करून त्या आनंदांतच पूर्वींचे विद्वान एकरूप होऊन गेले. आकाशांतल्या विजेप्रमाणें कांहीं काळ भ्रांतिसुखाचें साधन होऊन, अंतीं अति दुःखरूपानें परिणत होणाऱ्या, निःसार दारा, द्रव्य, पुत्र, मित्र, आदि ऐहिक व पारलौकिक सुखसाधनांचा त्याग करून, त्यांच्यामुळें सुख मिळतें ही वासना नष्ट करून, **प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरादस्पर्शनं वरम्** । या न्यायानें, बाल्यांतच विवेक-विरक्तीनें आधुनिक विद्वानहि संन्यासाश्रमाचा स्वीकार करतात; व प्राण-धारणार्थच केवळ भिक्षावृत्तीनें जीवन चालवितात. आम्हांला आत्मप्राप्तीच एक अभिप्रेत असतांना, आत्माच एक आमचा लोक असतांना, प्रजादिकांच्या साधनाचें महत्त्व आम्हांला वाटत नाहीं. त्यांच्या निष्प्रयोजकत्वाचा व निःसारत्वाचा निश्चय असल्यामुळें, त्यांची आम्हांला इच्छाच न होतां, या लोकांच्या वैभवाची कल्पनाच नसतां, धन, दारा, पुत्रादिकांना व या लोकाला तरी घेऊन आम्हीं काय करावें? अशी त्यांची भावना असते. ते सदैव आत्मानंदांतच गर्क असतात. **यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते** ॥ (बृ. ४।४।७) हृदयाचा आश्रय करून राहिलेल्या सर्व वासना जेव्हां निपटून नष्ट होतात, तेव्हां तो मर्त्यच अमर होतो. इथेच त्याला ब्रह्मरूपाची प्राप्ति होते. **शान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वाऽऽत्मन्येवात्मानं पश्यति सर्वमात्मानं पश्यति** ॥ (बृ. ४।४।२३). आत्मरूप देह, इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि आदिकांहून विलक्षण असून, त्याला यांच्या संबंधानें बाह्य भोग्य पदार्थांपासून लाभणाऱ्या विषय-सुखाचा संपर्क नाहीं. तें सदाच कर्म, त्याचें फळ व देहादिक, यांच्याशीं संबंध न ठेवणारें आहे. असें जाणणारा शांत, जितेंद्रिय, निरुपाधि, निष्क्रिय, सहनशील व दक्ष होऊन तो स्वरूपाचेंच एक लक्ष्य बाळगून असतो, आपल्यांत आपणाला बघतो, अखिल विश्व आत्मरूपानेंच पाहातो, आत्मास्थिति सुटून त्याला कशाचेंहि भान होत नाहीं. **पूर्णश्चिदानंदमयोऽवतिष्ठते न वेद बाह्यं न किंचिदांतरम्** ॥ (रामगीता ४७)—ज्ञानी चिदानंदानें अंतर्बाह्य पूर्ण असतो. आत्मानंदाव्यतिरिक्त अंतर्बाह्य दृश्याचें भान त्याला असत नाहीं.

तुर्यावस्था ही चौथी अवस्था आहे. हिचें वर्णन करतांना, “ **अदृष्टमव्य-वहार्यमग्राह्यमलक्षणम्** ”। ( मांडुक्य उ० ) अदृश्य, अव्यवहार्य, अग्राह्य व लक्षणशून्य ती आहे असें श्रुति सांगते. तेव्हां ही आत्मस्थितिरूप तुर्यावस्था, दृश्य, व्यवहार्य, ग्राह्य व लक्षणान्वित जागृत स्वप्नाहून निराळी आहे हें ठरलें. **न प्रज्ञानघनं न प्रज्ञं नाप्रज्ञम्** । या लक्षणानें सुषुप्तीहूनहि ती वेगळीच ठरते. तिसरी अवस्था ओलांडूनच चौथीची प्राप्ति होते. तिसऱ्या अवस्थेंतच दृश्याचा व दृश्य व्यवहाराचा, वासनेचा व वासनात्मक प्रपंचाचा, मी–माझें या कल्पनेचा व या कल्पनेच्या व्यवहाराचा समग्र लय झाल्यानंतर, पुढच्यांत यांपैकीं काय उरणार ? त्या निष्प्रपंच आत्मप्राप्तिकरितां निष्प्रपंचच व्हावयाला नको का ? या दृष्टीनें आत्मप्राप्तीला त्यागाची आवश्यकता नाहीं म्हणून कोण मानील ? सर्वहि दिसेनासें झालेल्या सुषुप्तीच्या पलिकडे असणारें तुर्यपद ‘ **एकात्मप्रत्ययसारम्** ’ एकात्म अनुभवानें अत्यंत सारभूत असें आहे. **त्यागः प्रपंचरूपस्य चिदात्मत्वावलोकनात्** ।—आपल्या चिन्मात्रतेच्या लक्ष्यानें, आनंदघनतेच्या स्थितीनेंच पूर्ण असणें व कोणत्याहि वृत्तिवश न होणें, हा ‘ सर्वोत्कृष्ट त्याग ’ आहे. यांत ‘ शते पञ्चाशत् ’ न्यायानें सर्व प्रकारच्या त्यागाचा व वैराग्याचा आपोआपच अंतर्भाव होतो. कृष्ण यजुर्वेदाच्या कठशाखेंत यमानें नचिकेताला ब्रह्मविद्येचा उपदेश करण्यापूर्वीं सांगितलें, “ **शतायुषः पुत्रपौत्रान्वृणीष्व बहून्पशून्हस्तिहिरण्य–मश्वान्** । **भूमेर्महदायतनं वृणीष्व स्वयं च जीव शरदो यावदिच्छसि** ॥२३॥ **ये ये कामा दुर्लभा मर्त्यलोके सर्वान्कामा ँ् छन्दतः प्रार्थयस्व** ॥ **इमा रामाः सरथाः सतूर्या नहीदृशा लम्भनीया मनुष्यैः** ॥ **आभिर्मत्प्रत्ताभिः परिचारयस्व** । ” —पूर्ण आयुष्याच्या पुत्रपौत्रांनीं, पशुपक्ष्यांनीं व अलोट संपत्तीनें सर्वतोपरि समृद्ध असणारें अखिल भूमंडलाचें साम्राज्य पाहिजे तर मागून घे. मर्त्य लोकांत ज्या लाभत नाहींत त्या सर्व कामनांना ( भोगसुखांना ) आपल्या इच्छेप्रमाणें मागून घे. रथवाद्यांसह या अप्सरा घेऊन जा. ब्रह्मविद्या कशाला पाहिजे ? अशा रीतीनें अनेक प्रकारें नचिकेताला मोहवश करण्याविषयीं बहु प्रयत्न यमानें केलें, तरी या वर्णनांना व विषयी वैभवाला तो भाळला नाहीं व ब्रह्मविद्येचा हट्टहि त्यानें सोडला नाहीं. **पराचः कामाननुयन्ति बालास्ते मृत्योर्यन्ति विततस्य पाशम्** ॥ **अथ धीरा अमृतत्वं विदित्वा ध्रुवमध्रुवेष्विह न प्रार्थयन्ते** ॥ ( कठ. उ. २–२ ) बालबुद्धीचीं माणसेंच बाह्य विषयांच्या

पाठीमागें लागतात आणि मृत्यूच्या विस्तृत जाळ्यांत आपण होऊन सांपडतात. प्रबुद्ध लोकांच याहून वेगळें आहे. ते अविनाशी आत्मरूप जाणून निश्चयी असतात. ते शाश्वतसुख क्षणभंगुर विषयसुखांत बघत नाहींत.

**सत्यं बृहदृतमुग्रं दीक्षा ब्रह्मयज्ञः पृथिवीं धारयन्ति ॥** (अथर्वण. १२)

—पारमार्थिक सत्य, व्यावहारिक सत्य, उग्र तप, सद्व्रतांची दीक्षा आणि ब्रह्मयज्ञ यांनीं पृथ्वीला धारण केलें आहे, असें अथर्वण वेदाच्या बाराव्या कांडांतील पृथ्वीसूक्तांत म्हटलें आहे. जगाच्या स्थितीला सत्यादि हीं साधनें किती आवश्यक आहेत, हें या मंत्रावरूनहि कळून येतें. ब्राह्मणांनींच आपल्या चरितार्थाकरितां बनविलेलीं अथवा रचलेलीं हीं वचनें नव्हेत. हीं श्रुतिवाक्यें आहेत. सर्वहितांचे सर्वमान्य श्रुतिसिद्धांत हे होत.

**तस्यै तपो दमः कर्मेति प्रतिष्ठा वेदाः सर्वांगानि सत्यमायतनम् ॥** ( केन खं. ४–८ ) तप, दम, कर्म, वेद व वेदांगें ही त्या ब्रह्मविद्येची प्रतिष्ठा आहे व सत्य हा आधार आहे. ब्रह्मविद्येच्या पूर्णतेला हें सर्वहि अत्यवश्य आहे. असें हें ज्ञानकांडाच्या उपनिषदाचेंच मत आहे. आत्मज्ञान तरी यांना सोडून होणें शक्य आहे काय ? कुठेहि सदाचार सोडून भागतच नाहीं. त्याला वेद हें मुख्य प्रमाण आहे. **तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसा अनाशकेन ॥** ( बृ. ४।४।२२ ) त्या परमात्म्याची, औपनिषदपुरुषाची वेदप्रमाणानें वैदिक यज्ञ, दान, तप, इत्यादि आचरून व रागद्वेषरहित निष्कामकर्म करून, त्या परमात्म्याला, त्या औपनिषदपुरुषाला ‘ ब्राह्मण ’ जाणण्याची इच्छा करतात. या मंत्रावरून ब्राह्मणांचें ध्येय, आत्मज्ञान करून घ्यावयाचें असतें; व त्याकरितां ते वेदाध्ययन, यज्ञ, दान, तप इत्यादि वैदिक साधनें निष्काम होऊन करतात व वेदवाक्यांचा आधार घेऊन विचार करतात हें सिद्ध होतें. **तमेव विदित्वा मुनिर्भवति ।**—त्या परमात्म्याला जाणूनच मुनि होतो. ब्राह्मणाच्या उच्चारादि आचारविचारांना वेदप्रमाणच आधार असतो, हें स्पष्ट होतें. ब्राह्मणांची उत्पत्ति परमात्म्याच्या मुखापासून झाल्यामुळें, स्वभावतः धर्मकर्मरूपानें प्राप्त होणाऱ्या उपदेशाचें, अध्यापकत्वाचें, गुरुत्वाचें कर्तव्य चालवावयाचें तर त्यांनीं या दृष्टीनें केलेल्या सर्व विधानांना वेदाचाच आधार असतो. तें त्यांचें स्वकपोलकल्पित जल्पन का ?

**सत्यमूचुर्नर एवाहि चक्रुः** ॥ ( ऋ. ४।३३।६ )

—त्यांनीं सत्याचेंच प्रतिपादन केलें; आणि त्याचप्रमाणें आपलें आचरणहि ठेवलें असें वेदांचें सांगणें आहे. **सुगा ऋतस्य पंथाः** ॥ ( ऋ. ८।३१।१३ )—सत्याचा मार्गच सुखाचा सुगम मार्ग, असा त्यांचा निर्धार झालेला असतो. **भद्रं भद्रं क्रतुमस्मासु धेहि** ( ऋ. १।१२३।१३ )—हे प्रभो, आमच्यांत मंगलमय कल्याणकारक असे, तुझ्या प्राप्तीचे उत्तम उत्तम संकल्प निर्माण करून, वेदविहित कर्म, उपासना व ज्ञानकांड यांचें आमच्याकडून आचरण करव, अशी त्या देवाजवळ ते अहर्निश प्रार्थना करीत असतात. **मित्रस्य चक्षुषा समीक्षामहे** । यजु० ( ३६–१८ )—आम्हां परस्परांत मैत्री नांदो—आणि आम्ही परस्परांना मित्रप्रेमानेंच बघावें, म्हणून ते देवाजवळ मागतात. **तस्य ते भक्तिवांसः स्याम** । ( अथर्व. ६–७९–३ )—हे प्रभो, सर्व हे आम्ही तुझे एकांतिक भक्त व्हावें, म्हणून त्यांची देवाजवळ प्रार्थना असते. **रमन्तां पुण्या लक्ष्मीर्याः पापीस्ता अनीशम्** । (अथर्व.७-११५-४) —पुण्यकर्माच्या अनेक सौंदर्यांनीं माझा आश्रम सुशोभित होवो. सत्कर्माचें तें समग्र भाग्य माझ्या आश्रमांत नांदो, माझ्या जीवनाच्या प्रत्येक विभागांत ती अखिल पुण्यकर्मांची, कमनीय भाग्यश्री सतत रममाण होवो. मी पापाच्या समग्र कर्मांना व प्रवृत्तींना समूळ नष्ट केलें आहे, असे त्यांचे आत्मविश्वासानें भरलेले भरीव उद्गार आहेत.

निर्दुष्ट व निरुपद्रवी असें केवळ जनहिताचें जीवन निःस्वार्थ दृष्टीनें घालवीत कायाक्लेश सहन करीत, रानावनांतून राहात, कंदमूलफलावर निर्वाह करीत परमात्मप्राप्त्यर्थ अहर्निश प्रयत्न करीत, स्वपरउद्धाराकरितांच केवळ जीवित धारण करून असणाऱ्या गरीब आणि सरळ, सात्त्विक, परोपकारी व सत्पात्र, ब्राह्मणवर्गावर विनाकारण जे सर्वजण असे तुटून पडतात, त्याला काय म्हणावें ? **निष्कारणवैरिणो जगति** । याचाच हाहि एक मासला दुसरें काय ?

**दानसंवनना ह्येते ग्रंथा मेधाविभिः कृताः ।**
**यजस्व देहि दीक्षस्व तपस्तप्यस्व संत्यज ॥**

( वा. रा. अ. कां. १०९ )

—हे दानप्रधान ग्रंथ, प्रायः बुद्धिमान ब्राह्मणांनीं केले आहेत. स्वार्थ ठेऊन यज्ञ कर, दान दे, व्रत उद्यापन कर, तप कर, सर्व संपत्तीचा त्याग कर

म्हणून ते सांगतात, असें हें तुमचें विधान जाबालि ऋषिवर्या ! सत्याच्या कसालाच लावल्यास कितपत ग्राह्य ठरतें तें तुम्हीच पाहा !

**सत्यं च धर्मं च पराक्रमं च भूतानुकंपा प्रियवादितां च । द्विजातिदेवातिथिपूजनं च पंथानमाहुस्त्रिदिवस्य सन्तः ॥** (वा. रा. अ. ११०।३१ )

—सत्य भाषण, स्वधर्माचरण, दुष्टदंडणाचे कामीं पराक्रम, भूतदया, प्रिय पथ्यकर असें गोड वचन, देव, ब्राह्मण, अतिथि यांचें पूजन हें स्वर्गाचें महाद्वार आहे, असें साधुसंतांनीं म्हटलें आहे. हें श्रीरामाचें नास्तिकमतानें वाद घालणाऱ्या जाबालीशीं केलेल्या बुद्धिवादाचें अंतिम निर्णायक वाक्य होय.

**न नास्तिकानां वचनं ब्रवीम्यहं । न नास्तिकोऽहं न च नास्ति किंचन॥**
**निवर्तनार्थं तव राम कारणात् । प्रसादनार्थं च मयैतदीरितम् ॥**
( वा. रा. अ. ११०।३८।३९ )

—रामा, नास्तिकांच्या पक्षाचें मंडण करावें हा माझा उद्देश नाहीं व मी स्वतःहि पण नास्तिक नाहीं; कसें तरी करून तुला अयोध्येला परत न्यावेंच म्हणून, तुझ्यावरील प्रेमातिशयानें केलेला हा एक केवळ युक्तिवाद आहे. यांत माझा असणारा उद्देश एवढाच. उद्देश कांहीं वाईट नाहीं. हें जाबालींचें वचन त्यांचें हृदय उघड करून दाखवितें. कसें कां होईना, आम्हांला मात्र या निमित्तानें श्रीरामाच्या उपदेशामृताचा लाभ झाला. या संवादानें श्रीरामाच्या हृद्गत विचारांचें आम्हांला दर्शन झालें. धर्मपर मनुष्याला त्या धर्मप्रवणतेपासून परावृत्त करण्याच्या अनेकांच्या अनेकानेक प्रयत्नांतून, इष्टमित्रांचा व बंधुबांधवांचा भिडेचा आग्रह आणि मान्यवर लोकांचा नास्तिक युक्तिवादहि प्रमुखत्वानें भाग घेतांना या ठिकाणीं आम्हांला दिसून येतो. इकडे आम्हींहि लक्ष पुरवावयाला पाहिजे. आपली धर्मश्रद्धा अनेक धर्मसंकटांच्या कसावर लावून पाहात असतांना, आपल्या मृदुमधुर शब्दाच्या पाशांत अडकवूं पाहाणारा प्रेमीजनांचा आग्रह व आपाततः खरेंच लोभनीय ठरणाऱ्या विषमिश्रित अन्नासारखा प्रेमी पंडितांचा नास्तिकवाद, हीं दोन्ही बराच त्रास देतात. रामराज्यांतले नागरिक होण्याची सिद्धता करणाऱ्या आधुनिक अखिल जनतेला श्रीरामाचें हें उदाहरण अनुसरण्यास आदर्शस्थानीय आहे. धर्मजीवन धुळीस मिळविण्याकारितां कशीं मोठमोठीं संकटें येतात, मोठमोठ्या धुरेचीं माणसेंच कशीं इरेस पडलेलीं असतात, यांत कशा कशा कष्टपरंपरेला तोंड द्यावें लागतें; कोण धैर्य, किती चिकाटी, कशी सहनशीलता पाहिजे याची कल्पना यावरून

येईल. कितीहि कष्ट झाले तरी आपल्या तनुमनाचा अशा बाबतींत तोल सांभाळणेंच इहपरसुखाचा मार्ग होय. सन्मार्गांत नुसते कष्टच अनुभवावयाला लागतात. दुर्मार्गांत कष्ट अनुभवून नष्ट व्हावें लागतें. आमच्या ठिकाणीं श्रीरामाप्रमाणें यथार्थ धर्मश्रद्धा आणि निश्चल धर्मपरायणता असली, तर आतां असलेलें स्वराज्यहि रामराज्य बनण्यास विलंब लागणार नाहीं. थोड्याच अवधींत तें रामराज्य होईल.

**लोके न हि स विद्येत यो न राममनुव्रतः ॥**

(वा. रा. अ. कां.)

—श्रीरामाच्या अत्युत्कृष्ट धर्माचरणाचा उन्नत आदर्श सदैव डोळ्यापुढें ठेऊन न वागणारा, असा एकहि कोणी अखिल त्रैलोक्यांतच कधीं असूं नये. श्रीरामाची लोकमान्यता आणि विश्वासार्ह व अनुकरणीय आचरण, यांचा धडा प्रत्येकानें अवश्य गिरवावा. अशा अनुकरणीय आदर्श जीवनाच्या प्रभेनेंच सर्वांचें मुखकमळ अतिशय शोभत असावें. यांत सौंदर्य आहे, यांत आरोग्य आहे, यांत आकर्षकता आहे, यांत सत्कीर्ति आहे आणि यांतच पराकाष्ठेचें सुख आहे. रामचरितानुगामी रामराज्यांत अवश्य अशीच प्रजा पाहिजे. सबंध रामराज्यांत कोणालाहि दैहिक, दैविक आणि भौतिक पापतापांचा कसला वारासुद्धां लागूं नये. ब्रह्मचर्य, न्यायनीति, परोपकार, दानधर्म, विद्वत्ता, दया, सत्य, सदाचार, सरलता, औदार्य, तप, विश्वबंधुता, पातिव्रत्य, एकपत्नीव्रत, उच्च ध्येयनिष्ठता, गोड स्वभाव, अध्यात्मपरता, ब्रह्मात्मैक्य इत्यादि सर्व शुभलक्षणांनीं रामराज्यांतील अखिल नागरिक, सदैव सुशोभित असोत. पौर्णिमेच्या, त्यांतहि शुद्ध व निष्कलंक असणाऱ्या अनुपमेय चंद्राप्रमाणें, दैविक संपत्तीच्या अखिल दिव्य सद्गुणांनीं शोभायमान होऊन, आपल्या आदर्श शीलाच्या दिव्य प्रभेनें, अखिल विश्वभर सदैव उजळ माथ्यानेंच हें भारत अखंड मिरवो; व आपल्याप्रमाणेंच अखिल विश्वाला सभाग्य करो व जीवन्मुक्त करून सोडो.

'रामराज्य' या नांवाच्या या भारतवर्षाच्या राज्याला, श्रीरामच एक चक्राधिपति होय. सुमंताप्रमाणेंच या रामराज्यांतील मंत्री असले पाहिजेत. अखिल सौम्य सद्गुण, ऐहिक सुखसाधनांत अनासक्ति, धर्मकार्यांत तत्परता, निःस्वार्थ राष्ट्रसेवा, विलक्षण बुद्धिमत्ता, उत्कट संघटनाशक्ति, अलौकिक प्रतिभा, आदरणीय चालचालणूक, इत्यादि आदर्श गुण सर्व मंत्र्यांच्या ठिकाणीं नेहमीं प्रकर्षानें असावेत. **चातुर्वर्ण्यं च लोकेऽस्मिन् स्वे स्वे कार्ये नियोक्ष्यति ।**

(वा. रा. बालकांड) रामराज्याच्या शासनपद्धतीचें हें एक लक्षणच होऊन राहावयाला पाहिजे. चातुर्वर्णाच्या लोकांनीं आपआपसांत कोणताहि कोप, ताप, राग, द्वेष, असूया, तिरस्कार न ठेवतां, आपआपल्या लोकहितकारी स्वधर्मोचित युक्त कर्मांच्या ठिकाणीं, सुखासमाधानानें या रामराज्यांत असावें. श्रीरामाविषयीं नारदांनीं वाल्मीकीला सांगितलेलें "चातुर्वर्ण्यं च" इत्यादि उपर्युक्त वचन आतांच्याहि रामराज्याला लागू व्हावें.

**प्रहृष्टमुदितो लोकस्तुष्टः पुष्टः सुधार्मिकः ।**
**निरामयो ह्यशोकश्च दुर्भिक्ष्यभयवर्जितः ॥ १ ॥**

**न पुत्रमरणं केचिद्द्रक्ष्यन्ति पुरुषाः क्वचित् ।**
**नार्यश्चाविधवा नित्यं भविष्यन्ति पतिव्रताः ॥ २ ॥**

**न चाग्निजं भयं किंचिन्नाप्सु मज्जन्ति जन्तवः ।**
**न वातजं भयं किंचिन्नापि ज्वरकृतं तथा ॥ ३ ॥**

**न चापि क्षुद्भयं तत्र न तस्करभयं तथा ।**
**नगराणि च राष्ट्राणि धनधान्ययुतानि च ॥ ४ ॥**

भारताचें राज्य अगदीं असेंच रामराज्य व्हावें. रामराज्यांतील लोक प्रहृष्ट, प्रमुदित, तुष्ट, पुष्ट, संपूर्ण धर्मिष्ठ, बलिष्ठ, अरोगिष्ट, नित्य सुखिष्ट, अशोकिष्ट व सर्वोत्कृष्ट असे असावेत. आतां तर (दुर्भिक्ष्य) नसावेंच, पण पुढें कधींतरी दुर्भिक्ष्य येईल कीं काय, ही भीतिहि या भारताच्या रामराज्यांत असतां उपयोगी नाहीं. जीवनाच्या अंत्य क्षणापर्यंतहि पुत्रमरणाची अनिष्ट वार्ता कोणी ऐकलेली नसावीच. सबंध भारतवर्षाच्या रामराज्यांत विधवा व अपतिव्रता शोधल्यासहि कुठे सांपडूं नयेत कीं असूं नयेत. कुणालाच अकालीं मरण येऊं नये. कोणीहि कधीं भाजून, बुडून मरूं नये. अपमृत्यु असा कुणालाच येऊं नये. वावटळ किंवा तुफान म्हणून कुणाच्या ऐकण्यांत सुद्धां असूं नये. कोणालाहि कधीं अन्नाची चिंता भासूं नये. चोरीछिनालीचा तर ऐकूनहि कुणाला संस्कार असूं नये. खेडींपाडीं, पुरें पट्टणें, अखिल राष्ट्र, जेथें पाहावें तेथें धनधान्यांनीं समृद्ध असावें. कोणताहि वर्णविद्वेष नसतां, सर्वहि स्वधर्मनिष्ठ असे पारमार्थिक दृष्टीचे विवेकी लोक भारतांत नांदावेत. आपल्या आचरणांनीं जगाचेच त्यांनीं धन्यवाद घ्यावेत. हें द्रव्यसंपत्तीचें व दैवी संपत्तीचें नांदतें राष्ट्र व्हावें, भारतीयांचें वैयक्तिक, कौटुंबिक, सामाजिक

तथा राष्ट्रीय जीवन आपल्या व्यावहारिक व पारमार्थिक अशा दोन्हीहि क्षेत्रांत, विश्वानुकरणीय व विश्ववंद्य व्हावें. भारताच्या प्रबुद्ध मनुष्यांत तर राहोच, ( पण ) कसल्या अप्रबुद्ध बालकांतहि कोणता दुर्गुण पाहूं म्हटला तरी दिसून येऊं नये. सर्वांचेंहि निर्व्यसनी जीवन असावें. आर्य संस्कृतीचा उच्च आदर्श सर्व जगांतच प्रसिद्ध असला पाहिजे. आदर्श मातापिता, आदर्श सति–पति, आदर्श सवती–सवती, आदर्श बंधु–भगिनी, आदर्श सापत्न बंधु, आदर्श कन्यापुत्र, आदर्श सासु–सासरे, आदर्श सास्वा–सुना, आदर्श जांवई–सासरे, आदर्श नणंदा–भावजया, आदर्श दीर–भावजय, आदर्श जावा–जावा, आदर्श स्वामी–सेवक या भारतांत नितांत सुखसंतोषानें नांदत असावेत. आदर्श शिक्षण, आदर्श देशबंधुत्व, आदर्श शिष्टाचार, आदर्श सभ्यता, आदर्श गुरु-शिष्य–संप्रदाय, आदर्श समाज, उच्च विचारसरणी, उन्नत आचार, उत्कृष्ट नीति, आदर्श दीक्षा, मृदुमधुर वाणी, अचल विश्वास, दुर्दम्य धर्मनिष्ठा, हार्दिक प्रेम व सारेंच परिशुद्ध जीवन, रामराज्यांतून सर्वत्र दिसून आलें पाहिजे. शुद्ध आचारविचाराचें बाळसें प्रत्येकाच्या तोंडावर उठून दिसत असावें. भारतांतल्या प्रत्येकाची स्थिति, कोरीव दिव्य आचरणाची असावी. रामराज्यांत एकहि कामी, कृपण, क्रूर, मूर्ख, नास्तिक, अविवेकी, दरिद्री, नीतिभ्रष्ट, ओंगळ आणि अधर्मी असतां कामा नये. कितीहि परिशोधून बघितलें तरी, एखादाहि अयोग्य मनुष्य सबंध भारतांतच सांपडतां कामा नये. भारताच्या मधुर विकासांनीं विश्वच प्रफुल्लित झालें पाहिजे. जगाच्या स्फूर्तिकिरणांचें भारत हें एक केंद्रच झालें पाहिजे. अध्यात्माच्या पायावरच प्रत्येकाच्या जीवनाचें मंदिर, गगनभेदी, आपल्या उन्नततेनें जगांतल्या तात्त्विक जीवनाचा जयस्तंभच होऊन राहावें. आर्य संस्कृतीचे जयघोष विश्वांतून दुमदुमून राहावेत. विश्वांतल्या कोणत्याहि भागांतून पाहिलें तरी भारताच्या धर्मध्वजाचें दर्शन व्हावें, इतका तो धर्मध्वज विस्तृत व्हावा, उन्नत व्हावा व विश्वभर फडकत असावा. त्याच्या अलौकिक वैभवाच्या दिव्य प्रकाशानें, समग्र विश्वच उजळत असावें, उत्साही व्हावें व आनंदपरवशतेनें त्याचे गोडवे गात असावें. असें हें सनातन वैदिक धर्माचें अपार वैभव आहे. आर्य संस्कृतीची अशी ही अपार महती आहे. भारतीय रामराज्याची ही निशाणी आहे.

विश्वउदयाचलावर उदीयमान होत असणाऱ्या या विश्वधर्माच्या कीर्तिसूर्याचें तें अपार वैभव आणि तें असामान्य विभूतिमत्व पाहून, त्याच्या

गुणगानाची दिव्य स्फूर्ति उत्पन्न होत नाहीं, असा विश्वांतच कोणी नाहीं. ख्रिस्त धर्माचा जाज्वल्य अभिमान बाळगणाऱ्या, मोनिअर नांवाच्या एकनिष्ठ ख्रिस्तभक्तानें, प्रथम कुतूहलानें सनातन धर्माच्या ग्रंथांचें वरवर अवलोकन केलें. तेवढ्यानेंच तो आकृष्ट झाला. परवशतेनें आर्य धर्माच्या त्या सर्वातिश्रेष्ठते-पुढें विनम्र होऊन, त्या दिव्य आनंदमय प्रकाशापुढें स्वदेहाभिमान, स्वराष्ट्रा-भिमान, स्वधर्माभिमान, सर्व विसरून त्यानें खालीं गुढघे टेकले व दोन्ही हात जोडून याची अनन्यतेनें स्तुति केली. आपल्या उद्धाराकरितां एकाचित्तानें प्रार्थना केली. खोल अभ्यास केला व कायमचा भक्त झाला. त्याच्या तोंडचे कांहीं उद्गार पाहूं.

" Hinduism is all-tolerant, all-compliant, all-comprehensive, all-absorbing."

—"हा सनातन हिन्दु धर्म सर्वसहिष्णु, अति थोर विचारांचा, सर्वसम, अतिविनयसंपन्न, विश्वव्यापक, सर्वसंग्राहक व सर्वांच्या अंतिम गतीचें सर्वाधिक श्रेष्ठ स्थान आहे." सनातन हिन्दु धर्माची मूर्ति तत्त्वज्ञानानेंच घडविली आहे. हा जितका थोर, तितकाच तो विनयान्वित आहे. थोरपणाचा विनय हा अलंकार आहे. अति महान् वस्तूंतहि व्यापून त्याहूनहि हा जसा अत्यंत विशाल म्हणवून घेतो, तसाच अति सूक्ष्म परमाणूंतूनहि व्यापून, त्याहूनहि तो अति सूक्ष्म परमाणू म्हणवून घेतो. इतकें झालें तरी तो जशाचा तसा सर्वांतहि आपल्या अनंतरूपानेंच आहे. हा सनातन धर्म सर्वांचा आदिम व अंतिम धर्म आहे. आद्यंतीं असणारी वस्तु मध्येंहि असते, या न्यायानें हा अनंत धर्म सर्वांचें मूळ, सर्वांचें लयस्थान व तसेंच सर्वांच्या आस्तित्वाचें मुख्य अधिष्ठान आहे. विश्वांत विखुरलेल्या आखिल उच्च तत्त्वांचें हें सर्वसंग्राहक: मूळस्वरूप आहे. या तत्त्वमहोदधीचेच अणुरेणु जगांत इतस्ततः, आपल्या मूळस्वरूपाची जाणीव देत जीवांचा उद्धार करतात. विश्वांत पसरलेल्या आखिल तत्त्व-किरणांना, आपल्यांत समाविष्ट करून हा सूर्याप्रमाणें आपल्या निरतिशय प्रकाशानें सदाचाच देदीप्यमान आहे.

" It is a living religion. It is scientific, carefully elaborated and practically valuable to all extent, not approached by any other religion in the world. "

—"केव्हांहि असणारा हा सनातन धर्म आहे. हा स्वतः चेतनरूप असून सर्वांनाहि चैतन्य आणतो. याची मांडणी अत्यंत शास्त्रशुद्ध आहे. याची

विचारसरणी तात्त्विक आहे. सर्व दृष्टीनेंहि हा परिष्कृत आहे. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत जितकें याचें महत्त्व आहे, त्याचें तितकेंच महत्त्व व्यावहारिक क्षेत्रांतहि पण आहे. जीवनाच्या अखिल कार्यक्षेत्रांत याची तितकीच आवश्यकता आहे. ऐहिक तशा पारलौकिक उन्नतीचा हा उच्चतम कळसच आहे. अखिल जीव-कोटीलाच अत्युन्नत अशा त्या ब्रह्मपदाची प्राप्ति करवून देण्यांत याचा हात-खंडा आहे. याच्याइतकें उन्नतपद मिळवून देण्याचें, याहून इतर कोणत्याहि धर्माला शक्य होत नाहीं व जगांतला कोणताहि धर्म इतक्या उन्नत स्थितीला पोहोंचलेलाहि नाहीं. ”

सर्व धर्मांचा तुलनात्मक दृष्टीनें संपूर्ण विचार करून, व त्याचा खोलवर अभ्यास करून झाल्यावर शेवटीं—" I have found Hinduism to be the most satisfactory religion in the world " म्हणूनच प्रत्येक पंडितानें आपलें वैयक्तिक मत दिलें. “ विश्वांतल्या अखिल धर्मांचा विचार आणि अभ्यास करून झाल्यानंतर, हा सनातन हिन्दु धर्मच एक मला अतिशय समाधानकारक असा आढळून आला. ”

या सनातन हिन्दु धर्माचा राज्यपद्धति म्हणजेच श्रीराम-राज्यपद्धति. विस्तारभयानें नमुन्यादाखल याचा आपण थोडक्यांत विचार केला. याचीं कांहीं तत्त्वें समजून घेतलीं. वरील आंग्ल पंडितांच्या वचनांनींहि याचें महत्त्व लक्षांत येईल.

* * *

सदाचाराच्या या सुंदर आर्य संस्कृतिवृक्षाचें वेद हेंच मूळ व आत्मनिष्ठा मधला बुंधा होय. अभ्युदय, निःश्रेयस ह्याच याच्या दोन मुख्य शाखा. दिव्य जीवन, पावित्र्य, मांगल्य, कीर्ति, तुष्टि, पुष्टि, उन्नति, शांति, उत्कर्ष, नीति, मृदु वाणी, मधुर वृत्ति, सत्यसंधता, आदर्श सभ्यता, उत्कृष्ट नागरीकता, त्याग, परोपकार, इत्यादि अनेक मनोहर डाहाळ्यांनीं (शाखांनीं) हा वृक्ष सुशोभित आहे. सर्व प्रकारच्या उत्कृष्ट सुखसौकर्यांच्या पर्णांनीं हा भरगच्च भरलेला आहे. उन्नत दैवी संपत्तीनें हा खूप विस्तारला आहे. उत्कृष्ट संतति आणि दिव्य वैभव यांच्या पुष्पगुच्छांनीं हा अतिशय चित्ताकर्षक झाला आहे. ब्रह्मानंदाच्या मधुर फळांनीं तर याला फारच महत्त्व आलें आहे. आत्मसुख निर्माण करणारा याचा दिव्य आमोद, अखिल विश्वभर दरवळून आहे. जीवनाच्या कृतकृत्यतेचें याचें अलौकिक दर्शन, विश्वांतील सर्व लोकांचीं मनें सहजच आपल्याकडे आकर्षून घेत आहे. याच्या प्रसार–प्रचाराकरितां निघणारा परमात्मरूप दिव्य वायु याचें निरातिशयत्व आखिल विश्वभर पसरीत आहे. ऑर्थर शोपेनहारचें एक वाक्य या प्रसंगीं सहज आठवलें तें खालीं देतों.

"In India our religion will now and never strike root. The primitive wisdom of the human race will never be pushed aside by the events of Galilee. On the contrary, Indian wisdom will blow back upon Europe and produce a thorough change in our knowing and thinking."

—Aurthur Schopenhauer

—"भारतवर्षांत आमचा ख्रिस्त धर्म आतां आणि पुढें केव्हांहि, कधीं दृढमूल होणार नाहीं. मानवजातीचें सरळ आणि मूलभूत असणारें हें आत्मीय ज्ञान, गॅलिलीच्या कोणत्याहि घटनेनें बाजूला न पडतां, उलट अत्यंत जोरानें युरोपभर पसरून, सर्व युरोपांतच आमच्या सगळ्या आचारविचारांत, संपूर्ण क्रांति घडवून आणील.

## वैदिक आर्य संस्कृति

सनातन आर्य धर्म आणि आर्य संस्कृति हीं विश्वांतील सर्व पंडितांना इतकीं जीं आवडलीं आहेत, तीं ह्यांना मूलभूत असणाऱ्या एक वेदामुळेंच.

नेहमीं त्या त्या धर्माला त्या त्या धर्मग्रंथामुळेंच महत्त्व येतें. या धर्मग्रंथाच्या महत्त्वावरच त्या धर्माचें महत्त्व अवलंबून असतें. सनातन आर्य धर्माचा मुख्य ग्रंथ वेद होय. त्यामुळेंच याला वैदिक धर्म म्हणतात. वेदाच्या निरतिशयत्वानें वैदिक धर्मसुद्धां सर्वातिशय झाला व वैदिक संस्कृति सर्वश्रेष्ठ झाली. या वैदिक वाङ्मयाची जोपासना व वैदिक संस्कृतीची वाढ आज भारतांत सर्वाधिक प्रमाणांत व्हावयाला पाहिजे. ' पिकतें तिथे विकत नाहीं ' या म्हणीप्रमाणेंच झालें, तर बुध्द्या आपल्या पायावर धोंडा पाडून घेतल्यासारखें होईल. जेथें लाखों बाहेरचे लोक येऊन पोट भरतात, तें आपलें घर सोडून, एखाद्या आडदांड तरुणानें जसें जेमतेम आपलें जीवन चालविणाऱ्याचा आश्रय करून, मुद्दाम आपली उपासमार करून घ्यावी, त्याप्रमाणेंच अन्य संस्कृतीच्या अनुकरणानें भारतीयांचें होणार आहे. आपल्याला जर ज्ञान नसेल तर दुसऱ्यांनीं गाइलेल्या कीर्तीनें तरी शाहाणें होऊन सर्वश्रेष्ठ आपल्या वैभवानें भारत सुखानें नांदूं लागला म्हणजे पुरे.

### अपौरुषेय वेद

**अपौरुषेयवाक्यं वेदः** । हें मीमांसकांचें मत सर्वमान्य आहे. कोण्या मानवाकडून रचला गेलेला हा वेद नव्हे. वेद ही ' अमानवी देववाणी ' होय. वेद हा ईशप्रणीत आहे. **ब्रह्मा देवानां प्रथमं संबभूव विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता** ।—विश्वाचा कर्ताभर्ता ब्रह्मदेव सर्व देवांच्या अगोदर पहिल्या प्रथम निर्माण झाला.

**यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै ।**
**त ँ्ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥**

(श्वे. ६।१८)

—ज्या परमात्म्यानें सृष्टिकरितां ब्रह्मदेवाला निर्माण करून, ' सृष्ट्युत्पत्तिस्थितिलयाच्या ' वेदांना त्याच्याकडे पाठवून दिलें; म्हणजे वेद त्याच्या हृदयांत स्फुरविले, अशा आत्मबुद्धि उजळविणाऱ्या परमात्म्याला मुमुक्षु असणारा मी, त्या मोक्षाच्या प्राप्तिकरितां अनन्यशरण जातों. असा या मंत्राचा अर्थ आहे. अजून या मंत्रांतून काय निष्कर्ष निघतो तो पाहूं—

### ' वेद ' शब्दाचा अर्थ

' वेद ' या शब्दांत विद् धातु आहे. विद् = जाणणें, त्या विषयाचें ज्ञान करून घेणें. या अर्थीं विद् धातु प्रसिद्ध आहे. सृष्टीचा उत्पत्तिस्थितिलय

याविषयीं व विविध ऐहिक आणि पारलौकिक साधनांविषयीं असें तूं जाण, म्हणून त्यांच्यासंबंधीं जे कांहीं विचार नंतर परमात्म्यानें सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाच्या हृदयांत स्फुरविले व सहज स्फूर्तीनें जे त्याच्या तोंडांतून बाहेर पडले, तेच हे वेद. हा एक निष्कर्ष या मंत्रांतून निघतो; व दुसरा म्हणजे मोक्षास प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीतीनें एक परमात्माच कारणीभूत होतो. मोक्षाची इच्छा असणाऱ्यानें एका परमात्म्यासच शरण जावें. मोक्षाला परमात्म–शरणागतीच एक प्रधान साधन आहे. इत्यादि निष्कर्ष सामान्यतः या मंत्रावरून निघतो. परमात्म्याकडून अंतःकरणांत स्फुरल्या गेलेल्या वेदांना प्रथम ब्रह्मदेवानें पाहिलें, त्यामुळें तो प्रथम वेदद्रष्टा झाला. त्यानंतर परमात्म्याच्या अनुग्रहानें तपस्व्यांच्या शुद्धांतःकरणांत या वेदमंत्रांचें स्फुरण झालें व तें या तपस्व्यांनीं, या परम पवित्र ऋषींनीं पाहिलें, त्यांना हा एक वेदसाक्षात्कारच झाला. अशा वेदांचा साक्षात्कार झालेल्या वेदकालीन ऋषींना, '**मंत्रद्रष्टारः**'—मंत्रद्रष्टे म्हणून म्हटलें जातें. आत्मज्ञान होऊन परमात्म्याच्या कृपेनें तदैक्य संपादिलेल्या, वेदकालीन ऋषींना हे मंत्र स्फुरले. या दृष्टीनें हे सर्व वेदमंत्र परमात्मप्रणीत आहेत, ती मानवकृती नव्हे हें स्पष्ट होतें. या अर्थानें वेदांना व वेदमंत्रांना अपौरुषेय म्हणून संबोधिलें जातें.

**श्रुतिस्तु वेद आम्नायः ।**—वेदाला 'श्रुति' असें दुसरें नांव आहे. **वेदे श्रवसि च श्रुतिः ।** (अमर)—श्रुति म्हणजे परमात्म-अनुग्रहानें अंतरंगांत स्फुरून, अनाहत ध्वनीप्रमाणें आंतूनच ऐकूं आलेले अथवा गुरुमुखानें ऐकून कंठगत करीत आलेल्या परिपाठांतलें; एकंदरींत ऐकून अवगत होणारें असा वेद शब्दाचा अर्थ होतो. आजहि गुरुमुखांतून श्रवण करूनच वेदाध्ययन करण्याची जी पद्धत आहे, तीहि मुळाची आठवण करून देते. ऐकून कंठगत करण्याची ही पद्धत, ऐकून कंठगत झाल्याची पूर्वस्मृति जागृत ठेवण्याकरितांच आहे. मूळांत ऐकून आल्यामुळें त्यांचा अभ्यासक्रमहि तसाच असणें, 'विधित्वेन'हि पण क्रमप्राप्त आहे. गुरुमुखावांचून केलेलें वेदाध्ययन ग्राह्यहि ठरत नाहीं; व तें वीर्यवत्तरहि होत नाहीं. अंतरंगांत स्फुरलेला वेद अंतःश्रवणानें ऐकून, अंतश्चक्षूंनीं पाहून मुखानें बाह्य प्रवाहित झाला. ब्रह्मदेवाची वाणीच अशा वेदोच्चारानें व्यक्त झाली. **वाग्विवृत्ताश्च वेदाः ।** (मुंडक उपनिषद २ खं. १।४) **वाग्विवृत्ता उद्घाटिताः प्रसिद्धा वेदा यस्य ।**-वेदोच्चारानेंच ब्रह्मदेवाची वाणी प्रगट झाली. **अनादिनिधना नित्या वागुत्सृष्टा स्वयंभुवा ॥**

—हें परमात्मदत्त ज्ञान, हा वेद, ही ब्रह्मदेवाची वाणी, अनादि परमात्म्याकडून ब्रह्मदेवाला स्फुरलेली असल्यामुळें, परमात्म्याचीहि ती वाणीच होत असल्यामुळें परमात्म्याशीं अभिन्न असणारी परमात्म्याप्रमाणेंच, तीहि पण अनादि आहे. असें वेदासंबंधीं असणाऱ्या 'अनादि' या शब्दानें स्पष्ट होतें. आपल्या अंतःकरणांत स्फुरलेले वेदमंत्र प्रथम ब्रह्मदेवानें ऐकले व अध्यापनाच्या द्वारें ऋषिमुनी इत्यादिकांतून ते स्वमुखानें प्रसृत केले. त्यानंतर ऋषींनीं जें ऐकलें,तें त्यांनींहि आपल्या विद्यार्थ्यांना सांगितलें. अशा रीतीनें ऐकून पाठ करीत आलेला हा संप्रदाय, वेदाला असणाऱ्या ' श्रुति ' या नांवानें स्पष्ट होतो. पवित्र पावन अंतःकरणाच्या अनन्य भक्तीच्या वेदकालीन कांहीं ऋषिमुनींना देखील, परमात्मकृपेनें जें थोडें फार वेदमंत्रांचें स्फुरण झालें, तेंहि त्यांनीं आपल्या शिष्यांना सांगितलें. असा हा गुरुमुखाचा संप्रदाय प्रचारांत आला. परमात्मसत्तेनें ब्रह्मदेवाच्या आणि ऋषिमुनींच्या अंतःकरणांत स्फुरलेले वेद कोणाचीहि वैयक्तिक कृती नसल्यामुळें, यांना अपौरुषेय म्हटलें जातें; वेद परमात्मप्रणीत आहेत असें म्हटलें जातें. परमात्मकृपेनें आपोआप स्फुरलेल्यांना अपौरुषेय, परमात्मसृष्ट, दैवी, ईश्वरदत्त म्हणून म्हणण्याशिवाय गत्यंतर नाहीं.

**वेदांचें कर्तृत्व कोणाकडे ?**

**यामृषयो मंत्रकृतो मनीषिणः । अन्वैच्छन्देवास्तपसा श्रमेण ।**
**तां देवीं वाच ँ्हविषा यजामहे ।।** ( तै. ब्रा. )

—दिव्य भूमिकेच्या बुद्धिमान ऋषींनीं बहु श्रम सोसून, तपानें जिचा साक्षात्कार करून घेतला आणि जे मंत्रकर्ते झाले, त्या वाग्देवतेस हव्य पदार्थांनीं आम्ही तृप्त करूं या, असा या मंत्राचा भावार्थ आहे. पूर्वक्त विधानावर हा मंत्र बराच प्रकाश पाडतो.

**युगांतेऽन्तर्हितान्वेदान्सेतिहासान्महर्षयः ।**
**लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा ।।**

या श्लोकांतूनहि तोच अर्थ बाहेर पडतो. युगांत्यसमयीं मूळस्वरूपांत विलीन झालेले इतिहासासहित वेद ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें ऋषींनीं तप करून पूर्वकालीं मिळविले. ' **मंत्रकृतः** '—' मंत्रकर्ते ऋषी ' या शब्दाचा अर्थ इथे कळून येतो. श्रुतिस्मृतींच्या या प्रमाणावरून म्हणजे ऋषीमुनींनीं तपोबलानें प्राप्त करून घेतलेल्या परमात्मकृपेनें वेद मिळविले, हें सिद्ध होतें. जें परमात्मकृपेनें ( मिळतें ) लाभतें, त्याचें सर्वथैव मूळकारण परमात्माच असणार. तेव्हां

वेद या दृष्टीनें अपौरुषेय म्हटले जातात. या व इतर कोणत्याहि दृष्टीनें, वेद हें मनुष्य-जनित वाङ्मय होऊं शकत नाहीं, वेदांचें कर्तृत्व ऋषींकडे येत नाहीं. ऋषी हे वेदद्रष्टे व मंत्रपति आहेत, म्हणूनहि म्हटलें जातें. यावरूनहि वेदकर्ते ऋषी नव्हेत हें स्पष्ट होतें. आपल्या अंतःकरणांतून आपोआप प्रगट होत असलेल्या वेदांना ऋषींनीं अवलोकिलें, स्फुरण पावत असलेल्या वेदांना ऋषींनीं बघितलें. स्फुरण होणें ही क्रिया मनुष्याची नव्हे; ती अतर्क्य परमात्म्याकडेच बोट दाखविते. त्यांत सांठविलेलें ज्ञानहि पण सर्वज्ञ परमात्म्याचेंच हें सिद्ध होतें. तें ज्ञान त्या मनुष्याचें असें म्हणतां येत नाहीं. अपूर्व वेदमंत्र ऋषींच्या तोंडांतून बाहेर पडत असतांना बघून, इतर लोक त्या ऋषींनाच वेदमंत्रकर्ते आणि वेदद्रष्टे म्हणूं लागले. पण जें स्फुरलें तेंच बघितलें या घटनेनुसार वेदांचें मूलकारणत्व असें एक परमात्म्याकडेच येतें. असें "**नम ऋषिभ्यो मंत्रकृद्भ्यो मंत्रपतिभ्यः ॥**" (तै. ब्रा. ४) या मंत्राचें तात्पर्य. '**पातीति पतिः ।**' अध्ययन–अध्यापनांनीं वेदांचें ऋषींकडूनच रक्षण झालें, या अर्थी ऋषींना मंत्रपति म्हणून म्हटलें जातें. हीच परंपरा ऋषिपुत्र ब्राह्मणांनीं आजपर्यंत चालवीत आणली आहे.

**वेदमेव सदाभ्यस्येत्तपस्तप्स्यन्द्विजोत्तमः ।**
**वेदाभ्यासो हि विप्रस्य तपः परमिहोच्यते ॥** (म. स्मृ. २।१६६)

**ब्राह्मणस्य तपो ज्ञानं तपः क्षत्रस्य रक्षणम् ।**
**वैश्यस्य तु तपो वार्ता तपः शूद्रस्य सेवनम् ॥** ( ११।२३५ )

——ब्राह्मणांचें तप म्हणजे वेदाभ्यास, क्षत्रियांचें तप प्रजारक्षण, वैश्यांचें तप व्यापार व शूद्रांचें तप सेवा, असा विभाग झाल्यामुळेंच अद्याप वेद टिकून आहेत. एकाकडे अथवा एका वर्गाकडे ती जबाबदारी घातल्याशिवाय, तें कार्य व्यवस्थित होत नाहीं, कोणीहि अभिमानानें झटून तें काम करीत नाहीं. त्या त्या कारितांच तशातशांची तिथे तिथे निवड झाली म्हणजे, ते ते आपुलकीनें, प्रेमानें व धर्मबुद्धीनें तें तें काम करतात. ही कर्तव्यपर धर्मबुद्धि कां एकदां विस्कळीत झाली म्हणजे सर्व समाज ढासळतो हें ओघानें आम्हांस समजून घ्यावयास पाहिजे. पूर्वीच्या काळच्या ऋषींच्याकडून हे रचले गेले, या दृष्टीनें मनुष्यकृति म्हणून, आधुनिक समाजाचें थोडें वेदाकडे दुर्लक्ष होत आहे.

वेद हे अपौरुषेय आहेत, हें युक्तीनेंहि आपल्याला समजून घेतां येईल. या लोकांचें ज्ञान, कांहीं प्रमाणांत कां होईना, प्रयत्नानें मनुष्यांना करून घेणें साध्य आहे, असें गृहीत धरून चाललें तरी मरणोत्तरच्या अलौकिक ज्ञाना-संबंधानें मात्र मनुष्याचे प्रयत्न कांहीं करूं शकत नाहींत, ते सर्वथैव निकामी ठरतात, हें मानावेंच लागतें. मरणोत्तरचें व परलोकाचें ज्ञान मनुष्याला नाहीं व त्याचें ज्ञानहि त्याला केवळ, प्रयत्नसाध्य ऐहिक पदार्थांच्या ज्ञानाप्रमाणें, सहज करून घेतां येणेंहि पण शक्य नाहीं. सृष्टिनियंत्या व निर्माणकर्त्या परमेश्वरालाच तें एक ठाऊक असणें शक्य आहे. मानवी बुद्धीच्या आटोक्याबाहेरचें यथास्थित सांगणारा, एक सर्वज्ञ परमेश्वरच सर्वतोपरि समर्थ आहे. अलौकिक सुखाची कल्पना आणून देणारा, त्याचें साधन सांगणारा व त्या त्या कर्माचें अमुक म्हणून अचूक फळ देणारा, सर्वश्रेष्ठ सुखाचा परिचय करून देऊन, त्याचें साधन शिकवून त्याची त्या प्रयत्नानें प्राप्ति करवून देणारा, आपलें यथार्थ ज्ञान करून देऊन, स्वांशभूत जीवांना मोक्ष म्हणजे निजैक्य प्राप्त करून देणारा, एक परमेश्वरच होय. हें सर्वहि मानवी कक्षेच्या सर्वथैव बाहेरचें ठरतें. वेदांमध्यें हें सर्व असल्यामुळें, वेद हे अपौरुषेय म्हणजे परमात्मनिगदित आहेत, असेंच म्हणावें लागतें.

वेदांत दिव्यलोकांचें कथन आहे, त्या अलौकिक सुखसाधनांचा उप-देश आहे, या लोकांत आढळून न येणाऱ्या देवदेवतांचें वर्णन आहे. मोक्ष-मार्गाचीं साधनें आहेत, सृष्टीच्या पूर्वील परब्रह्म परमेश्वराचें वर्णन आहे, सृष्ट्युत्पत्तीचें क्रमवार कथन आहे, सृष्टीच्या अधिकारीवर्गाची माहिती आहे, सृष्टिनिर्वहणार्थ अवश्य असणाऱ्या त्यांच्या साहाय्याचें विवेचन आहे, त्या साहाय्याकरितां आवश्यक असणाऱ्या विधिविधानात्मक यज्ञादि साधनांचा उल्लेख आहे, विविध कर्में व त्यांचीं विविध फळें यांचें उद्‌घाटन आहे, पूर्वेतिहास आहे, ऐहिक जीवनोपयोगी व पारलौकिक मोक्षोपयोगी अखिल साधनांचा, सूक्ष्मस्थूळपणें मूलग्राही निर्देश आहे. जन्मसाफल्याचें, उत्कृष्ट नीतीचें, उन्नत सदाचाराचें, सत्यधर्माचें, युक्तायुक्त आचरणाचें, प्रतिप्राणीपदार्थांच्या गुण-धर्मांचें व जीवनोपयोगाचें यथार्थ वर्णन आहे. थोडक्यांत मानवी शक्तीच्या आटोक्याबाहेरचे व मनुष्यप्रयत्नसाध्य अखिल साध्यसाधनांचे आविष्कार, वेदांत सूत्ररूपानें भरगच्च भरले आहेत. अलौकिकाची ओळख सांगणारा अलौकिक ज्ञानसंपन्न असला पाहिजे. अलौकिक ज्ञान, लौकिक मनुष्याकडून,

लौकिक अशा कोणत्याहि प्रयत्नानें करून घेणें साध्य होत नसल्यामुळें, अलौकिकाची ओळख सांगणारा अलौकिकच असला पाहिजे. या लोकांत न जन्मलेला, या लोकांतच अंतर्भूत न होणारा, या अखिल लोकाच्या व अलौकिक देवदेवतांच्या व तत् लोकाच्या उत्पत्तीला कारणीभूत असणाराच एक केवळ, या सर्वांची यथार्थ ओळख करून देईल. वेदांत हें सर्व आढळून येत असल्यामुळें वेद ही परमात्म्याचीच वाणी आहे व त्यामुळेंच वेद अपौरुषेय म्हणवून घेतात हें सिद्ध होतें.

ऋग्वेदाच्या भाष्यांत श्रीसायणाचार्यांनीं म्हटलें आहे—

**अलौकिकं पुरुषार्थोपायं वेत्त्यनेनेति वेदशब्दनिर्वचनम् ॥**

—लौकिक ज्ञानानें समजण्यास अशक्य असणारीं अलौकिक स्वर्गादिकांचीं सुखसाधनें व विशेषतः आत्मसाक्षात्काराचे उपाय, म्हणजे जन्ममरणरहित होऊन आनंदमात्र परमात्मस्वरूपाशीं ऐक्य संपादण्याचे उपाय या वेदांमुळें जाणले जातात. त्यामुळेंच यांना वेद असें म्हणतात.

**प्रत्यक्षेणानुमित्या वा यस्तूपायो न बुध्यते ।**
**एनं विदन्ति वेदेन तस्माद्वेदस्य वेदता ॥**

—डोळ्यानें पाहून प्रत्यक्षप्रमाणानें अथवा मनानें ताडून अनुमानप्रमाणानें जें समजणें अशक्य आहे, जें इंद्रियें व मन यांच्या आंवाक्याबाहेरचें आहे तें सर्वच, विशेषतः मोक्षोपाय, या वेदामुळेंच जाणला जातो. आणि हेंच वेदांचें वेदत्व. या महत्त्वामुळेंच (यांना) वेदांना अपौरुषेय म्हणजे परमात्मप्रणीत वेद असें म्हणतात. परमात्म्याखेरीज कोणी सर्वज्ञ असूं शकत नाहीं व वेदांत सर्वज्ञत्व प्रगट झालें असल्यामुळें वेद हे सर्वज्ञ परमात्म्याकडून रचले गेले हें ओघानेंच सिद्ध होतें. वर दिलेल्या—

**यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै ।**
**त ँ् ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥**

(श्वेताश्वेतर उ. ६।१८)

—ब्रह्मदेवादिकांच्या हृदयांत वेदमंत्र स्फुरविण्याच्या कार्याबरोबर सर्वांच्या ठिकाणीं आत्मबुद्धीस उजळविण्याचें कार्यहि पण एका परमात्म्याचेंच आहे हें स्पष्ट होतें. यावरून जन्मास आलेल्यांनीं आत्मलाभाकरितां परमात्म्यास शरण जावें, असा एक निष्कर्ष निघतो. इथे " **अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्** "। अनित्य आणि असुख अशा या लोकांत जन्मास येऊन

शाश्वत सुखाच्या आत्मप्राप्तिकरितां म्हणजेच मोक्षाकरितां मला शरण ये, माझी भक्ति कर, या गीतेंतील भगवंताच्या वचनाची आठवण होते. यावरून बारक्या सारक्या ( किरकोळ ) सुखाकरितां परमात्मशरणागति आवश्यक नाहीं असें कोणी समजूं नये. **नात्मलाभात्परो लाभः ।** –अनंतानंत शाश्वत आत्मसुखाच्या लाभाहून अधिक असा कोणताहि लाभ नाहीं. **सर्वं पदं हस्तिपदे निमग्नम् ।** या म्हणीप्रमाणें या आत्मसुखांत, सर्व सुखाचा लाभ आपोआपच अंतर्भूत होतो. कोटि रुपयांत शंभर हजार व शंभर लाखांचाहि अंतर्भाव झाल्याप्रमाणें आत्मसुखांत इतर सर्व सुखांचा अंतर्भाव होऊन, सुख म्हणून जितकें, त्या सर्वांच्या प्राप्तिकरितां केवळ सुखरूपी परमात्म्यालाच शरण जावें, असा बोध होतो. त्यांतून आत्मलाभाच्या सुखाची मातब्बरी कोण नाकबूल करील ? एकंदरींत या उपर्युक्त मंत्राच्या विचारानें वेद हें भोगमोक्षसुखकारक आहेत, त्या त्या अधिकारानुरूप सांगितलेल्या वेदमतानुसारी कर्माचें व भक्तियोगाचें अनुष्ठान करीत,अंतिम गतिरूप मोक्षाकरितां शेवटीं निष्काम होऊन परमात्म्याला मुमुक्षूनें शरण जावें व आत्मसाक्षात्कारानें, परमात्म्यैक्य संपादून दुःखरूप जन्ममरणांतून कायमचें सुटावें. त्या परमानंदरूपानें सदाच असावें. हा गूढार्थ इथे सूचित होतो.

**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥** ( गीता १८।४६ )
**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ॥** (१८।४५)
**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥** ( गीता १०।६ )
**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥** ( गीता १०।१० )
**तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥** ( गीता १०।११ )

या गीतेच्या श्लोकांचें इथ आपोआप स्मरण होतें. त्या त्या वर्णाश्रमाला सांगितलेलें कर्मानुष्ठान करीत भगवंताची अनन्यभक्ति केल्यास, परमात्मा त्या त्या भक्तास इहपरसुख देतो, स्वरूपाचें अज्ञान नष्ट करतो. सर्वप्रथम उत्पन्न झालेले सर्व ऋषि, मनु, मुनि प्रत्यक्ष वा परंपरेनें परमात्म्याच्या मनापासूनच उत्पन्न झाले व त्यांच्यापासून पुढें ही सर्व सृष्टि झाली. झालेल्या सृष्टीचा परमात्माच एक प्रभु आहे, हें या श्लोकावरून कळून येतें.

**अव्यक्तान्महन्महतोऽहंकारोऽहंकारात्पंच-**
**तन्मात्राणि पंचतन्मात्रेभ्योऽखिलं जगत् ॥**

हें समस्त कार्यजात अजून ज्या ठिकाणीं व्यक्त झालें नव्हतें तें अव्यक्त, तदभिमानी ईश्वर. यानंतर बीजापासून अंकुराप्रमाणें महत्तत्त्व व तदभिमानी हिरण्यगर्भ.अंकुरापासून विशाल वृक्षाप्रमाणें पुढें मानसिक ब्रह्मांड व तदभिमानी अहंकार म्हणजे विराट्. या विराटापासून प्रगट त्रिगुण व या त्रिगुणांतल्या सत्वगुणापासून विष्णु, रजोगुणापासून ब्रह्मदेव, तमोगुणापासून रुद्र. 'बहु व्हावें' या संकल्पानें विष्णूपासून निर्मित झालेल्या ब्रह्मदेवानें, त्या आपल्या बहुविध रूपाच्या पूर्तीकरितां विष्णूनें स्फुरविलेल्या वेदज्ञानापासून प्रथम पंचभूत निर्माण केलें व त्या सूक्ष्मस्थूळ पंचभूतापासून बहुसूक्ष्मस्थूल शरीरें निर्माण केलीं व त्यांत तो आपल्या सूक्ष्मरूपानें प्रविष्ट झाला. त्याच्या मानसिक सृष्टींत प्रथम नवप्रजापति, ऋषि, मुनि, मनु, यांचा अंतर्भाव झाला व पुढचें कार्य यांच्या-कडून झालें. या ब्रह्मा-विष्णु-महेश्वराकडे क्रमानें सृष्टिस्थितिलयाचीं कार्यें आलीं. हें विराट हिरण्यगर्भ व ईश्वर, यांचे अवतार अथवा अंश आहेत. यांचाच सर्व सृष्टीवर उघड अधिकार चालतो. प्रत्यक्ष वा परंपरेनें असें हें समग्र विश्व, पर-मात्म्याच्या व्यक्ताव्यक्त संकल्पशक्तीचें कार्य असल्यामुळें सर्व मानसिकच होय. या संकल्परूप मायाशक्तीच्या मगरमिठींतून निसटावयाचें झाल्यास त्या सर्वात्म परमात्म्याची शरणागतीच एक साधन होय. वैदिक मताप्रमाणें अभ्युदय नि निःश्रेयस यांकरितां प्रत्येकानें प्रयत्न करावा. हा एवढा अर्थ या श्लोकांतून काढतां येईल.

श्रीजैमिनी ऋषींनीं प्रथम पादांत **वेदांश्चैके सन्निकर्षं पुरुषाख्याः । अनित्यदर्शनाच्च ।** या सूत्रांनीं वेदांच्या पौरुषेयत्वासंबंधीं प्रथम केलेला पूर्वपक्ष **उक्तं तु शब्दपूर्वत्वम् । परंतु श्रुतिसामान्यमात्रम् ।** या सूत्रांनीं खोडून वेदाच्या अपौरुषेयत्वाविषयीं सिद्धांत स्थापला आहे. **स्यात्पौरुषं न वा वेद वाक्यं स्यात्पौरुषेयता । काठकादिसमाख्याना-द्वाक्यत्वाच्चान्यवाक्यवत् ।** (जै. न्या. मा.) **समाख्यानं प्रवचनाद्वाक्यत्वं तु पराहतम् । तत्कर्त्रनुपलंभेन स्यात्ततोऽपौरुषेयता ।** या जैमिनी न्यायमालेच्या प्रमाणावरून व **शब्दतदुपजीविप्रमाणातिरिक्तप्रमाणजन्यप्रमित्यविषयार्थ-कत्वे सति शब्दजन्यवाक्यार्थज्ञानजन्यप्रमाणशब्दत्वं वेदत्वम् ।**

या शब्दचिंतामणीच्या वेदलक्षणावरून वेदाचें अपौरुषेयत्व सिद्ध होतें. **शास्त्रयोनित्वात्** ( ब्र. सू. ) या ब्रह्मसूत्रानेंहि व या वरच्या **महीदृशस्य शास्त्रस्य ऋग्वेदादिलक्षणस्य सर्वज्ञगुणान्वितस्य सर्वज्ञादन्यतः संभवोस्ति।** ( शां. भा. ) या शांकरभाष्यानेंहि वेदाच्या अपौरुषेयत्वाला पुष्टि मिळते. ऋग्वेदादि सर्वज्ञलक्षणान्वित अशा या अलौकिक शास्त्राची उत्पत्ति सर्वज्ञ परमेश्वरावांचून इतर कोणाकडूनहि होणें शक्य नाहीं. अमक्या एका मनुष्यापासून त्याच्या अमुक वयांत, अमुक देशांत, अमक्या वेळीं समग्र वेद झाले, असें कोणतेंहि प्रमाण कोठें आढळून येत नसल्यामुळें व ते परमात्म्यापासूनच झाल्याचें प्रमाण मिळत असल्यामुळें वेद अपौरुषेय आहेत. मनुष्यजात शिकून शाहाणी होते व तिची उत्तरोत्तर कालांत प्रगति होत जाते, या मतानुसारहि अति प्राचीनकालीं म्हणजे जगदुत्पत्तिसमयीं झालेले वेद परमात्मप्रणीत, परमात्मदत्तच आहेत असा निश्चय करण्यास कोणालाहि शंका येणार नाहीं. प्रथम उत्पन्न झालेल्या प्रजेला, प्रथमक्षणीं इहपरसुखसाधक धर्माचा—साधनाचा ज्यामुळें बोध केला गेला, ते वेद परमात्म्यापासून झाले नाहींत, असें कोण बरें मानील ?

सर्वपूर्वप्रजेला इहपरसुखसाधन—बोधक वेद, सर्वप्रथम परमात्मा सांगणार नाहीं, तर दुसरा कोण सांगेल ? सर्वप्रथम असणाऱ्या एका परमात्म्यापासूनच सर्व निर्माण झाले, असें कोणालाहि मानावें लागेल. ब्रह्मदेवाकडून सृष्टी रचविण्याकरितां त्याला दिलेलें ज्ञान, म्हणजेच 'वेद' म्हणून सिद्ध झालें असतां, यांचें अपौरुषेयत्व, जगत्कारणत्व, जगांतील इहपरसाधनांचें मूलग्राही बोधकत्व इत्यादि वेदांचीं सर्व लक्षणें आपोआप सिद्ध होतात.

**वेदापासून सृष्टि**

**सर्वेषां स तु नामानि कर्माणि च पृथक् पृथक् ।**
**वेदशब्देभ्य एवादौ पृथक् संस्थाश्च निर्ममे** ॥ (मनु० १।२१)

वेदाच्या आधारें ब्रह्मदेवानें सर्व लोकांची व्यवस्था केली. पूर्वीचें कर्मफल व संस्कार बघून त्यांना त्यांना तें तें कर्म विभागलें. त्या त्या सृष्ट पदार्थांना तें तें नांव दिलें. त्या त्या जीवांना त्या त्या कर्माप्रमाणें त्या त्या योनींत जन्माला घातलें. देव, दानव, मानव, पशु, पक्षी आदि चेतन सृष्टि, पूर्वकल्पाच्या कर्माप्रमाणें निर्माण केली. सकल प्राणिपदार्थांना निर्माण करून त्यांना

वेदाधारानें नांवें ठेवलीं; व त्यांत त्या त्या गुणधर्मांची कल्पना केली. देवांतून इंद्र, बृहस्पति आदि नांव ठेवलें. त्यांना त्यांना तीं तीं कर्मे दिलीं. मनुष्यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अशीं नांवें ठेवलीं; व त्या त्याप्रमाणें त्यांना त्यांना कर्मांचा विभाग करून दिला.

**चातुर्वर्ण्यं त्रयो लोकाश्चत्वारश्चाश्रमाः प्रथक् ।**
**भूतं भव्यं भविष्यं च सर्वं वेदात्प्रसिध्यति॥** (म.स्मृ. १२-९७)

ब्राह्मणक्षत्रियादि पृथक चार वर्ण, ब्रह्मचर्यादि प्रथक चार आश्रम, स्वर्ग, मृत्यु, पाताल, वर्तमान, भूत, भविष्य, सर्वहि वेदामुळें निर्माण झाले. अशा या अर्थाचा दुसरा एक श्लोक मनुस्मृतींतच आला आहे. **शब्द इति चेन्नातः प्रभवात् प्रत्यक्षानुमानाभ्यां** ॥ या ब्रह्मसूत्रांत वेदापासूनच सृष्टि झाली, असें व्यास महर्षींनींहि सांगितलें आहे. इथे 'वेद वदोन मार्गा लाविले' या समर्थांच्या ओवीचें वाचकांना स्मरण झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

## धर्ममूळ वेद

वेदापासून सृष्टि झाली असल्यामुळें, सकळ सृष्टीचा मूळ धर्मग्रंथ वेद होय, हें ओघानेंच सिद्ध होतें; साऱ्या विश्वाचाच हा वैदिक धर्म आहे हें मनाला पटतें.

**वेदोऽखिलो धर्ममूलम् ॥ स्मृतिशीले च तद्विदाम् ॥**
**आचारश्चैव साधूनामात्मनस्तुष्टिरेव च ॥** ( म. स्मृ. अ. २-६ )

संपूर्ण धर्माचें मूळ वेद होय. वेद, वेदानुसारी स्मृति, वेदस्मृतिवेत्या महात्म्यांचा सदाचार, आत्मसंतोष, हींच या धर्माचीं प्रमाणें होत, असें दुसऱ्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकांत मनूनें सांगितलें आहे. या धर्मांत एकंदरींत सदाचाराला फार महत्त्व आहे. सदाचारच याचें जीवन आहे.

**श्रुतिस्मृत्युदितं धर्ममनुतिष्ठन्हि मानवः ।**
**इह कीर्तिमवाप्नोति प्रेत्य चानुत्तमं सुखम् ॥** ( मनु. २-९ )

हाहि श्लोक मनुस्मृतीचाच आहे. श्रुतिस्मृतींनीं निर्णित केलेला धर्म मानवानें जर आचरला, तर या लोकांत कीर्ति व मरणोत्तर अमित सुखहि त्याला प्राप्त होतें, असा या श्लोकाचा अर्थ होतो. या श्लोकांतील 'मानवः' हा शब्द आखिल मानवजातीलाच उद्देशून आहे, असें सर्वांना कळून येण्यासारखें आहे. यावरून 'श्रुतिस्मृत्युक्त धर्म' हा आखिल मानवांचा धर्म होय, असें

स्पष्ट होतें. जिवंत असे तोंपर्यंत सर्व दृष्टीनेंहि स्तुत्यजीवन होऊन मरणोत्तर अनंत सुखाची प्राप्ति व्हावी, म्हणून निसर्गतः ज्या कोण्या मानवाला वाटतें, त्यानें या श्रुतिस्मृत्युक्त धर्माचा अवलंब करावा, असें येथें ध्वनित होतें.

**श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः ।**
**ते सर्वार्थेष्वमीमांस्ये ताभ्यां धर्मो हि निर्बभौ ॥** ( मनु. २–१० )

श्रुति हें नांव वेदाला आहे व धर्मशास्त्र हें नांव स्मृतीला आहे. वेद-स्मृतीपासूनच धर्म निर्माण झाला. वेद हा जनक व तदनुसारिणी स्मृति, ही धर्माची जननी होय. त्यामुळें धर्माच्या विषयीं तर्क करावयाचाच झाल्यास तो या वेदस्मृतींना अनुकूल असाच केला पाहिजे.

निःसार आणि गलिच्छ विषयसुखाच्या घाणेरड्या वासनेंतून, आपली कायमची सुटका व्हावी असें ज्याला वाटतें, तो परमात्मपदाचा अधिकारीच, या धर्माचें प्रीतीनें अनुष्ठान करतो. अशाकरितांच हा धर्म आहे. अशांनींच या धर्माचें अनुष्ठान करावें. विषयवासनेचा ओढा या धर्माच्या आचरणानें कमी होतो. संयमाचा अभ्यास होतो. निर्विषय आत्मसुखाची वासना वाढते. संसारांत सर्वत्र क्षेम लाभतें, अनंतानंत आत्मानंदाचा लाभ क्रमेण होऊन, प्राणी दुःखरूप जन्ममरणांतून कायमचाच सुटतो. वैदिक धर्माची ही महत्ता आहे. वेदाचें हें गौरवास्पद वैशिष्ट्य आहे. रोग्याला अमृतप्राशनासारखें, भवरोग्यांना या धर्माचें आचरण विलक्षण परिणामकारी आहे. कशाहिविषयीं माणसानें या धर्माचें अनुष्ठान निष्ठेनें करावें व दिव्य जीवनाचा देवमाणूस व्हावें. अर्थ-कामाच्या मगरमिठींतून अपाय न होऊं देतां हळूच सोडवून, परमपदाची प्राप्ति करून देण्यांत या धर्माचा हातखंडा आहे. या कारणामुळेंच याला 'सनातन वैदिक आर्य धर्म' म्हणतात. वेदबीजापासून फोफावलेला अति विशाल असा हा धर्मवृक्ष, वेदबीजाचींच अमृत फळें जगभर पसरवितो. आखिल विश्वालाच निरतिशय आत्मानंदाची प्राप्ति करून देण्यास हा बद्धकंकण आहे. आणि खऱ्या धर्माचेंहि तेंच लक्षण आहे. वेदाची हीच शिकवण आहे. मोठ्यापुढें जाऊन मोठेंच मागणें रास्त असें सांगण्याचा हा गर्भितहेतु मनांत ठेऊन या दृष्टीनेंच मनूनें सांगितलें आहे :

**अर्थकामेष्वसक्तानां धर्मज्ञानं विधीयते ।**
**धर्मं जिज्ञासमानानां प्रमाणं परमं श्रुतिः ॥**

यावरून दिसतें कीं, निर्विषय आत्मसुखाच्या प्राप्तीनें प्राणिमात्र मुक्त होण्याकारितां, प्रत्यक्ष परमात्म्यानेंच सांगितलेला हा वेदोक्त धर्म सर्वांनाच अभ्युदय–निःश्रेयसप्रद आहे. अर्थकामांच्या ठिकाणीं अनासक्त असणाऱ्यासाठीं हें धर्मज्ञान आहे आणि धर्म जाणण्याची इच्छा असणाऱ्यांना सर्वश्रेष्ठ प्रमाण म्हणजे एक श्रुतीच होय हा या वरील श्लोकाचा अर्थ.

## उत्क्रांतिवाद

अलीकडच्या उत्क्रांतिवादावरूनहि वेदांचें अपौरुषेयत्व सिद्ध होतें. जगाची दिवसेंदिवस उत्क्रांति होत आहे, असा या वादाचा सिद्धांत आहे. याला 'Theory of Evolution' 'उत्क्रांतिवाद' असें म्हणतात. 'विकासवाद' असेंहि याचें दुसरें नांव आहे. पुढपुढचा प्रगल्भ काल हा अधिकाधिक उत्कर्षाचा व मागमागचा काल अधिकाधिक मागासलेला असें या मतानें ठरतें. मागचा काल म्हणजे पशुतुल्य, रानटी जीवनाचा, ज्ञानशून्य काळ असें या मताचे लोक म्हणतात. वेदांचा काल अतिप्राचीन. तेव्हां त्या काळांत यांच्या सिद्धांताप्रमाणें कोणालाच कसलें ज्ञान असूं शकत नाहीं. अशा काळीं झालेला वेद, आजच्या उत्क्रांतीच्या कालांतहि इतका आदरणीय आणि अनुकरणीय ठरतो व विश्वमान्य होतो, तें केवळ त्याच्या अपौरुषेयत्वामुळेंच हें कोण नाकबूल करील ? या उत्क्रांतिवादाच्या आधुनिक विद्वानांच्या सिद्धांताप्रमाणेंहि, वेद ही मनुष्यकृति नसून ती परमात्मकृति आहे, हें सरळ सिद्ध होतें. वैदिक धर्माचा प्रणेताहि परमात्माच; हेंहि ओघानेंच प्राप्त होतें.

अपक्रांतिवादानेंहि वेदाचें अपौरुषेयत्व सिद्ध होतें. दिवसेंदिवस प्रतिप्राणिपदार्थाचा ऱ्हास होत जातो. प्रतिवस्तु प्रतिक्षणीं क्षीण होत होत शेवटीं नष्ट होते. क्रमशः नाशाच होत जातो. तेव्हां दिवसेंदिवस पूर्वीपेक्षां क्षीण होत जाणें या नियमानुसार, जगाचा उत्तरोत्तर उत्कर्ष न होतां अपकर्षच होत जातो. असा या अपक्रांतिवादाचा सिद्धांत आहे. उत्तरोत्तर दिवस गेल्याप्रमाणें होणारें सर्व अपूर्ण, निःसत्व, शक्तिहीन होतें. या मतानुसारहि जगदुत्पत्तिकालांत झालेला वेद, साहाजिकपणें सर्वांपूर्वींच्या परमात्म्याकडे आपलें कारणत्व दाखवून, आपलें अपौरुषेयत्व सिद्ध करतो व पूर्णत्व स्थापितो. पूर्वशक्ति उत्तरोत्तर राहात नाहीं, या दृष्टीनें जगत्‌उत्पत्तीच्या दुसऱ्याच क्षणापासून, जगाच्या अपक्रांतीला सुरुवात झाल्यानें, जगदुत्पत्तीच्या नंतरचें वाङ्मय पूर्ण होऊं शकत

नाहीं. या सर्व विचारानें कोणतें तरी एक, असें पूर्ण वाङ्मय मानावेंच लागतें. वेदापेक्षां प्राचीन वाङ्मय दुसरें आढळत नाहीं. वेदाची उत्पत्ति परमात्म्यापासूनच झाली याचें भरपूर प्रमाणहि सांपडतें. या दृष्टीनें वेदाचें अपौरुषेयत्व सिद्ध होतें. पूर्ण स्वरूपाचा बोध करणारे सर्वांगपरिपूर्ण वेद, जगदुत्पत्तीनंतर उत्पन्न न होतां ते जगदुत्पत्तीपूर्वींच, सर्वज्ञ परमात्म्यापासूनच उत्पन्न झाले असें तर्कानेंहि सिद्ध होतें.

## वेदादि धर्मग्रंथांविषयीं पाश्चात्यांचें मत : वेद

सनातन धर्माचे आधारग्रंथ म्हणजे वेद, उपनिषदें आणि गीता. जगाच्याच वाङ्मयांत यांना विशेष प्राधान्य आहे. यांत सनातन आर्य धर्माचें सर्वस्व सांठविलें आहे. यांचा कुलंकष विचार करून पाश्चात्य पंडितांनींहि याची महती गाइली आणि यांना हृदयांत सांठविलें. यांच्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं असलेला आदर व्यक्त करण्यास, निवडक अशा कांहीं पंडितांचीं शेलकीं अशीं कांहीं वचनें, प्रसंगोपात्त इथे थोडीं उद्धृत करूं. यामुळें त्यांच्या हृदयांत घर करून असलेल्या, आर्य धर्माच्या वैदिक वाङ्मयाच्या महत्त्वाचें संदर्शन सर्वांनाच होईल. पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत प्रसिद्ध असलेल्या ' विक्सर कझन ' नांवाच्या एका फ्रेंच विद्वान तत्त्वज्ञानें, एका मोठ्या सभेपुढें वैदिक वाङ्मयाविषयीं जें घंटाघोषानें सांगितलें, तें येथें उद्धृत करतों.

"When we read with attention in Poetical Philosophical monuments of the East, above all, those of India which are beginning to spread in Europe, we discover many a truth of truths so profound and which we make such a contrast with the meanness of the results at which European genius has sometimes stopped, that we are constrained to kneel before the philosophy of the East and to see in the cradle of the human race the native land of the highest Philosophy."

—युरोपांत अलीकडे झपाट्यानें प्रसृत होण्यास आरंभिलेल्या पौर्वात्य तत्त्वज्ञानाचें, त्यांतहि मुख्यत्वेंकरून भारतांतील उदात्त व अतिरसमय तत्त्वज्ञानाच्या अतिशय रहस्यपूर्ण,बहु महत्त्वाच्या वैदिक ग्रंथभांडाराचें, जेव्हां आम्ही सूक्ष्मरीतीनें अवलोकन करतों, तेव्हां वेदवेदांतांनीं सुशोभित झालेल्या तात्त्विक रत्नसागरांत पाश्चात्य पंडितांच्या भेदक दृष्टीलाहि दिपवून टाकणारीं व निसर्गरमणीय

असणारीं अमोलिक अशीं अपार सिद्धांतरत्नें आढळतात. त्याचा विचार केला असतां आम्हां युरोपियनांची बुद्धि अतिमुग्ध व स्तब्ध होते. कांहीं तत्त्वज्ञान्यांच्या प्रमेयांचा विचार करतांना,या पूर्वींहि कांहीं प्रसंगीं युरोपियनांची बुद्धि स्तब्ध होण्या-सारखे कांहीं प्रसंग आले होते. त्यांपेक्षांहि हीं भारतीय प्रमेयें आणखी अधिक गहन व महत्त्वपूर्ण आहेत. विश्वाचें मार्गदर्शन करणाऱ्या, विश्वभाग्योदयाच्या या अपौरुषेय वैदिक वाङ्मयाच्या पुढें, याच्या त्या दिव्य भव्यतेपुढें किती नाहीं म्हटलें तरी, भावावेशानें शेवटीं गुढघे टेकून, आम्हां सर्वांनाच मस्तक लव-विणें भाग पडतें. असा कांहीं त्याचा विलक्षण दैवी प्रभाव आहे. आपण कोण हें समजाऊन देऊन, सर्वांना मूलस्वरूपाची अचूक ओळख पटवून देणाऱ्या, आत्मसाक्षात्कार करून देऊन सर्वांचा उद्धार करणाऱ्या, अशा या मूलग्राही सर्वोन्नत तत्त्वज्ञानाचें जन्मस्थानच हा भारतवर्ष असल्यामुळें, अखिल मानवाच्या शुद्ध धर्माची ही केवळ मायभूमी आहे. ' जकोलीयट ' नामक एका पाश्चात्य पंडिताकडून विरचित झालेल्या, 'The Bible in India' नांवाच्या एका ग्रंथांत सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं अनेक मतमतांतरांचा उल्लेख करून, वैदिक मताचा उल्लेख करतांना त्यानें खालीलप्रमाणें लिहिलेलें आहे.

"Astonishing fact! The Hindu revelation (Veda) is of all revelations, the only one whose ideas are in perfect harmony with modern science as it proclaims the slow and gradual formation of the world."

—सर्व धर्मांचे लोकहि आपापला धर्मग्रंथ ईश्वरदत्त आहे असें म्हणतात. त्या सर्व ईश्वरदत्त धर्मग्रंथांत, अपौरुषेय वेदच एक असा ईश्वरदत्त धर्मग्रंथ आहे कीं, ज्याचे विचार, यांत सावकाशपणें क्रमसृष्टीचा उपदेश असल्यामुळें, आधुनिक विज्ञानाशीं जुळतात, आम्हांला समंजस वाटतात आणि पटतात. थक्क करून टाकणारें सोलीव सत्य या एका वेदग्रंथांतून मात्र आढळतें. अमेरिकेच्या ' व्हिलर विल्कॉक्स ' नामक एका विदूषीनेंहि अशाच तऱ्हेनें आपलें मत प्रकट केलें आहे.

"We have all heard and read about the ancient religion of India. It is the land of the great Vedas, the most remarkable works, containing not only religious ideas on a perfect life, but also facts which all the science has since proved true. Electricity, Radium, Electrones, Air-Ships all seem to have been known to the Seers who found the Vedas."

—भारताच्या अतिप्राचीन वैदिक धर्माविषयीं आम्हीं संपूर्ण ऐकलें आहे आणि वाचलें आहे. भारत हें त्या अत्यंत महत्त्वपूर्ण आणि श्रेष्ठ अशा वेदांचें जन्मस्थान आहे कीं ज्यांत संपूर्ण दिव्य जीवनाच्या धार्मिक तत्त्वांचेंच एक केवळ विवेचन नसून, आजपर्यंतच्या आखिल विज्ञान–शास्त्रांनीं सिद्ध करून प्रचारांत आणलेल्या व सत्य म्हणून विश्वासून असणाऱ्या आखिल वैज्ञानिक सिद्धांतांचेंहि पण विवेचन आहे. ( विद्युत् ) इलेक्ट्रिसिटी, रेडिअम्, इलेक्ट्रॉन्स आणि विमानें इत्यादिकांचें ज्ञानहि, तपोबलानें वेदांचा शोध लाविलेल्या त्या वेदद्रष्ट्या ऋषींना होतें, असें आढळून येतें. आधुनिक विज्ञान–शास्त्र म्हणजे वेदांतील अबाधित सिद्धांतांचें केवळ अनुकरणच होय. '**सर्वं वेदाप्रसिध्याति**' या मनूक्त वचनाची हें विधान वाचून पुन्हां एकदां इथे आठवण होते.

कलकत्त्याच्या संस्कृत कॉलेजचे प्राध्यापक सत्यव्रत यांनीं वेदासंबंधींच्या खोल संशोधनाचे फारच परिश्रम सोसले होते. वैदिक साहित्य शिकविण्याचाच यांचा विषय होता. पौर्वात्य आणि पाश्चात्य विद्वानांमध्यें हे एक गण्य विद्वान होते. यांचे त्रयीचतुष्टय, त्रयीपरिचय, निरुक्तालोचन, ऐतरेयालोचन इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. यांनीं आपल्या त्रयीचतुष्टय नामक संग्रहग्रंथांत वेदांसंबंधीं खालीलप्रमाणें आपलें मत दिलें आहे.

"When the 'Trayee Sangrah' was being compiled the impression grew upon me that the real meaning of many Mantras did not come out in Sayana's Commentary and the desire became strong in me to publish the interpretation of Yaska and other old expositors of the Veda. At a time when photography, phonography, gaslight, telegraph, telephone, railway and balloons had not been introduced into the country, how could our people understand any verses referring to these things? Our opinion is that, in Vedic times, our country had made extraordinary progress. In those days the sciences of Geology, Astronomy and Chemistry were called 'Adhidaivika Vidya' and those of Physiology, Psychology and Theology, 'Adhyatma Vidya.'

"Though the works embodying the scientific knowledge of those times are entirely lost, there are sufficient indications in Vedic works of those sciences having been widely known in those days."

— Acharya Satyavratji

—'त्रयीसंग्रह' नामक ग्रंथलेखनाच्या संग्रहार्थ परिशीलन करीत असतां, 'सायण' भाष्यांत कितीतरी मंत्रांचा यथार्थ भाव प्रगट होत नाहीं असें माझ्या

नजरेस आलें. यामुळें यास्कादि अन्य प्राचीन भाष्यकारांचा भावार्थ प्रसिद्ध करावा, अशी मला तीव्र इच्छा उत्पन्न झाली. वैदिक कालांत, फोटोग्राफी, फोनोग्राफी, गॅसलाइट, टेलिग्राफी, टेलिफोन, रेल्वे, बलून्स इत्यादिकांचा प्रचार जर नव्हता, तर त्यांच्या त्यांच्या संकेतांनीं युक्त असें, त्या त्या मंत्रांचें रहस्य वेदभाष्यकारांनीं कसें जाणलें ? वैदिककालीं आमच्या भारतवर्षाची भौतिक शास्त्रांतहि असाधारण प्रगति झाली होती असें आमचें मत आहे. त्या कालीं भूगर्भ, ज्योतिष आणि रासायनिक शास्त्र यांना 'अधिदैविक विद्या' म्हणून म्हटलें जात असे. आणि शारीरशास्त्र, मनोविज्ञान, ब्रह्मविज्ञान या शास्त्रांना 'अध्यात्मविद्या' म्हणून म्हटलें जात असे. वैदिक कालचे वैज्ञानिक ग्रंथ जरी आज़ प्रगट नसले तरी वेदांमध्यें वैज्ञानिक शोधांचे वाटेल तितके निर्देश दिसून येतात. वैदिककालीं वैज्ञानिक प्रचारहि भरपूर होता असें यामुळें स्पष्ट होतें.

शोपेनहार नांवाच्या जर्मन तत्त्ववेत्यानें वैदिक वाङ्मयाविषयीं जें आपलें मत व जो आपला अनुभव प्रगट केला आहे, त्याचाहि विचार करूं.

विदेशीय पंडितांनीं मनमुराद गाइलेल्या वेदांच्या गोडव्याचें अवलोकन करून तरी, आधुनिक आंग्लविद्याविभूषितांच्या बुद्धीवर प्रकाश पडेल; व त्यांची वेदश्रद्धा यामुळें दुप्पट तिप्पट वाढेल. इतकेंच नव्हे तर भारतांतल्या विदेशीय व भारतीय ख्रिस्त-धर्म-प्रचारकांनाहि यामुळें, त्यांच्या सन्मान्य पंडितांनीं प्रगटविलेल्या मतांची ओळख पटून, वैदिक वाङ्मयाविषयीं व वैदिक धर्माविषयीं आदर आणि पूज्यत्व उत्पन्न होईल. या उद्देशानें हीं अवतरणें इतक्या विस्तारांनीं इथे दिलीं आहेत. पाश्चात्य पंडितांवरच भिस्त ठेऊन असणाऱ्या, आधुनिक विद्वान-शास्त्री-पुढाऱ्यांनाहि वेदाचें व वेदधर्माचें महत्त्व या योगानें कळून यावें; हा या उपक्रमाचा उद्देश आहे. एरवीं हातच्या कांकणाला आरसा कशाला हवा ? वेदांविषयीं आतांपर्यंत बघितलें. आतां उपनिषदांसंबंधीं उदाहरणादाखल, कांहीं पाश्चात्य पंडितांचीं मतें येथें उद्धृत करूं या.

### उपनिषदें

"In the whole world there is no study so beneficient and so elevating as that of the Upanishads. It has been the solace of my life and it will be solace of my death." — Schopenhauer

—मनुष्याच्या मनोभूमिकेस पराकाष्ठेच्या उन्नतीस पोहोंचवून, मानवजातीवर मोठा उपकार करणाऱ्या, या उपनिषदांच्या अभ्यासाखेरीज

सर्व जगांत इतका लाभकारक व उन्नतिकारक, असा दुसरा कोणताहि श्रेष्ठ अभ्यास नाहीं. उपनिषदेंच माझ्या आयुष्याचें समाधान. याच्या आश्रयानेंच मी नितांत सुखासमाधानाचें दिव्य जीवन अनुभवीत आहें. याच्या छत्राखालींच शेवटीं निरतिशय सुखशांतीनें मी देहत्याग करीन.

प्रोफेसर मॅक्समुल्लर यानेंहि शोपेनहारच्या या वरील विधानावर आपल्या संमतीची सही केली आहे. आपल्या अनुभवाचीहि याला पुष्टि दिली आहे. या वैदिक तत्त्वांचाच त्यानें अधिक पुरस्कार केला आहे.

"If those words of Schopenhauer required any endorsement, I should willingly give it as the result of my own experience during the long life devoted to the study of many philosophies and religions. If Philosophy is meant to be a preparation for death, I know of no better preparation for it than the Vedic Philosophy."

—"शोपेनहारनें केलेल्या विधानाच्या दृढतेकरितां माझीहि सही जर कोणी अपेक्षील, तर ती मी, माझ्या सकळ धर्माच्या व तत्त्वज्ञानाच्या दीर्घ परिश्रमाचा अंतिम निर्णय म्हणून, केव्हांहि मोठ्या आनंदानें देण्यास, हा एका पायावर तयार आहें. आत्मतृप्तीनें **सकाळीं** मरणाचें स्वागत करण्यास अवश्य असलेल्या सिद्धतेला तत्त्वज्ञानाचा अभ्यासच कारण होतो. असें झाल्यास एका वैदिक तत्त्वज्ञानाखेरीज दुसरें असें कोणतेंहि श्रेष्ठ तत्त्वज्ञान सबंध जगांतच मला कुठे आढळत नाहीं; आणि आहेसें वाटतहि पण नाहीं."

ज्यांना वैदिक वाङ्मयाचें महत्त्व वाटत नाहीं, ज्यांचा वैदिक वाङ्मयावर विश्वास नाहीं, त्यांच्या मनःचक्षूंना या पाश्चात्य पंडितांचीं स्वानुभवानें ओथंबलेलीं हीं सारभूत वाक्यें अंजनाप्रमाणें परिणामकारक होवोत. परधर्मीय आणि परदेशीय म्हणविणारे लोकसुद्धां वेदांचें प्रामाण्य इतकें शिरसावंद्य मानतात; तर मग एतद्धर्मीय आणि एतद्देशीय लोकांनीं तें किती अधिक मानावयास पाहिजे व तें आतां किती प्रमाणांत मानण्यांत येतें याचा आढावा काढून त्यावर प्रत्येकानेंच विचार करावा. पाश्चात्य पंडितांनीं जें असें वेदांचें यश गाइलें त्यांच्या कीर्तीचा डंका वाजविला, तो अनुभव आल्याशिवायच का?

## भगवद्गीता

वेद आणि उपनिषदें यांविषयीं पाश्चात्य पंडितांच्या उद्गारांचें निरीक्षण आपण केलें. आतां भगवद्गीतेविषयीं असणाऱ्या त्यांच्या अनुभवाकडे आपण वळूं.

"The most beautiful, perhaps properly the only true philosophical song that exists in any known tongue."

श्रीमद्भगवद्गीतेबद्दलचें हें हंबोल्सचें वाक्य आहे. 'सर्वच दृष्टीनें अतिशय सुंदर, किंबहुना जगांतील सर्व भाषांतल्या साऱ्या गीतांतच, खऱ्या तत्त्वज्ञानाचा, सर्वतोपरी खरोखर योग्य, असा एकच एक अचूक ग्रंथ;' म्हणजे भगवद्गीता.

"There is in it a sublimity of conception, reasoning and diction almost unequalled." — Warren Hastings

— 'गांभीर्यपूर्ण विचारसरणी, मनाला पटण्यासारखें सयुक्तिक विवेचन आणि लयबद्ध छंद, इत्यादिकांनीं 'गीता' हा ग्रंथ जगांतच बिनतोड आहे.'

आचार्यादिकांचें उदाहरण घेऊन अथवा त्यांचीं वचनें उद्धृत करून गीतेचें महत्त्व पटाविण्याचा प्रयत्न केल्यास, पाश्चात्य विद्यांनीं सुसंस्कृत झालेल्या वा पाश्चात्य संस्कृतीनें भारलेल्या आधुनिक पंडितांना व पुढाऱ्यांना वाटावयाचें कीं, आपल्या प्रमाणग्रंथाची आचार्य टिमकी वाजवितात व त्याची 'श्रीधरस्वामी' री ओढतात. या सदराखालीं जाऊन गीतेचें महत्त्व कोणाला तितकेंसें पटणारहि नाहीं; व तें परिणामकारक होणार नाहीं. म्हणून त्यांना त्यांना संमत असलेल्या प्रमाणवाक्यांनीं तें पटवून दिलें म्हणजे तें अनायासें चटकन् पटतें. म्हणून (या न्यायानें) पाश्चात्यांचींच गीतेविषयीं कांहीं वाक्यें बाघितलीं. पाश्चात्य पंडितांच्या मताचा छडा लाविला. त्यांचें गुणग्राहकत्व दिसून आलें व त्यामुळें वैदिक वाङ्मयाची थोरवीहि इतर जनांना पटली. वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासानें पाश्चात्यांनीं आपली भूमिका कितीतरी वाढवून घेतली होती, हें उदाहरणार्थ उद्धृत केलेल्या शोपेनहार व मॅक्समुल्लर यांच्या आनुभविक विधानांवरून स्पष्टपणें व्यक्त होण्यासारखें आहे. पाश्चात्यांच्या मनोभूमिकेंतून गीतेविषयीं विचार करीत असतां, आपोआपच ओघानें एका घटनेचें स्मरण झालें. विधर्मीय नी विजातीय म्हणविणाऱ्या पाश्चात्यांनासुद्धां, गीतेच्या अभ्यासानेंच केवळ, केवढी उच्च भूमिका प्राप्त करून घेतां येते हें या घटनेनें व्यक्त होईल. या 'थोरो'च्या उदाहरणानें भारतीयांच्या डोक्यांत प्रकाश पडेल. 'अतिपरिचयादवज्ञा' या न्यायानें वागल्याबद्दल पुरेसा पश्चात्ताप होईल.

प्रसिद्ध जर्मन कवि इमर्सन हा सहज थोरोच्या दर्शनाला एकदां गेला. तेव्हां थोरो हा एका वृक्षाखालीं जुन्या जीर्ण खाटेवर बसला

होता व त्याच्या त्या खाटेखालीं इकडे तिकडे लहान मोठे सर्प वावरतांना दिसत होते. जितकी थोरोची निर्भय स्थिति होती तितकीच सर्पांचीहि निर्भय स्थिति होती. तिथे कोणांतहि भयाचा मागमूसहि दिसून येत नव्हता. आनंदानें व प्रसन्नतेनें जसा थोरो खाटेवर बसला होता, तसेच ते सर्पहि आनंदानें व प्रसन्नतेनें, इकडे तिकडे स्वच्छंदानें विहरत होते. हें दृश्य पाहून इमर्सन आश्चर्यचकित झाला. याचें रहस्य जाणण्याविषयीं त्याच्या मनांत आलें. कोणत्या तात्त्विक ग्रंथाच्या अभ्यासानें अशी ही याची स्थिति झाली तें समजून घ्यावें असें त्याला वाटलें. विनयान्वित होऊन इमर्सन विचारतो, "महाराज, आपल्याला या सर्पांची भीति कशी वाटत नाहीं?" थोरोचें यावरील उत्तर फार मननीय आहे. यानें गीतेचें महत्त्व व्यक्त होतें. आर्यांच्या तत्त्वज्ञानाची थोरवी मनांत बिंबते. "Where is fear when Mother Gita is there to protect!" थोरोच्या या उत्तराचा वाचकांनीं विचार करावा. भारतांतल्या प्रत्येक सुधारकानें सद्यःपरिस्थितींतली आपली भूमिका याच्याशीं ताडून पाहावी. गीतेविषयीं असणारी आपली भक्ति, श्रद्धा, याच्या कसाला लावून बघावी. "गीतामाताच इथे प्रत्यक्ष रक्षण करण्याकरितां निकट असतांना भीति कुठून शिल्लक राहाणार!" हा थोरोच्या ह्या वाक्याचा अर्थ. आपल्या उशाशीं असणारी ती गीता चटकन काढून, "या तात्त्विक ग्रंथाच्या अभ्यासानें माझी ही अशी स्थिति झाली," म्हणून तो गीता ग्रंथ थोरोनें इमर्सनच्या हातांत ठेवला. त्यावेळीं कृतज्ञतेच्या प्रेमाश्रूंनीं थोरोचे डोळे भरून आले. आनंदाश्रूंच्या धारा लागल्या. सर्वांग आनंदानें पुलकित झालें. विलक्षण सुखशांतीची दिव्य छटा त्यांच्या तोंडावर झळकूं लागली. नव्या विचाराच्या वातावरणांत वावरणाऱ्यांना यापासून कांहीं धडा मिळत असल्यास त्यांनीं तो अवश्य घ्यावा.

**एषा वेदोपनिषत्।** या तैत्तिरीय शिक्षोपनिषदाच्या वाक्यावरून वेदांचा आणि उपनिषदांचा संबंध लागल्याप्रमाणें, "इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु" या प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं येणाऱ्या पालुपदावरून या उपनिषदांचा आणि गीतेचा संबंध लागतो.

**न जायते म्रियते वा विपश्चिन्नायं कुतश्चिन्न बभूव कश्चित्।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे॥**

(१८ कठ अ. १ व. २)

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ।।**
( २० भ. गीता. अ. २ )

**हन्ता चेन्मन्यते हन्तुं हतश्चेन्मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति व हन्यते** ।। (१९ कठ. १ व. २

**य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते** ।। (१९भ.गीता२०अ.२)

**उर्ध्वं मूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ।**
( १ कठ अ. २ व. ६ )

**उर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम्** । ( १ भ. गीता अ. १५ )

इत्यादि वाक्यांचें अतीव साम्य आहे; तत्त्व तर एकच.

उपनिषदें आणि गीता, या दोन्हींचा वेदांतच अंतर्भाव होतो व या सव ग्रंथांचा अंतर्भाव, वैदिक अथवा आर्य धर्मांत, आर्य संस्कृतींत होतो.

## वेदवेद्य परमात्मा

**नावेदविन्मनुते तं बृहन्तम्** । ( य. ब्रा. ) तें विशाल बृहत्तत्व वेदाच्या परिज्ञानाशिवाय कोणी जाणूं शकत नाहीं. वेदमताचा कोणताहि आस्तिक--ग्रंथ, आपल्या आधाराकडे—वेदाकडे बोट दाखवून वैदिक म्हणवितो. परमात्म-तत्त्व समजावून सांगणाराच वेद होय. सृष्टीपूर्वी असणाऱ्या परमात्म्याला आपलें तत्त्व समजावून सांगावयाचें झाल्यास, सगुण रूप धारण करून आपल्या श्रीमुखानेंच सांगावें लागणार. एरवीं दुसऱ्या कोणास तें जाणणें शक्य आहे ? या दृष्टीनेंहि निजरूप व त्याच्या प्राप्तीकरितां असणारीं साधनें, सर्वप्रथम असणाऱ्या लोकांना परमात्म्यानें ज्या वाणीनें सांगितलीं त्या त्याच्या वाणीलाच **वाग्विवृत्ताश्च वेदाः** । वेद असें म्हणतात.

## ऋग्वेदांतर्गत सृष्टिक्रम

'ऋग्यजुस्सामाथर्व' या चारी वेदांमध्यें ऋग्वेदाचीच प्रथम गणना होते. आधुनिक मताप्रमाणेंहि अतिप्राचीन असणाऱ्या ऋग्वेदाच्या नासदीय सूक्तांत सृष्टीची रचना व सृष्टीपूर्वील स्वरूपवर्णन आलें आहे. सृष्टिरचनेचें वर्णन आणि सृष्टीच्या पूर्वील स्वरूपाचें वर्णन, हें एका परमात्म्याखेरीज

इतक्या पुरातन काळीं, किंबहुना जगदाद्यकालीं, दुसरा कोण सांगण्यास समर्थ आहे ? या उदाहरणानेंहि वेद परमात्मप्रणीतच होत असें कोणालाहि वाटेल. आपण त्या नासदीय सूक्ताचा भावार्थ समजून घेऊं या.

**नासदासीन्नो सदासीत्तदानीम् नासीद्रजो नोव्योमापरोयत ॥**
**किमावरीवः कुहकस्य शर्मन्नम्भः किमासीद् गहनं गभीरम् ॥१॥**

( ऋ. १०-१२९-१-७ )

—सबंध सृष्टीचा शेवटीं प्रलय होऊन सृष्टीपूर्वीची स्थिति उरते. त्या ठिकाणीं सृष्टिहि नसते व शून्यहि नसतें. सत्वादि गुणत्रय आणि व्योमादि भूतपंचकहि त्यावेळीं नसतें. त्या अद्वितीय आनंदरूपांत आवरणात्मकहि कांहीं नसतें व विक्षेपात्मकहि कांहीं नसतें. तें आवरण तरी कुठे, कसें व कोणाच्या सुखाकरितां तिथे असणार ? ब्रह्मदेवाच्या दैनंदिन प्रलयांत, पृथ्वी आणि पृथ्वीतलें सर्व, एक जलमय तरी होऊन असतें, पण तसेंहि कांहीं इथे नसतें.

या आखिल कार्यजाताच्या पूर्वीं कारणरूप परब्रह्म एकच एक होतें. त्या परमात्मस्वरूपाहून दुसरें असें कांहींहि नव्हतें. तेंच तें एक निव्वळ आपल्या अद्वितीयरूपानें, केवळ एक आनंदमात्र असल्यामुळें, तिथे व्यक्त अथवा अव्यक्त रूपानेंहि, सृष्टि म्हणून कांहीं नव्हतेंच. या जगाचा मागमूसहि तेथें नव्हता. सत्त्वरजतम गुणांपैकीं एखादाहि गुण त्या ठिकाणीं नव्हता. तिथे कसलाहि संकल्प, कोणतीहि कल्पना नव्हती. कसलीहि कार्यस्फूर्ति नव्हती. आकाशादि पंचभूतेंहि त्या ठिकाणीं नव्हतीं. त्रिगुण, पंचभूतें, नामरूप उपाधि, ज्ञान, इच्छा, क्रिया अशा अखिल कार्यकारणापूर्वीं कार्यकारणशून्य आनंदच एक होता. सर्वप्रथम असणाऱ्या या आनंदमात्रतेंत दुसरें असें काय असणार ? अगदीं कशाचीहि उत्पत्ति झाली नसतां निव्वळ आनंदच एक होता. ज्ञानमात्र आनंदच एक केवळ आपल्या अस्तित्वानें अद्वय असतां, दुसरें कांहींच नसतां, त्या ठिकाणीं अन्य कोण आणि कशाच्या योगानें व कशाकरितां, कोणाला, काय म्हणून आच्छादणार ? त्या अद्वितीय आनंदमात्रतेंत दुसरें कांहीं नसतां, आच्छादक आवरणहि नव्हतें. स्वसंवेद्य आनंदाच्या एका अस्तित्वावांचून दुसरें कांहींच नसतांना हें आच्छादक आवरण असूं शकेल तरी कसें ? निःसंकल्प, निर्विकल्प, निःस्फूर्तिक अशा त्या केवळ एक आनंदमात्रतेंत, अन्यच कांहीं नसतांना, कोणाच्या हिताकरितां कोणाला सुख व्हावें म्हणून, कशाची उत्पत्ति

झाली असणार! अन्य तरी काय असणार? नित्य निर्विकार अशा त्या सच्चिदानंदघन स्वरूपांत, जग आणि जगत्प्रलयच नसतांना, जगत्प्रलयानंतर उरणारें तें अगाध एकार्णव जल तरी त्या ठिकाणीं कसें असूं शकेल? आनंद-मात्रतेंत एका आनंदाशिवाय दुसरें काय असणार?

**न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अन्ह आसीत् प्रकेतः ॥**
**आनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्न परः किंचनास ॥ २ ॥**

( ऋ. ना. सू. १०–१२९–१–७ )

—मृत्यु आणि अमृतत्व अशीं दोन्हीहि त्या ठिकाणीं नसतात. रात्र आणि दिवस दोन्ही त्या ठिकाणीं नसतात. सूर्यचंद्राचाहि त्या ठिकाणीं अभाव असतो. मनप्राणाशिवायच तेथें तें आपल्या आपण असतें. एका त्या ब्रह्मतत्त्वाखेरीज त्या वेळीं कांहीं नसतें. त्या वेळीं तेथें मृत्युहि नव्हता. मृत्युसापेक्ष अमृतत्वहि नव्हतें. बंधहि नव्हता आणि मोक्षहि नव्हता. रात्रहि नव्हती आणि दिवसहि नव्हता. कसल्याहि काळाची गणना नव्हती. कालाच्या गणनेस कारणीभूत होणारे सूर्यचंद्रहि त्यावेळीं नव्हते. आनंदमात्र ब्रह्मरूपच एक त्यावेळीं होतें. या जगांतले प्राणी प्राणामुळेंच श्वासोच्छ्वास असेपर्यंतच केवळ जगतात. तो प्राणस्पंद कां एकदां थांबला, कीं त्या प्राण्यांत चैतन्य दिसून येत नाहीं. चैतन्य प्राणस्पंदानें प्रगट होतें या न्यायानें तिथेहि हा प्राणस्पंद असावयाला पाहिजे म्हणून कोणी आक्षेपील तर तोहि तिथे म्हणजे जगदाद्य परमात्मस्वरूपांत नव्हता. आनंद-मात्र परमात्मरूप स्वतःच चैतन्यरूप असल्यामुळें त्याला अन्य प्राणादिकांची आवश्यकता नाहीं. तो आनंदरूपी परमात्मा प्राणाशिवाय व अशा कसल्याहि प्राणस्पंदाशिवाय, वायुप्रचाराशिवाय, श्वासोच्छ्वासाशिवाय आपल्या एक चैतन्य-मात्र स्वरूपानेंच, आपल्या निव्वळ आनंदमात्रतेनेंच केवळ शिल्लक होता. त्या आनंदस्वरूपाव्यतिरिक्त तिथे त्या वेळीं दुसरें कांहीं एक अजिबात शिल्लक नव्हतें, म्हणून श्रुतीचें सांगणें आहे.: असें हें सृष्टीपूर्वीचें निर्मळ आणि निर्भेळ स्वरूप एका आनंदमात्रतेशिवाय दुसऱ्या कोणत्याहि रूपानें, कोणाकडूनहि अनुमानित होऊं शकत नाहीं, हें खरें. पण हें झालें त्या शुद्ध स्वरूपाचें वर्णन. पण या सृष्टीची व्यवस्था कशी लावावयाची? या सृष्टीच्या कार्यकारणाचा कांहीं तरी संबंध लागला पाहिजे ना? म्हणून विचारल्यास त्यानें उत्तर म्हणून " **यक्षानु-रूपो बलिः** " या न्यायानें हा पुढचा उपक्रम आहे. प्रथम जगदादीचें केवळ

आनंदरूप कळवून जगन्निर्वाहरूप कार्यकारणाचें निरूपण आतां पुढच्या श्रुतिमंत्रानें करणें आहे. त्याच्या भावार्थाकडेच एकदम लक्ष घालण्यापूर्वी समजण्यास सोपें जावें म्हणून त्याबद्दल थोडा पूर्वविचार इथे करूं या. तिन्ही कालींहि एकरूप असणाऱ्या सत्यरूपांत वर्तमान–भूत–भविष्यादि कालगणना असूं शकत नाहीं. तें नित्यनिर्विकार स्वरूप असल्याप्रमाणेंच सदोदित असल्यामुळें, त्यांत अन्य कांहीं होत नाहीं व तें कार्याभावीं कसलेंच कारणहि पण होऊं शकत नाहीं.

**कारणं यस्य वैकार्यं कार्याभावे न कारणम् ।**
**कारणत्वं ततो नश्येत् कार्याभावे विचारतः ।**

—कार्यामुळेंच कारण. कार्य नसतांना कारणहि नाहीं. कार्याचा अभाव झाला कीं कारणत्वाचाहि आपोआप अभाव होतो. कल्पित वंशावळीचा मूलपुरुष कल्पितच असणार म्हणून कार्यकारणशून्य अशा सर्वाद्य स्वरूपाच्या ठिकाणीं झालेल्या सृष्टीचा केवळ आरोप ठरला; व हा आरोप केवल मूलस्वरूपाच्या अज्ञानानेंच होतो, असें झाल्यास, केलेल्या या आरोपास मूलस्वरूपाचें अज्ञानच एक कारण म्हणून जसें मानावयाचें व त्या आरोपित कार्याच्या पूर्वीं त्या मूलस्वरूपाचें अज्ञान एक होतें म्हणून जशी आरोपसापेक्ष तत्पूर्वील मूलस्वरूपाच्या अज्ञानाची कल्पित उभारणी करावयाची व त्यापासून आरोपात्मक असें हें कार्य झालें म्हणून कार्याची संगती लावावयाची त्याप्रमाणें "**अज्ञानमेवास्य हि मूलकारणम् ।**" या आरोपित कार्यकारण–परंपरेला मूलस्वरूपाचें तमोरूप अज्ञानच कारण आहे. व तें या आरोपापूर्वीं होतें म्हणून श्रुति सांगते.

**तम आसीत्तमसा गूळहमग्रेऽप्रकेतं सलिलं सर्व मा इदम् ।**
**तुच्छयेनाभ्वापिहितं यदासीत्तपसस्तन्महिना जायतैकम् ।**

( ऋ. ना. सू. )

**प्रत्यगात्मा परं ज्योतिर्माया सा तु महत्तमः ।**

( पाशुपत ब्रह्म. उ. )

—सृष्टीच्या पूर्वीं अति विलक्षण व अति गूढ असें तम म्हणजे आवरण होतें. सृष्टीचें अव्यक्त रूप होतें. त्यांतच ही सृष्टि विलीन होती. त्या तमोरूप तुच्छ मायेचें जें अवगुंठित चैतन्य होतें तेंच एक तसा संकल्प करून पुढें

विविध विश्वरूपानें आकारलें. हें अज्ञानरूपी अथवा आवरणरूपी तम जगाच्या प्रारंभीं होतें. तें कुठे व कसें होतें म्हणून कोणी विचारल्यास तें अज्ञान अथवा आवरण आपल्या तमोरूपानेंच गूढ होतें, गूढता हा त्याचा स्वभाव आहे म्हणून श्रुतीचें सांगणें आहे. हें सर्व जग पूर्वीं त्याच्यांतच गुप्तरूपानें होतें. या आवरणालाच प्रकृति अथवा माया म्हणतात. सूर्यापासून निर्माण झालेले ढग जसे सूर्याला आच्छादिल्यासारखे वाटतात, पण जसे आच्छादित नाहींत कीं त्याला स्पर्श करीत नाहींत, सूर्यमंडळापर्यंत जाऊन देखील पोहोंचूं शकत नाहींत, सूर्यमंडळ मेघमंडळापेक्षां कितीतरी दूर असतें; त्याप्रमाणेंच परमात्मस्वरूपापासून झालेली ही माया परमात्मस्वरूपास आच्छादिल्याप्रमाणें वाटते पण खरें आच्छादित नाहीं, कीं त्याला स्पर्श करीत नाहीं, तेथपर्यंत जाऊन देखील पोहोंचूं शकत नाहीं. ब्रह्मतत्त्व या मायेच्या कक्षेच्या कितीतरी दूर असतें. या ब्रह्मतत्त्वांत माया नसून देखील असल्यासारखी भासते. त्यास न आच्छादितां आच्छादिल्यासारखी वाटते. तेथें पोहोंचूं शकत नसतांहि पोहोंचल्यासारखी दिसून येते. त्याला हिचा कांहीं संपर्क नसतांनासुद्धां संपर्क झाल्यासारखा दाखविते. यामुळें मूलस्वरूपाचें अज्ञानच या मायेचें रूप होतें. **या मा सा माया**। या हिच्या उत्पत्तीवरूनच ही खोटी ठरते. मुळांत नसून भासत असल्यामुळें व भासली तरी हिचा मुळांत संपर्क नसल्यामुळें ही क्षुल्लक वाटते. तिच्या या क्षुल्लकतेमुळें हिला या मंत्रांत ‘तुच्छ’ असें नांव दिलें आहे. काळ्या ढगांतून दिसून येणारा सूर्यप्रकाश काळ्या ढगांनीं आवृत होऊन अंधुक दिसून येतो व ढगाला तो प्रकाशच कारणीभूत असल्यामुळें तो प्रकाशच पाऊस पाडतो असें वाटतें; तसें मानावेंहि पण लागतें. त्याप्रमाणेंच मायेच्या ठिकाणीं दिसून येणारा परमात्मप्रकाश, मायेनें आवृत होऊन सगुणसा दिसून येतो. याला शबल ब्रह्म म्हणतात. मायेला हें ब्रह्मतत्त्वच एक विवर्तकारण असल्यामुळें तें ब्रह्मतत्त्वच मायेला व मायेच्या विश्वरूपी कार्याला उत्पन्न करतें असें वाटतें. दुसऱ्या कारणाभावीं तसें मानावेंहि पण लागतें. **प्रकृतिर्जडा**। प्रकृति ही स्वतः अचेतन असल्यामुळें तिला कारणत्व येत नाहीं. सूर्याचा प्रकाश अथवा उष्णता नसतांना ढग होत नाहींत व ढग उत्पन्न नाहीं झाले तर पाऊस पडत नाहीं. तसेंच ब्रह्मतत्त्वाची सत्ता नसतांना माया उत्पन्न होत नाहीं व माया उत्पन्न न झाली तर जग उत्पन्न होत नाहीं. स्वतंत्रपणें ढग जसा पाऊस पाडूं शकत नाहीं,

त्याप्रमाणेंच माया ही स्वतंत्रपणें जग निर्माण करूं शकत नाहीं. या दृष्टीनें ब्रह्मतत्त्वाकडे मायेचें व जगाचें कारणत्व लागू होतें. मायोपाधीनें शबल म्हणून घेणारें ब्रह्मतत्त्वच आपल्या संकल्पद्वारां जगास कारण होतें असें मानावेंहि पण लागतें.

**मायोपाधिर्जगद्योनिः सर्वज्ञत्वादिलक्षणः ।**

—या मायोपाधीनें तें अखंड व्यापक स्वरूप किंचित झांकलें गेल्यासारखें होऊन, जें सर्वज्ञत्वादि लक्षणयुक्त जगत्कारण झालें तेंच "**बहुस्यां प्रजायेय**"—" मी बहु व्हावें ", अनेक प्रजेचें रूप धारण करावें म्हणून संकल्प करून त्या आलोचनेनें तें एकटेंच अनेकरूप झालें. कोणतेंहि कार्य शक्तिमुळेंच होतें. कोणत्याहि कार्याला हात घालण्यापूर्वीं 'तुझ्यांत तितकी शक्ति असल्यास त्या कार्याला हात लाव' असें म्हणण्याचीहि पद्धत आहे. 'तितकी शक्ति असल्याशिवाय त्या कार्याला तूं हात कां घातलास ?' असें विचारण्यांतहि येतें. यावरून कोणतेंहि कार्य त्याला लागणाऱ्या शक्तिशिवाय होत नाहीं हें कळून येतें. कोणतेंहि कार्य शक्तीनें पार पडतें व संकल्पानें आरंभिलें जातें. **कारणगुणाः कार्येषु संक्रामन्ति** । म्हटल्याप्रमाणें हा आमचा अनुभव मुळांतली कांहीं ओळख पटवून देतो. **सोऽकामयत । स तपो तप्यत । स ईक्षत ।** इत्यादि श्रुतिवाक्यांच्या आधारें सृष्टिउत्पत्तीपूर्वीं परमात्म्याला सृष्टीचा संकल्प होतो, हें स्पष्ट होतें.

## मायेचें स्वरूप

**प्रकृतिरिति च ब्रह्मणः सकाशान्नानाविचित्रजगन्निर्माणबुद्धिरूपा ब्रह्मशक्तिरेव प्रकृतिः ।** (निरालंब) **माया नाम अनादिरन्तवती प्रमाणाप्रमाण-साधारणा न सती नासती न सदसती स्वयमधिका विकाररहिताऽनिरूप्य-माणा सतीतरलक्षणशून्या सा मायेत्युच्यते ॥** ( सर्वसारोपनिषत् ) **माया च तमोरूपानुभूतिस्तदेतज्जडं मोहात्मकमनन्तामिदं रूपमस्यास्य व्यंजिका नित्यनिवृत्तापि मूढैरात्मैव दृष्टास्य सत्वमसत्वं च दर्शयाति सिद्ध-त्वासिद्धत्वाभ्यां स्वतंत्रास्वतंत्रत्वेन सैषा वटबीजसामान्यवदनेकवटशक्ति-रेकैव तद्यथा वटबीजसामान्यमेकमनेकान्स्वाव्यातिरिक्तान्वटान्सबीजानुत्पाद्य तत्र तत्र पूर्ण स तिष्ठत्येवमेवैषा माया ।** (नृसिंह उ. ता. खं. ९) **स्वातिरि-क्तानि पूर्णानि क्षेत्राणि दर्शयित्वा जीवेशावभासेन करोति मायाचाविद्या**

**स्वयमेव भवति सैषा चित्रा सुदृढा बव्हङ्कुरा स्वयंगुणभिन्नांकुरेष्वपि गुणभिन्ना सर्वत्र ब्रह्मविष्णुशिवरूपिणी चैतन्यदीप्ता** ।। (नृ. ता. खं. ९) अशीं कांहीं मायेसंबंधीं उपनिषद्वचनें आहेत. ब्रह्मस्वरूपाच्या सान्निध्यानें चैतन्ययुक्त होऊन, त्याच्या सत्तेनें नानाविचित्र जगाच्या निर्माणाचें सामर्थ्य असणारी, जीवांच्या बुद्धीप्रमाणें ब्रह्मस्वरूपाची शक्तीच, प्रकृति म्हणून म्हटली जाते. **मायां तु प्रकृतिं विद्यात्**। मायेलाच प्रकृति असें नांव आहे. ही अनादि असून ब्रह्मैक्यानें नाश पावणारी आहे. प्रमाणभूत तशी ही अप्रमाणहि आहे. सृष्टीच्या दृष्टीनें ही प्रमाणभूत होते व अद्वितीय निष्प्रपंच दृष्टीनें ही अप्रमाण होते. ही असणारीहि नव्हे, नसणारीहि नव्हे. कांहीं भागांनीं असणारी व कांहीं भागांनीं नसणारी असेंहि हिला म्हणतां येत नाहीं. ब्रह्मस्वरूपाच्या सत्तेनें आपोआपच ही फोफावते. ब्रह्मैक्यप्राप्तीशिवाय कोणत्याहि साधनांनीं ही कमी होत नाहीं. अमक्या एका लक्षणानें ही अशी म्हणून न सांगतां येण्यासारखी आहे.

**'अस्ति नास्ति'** याहून विलक्षण असणारी अशी ही माया आहे. हिला अज्ञान म्हणूनहि म्हणतात. 'तुच्छ' अथवा 'तुच्छा' असेंहि म्हणतात. 'मिथ्या' नांवानेंहि ही प्रसिद्ध आहे. ज्ञान्यांना ही मिथ्या जरी वाटली, तुच्छ म्हणून जरी त्यांनीं हिला लेखलें तरी ही अज्ञान्यांना मात्र कालत्रयांतहि सत्यच वाटते. सत्वबुद्धीच्या **लौकिकांना** कितीहि विचार केला तरी हिचें असें एक लक्षण म्हणून सांगतां येत नाहीं. सत्य म्हणावी तर मिथ्या वाटते, मिथ्या म्हणावी तर सत्य वाटते. एकूण, अशाच्या दृष्टीनें ही अनिर्वचनीय आहे. ' निरालंब ' आणि ' सर्वसार ' या दोन उपनिषदांतून आढळणाऱ्या मायेच्या विवरणा-विषयीं आपण विचार केला. आतां ' नृसिंहोत्तरतापिनी ' उपनिषदाच्या विवरणाकडे वळूं. **माया च तमोरूपा** ।–माया ही तमोरूप आहे. कांहीं अंधकारात्मक, आवरणात्मक, न समजून येण्यासारखा, असा हिचा अनुभव आहे. ही जड आहे. मोहात्मक आहे. अज्ञान्यांना ही अनंत वाटते. नाम-रूपांनींच ही प्रगटते. ही नित्यनिवृत्त असली तरी मूढांना आत्मरूपाप्रमाणेंच ही शाश्वत वाटते. ही आपलें सत्यमिथ्यात्व दाखवून घेते. आपल्या व्यक्ता-व्यक्ततेनें, स्वतंत्रास्वतंत्रतेनें, अल्प वटबीज अनेक परंपरागत विविध विशाल वृक्ष जसें निर्माण करतें, एकेका वृक्षांत विविध वृक्ष निर्माण करणाऱ्या अनेक बिया जसें ठेवतें, त्याचप्रमाणें ही माया अल्प असून देखील अनंतकोटी ब्रह्मांडांना निर्माण करते, जीवेशाभास निर्माण करते. ही माया अथवा अविद्या आपल्या

कल्पनेनें आपणच ब्रह्मस्वरूपाच्या आधारानें फोफावते. अशी ही माया विचित्र आहे. हिचे पाश जालासारखे पसरलेले असतात. ब्रह्मज्ञानाच्या एका साधनाशिवाय अन्य साधनांनीं या पाशांतून सुटका करून घेण्याकरितां अधिकाधिक प्रयत्न करावा, तसें तसें या पाशांचें अधिकाधिक वेष्टण होतें. पाण्यांतल्या कमळाच्या जाळ्याप्रमाणें कांहींसें हें आहे. हत्तीसुद्धां यानें बांधला जातो. यांतून सुटण्याकरितां जितकी म्हणून हालचाल करील तितका तो अधिक जखडला जातो. अशाच तऱ्हेचें हें मायेचें जाल आहे.

**कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।**
**सतो बंधुमसति निरविन्दन्हृदि प्रतीदक्ष्या कवयो मनीषा ॥ ४ ॥**

—सृष्टीच्या पूर्वीं, सृष्टीचा संकल्प परमात्म्याला झाला. मनाच्या या संकल्पानें सृष्टिकरणाची प्रवृत्ति त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. असद्रूप कार्यांत सद्रूप परमात्म्याचा प्रवेश झाला. त्याच्या प्राप्तीचीं साधनें प्रगटलीं. जीवांनीं तीं जाणून परमात्म्याचा साक्षात्कार करून घेतला.

**संकल्पात्मकं मनः** ।—संकल्पात्मकच मन आहे. **संकल्पो विविधः कर्ता** ।—संकल्पच विविध वैचित्र्यपूर्ण अशा जगाचा कर्ता आहे. मनानेंच संकल्प होतो. त्या त्या वासनेशिवाय तो तो संकल्प होत नाहीं. एकंदरीत संकल्पास कारण वासना. **वासनात्मकं मनः** ।—संकल्पात्मक मन म्हटल्या-प्रमाणें वासनात्मक मन म्हणूनहि म्हटलें जातें. वासना म्हणजे पूर्वसंस्कारानें होणारी इच्छा. **इच्छामनोभवौ कामौ** । (अमरकोश)—इच्छेला काम असेंहि म्हणतात. **कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धीर्भीरित्येतत्सर्वं मन एव** ।—काम म्हणजे मैथुनाची अथवा इतर कोणतीहि इच्छा, संकल्प, संदेह, श्रद्धा, अश्रद्धा, बुद्धि, भीति इत्यादिक सर्व मनच आहे. मनालाच हीं नांवें आहेत. **संशयात्मकं मनः** । असेंहि म्हणतात. स्वरूपाचा संशय म्हणजे अज्ञान-आवरणच ‘ मन ’ म्हणवून घेतें आणि यामुळेंच वासना, संकल्प, इच्छादिकांची उत्पत्ति होते. **नाहं प्रकाशः सर्वत्र योगमायासमावृतः** ।—स्वरूपाला आवरण या मायेमुळें होतें. एकंदरीत आवरणात्मक, अज्ञानात्मक ही माया संकल्पपूर्वक व इच्छापूर्वक जगाला कारणीभूत होते असें धरून चालावयाला हरकत नाहीं. **इच्छामात्रमविद्येयम्** । इच्छेला अविद्याच कारणीभूत होते.

**क्वचिन्मनः क्वचिद्बुद्धिः क्वचिज्ज्ञानं क्वचित्क्रिया ।**
**क्वचिदेतदहंकारः क्वचिच्चित्तमिति स्मृतम् ॥ १२० ॥**

**क्वचित्प्रकृतिरित्युक्तं क्वचिन्मायेति कल्पितं ।**
**क्वचिन्मलमिति प्रोक्तं क्वचित्कर्मेति संस्मृतम् ॥ १३१ ॥**
**क्वचिद्बंध इति ख्यातं क्वचित्पुर्यष्टकं स्मृतम् ।**
**प्रोक्तं क्वचिदविद्येति क्वचिदिच्छेति संमतम् ॥ १३२ ॥**

( महोपनिषत् अ. ५ )

मायेचींच हीं सारीं नांवें आहेत असें या श्लोकांत सांगितलें आहे.

प्रथम परमात्म्याच्या मनापासून जगदुत्पत्तीची वासना निर्माण झाली. तोच ' काम '. सृष्टिकार्याकरितां प्रथम कामाची उत्पत्ति झाली. इथेंसुद्धां सृष्टीकारितां म्हणजे प्रजेकरितां प्रथम कामाचीच उत्पत्ति होते. नंतर सतीपतींचा संगम होतो. " **मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् । संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥** " या गीतावाक्याची आठवण होते. कामाच्या उत्पत्तीनें प्रकृतिपुरुषाचा संगम झाला. कामाला ' **मनसिजः** ' असें म्हणतात. मनापासूनच त्याची उत्पत्ति होते. प्रकृतिपुरुषांच्या संगमानें प्रजा निर्माण झाली. तेंच हें विश्व.

**मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ।**
**तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥**

—सतीपतींच्या संगमापासूनच प्रजा. भूमींत बी पेरून अनेक बियांची उत्पत्ति होते, तद्वत पुरुषाचें रेतच बीज आणि स्त्री अथवा प्रकृति भूमि आणि त्यापासून झालेलें बहुत्वाचें पीक म्हणजे प्रजा. **पुमान रेतः सिंचति योषितायां बह्वीः प्रजाः पुरुषात्संप्रसूताः ।** ( मुंडक ६–२–१ ) इतर प्राणी स्थूलदेहधारी म्हणून त्यांच्याकडून प्रजेचें कार्य स्थूल क्रियेनें होतें; व सृष्टिकर्त्या परमेश्वराच्या ठिकाणीं सूक्ष्म मनोमयच अथवा केवल संकल्पात्मकच कार्य घडतें. मन, मनाची शक्ति म्हटल्याप्रमाणेंच पुरुषप्रकृतीचें रूप सूक्ष्म असतें. **यच्चित्तस्तन्मयो भवति ।**—कल्पनेशीं तादात्म्य पावण्याच्या स्वभावाप्रमाणें, पुरुषपरमात्मा प्रथम मनोमय, संकल्परूप होतो. **मनोमयः । क्रतुमयः पुरुषः ।** —आणि मग मनाच्या शक्तीनें म्हणजे संकल्पानें तो जग निर्माण करतो. **यत्र संकल्पनं तत्र मनोस्तीत्यवगम्यताम् ॥** ( महोप. )–संकल्प असल्या ठिकाणीं मन असतें असें समजावें. सतीपतीच सतीपतींतून होणाऱ्या स्थूल क्रियेचें मूळरूप म्हणून विद्वान महात्म्यांनीं समजलेलें असतें. कामाच्या प्रादुर्भावानें

म्हणजे प्रजेच्या इच्छेनें प्रकृतीशीं संयोग होऊन तींत पुरुष "**एकोऽहं बहु स्यां**"—मी बहु व्हावें, या संकल्पाचें रेतःसिंचन करतो व नंतर 'मी मी' म्हणून वावरणारी बहुनामरूपात्मक प्रजा निर्माण होते. माया अथवा प्रकृति ही असद्रूप होय. पुरुष हा सत्य होय. **सत्यानृते मिथुनीभवतः।** —सत्यानृतरूपी शबल ब्रह्ममाया अथवा पुरुषप्रकृति यांच्या मिथुनानें चराचर विश्वाची उत्पत्ति. अंतःकरण व प्राण यांच्या कमीअधिक स्पंदानें विश्वांत चेतनाचेतन व्यवहार घडतो. अनेक कर्मांच्या फलाकरितां व बहुत्वाच्या निर्वाहाकरितां सृष्टि अशी उत्पन्न झाली. अनेक देह निर्माण करून त्यांत परमात्म्यानें प्रवेश केला. प्रवेशानंतर जीवसृष्टि, ईशसृष्टि, जीवेश हा कल्पित भेद उत्पन्न झाला व यामुळेंच जगाचें गाडें चालू झालें. त्या प्रकृतिपुरुषाचें रूपच सतीपतीरूपानें व त्यांच्या मुलांमुलींच्या रूपानें इथे व्यक्त झालें. सर्वांत असणाऱ्या एका '**अहं**' या स्फुरणानें "**एकोऽहं बहु स्यां।**" या संकल्पाचें व्यक्त रूप स्पष्टपणें दृग्गोचर झालें. सूर्यप्रकाश आणि मृगजलाप्रमाणें असाच कांहीं अनुभव या सत्यमिथ्या प्रपंचाच्या बाबतींत महात्म्याला असतो.

**तिरश्चीनो विततो रश्मिरेषामधः स्वीदासीदुपरि स्विदासीत्।**
**रेतोधा आसन् महिमान आसन् स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात् ॥५॥**

—मृगजलाच्या भासांत सूर्यप्रकाशच असल्याप्रमाणें किंवा वस्त्रामध्यें सूत असल्याप्रमाणें परमात्म्यापासून झालेल्या या जगांत परमात्म्याचा प्रकाशच वर-खालीं अंतर्बाह्य चोहोंकडे भरला आहे. कर्ता भोक्ता म्हणून स्वतःला मानणारे देहोपाधींच्या दृष्टीनें भिन्न भिन्न असे अगणित जीव उत्पन्न झाले. प्रवृत्तिनिवृत्त्यात्मक धर्म प्रचारांत आले. जीवांना उच्चोच्च साधनांनीं मोठमोठें महत्त्व प्राप्त झालें. परमात्मप्रकाशाच्या कांहीं किरणांवर त्या विचित्र मायाशक्तिद्वारां कर्तृत्वभोक्तृत्वाच्या संस्कारानें विविध कर्मफलरूप उपाधींचा आश्रय करून अनेक देह व तद्जीवांचीं रूपें धारण केल्याचा आरोप आला. आणखी कांहीं किरणांवर या जीवांना भोग्यरूप असणाऱ्या दृश्य पदार्थांचीं रूपें धारण केल्याचा आरोप आला. अनेक देहोपाधींनीं अनेक जीव दिसूं लागले व ते विविध कर्मांनीं, विविध वैभवसंपन्न झाले. जगानें विस्तृत रूप धारण केलें. याप्रमाणें परमात्म्याचा प्रकाशच विचित्र मायेच्या शक्तीनें युक्त होऊन आश्चर्यजनक अशा जडचेतनात्मक सृष्टीनें नटला. परमात्म्याची चित्शक्ति अखिल

प्रपंचालाच व्यापून राहिली आहे. तिनेंच दोन रूपें धारण केलीं आहेत. जीवांच्या संसाराला कारणीभूत होऊन, त्याच्या पलीकडे असणाऱ्या मोक्षालाहि तीच कारणीभूत होते.

दोरीच्या अज्ञानानें झालेला, तिथे नसलेला व केवल कल्पनेनेंच भासणारा सर्प कसा झाला हें कोणालाहि सांगतां येणें शक्य नाहीं. त्या दोरीचें अज्ञान कोणत्या रूपानें आहे, कोठें आहे, कसें आहे हें दाखविणेंहि कोणास शक्य नाहीं. भ्रम झाल्यावरच त्या भ्रांत मनुष्याला दोरीवर नसून दिसणाऱ्या सर्पाची भावना होते. परमात्म्याच्या अज्ञानानें झालेला, तिथे नसलेला व केवळ कल्पनेनेंच भासणारा हा प्रपंच कसा झाला हें कोणालाहि सांगतां येणें शक्य नाहीं. त्या परमात्म्याचें अज्ञान कोणत्या रूपानें आहे, कोठें आहे, कसें आहे हें दाखविणेंहि कोणास शक्य नाहीं. भ्रम झाल्यावरच मनुष्याला परमात्म्यांत नसून भासणाऱ्या प्रपंचाची भावना होते; जगज्जीवाची भावना येते. झालेल्या जगत्कार्यांत अंतर्भूत होणाऱ्याला जगाच्या पूर्वीचें काय सांगतां येणार ? या अखिल जीवांच्याहि पूर्वीं या भ्रमाची उत्पत्ति झाली असल्यामुळें जीवांना त्याचा परिचय असूं शकत नाहीं. ( जन्मापूर्वीं ) हा भ्रमच या जीवाच्या अज्ञपणाला कारण झाला आणि या भ्रमानेंच जग आकारास आलें. तें सृष्टिकारण अज्ञान आणि अज्ञानजन्य भ्रम यांच्या उत्पत्तीपूर्वीं व यामुळें झालेल्या या सर्व जगाची व या साऱ्या जीवांची उत्पत्ति कितीतरी अलीकडची. मातापित्यांचा जन्म मुलांना जसा पाहून माहीत नसतो त्याप्रमाणेंच या अज्ञानाचें आणि भ्रमाचें मूळ कारण जीवांना पाहून माहीत नसतें व त्याची कल्पनाहि करण्यास त्यांना अशक्य होतें. या अज्ञानाचें मूळ शोधणें व तें अमूकच ( आहे ) म्हणून ठरविणें कोणासहि शक्य नाहीं. रोग झालाच कसा म्हणून त्याच्या शोधांत काळ घालवून रोग तोंपर्यंत वाढवून घेण्यापेक्षां औषधोपचारांनीं तो होईल तितक्या लवकर बरा करून घेणें हें हिताचें झाल्याप्रमाणेंच या अज्ञानाच्या व भ्रमाच्या मूळशोधनांत वेळ घालवून तोंपर्यंत त्याला बळकटी आणण्यापेक्षां त्याच्या निवृत्तीकरितां ब्रह्मस्वरूपाचा निश्चय, होईल तितक्या लौकर करून घेऊन यांतून मुक्त होणें हेंच अगदीं रास्त व अत्यंत हिताचें होईल.

दोरीवर सर्प दिसून येण्याला त्यांत दिसून येणारें सादृश्य म्हणजे मृदु स्पर्श, बारीकपणा, नागवळणी वक्रता सर्पभासाला कारणीभूत होते.

सर्पभासाला कारण होणारी तीच त्याची शक्ति असें जसें मानावें त्याप्रमाणें त्या परमात्म्यावर जगाचा भास होण्याला, त्याच्यांत दिसून येणारी सादृश्य सच्चिदानंदात्मक अस्तिभातिप्रियता जगाच्या आभासाला कारणीभूत होते व अशा जगद्भासाला कारणीभूत होणारी तीच त्याची शक्ति म्हणून मानावी लागते. जगांतल्या नामद्वारां दिसणारें त्याचें अस्तित्व, भातित्व व प्रियत्व हीं परमात्म्याच्या सद्रूप, चिद्रूप व आनंदरूप यांच्याशीं अभिन्न आहेत.

**को अद्धा वेद क इह प्रवोचत कुत आजाता कुत इयं विसृष्टिः । अर्वाग्देवा अस्य विसर्जनेनाऽथ को वेद यत आबभूव ॥**—ही सृष्टि कुठे, कशी निर्माण झाली हें कोणाला ठाऊक आहे ? कोण ही अशीच सृष्टि झाली म्हणून जाणतो ? कोण ही अशी अशी झाली म्हणून खात्रीनें सांगतो ? हें निश्चयानें कोणाला बरें सांगतां येईल ? हें असेंच म्हणून कोणास बरें ठरवितां येईल ? देवसुद्धां सृष्टि झाल्यावरच उत्पन्न झाले असल्यामुळें त्यांनाहि त्या पूर्वींपासून असलेली ही सृष्टि कोठून कशी झाली हें जर सांगतां येत नाहीं तर इतरांचा पाड काय ? देवांनाच जर अशक्य होतें तर कोणा मानवाला हें शक्य होईल ? कोठून ही सृष्टि झाली म्हणून कोण सांगेल ?

**इयं विसृष्टिर्यत आबभूव यदि वा दधे यदि वा न यो अस्याध्यक्षः परमे व्योमन् सो अंग वेद यदि वा न वेद ॥**—ही सृष्टि कोठून, कशी, कां अशी झाली ? ही स्वतःला आपल्या आपणच कारण आहे कीं नाहीं, हें या बाह्याकाशाच्या पलीकडे असणाऱ्या, आपल्या मनापासून सृष्टि निर्माण करणाऱ्या त्या प्रजाध्यक्षाला तरी माहित आहे कीं नाहीं कोण जाणें ! मनांत आल्याप्रमाणें कृति घडते; पण मनांत कोठून, कसें व कां येतें हें कोणालाच कळत नाहीं. पुन्हां ब्रह्मदेवाला सृष्टि निर्माण करण्याकरितां आवश्यक अशा ज्ञानरूप वेदाची प्राप्ति परमात्म्यापासूनच झाली असें दिसून येतें. **यः सर्वज्ञः सर्ववित्** । ( मुंडक. १–९ ) इत्यादि वाक्यांच्या आधारें त्या परमात्म्याला मात्र हें सर्व माहीत असणें साहजिक आहे. हें सर्व सांगणारा एक परमात्माच आणि त्याच्यापासून उत्पन्न झालेले वाक्‌रूपी एक वेदच होत.

**यः सर्वज्ञः सर्ववित्** । ( मुं. १–८ ) या वचनावरून ज्या परमात्म्यानें ब्रह्मदेवाला अथवा विराटाला वेदज्ञान सृष्टिउत्पत्तीकरितां दिलें त्याला तें एक माहीत असणें स्वाभाविक झालें. हें सर्वहि यथार्थपणें जाणणारा एक सर्वज्ञ

परमात्मा व त्याच्यापासून उत्पन्न झालेली सृष्टीची श्रुतिमाता; तिसऱ्या कोणाचा इथे रीघ होणें शक्य नाहीं. उपनिषदांत आत्मतत्त्वाचें प्रतिपादन आहे, वेदांत तें नाहीं, असा आक्षेप घेणाऱ्यांना हें ऋग्वेदांतर्गत 'नासदीय सूक्त' एकच उत्तर देईल. **नावेदविन्मनुते तं बृहन्तम् तमेतं वेदानुवचनेन विविदिषन्ति । न ह्यनात्मवित्कश्चिद्वेदार्थं ज्ञातुमर्हति ॥** हीं वेद, उपनिषदें व स्मृती यांचीं वचनेंहि त्याला आपलें अनुमोदन देतील. वेद न जाणणारा ब्रह्मस्वरूपाचें योग्य आकलन करूं शकत नाहीं. वेदवचनांनीं त्या ब्रह्मतत्त्वाला जाणूं इच्छितात. अनात्मज्ञानी, मग तो कितीहि बुद्धिमान असो, वेदार्थ उमगण्यास समर्थ होत नाहीं, हा या वाक्यांचा अर्थ. हीं वाक्यें दृष्टीखालून गेल्यानंतर तत्त्वज्ञानाच्या प्राप्तीकरितांच वेदांचा अभ्यास आणि वेदार्थ तत्त्वज्ञाखेरीज कोणी जाणूं शकत नाहीं. असें झाल्यास वेदांत तत्त्वज्ञान नाहीं म्हणून कोण बरें म्हणूं शकेल ?

### अज्ञातवाद

वेदामध्यें अज्ञातवादाचें समर्थन केलेलें नाहीं.

**सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञातिसव्यः** । ( छां. उ. ८–७–१ )

**तमेवं विद्वानमृत इह भवति** । ( पुरुषसूक्त )

**य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति अथेतरे दुःखमेवापियन्ति** । (श्वे.३-१०)

—त्या परमात्म्याचा शोध केला पाहिजे, त्याला जाणलें पाहिजे. त्याला अशा रीतीनें जाणणारा अमृतत्व प्राप्त करून घेतो. जे कोणी हें परमात्म-तत्त्व जाणतात ते अमर होतात व बाकीचे मात्र दुःखच अनुभवितात.

**देवं ज्ञात्वा हर्षशोकौ जहाति** ।

—त्या परमात्म्याला जाणूनच हर्षशोकांचा त्याग करतो.

**पुरुष एवेदं विश्वं कर्म तपो ब्रह्म परामृतम् । एतद्यो वेद निहितं गुहायां सोऽविद्याग्रंथि विकिरतीह सोम्य** ॥ ( मुं. उ. २-१-१० )

—तो पुरुष, तो परमात्माच हें सर्व विश्व आहे. कर्म, तप आदि साधनेंहि तें सर्वश्रेष्ठ अमृतस्वरूप ब्रह्मच आहे. तें ब्रह्मतत्त्व अथवा परमात्मस्वरूप इथेच आपल्या 'मी' या आत्मीय भावांतच संपूर्णपणें वास करून आहे असें जो जाणतो तो पक्क्या गांठीप्रमाणें बळकट झालेल्या देहात्मरूप अविद्येला चुटकीसरसें नष्ट करून टाकतो. सर्पाभासांत एक दोरीच असल्याप्रमाणें या

सर्व विश्वांत एक परमात्माच भरून उरला आहे. मातीचा घट मातीहून भिन्न नसल्याप्रमाणें परमात्म्यापासून झालेलें हें विश्व परमात्म्याहून भिन्न नाहीं. दागिन्यांत असलेल्या सोन्याच्या दृष्टीनें दागिना हा सोनेंच असतो हें अनुभवास आल्याप्रमाणें विश्वांत असणाऱ्या त्रिकालाबाधित परमात्म्याच्या दृष्टीनें जग हें परमात्मस्वरूप म्हणून अनुभवास येतें. लौकिक व तशीं सर्व श्रौतस्मार्त-पुराणोक्त कर्में, सर्व तऱ्हेचें तप, जगांत असणारे सर्व जीव, यच्चयावद्विश्व खरोखर एक परमात्मस्वरूपच असल्यामुळें तें अमृतरूपी ब्रह्मच मी, 'तेंच हें सर्व' असें जो जाणतो तो या आत्मज्ञानाच्या योगानें अविद्याग्रंथीचा म्हणजे अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या सर्व वासनांचा व देहात्मबुद्धीचा ठावच संपूर्ण पुसून टाकतो.

## परमात्मतत्त्व उपनिषद्रहस्य

ह्या आणि बाकीच्या वेदोपनिषदांचा परिचय अज्ञातवादाचें निरसन करतो. उपनिषदाच्या हृदयाचा परिचय करून घेण्यास अजून कांहीं उपनिषद्मंत्रांचें परिशीलन करूं या.

**य आत्माऽपहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः स सर्वा ँश्च लोकानाप्नोति सर्वा ँश्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति ह प्रजापतिरुवाच ॥** (छां. ८-७-१)—जो नेहमीं निष्पाप, जरामृत्युरहित, शोकशून्य, क्षुधातृषाविरहित, सत्यकाम, सत्यसंकल्प आहे त्या परमात्मरूपाचा तूं शोध कर, त्याला तूं जाण. जो त्या आत्मरूपाला जाणतो तो सर्वलोकसुखाची व सर्व कामनातृप्तीची प्राप्ति एकदम करून घेतो. एक परमात्माच सर्व जगाला व्यापून असल्यामुळें व तें त्याहून वेगळें नसल्यामुळें, तोच हें अखिल विश्वरूप असल्यामुळें, इच्छेनें प्राप्त करून घेणाऱ्या सर्व सुखांत एकच एक परमात्म्याचें सुख व्यापून असल्यामुळें, या सर्व सुखांना हाच एक परमात्मा कारण असल्यामुळें तें परमात्मस्वरूपच मी म्हणून जो जाणतो तो परमात्मैक्यानें, या आपल्या तात्त्विक व्यापकतेनें सर्व लोकसुखाची व केवल आनंदरूपतेनें सर्व कामनापूर्तींची एकदम प्राप्ति करून घेतो. जो हें परमात्मस्वरूप वेदशास्त्रसद्गुरुमुखानें प्रथम श्रवण करून नंतर त्याचें युक्तीनें मनन करून शेवटीं निजध्यासानें तेंच मी म्हणून निश्चय करतो व त्याचा पूर्णपणें

साक्षात्कार करून घेतो, तो या परमात्म्याशीं एकरूप होऊन आपल्या सर्वव्यापित्वानें, सर्वरूपतेनें व आपल्या केवळ आनंदरूपतेनें सर्वलोकसुखाची व सर्व कामनातृप्तीची एकदम प्राप्ति करून घेतो.

**यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् । तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरंजनः परमं साम्यमुपैति ॥** (मुंडक ३-३)—सर्वांचें मूळरूप असणारें आनंदमात्र ब्रह्मतत्त्व 'एकमेवाद्वितीय ब्रह्म' व 'न तु तद्वितीयमस्ति' या वचनाधारेंहि अखंड एक अद्वितीय जगत्कारण ईशाचेंहि स्वयंज्योतिस्वरूप असल्यामुळें तें आपलें मूलस्वरूप आहे असें जो जाणतो व अवलोकन करतो, सत्याचा साक्षात्कार करून घेतो तो सर्व पापपुण्यास व आगंतुक बंधमोक्षास कारण असणारीं अखिल शुभाशुभ कर्मे संपूर्ण नष्ट करून टाकतो व स्वतः सर्वक्लेशशून्य, निर्लेप, स्वयंप्रकाश असा निरतिशय एकरस आनंदरूप होतो. **यथोदकं शुद्धे शुद्धमासिक्तं तादृगेव भवति । एवं मुनेर्विजानत आत्मा भवति गौतम ॥** ( कठ. २-४–१५ )—शुद्ध पाण्यांत शुद्ध पाणी मिसळलें असतां जसें तें एकरूप होतें त्याप्रमाणें आत्मज्ञ मुनी ब्रह्मतत्त्वांत मिळून एकरूप होतो. **स यथेमा नद्यः स्यन्दमानाः समुद्रायणाः समुद्रं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते तासां नामरूपे समुद्र इत्येवं प्रोच्यते एवमेवास्य परिद्रष्टुरिमाः षोडशकलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते चाऽऽसां नामरूपे पुरुष इत्येवं प्रोच्यते स एषोऽकलोऽमृतो भवति ॥** (प्रश्नोप. ६–५) वाहणाऱ्या नद्या ज्याप्रमाणें समुद्राकडे धांव घेऊन समुद्रास मिळतात व आपलें नामरूप नष्ट करून त्या जशा आपलें अंतिमस्थान असणाऱ्या समुद्राशीं एक होऊन जातात व नंतर समुद्रच म्हणून ओळखल्या जातात त्याप्रमाणें मोक्षाची इच्छा करणारे जीव परमात्मस्वरूपाकडे धांव घेऊन त्या आनंदघन परमात्म्यास जाऊन मिळतात व आपलें नामरूप नष्ट करून, अंतिम लयस्थान असणाऱ्या आनंदघन परमात्म्याशीं एक होऊन जातात. भूमि, इंद्रिय, मन, अन्न, वीर्य, तप, मंत्र, कर्म, लोक, नामाभिधान, प्राण, श्रद्धा, आकाश, वायु, अग्नि, जल या षोडशकला राहात नाहींत. त्यांचें परमात्म्याशीं भिन्नत्व उरत नाहीं. परमात्म्याच्या ठिकाणीं एकरूप होऊन राहिल्यामुळें ते जीव परमात्मस्वरूपाचे म्हणून ओळखले जातात. हे सर्व जीव निर्मल, निष्कलंक, अविनाशी परमात्मतत्त्वच होऊन असतात. त्या परमात्मतत्त्वाखेरीज त्यांचा नामनिर्देश पृथक् होत नाहीं. या मंत्रांतला ' पुरुष ' शब्द परमात्मवाचक आहे.

**गताः कलाः पंचदश प्रतिष्ठा देवाश्च सर्वे प्रतिदेवतासु । कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा परेऽव्यये सर्व एकीभवन्ति । यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय । तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥** (मुंडक. ३–२–७–८)—या मुंडकोपनिषदांतील मंत्रांचेंहि हेंच तात्पर्य आहे.

**इमाः सोम्य नद्यः पुरस्तात्प्राच्यः स्यन्दन्ते पश्चात्प्रतीच्यस्ताः समुद्रात्समुद्रमेवापियन्ति । समुद्र एव भवति ता यथा तत्र न विदुरियमहमस्मीति । एवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजाः सत आगत्य न विदुः सत आगच्छामहमिति त इह व्याघ्रो वा सिँ्हो वा वृको वा वराहो वा कीटको वा पतंगो वा दँ्शो वा मशको वा यद्भवन्ति तदा भवन्ति ॥** (छां. ६-१०-१-२). पूर्वपश्चिम–दक्षिणोत्तरवाहिनी नद्या समुद्रापासूनच निघून पुन्हां समुद्रासच जाऊन मिळतात आणि समुद्रच होतात. नंतर एक समुद्रच असतो. समुद्र झाल्यावर आपण अमकी अमकी नदी म्हणून त्यांना जसें समजून येत नाहीं, त्याप्रमाणेंच या सर्व जीवरूपी नद्या परमात्मसमुद्रापासून निघून त्यालाच जाऊन मिळतात आणि परमात्मरूपच होतात. नंतर एक परमात्माच असतो. परमात्मरूपच झाल्यानंतर ‘मी अमुक’ ‘मी अमुक’ म्हणून त्यांना भान राहात नाहीं. **सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः ।** (छां. ६-८-४) या सर्व जीवांचें मूळ तें अविनाशी परमात्मरूपच आहे. याचाच त्यांना आश्रय आहे व हाच त्यांचें जीवन आणि स्वरूप आहे. याच्यामुळेंच त्यांची प्रतिष्ठा. परमात्मस्वरूपच असतां सर्वांनाच त्याची जाणीव कां नाहीं ? याला यापूर्वीं मधाचें उदाहरण देऊन वर दिलेल्या मंत्रांत पुन्हां समुद्राचें उदाहरण दिलें आहे. विविध झाडाझुडपांच्या फुलापासून रस गोळा करून मधमाशा मध तयार करतात. मध तयार झाल्यानंतर अमुक अमुक झाडाचा हा रस म्हणून त्या त्या रसाच्या मुळाची आठवण जशी त्या मधांत समरसून गेलेल्या रसांतून आढळून येत नाहीं त्याप्रमाणें ब्रह्मरूप झालेल्यांना पूर्वील औपाधिक रूपाची जाणीव राहात नाहीं. तुर्यास्थितीचा अथवा समाधीचा, जीव परमात्मैक्याचा अनुभव प्रत्येकाला नसला तरी सुषुप्तीचा अनुभव सर्वांना आहे. **स्वपिति नाम समा सोम्य तदा संपन्नो भवति । स्वमपीतो भवति तस्मादेनँ्स्वपितीत्याचक्षते स्वँ्ह्यपीतो भवति ॥** सुषुप्तींत सर्वहि कार्य तमांत, अज्ञानांत विलीन झाल्यानंतर हा जीव आपल्या सन्मात्र परमात्मरूपाशीं

अभिन्न होतो,सत्संपन्न होतो. सुषुप्तींत आत्मरूपालाच तो प्राप्त झालेला असतो. तेथें त्याला कसलीहि भावना राहात नाहीं. त्यामुळेंच त्याला 'स्वपिति'–झोंपला आहे असें म्हणतात. त्या गाढ झोंपेंत तो स्वतःलाच म्हणजे स्वतःच्या मूळ परमात्मस्वरूपालाच्च प्राप्त झालेला असता. **सुषुप्तिकाले सकले विलीने तमोऽभिभूतः सुखरूपमेति ।** ( कै. उ. )—काळ्या कांचेंतून आलेला प्रकाश जसा काळा दिसतो त्याप्रमाणें सुषुप्तिस्थ अज्ञानांतून आलेला जीव खरोखरीच परमात्मस्वरूप असला तरी त्या अज्ञानांतून आल्यामुळें त्याला आत्मस्वरूपाची विस्मृति भासते. काजळाचे हात लागल्यामुळें जसें तोंड काळें होतें त्याप्रमाणें अज्ञानाचा परिणाम यावर झाल्यामुळें स्वरूपाची आठवण याला नसते–तें काजळ धुऊन काढलें म्हणजे तोंड स्वच्छ झाल्याप्रमाणें हें अज्ञान गुरुशास्त्र-आत्मप्रचितीनें कां एकदां धुवून काढलें कीं मग तो परमात्मप्रकाशानें प्रकाशूं लागतो. **जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादिप्रपंचं यत्प्रकाशते । तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा सर्वबंधैः प्रमुच्यते ॥**—जागृत्, स्वप्न, सुषुप्ति आदि प्रपंच ज्यामुळें प्रकाशित होतो तें ब्रह्म मी म्हणून आवरणविक्षेपरहित निश्चयानें जाणल्यानें, त्या ब्रह्म-स्वरूपाचा साक्षात्कार झाल्यानें सर्व दुःखरूप कर्मबंधापासून व सर्ववासना-जालापासून तो मुक्त होतो. त्याची देहात्मबुद्धि नष्ट होते. जागृदादि अवस्थाशून्य अशी एक तुर्यअवस्था आहे,जींत या तीन्ही अवस्थांचा अनुभव न येतां आनंदघन आत्मानुभवच एक शिल्लक असतो. अशी स्थिति जोंपर्यंत बाणत नाहीं तोंपर्यंत सुषुप्तीच्या त्या ऐक्यस्थितींतून बाहेर येण्याचा अवकाश कीं त्याला काळ्या कांचेंतून आलेल्या प्रकाशाप्रमाणें होऊन स्वज्ञानानें, पशुपक्षी, मनुष्यादि स्वस्वदेहाचा अभिमान येऊन, त्या त्या देहधर्माप्रमाणें तो वागूं लागतो, मोह पावतो. याला त्याच्या यथार्थरूपाचें अज्ञानच एक कारण आहे. हे श्वेतकेतो, तुला खरेंच कळवावयाचें झाल्यास **"स य एषोणिमैतदात्म्यमिद-ँ सर्वं तत्सत्य ँ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो ।"** —या सर्वांचें-जीवांचें यथार्थरूप असणारा जो अतिसूक्ष्म चिदानंद परमात्मा आहे, तद्रूपच हें सर्व कांहीं आहे, त्यालाच ब्रह्मतत्त्व म्हणतात. तेंच सत्य आहे. तूंहि पण तेंच निष्प्रपंच आनंदघन ब्रह्म आहेस.

**स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति ।**
**तरति पाप्मानं गुहाग्रंथिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति ॥**

( मुंड. ३–२–९ )

-- ' याचि जन्मीं येणोंचि काळें ' जो तें परब्रह्मच मी म्हणून स्वतःला जाणतो तो निःसंशय ब्रह्मच होतो. अखिल अज्ञान ओलांडून सर्व प्रपंचापलीकडे तो जातो. सर्व पापांपासून मुक्त होतो. देहात्मबुद्धीपासून कायमचा सुटतो. तो अमर होतो.

**तद्धेदं तर्ह्यव्याकृतमासीत्तन्नामरूपाभ्यामेव व्याक्रियतासौ नामाऽयमिदँ रूप इति तदिदमप्येतर्हि नामरूपाभ्यामेव व्याक्रियतेऽसौ नामायमिदँ रूप इति।** ( बृ. १-४ ) **स एष इह प्रविष्टः आनखाग्रेभ्यः।** ( बृ. अ. १ ब्रा. । ४ )—हें जग उत्पत्तीपूर्वी अव्यक्त होतें. ब्रह्मांडांत अव्यक्त व पिंडांत सुषुप्ति अवस्था. सुषुप्ति अवस्थेंत जसें हें सर्व अव्यक्त असतें तसेंच हें समग्र ज्या वेळीं त्या आवरणशक्तींत अव्यक्त होतें, तेव्हां त्याला अव्याकृत अथवा अव्यक्त असें नांव आहे. हेंच जगाचें कारणशरीर होय. हें अज्ञानरूप अथवा आवरणरूप असतें. या ब्रह्मांडकारणशरीराचा अंशच जीवाचा कारणदेह, सुषुप्ति अवस्था. ब्रह्मांडाच्या या कारणदेहाचा अभिमानी ईश्वर, पिंडाच्या कारणदेहाचा ' प्राज्ञ. ' हें सुषुप्तीच्या अभिमानी जीवाचें नांव होय. **अव्यक्तान्महत्** ।—या अव्यक्तापासूनच महत्तत्त्व निर्माण झालें. हें महत्तत्त्व म्हणजे ब्रह्मांडाचा सूक्ष्म देह. ब्रह्मांडोत्पत्तीचा संकल्प इथेंच झाला. या महत्तत्त्वाच्या अंशाच म्हणजे स्थूलदेहोत्पत्तीच्या वासनेचा व्यक्तिगत सूक्ष्म देह. या महत्तत्त्वाचा –ब्रह्मांडाच्या सूक्ष्म देहाचा अभिमानी ' हिरण्यगर्भ ' होय. व्यक्तिगत सूक्ष्म देहाचा अभिमानी ' तैजस ' होय. हा हिरण्यगर्भाचा अंश. या अवस्थेला ' स्वप्न ' असें नांव आहे. या व्यक्तिगत सूक्ष्म देहाला ' लिंगदेह ' अथवा ' आतिवाहिक देह ' असें म्हणतात. हिरण्यर्भानेंच " एकोऽहं बहु स्यां । "— आपण बहु व्हावें, असा संकल्प केला. त्यानंतर बहुत्वाला कारण होणारे अनेक देह निर्माण करून त्या त्या देहांत त्यानें प्रवेश केला. आनखाग्र प्रतिदेहांत तोच आहे. बहुत्व सजण्याकारितां तारतम्य निर्माण केलें, अज्ञान पांघरलें, भिन्न भिन्न कर्मफळ निर्माण केलें. चौऱ्यांशी लक्ष योनी निर्माण झाल्या. अनेक देव, दानव, मानव, पशु, पक्षी, कृमीकीटदिकांची उत्पत्ति झाली. यांत जीव-भावास प्राप्त होऊन " नाना देहीं देव एक विराजे । नाना नाटकलीला सुंदररूप साजे " ॥ हें झालेलें जग पूर्वी अव्यक्त असून तेंच नंतर नामरूपद्वारां व्यक्त झालें. या व्यक्त जगाचा अभिमानी असणाऱ्या परमात्म्याला ' विराट ' हें नांव आहे. हा परमात्म्याचा स्थूल देह होय.

यांच्यांतच सर्व जीवांच्या स्थूळ देहांचा अंतर्भाव होतो. भिन्नभिन्न अशा देहांत प्रवेश करून जो स्थिरचर विश्वाकार झाला तो विराट या जागृतींत स्व-देहाचा अभिमान वाहून त्या त्या देहाप्रमाणें देहनिर्वाहकार्यांत व्यापृत असणारा अंश जागृदभिमानी विश्व होय. जागृतींतला सर्व कारभार याचाच असतो. आनखाग्र सर्व देहांत तो परमात्माच आहे याबद्दल हें श्रुतिवाक्य ग्वाही देत आहे.

**स इह प्रविष्टः आनखाग्रेभ्यः** । ( बृ. उ. अ. १–४–७ )

**आत्मैवेदमग्र आसीत् पुरुषविधः सोऽनुवीक्ष्य नान्यदात्मनोऽपश्यत्सोऽहमस्मीत्यग्रे व्याहरत्ततोऽहंनामाभवत्तस्मादप्येतर्ह्यामंत्रितोऽहमयमित्येवाग्र उक्त्वाऽथान्यन्नाम प्रब्रूते यदस्य भवति** । ( बृ. १–४–१ )—दुसऱ्या कोणत्याहि शरीराची उत्पत्ति होण्यापूर्वी, या सर्व जगापूर्वी प्रथमशरीरी असा एक प्रजापतीच होता. शिर, करचरणादि अवयवयुक्त पुरुषाकार झालेल्या या विराटास प्रथम स्वतःखेरीज दुसरें असें कांहीं न दिसल्यामुळें मी कोण, कोणत्या लक्षणांनीं युक्त असणारा मी आहें असा विचार त्याला पडला. स्वतः मूळ रूपाचा खोलवर विचार करून त्यानें आत्मनिरीक्षण केलें, तों सच्चिदानंदरूपी परमात्माच मी म्हणून जाणलें व तोच मी म्हणून अगदीं पहिल्यांदा त्यानें उच्चारलें. तेव्हांपासून तो ‘ अहं ’ ‘ मी ’ या नांवानें प्रसिद्ध झाला. या आत्मीय भानानें त्यानें निर्माण केलेल्या सर्व देहांत तोच प्रविष्ट झाला. त्यामुळें आतांहि व्यवहारांत ‘तूं कोण’ म्हणून विचारलें असतां आपल्या मूळ स्वरूपाची ओळख पटविण्याकरितां, तोच मी म्हणून सांगण्याकरितां ‘ मी ’ च आहें, असें आपण म्हणतों. विचारणाऱ्याला पहिल्यानें पारमार्थिक सत्यस्वरूपाची आपली जाणीव देतों. पुन्हां मी म्हणजे कोण म्हणून खडसून विचारलें असतां व्यवहारदृष्ट्या आईवडिलांनीं ठेवलेलें देहाचें व्यावहारिक नांव सांगतों, मी अमुक म्हणून त्या देहाचें नांव कळवितों.

याच्या ज्ञानासाठीं पूर्वपूर्वाधिकाऱ्याकरितां वेदांनीं प्रथम कर्मउपासनापर असणाऱ्या कांडद्वयाचा उपदेश केला. एका अज्ञानानेंच अथवा अविद्येनेंच केवळ, ज्या आनंदमात्र परमात्म्यांत कर्ता, भोक्ता, क्रिया, कर्मफळ, साधक, सिद्ध, बद्ध, मुक्त, देव, भक्त, इत्यादि भावनांचा केवळ अज्ञानानें अध्यारोप होतो तें परमात्मरूपच या चराचर विश्वाचें कल्याणमय शुद्ध रूप होय.

पाण्यापासून होणाऱ्या फेंसाप्रमाणें ज्याच्यापासून नामरूप उत्पन्न होतें व जो त्या सर्व नामरूपांत प्रवेश करून असतो तो शुद्धबुद्ध सच्चिदानंद परमात्माच, जलाच्या अखिल विकारांतून एकजलच असल्याप्रमाणें अद्वितीय आहे. **तं न पश्यति अकृत्स्नो हि सः ।** ( बृ. उ. अ. १ ब्रा. ४ ) अशा परमपवित्र अति मंगलमय आनंदघन परमात्म्याचें जो सर्वत्र दर्शन घेत नाहीं तो देहाएवढा परिमित होऊन अल्प व अपूर्ण असतो. त्याची वृत्ति बहिर्मुख होते. तो प्राणमनोवाक्चक्षुश्रोत्रादि अनेक अल्पाल्प विभागांनीं विभागला जातो. त्याचे अनेक तुकडे पडतात. **प्राणन्नेव प्राणो नाम भवति वदन्वाक्पश्यंश्चक्षुः शृण्वन् श्रोत्रं मन्वानो मनस्तान्यस्यैतानि कर्मनामान्येव । स योऽत एकैकमुपास्ते न स वेदाकृत्स्नो ह्येषोऽत एकैकेन भवत्यात्मेत्येवोपासीतात्र सर्वं एकं भवति ॥** —श्वासोच्छ्वासाला प्रारंभ झाला कीं तो प्राण होतो, बोलूं लागला कीं वाक् होतो, पाहूं लागला म्हणजे चक्षु होतो, ऐकूं लागला तेव्हां श्रोत्र होतो, संकल्प करूं लागला, इच्छा करूं लागला, असें तसें म्हणून मानूं लागला कीं मन होतो. कर्मवासनेनें भिन्नभिन्नपणें विभक्त झालेलीं अशीं हीं जीवाचीं खंड खंड झालेलीं हीं नामरूपें होत. क्रिया-वासनेनें या देह, प्राण, मन, बुद्धि, दशइंद्रियादिकांत आत्मभावना जोंपर्यंत हा जीव ठेवून असतो तोंपर्यंत त्याचें रूप अखंड आणि पूर्ण असें न होतां त्याचे तुकडे तुकडे पडतात व अशा या अल्पाल्प शकलांतच त्याला आत्मभावना होऊं लागते व तोहि याप्रमाणें अल्पाल्परूपी होऊं लागतो. तुच्छ व क्षणिक विषयसुखच, तें कितीहि गलिच्छ असलें तरी त्यालाच, तो आत्मसुख मानूं लागतो व शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पंचविषयांत गुरफटतो. तो ब्रह्मरूप जाणत नाहीं व ब्रह्मानंद अनुभवीत नाहीं. देह, इंद्रिय, प्राण, मन आदिकांच्या अध्यासानें तो अपूर्ण होतो. भ्रांतीनें तें तेंच तो बनून असतो. यासाठीं अखंड सच्चिदानंद स्वरूपाची ओळख करून घ्यावी. त्या संपूर्ण आनंदघन परमात्म्याची सोऽहं भावनेनें उपासना करावी. तद्रूपानें राहाण्याचें साधन अखंड चालवावें. पाण्याच्याच दृष्टीनें सर्व पाण्याचे विकार पाहिल्याप्रमाणें त्या परमात्म्याच्या त्या चिदानंदमय मंगल रूपानेंच व्यक्तिगत स्वपरदेहादिकांना बघावें. सुवर्णालंकारांत एक सुवर्णाची दृष्टि ठेवल्याप्रमाणें अखंड ब्रह्मानंदाचीच दृष्टि सर्वत्र असावी. असें झालें कीं सर्वांचा अंतर्भाव एकांत होऊन सर्वच एक होतें, पूर्णरूप होतें. साधक ब्रह्मरूपच होतो.

**ब्रह्म वा इदमग्र आसीत्तदात्मानमेवावेत् । अहं ब्रह्मास्मीति तस्मात्तत्सर्वमभवत् । तद्यो यो देवानां प्रत्यबुध्यत स एव तदभवत्तथर्षीणां तथा मनुष्याणाम् । तदिदमप्येतर्हिं य एवं वेदाऽहं ब्रह्मास्मीति स इदं सर्वं भवति तस्य ह न देवाश्च नाभूत्या ईशते । आत्मा ह्येषाँ स भवति ।** (बृ.१-४-१०)—पूर्वीं हें सर्वहि एक परमात्मतत्त्वच अथवा एक ब्रह्मच होतें. त्यानेंच स्वतः स्वतःला मी ब्रह्म म्हणून जाणलें. त्या आत्मीय ज्ञानानेंच तें हें सर्व कांहीं झालें, विश्वाकार बनलें. त्यानेंच प्रतिदेहांत प्रवेश केला. देवामधून ज्यानें ज्यानें स्वतःला तें परमात्मरूप म्हणून जाणलें तो तो तें परमात्मरूपच झाला, ब्रह्मच झाला. याचप्रमाणें ऋषिमधून, मनुष्यामधून ज्यानें ज्यानें स्वतःला तें परमात्मरूप म्हणून जाणलें व प्रत्ययाला आणलें तो तो तें परमात्मतत्त्व, तें ब्रह्मच झाला. आतां सुद्धां हें चिदानंदमात्र ब्रह्मच मी म्हणून जो जाणतो तो ब्रह्मच होतो. ब्रह्माप्रमाणेंच ( मी ब्रह्म म्हणून जाणण्याच्या ) या ज्ञानानें तो सर्वहि हें होतो. सर्वांचें आत्मरूपच तो बनतो. कोणीहि त्याच्याविरुद्ध जात नाहीं. देवसुद्धां त्याचें अनिष्ट करीत नाहींत. त्या ब्रह्मवेत्त्याच्या नाशाकरितां अथवा अनिष्टाकरितां देवतांनींहि प्रयत्न केले तरी त्यांना तें तसें घडवून आणणें शक्य होत नाहीं.

या उपनिषदांच्या वेंचक वाक्यांवरून आपल्याला तत्त्वज्ञानाचा थोडा फार परिचय झाला. या नामरूपात्मक जगाच्या जाळ्यांत न सांपडतां याच्या पलीकडे असणारें परमात्मतत्त्व जाणलें पाहिजे. तेंच आपलें स्वरूप होय. त्याला जाणणारा मुक्त होतो. मुक्ति म्हणजे अज्ञान व त्याच्या सर्व कार्यांचा अत्यंत अभाव होऊन, आनंदमात्र असणारें केवल ब्रह्मतत्त्वच होऊन असणें हें आपण जाणलें. श्रुतींत जिथे तिथे आत्मानंदाचे आलाप ऐकूं येतात. आतां त्या परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार करून घेतलेल्या आत्मनिष्ठांनीं स्वस्फूर्तीनें गाइलेलें आत्मगीत आपण थोडें श्रवण करूं या. याच्या योगानें जीवब्रह्मैक्याबद्दल कोणास थोडासा संशय उरला असल्यास तो उन्हांतील धुक्याप्रमाणें पार वितळून नष्ट होईल आणि मंगलमय चिदानंदस्वरूप सर्वत्र प्रकाशूं लागेल.

## आत्मनिष्ठांचें आत्मगीत

**वेदाहमेतं पुरुषं महान्तम् । आदित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ तमेवं विदित्वाऽतिमृत्यमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ॥** ( श्वेताश्वेतर उ.३–८ )

–अंधाराच्या कोठडींतून बाहेर निघून जसें अपार तेजाच्या सूर्याचें दर्शन घ्यावें, त्याच्या तेजांत वावरावें त्याचप्रमाणें तमानें भरलेल्या या चराचर विश्वाच्या बाहेर येऊन त्या स्वप्रकाश परमात्म्याचें दर्शन घेतलें. त्या स्वयंप्रकाशांत मी वावरत आहें. सूर्याप्रमाणें स्वयंप्रकाशानें प्रकाशित असलेलें स्वरूप मी बघितलें, तें महान पुरुषस्वरूप मी ओळखलें. तें मी चांगलें जाणतों. आपल्या ज्ञानमात्रतेनें, केवल आनंदघनतेनें व केवल स्वयंप्रकाशानें जें सदा प्रकाशत असतें, तें परमात्मतत्त्वच मी असा माझा निश्चय झाला आहे. त्या परमात्मस्वरूपाला जाणूनच मर्त्य अमर होतो. परमात्मस्वरूपाच्या ज्ञानाशिवाय भवसिंधुतारक असा दुसरा कोणताहि मार्ग नाहीं.

**तमो हि शारीरप्रपंचमाब्रह्मस्थावरान्तमनन्ताखिलजांडभूतम् । निखिलनिगमोदितसकामकर्मव्यवहारोलोकः । नैषोऽन्धकारोऽयमात्मा ॥** —तम म्हणजे सर्व शारीरिक प्रपंच, आब्रह्मस्थावरान्त अखिल ब्रह्मांडगोल, वैदिक सकाम कर्म करणारे लोक. हा अंधःकार कांहीं आत्मा नव्हे. **सहस्रभानुमच्छुरितापूरितत्वादलिप्यापारावारपूर इव । नैषा समाधिः नैषा योगसिद्धिः । नैषा मनोलयः ब्रह्मैक्यं तत् ॥** ( महावाक्योपनिषत् ) हा मंत्र वाचतांना **दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता । यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ।** ( भ. गी. ११–१२ ) हा गीतेचा श्लोक आठवतो. हजारों सूर्यांची एकवटलेली प्रभा, त्यांतील तापदायक तीक्ष्णता काढून टाकल्यास जें तिचें अति मृदु, अति सुंदर, सुशांत, आनंदघन रूप शिल्लक राहील तें अपार चिद्रूपच परमात्मरूप होय. **आर्द्रं ज्वलति ज्योतिरहमस्मि । ज्योतिर्ज्वलति ब्रह्माहमस्मि । योऽहमस्मि । ब्रह्माहमस्मि । अहमस्मि ब्रह्माहमस्मि । अहमेवाहं मां जुहोमि स्वाहा ॥** ( महा ना. उ. १५ ) या मंत्रांतहि "**आर्द्रं ज्वलति ज्योतिरहमस्मि ।**" असा उल्लेख आहे. **तस्माच्छुक्रं तेजोमयं ब्रह्मेति सिद्धम् ।** ( अद्वयतारक उ. ) हा आत्मप्रकाश या सामान्य चक्षूंना गोचर होण्यासारखा नाहीं, हें "**दिव्यं ददामि ते चक्षुः ।**" या त्रिलोकी गुरु भगवंताच्या वाक्यावरून स्पष्ट होतें. सद्गुरुपरमात्मानुगृहीत मनःशक्तीनें व चक्षुरिंद्रियानें याचा साक्षात्कार होतो. श्रीसमर्थांचें वाक्यहि इथे आठवलें : " सद्गुरुकृपा होय त्यासी । जो शोधी आपणासी । पुढें कळे अनुभवासी । आपेआप वस्तु ॥ दा. बो. ६–१०–११ ॥ सद्गुरुकृपा तेचि किली । जेणें बुद्धि प्रकाशली । द्वैतकपाटें उघडलीं । एकसरी ॥

७–२–१५ ॥ तेथें सुख असें वाड । नाहीं मनासी पवाड । मनेंवीण कैवाड । साधनाचा ॥१२॥ ”

**इहैव सन्तोऽथ विद्मस्तद्वयं न चेदवेदीर्महती विनष्टिः । ये तद्विदुरमृतास्ते भवन्त्यथेतरे दुःखमेवापियन्ति** ॥ ( बृ. ४–४–१४ )—इथेच या लोकांत राहून या देहांत तें परमात्मस्वरूप आपण जाणूं या. तें परमात्मतत्त्व आपणच आहों, असें जर या लोकांतच या देहांतच जाणलें नाहीं तर मोठ्या भयंकर आपत्तीला आम्हांला पुढें बळी पडावें लागेल. त्या योगानें आपलें अत्यंत अनहित होईल, कल्पनातीत दुःख भोगावें लागेल. आपलें स्वरूप जे जाणतात ते अमर होतात. इतर मात्र केवळ दुःखाचीच प्राप्ति करून घेतात. आत्मज्ञान होईपर्यंत कोणालाहि दुःख चुकतच नाहीं.

**अहं वृक्षस्य रेरिव । कीर्तिपृष्ठं गिरेरिव । ऊर्ध्वपवित्रो वाजिनीव स्वमृतमस्मि द्रविणँ सवर्चसं सुमेधा अमृतोक्षितः इति त्रिशंकोर्वेदानुवचनम्** ॥ ( तैत्तरीय उ. )—नाशिवंत अशा या सर्व संसारवृक्षाचा अविनाशी असा मीच एक आदि आहे, त्याचें सत्य कारण आहें. अधिष्ठानरूपानें व चुंबक-लोहवत् सत्तामात्रतेनें मी त्याचा प्रेरक आहें, साक्षी आहें. माझी कीर्तिहि मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणें अति उन्नत आहे. **ऊर्ध्वमूलोऽवाक् शाखाः** । —या संसारवृक्षाच्यावर जें याचें पवित्र मूळ आहे म्हणून श्रुति सांगते तें ब्रह्मच मी आहें. देहाच्या ऊर्ध्वभागीं असलेल्या मस्तकांतील ब्रह्मरंध्रांत जें ब्रह्म निहित आहे तेंच मी. **यश्चायं पुरुषे यश्चासावादित्ये स एकः** । —या देहांत आणि त्या सूर्यमंडलांत असणारा आत्मा एकच आहे. सूर्य जसा अमृतस्वरूपी व पवित्र आत्मरूपी आहे त्याप्रमाणेंच मीसुद्धां अमृतस्वरूपी व पवित्र आत्मरूपी आहें. अनेक साधनांनीं, मुख्यतः अध्यात्मश्रवणानें मिळविलेल्या स्वयंप्रकाश आत्मसुखाची ती दिव्य संपत्तीच मी आहें. मी सच्चिदानंद अशा या स्वरूपलक्षणानें अखंड जशाचा तसाच असतों. या सर्वांचा साक्षी सदाच तटस्थ राहून सत्तामात्रें जगत्सृष्टिस्थितिलयकार्यें करतों. सदाच असंग राहण्याचें व अद्वितीय राहण्याचें माझें बुद्धिकौशल्य असम व अवर्णनीय आहे. मला विकार आणि मरण हीं कधीं होतच नाहींत. मी म्हणजे अमृताची केवळ ओतीव मूर्तीच आहें. आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाल्यानंतर त्रिशंकूच्या वाणींतून सहज उमटलेले हे अमृतोद्गार आहेत. हृदयाचा बांध फोडून, भेदाचा ठाव पुसून, लौकिकाचा दाब उडवून, अंतरंगांतून उचंबळून वर उसळी घेणारा

अनंत आत्मानंदाचा हा उद्रेक आहे. त्रिलोक पावन करणारा, अखिल देव—दानव-मानव जातीसच सावध करणारा, अखिल विश्वासच भारून टाकणारा त्रिशंकूच्या आत्मानंदाचा हा परमपवित्र गंगाप्रवाह होय.

**स यो ह वै तदच्छायमशरीरमलोहितं शुभ्रमक्षरं वेदयते यस्तु सोम्य स सर्वज्ञः सर्वो भवति** ॥—जो विरक्त तें अज्ञानशून्य, निरावृत, स्वरूपचिन्मात्र व निर्गुण, निराकार असें अति परिशुद्ध अविनाशी आत्मस्वरूप जाणतो तो स्वरूप व सर्वज्ञ होतो.

**हा ३ वुहा ३ वुहा ३ वु** ॥ **अहमन्नमहमन्नमहमन्नम् अहमन्नादोऽ ३ हमन्नादोऽहमन्नादः** ॥ **अहँ श्लोककृदहँ श्लोककृदहँ श्लोककृत्** ॥ **अहमस्मि प्रथमजाऋता ३ स्य । पूर्वं देवेभ्योऽमृतस्यना ३ भायि** ॥ **यो मा ददाति स इदेव माऽ ३ वः । अहमन्नमन्नमदन्तमाऽ ३ द्मि । अहं विश्वं भुवनमभ्यवाम् । सुवर्णज्योतीः** ॥ **य एवं वेद** ॥ ( तै. भृगु व. १० ) " **हा ३ वुहा ३ वुहा ३ वु** । " हे तीन शब्द आश्चर्यदर्शक आहेत. आनंदाच्या उद्रेकानें वर उसळून आलेले स्वैर आलाप आहेत. तें आनंदरूप ब्रह्मच मी. " **आनंदेन जातानि जीवन्ति** ।" म्हटल्याप्रमाणें माझ्या आनंदामुळेंच सर्वांचें जीवन चालतें. मी आत्मानंदरूपाचें दिव्य अन्न आहें. सकळ जीवांचें जीवन असणारा आत्मानंदच मी आहें. ज्याच्या सत्तेनें जग अस्तित्वांत आहे, ज्याच्या ज्ञानरूपतेनें ज्ञानसंपन्न आहे, ज्याच्या सुखानें सुखी आहे तेंच मी सकळ जगज्जीवांचें मूळ रूप व त्यामुळेंच मी सर्वांचें जीवन अन्न आहें.

**को ह्येवान्यात्कः प्राण्यात् । यदेषआकाशो न स्यात्** ॥—या विश्वाच्या अंतर्बाह्य भरून सर्वत्र भरगच्च कोंदाटलेला हा अद्वितीय आत्मानंद नसेल तर अन्य कोणत्या आनंदानें प्राणी जगूं शकतात? स्वरूपानंदच सर्व प्राणिमात्रांचें जीवन आहे. तेंच खरेंखुरें अन्न आहे. स्वरूपाहून अन्य असें आपल्यांत कांहींच असूं शकत नाहीं. **अहमेवाहं मां जुहोमि** । असाच व्यवहार चालतो. **स्वस्वरूपं स्वयं भुंक्ते नास्ति भोज्यं पृथक् खलु** । —केवळ आनंदमात्र स्वरूपांत आनंदच स्वयं अन्न व अन्नादहि पण होतो. माझेंच स्वरूप मी अनुभवितों म्हणणें काय व मीच अन्न व अन्नाद आहें म्हणणें काय दोन्ही एकच. अन्न व अन्न सेवन करणाऱ्याच्या ( अन्नादाच्या ) रूपांनीं एक आनंदघन स्वरूपच आहे. म्हणजेच अखिल अन्न व अन्नादांच्या

रूपानें स्वरूपच एक आहे. मीच अखिल अन्न व अन्नादरूपानें आहें. मीच अन्न व अखिल अन्नादांना निर्माण केलें, म्हणणें म्हणजे स्वमात्र मीच एक आहें असें म्हणणें आहे. माझ्या अद्वितीय निरतिशय आनंदाचें अतिशय महत्त्व आहे. तेंच एक सर्वाधिक सर्वोत्कृष्ट आहे. सर्वाधिक सर्वोत्कृष्टतेनें तें अन्यनिरपेक्ष असणें स्वाभाविक झालें. असें हें स्वरूप स्वतःपूर्ण, स्वमात्र असल्यामुळें आनंदमात्रतेंत झालेलें, होणारें व आतां असलेलें सर्व मीच आहें. सर्व कर्माध्यक्ष, सर्व कर्मफलदाता, सर्वव्यापि, सर्व विश्वाधिपति, सर्वादि हिरण्यगर्भहि मीच आहें.

सर्व देवदेवतांच्या पूर्वी उत्पन्न झालेला विराटहि पण मीच आहें. विष्णु तसा ब्रह्मदेवहि पण मीच आहें. सर्व सत्कीर्ति माझीच आहे. सर्व सत्कीर्तीला मीच कारण आहें. अखिल सत्कर्म व त्याचा कर्ता करविताहि मीच आहें. जीवांच्या मोक्षाला कारणीभूत होणारे अखिल मोक्षोपाय व मोक्षपाणी सद्गुरुहि मीच आहें. मीच अमृतत्वाची नाभि म्हणजे कारण आहें. वर्तुलांतल्या मध्यबिंदु-प्रमाणें, शरीरांतल्या नाभीप्रमाणें अथवा चक्राच्या मध्यवर्ति गड्ड्याप्रमाणें सर्व विश्वाचें मी धारण करतों. शरीरांतल्या नाड्यांप्रमाणें "**अमृतस्य नाभिः ।**" नाभीरूप असलेल्या माझ्यापासूनच सर्व जगाचे सारे जीवनोपाय उत्पन्न होतात. चक्राच्या अरा जशा चक्राच्या मध्यभागीं असणाऱ्या त्याच्या नाभींत एकत्रित होतात, त्याप्रमाणें जीवनाचा व सकल जीवप्रीत्यर्थ जीवनाधार मोक्ष-रूप असणाऱ्या माझ्यांत म्हणजे आपल्या आत्मानंदरूपांत एकत्रित होतात. शरीराच्या जीवनक्रमांत नाभीपासूनच सर्व नाड्यांना अन्नरस जाऊन पोहोंचतो; त्याप्रमाणेंच सर्वात्मरूप अशा माझ्यापासूनच जगांतल्या अखिल जीवांना जीवन मिळतें, आत्मानंदाचा लाभ होतो व आत्मप्राप्तीच्या साधनांचा प्रचार आणि प्रसार केला जातो. मोक्ष, मोक्षाचीं साधनें, मोक्षाचें कारण व मुक्तहि मीच आहें. जग, जगाचें जीवन अन्न व जगून असणारा अन्नाद इत्यादि सर्व मीच आहें. अन्नदाता, अन्नभोक्ता व अन्नहि मीच आहें. अद्वितीय आत्मानंदच या सर्वांचें स्वरूप आहे. जो आलेल्या मुमुक्षूला आत्मज्ञान देतो अथवा आलेल्या बुभुक्षूला अन्न देतो तो आपलें, माझें व दुसऱ्याचें रक्षण करतो आणि स्वतः जिवंत राहातो. दुसरा म्हणून इथे कोणी नसल्यामुळें अन्नाभावानें कोणालाहि झालेल्या कष्टाचा व कोणाच्याहि झालेल्या प्राणहानीचा संबंध आपल्यालाच लागतो. अन्न—जीवन व जिवंत असणारा मीच एक आहें. जो

अन्नरूप अशा मला दुसऱ्याला न देतां, याचकांना तृप्त न करतां आपण मात्र यथेष्ट अन्न सेवन करतो तो आपणच आपला मृत्यु ओढवून घेतो. दुसऱ्याला अन्नाभावीं झालेले कष्ट ते याचेच कष्ट आहेत. तशीच दुसऱ्याची झालेली प्राणहानी पण याचीच प्राणहानी आहे. दुसऱ्याला जीवनाचा लाभ न होतां आलेलें मरण म्हणजे आपल्यालाच आपल्यापासून जीवनाचा लाभ न होतां आपणच मरण पावणें होय. दुसऱ्याला न देतां जो स्वतः मात्र अन्न सेवन करतो त्याला तें अन्नच खाऊन टाकतें. तो स्वतःचा नाश स्वतःच करून घेतो म्हणणें काय किंवा त्या अन्नरूपानें मीच त्याचें भक्षण करतों म्हणणें काय सारखेंच आहे. स्वरूपाच्या ठिकाणीं अन्य काय आहे ? विराट् अथवा ब्रह्मदेवाच्या रूपानें जगाची उत्पत्ति, हिरण्यगर्भ अथवा विष्णूच्या रूपानें जगाचें पालन व ईश्वर अथवा रुद्ररूपानें जगाचा उपसंहार मीच करतों. मी या आत्मीय भावनेंत सर्वांची प्रतीति येत असल्यामुळें, ती अखिल प्रतीति, तो यच्चयावत् अनुभव आत्मीय भानांतच आहे. आत्मीय म्हणजे आपल्या भानांत आपण एक असणारा. या दृष्टीनें सर्व कांहीं आपणच आहों. मीच एक आहें. सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें केवळ एकच एक होऊन, हें आत्मीय ज्ञान, हा आत्मप्रकाश सर्व रूपानें चोंहींकडे भरगच्च भरून आहे. त्याहून त्यांत अन्य असें आजपर्यंत कांहीं उत्पन्न झालें नाहीं व पुढेंहि कांहीं होणें शक्य नाहीं. अनंत आनंदाचा अद्वितीय महोदधीच मी आहें. त्रिशंकूनें गाइलेल्या आत्मगीताप्रमाणेंच हें भृगूनें गाइलेलें आत्मगीत आहे. **वामदेवः प्रतिपेदेऽहमनुरभवँ्सूर्यश्चेति ।**—मीच मनु, मीच सूर्य इत्यादि उद्गारांनीं वामदेवानेंहि आपला सर्वात्मभाव प्रगटविला आहे. ( बृ. १–४–१० ) **वेनस्तत्पश्यन्विश्वा भुवनानि विद्वान्यत्र विश्वं भवत्येकनीडम् । यस्मिन्निदँ् संचविचैति सर्वँ् स ओतः प्रोतश्च विभुः प्रजासु प्रतद्वोचे अमृतं नु विद्वान् गंधर्वो नाम निहितं गुहासु ॥** ( म. ना. उ. ३ )—ज्या ठिकाणीं हें समग्र विश्व केंद्रिभूत आहे, ज्याच्यांतच विश्वाच्या साऱ्या घडामोडी होतात, जें या चराचर विश्वांतून ओतप्रोत भरून आहे, जें सर्वांच्या हृदयांतून सांठविलेलें आहे त्या अमृतआत्मरूपाचा साक्षात्कार करून घेऊन विद्वान वेन गंधर्वानें तें सर्वांना सांगितलें.

### श्रुतीचें सांगणें

**यो वै भूमा तत्सुखं । नाल्पे सुखमस्ति । भूमैव सुखं । भूमा एव**

**विजिज्ञासितव्यः ॥**—जें निरतिशय सर्वाधिक सुख आहे तेंच खरें सुख. अल्पांत सुख नाहीं. तें सर्वांत मोठें सुखच एक खरें. त्यालाच जाणण्याची इच्छा धरावी. ' **यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमाऽथ यत्रान्यत्पश्यत्यन्यच्छृणोत्यन्यद्विजानाति तदल्पं यो वै भूमा तदमृतम् यदल्पं तन्मर्त्यं ँ स भगवः कस्मिन्प्रतिष्ठित इति स्वे महिम्नि यदि वा न महिम्नीति** ॥ ( छां. ७।२४।१ )—जेथें पाहावयाला, ऐकावयाला व जाणावयाला वेगळें म्हणून उरत नाहीं, जें अखंड एकरस सुखरूप असतें तेंच परमात्मरूप. जेथें पाहाणारा व पाहिलें जाणारें, ऐकणारा व ऐकलें जाणारें, जाणणारा व जाणलें जाणारें वेगवेगळें असतें तें हें विश्व अल्प आहे. जें निरवधि सुख अद्वितीय परमात्मरूप आहे तेंच एक नित्य निर्विकार असें अविनाशी तत्त्व होय. आणि याहून जें विलक्षण असतें तें अल्प. विश्व विकारी, विनाशी आहे. तें परमात्मरूप कुठे व कोणत्या आश्रयानें असतें असें विचारल्यास तें सर्वोपाधि विनिर्मुक्त सत्तामात्र स्वरूप आहे. त्याला कशाचाहि आश्रय नाहीं. तें आपल्या प्रभावानें व वैभवानें प्रभावशाली व वैभवशाली आहे. आपल्या महिम्यानेंच तें सुप्रतिष्ठित आहे. त्याचाच आधार सर्वांना आहे. त्याला मात्र कशाचा आधार नाहीं. तेंच सर्वाधाररूप होय. केवल सुख, केवल आनंद हें त्याचें स्वरूप आहे. दोरीवर सर्पाचा आरोप झाल्याप्रमाणें या अद्वितीय आनंदरूप परमात्म्यावर या जगाचा हा असा केवळ आरोप आहे.

**गो अश्वमिह महिमेत्याचक्षते । हस्तिहिरण्यं दासभार्यं क्षेत्राण्यायतनानीति। नाहमेवं ब्रवीमि ब्रवीमीति होवाचान्यो ह्यन्यस्मिन्प्रतिष्ठित इति॥** ( छां. ७ । २४ । २ )—गाई, वृषभ, हत्ती, घोडे, सोनें, चांदी, दासदासी, आयुरारोग्य, विधि, बुद्धि, सुंदर, पत्नी, पुत्र, जमीनजुमला, इष्टमित्र, गजान्त लक्ष्मी असणें म्हणजे मोठें भाग्य व मोठें वैभव म्हणून म्हटलें जातें. मी मात्र तसें म्हणत नाहीं. अनंत कोटी ब्रह्मांडांचें अखिल वैभवहि त्या आत्मीय अपार व सारभूत वैभवापुढें, त्या सत्य व सर्वकारण सुखापुढें, त्या कोरीव केवल आनंदापुढें अत्यल्प, विनाशी, विकारी व असत्य आहे. तर मग त्या एवढ्या वैभवाची काय कथा ! त्या परममंगल आत्मीय सुखावर बाह्यसुखाचा केवळ आरोप आहे. खऱ्या सरोवराचें पाणी आणि त्याच्या चित्रांतलें पाणी इतकें यांत अंतर आहे. चित्रांतल्या सरोवरांत खरें पाणी नसल्यामुळें तेथें जसें खरें पाणी प्यावयाला मिळत नाहीं आणि तहानहि भागत नाहीं त्याप्रमाणें

काल्पनिक प्रपंचांतल्या काल्पनिक सुखांत सुखच नसल्यामुळें यापासून शांति-समाधान व खरें सुख लाभत नाहीं. चित्रांतल्या सरोवरांत खऱ्या सरोवराचा आभास असल्याप्रमाणें या बाह्य वैभवांत खऱ्या सुखाचा आभास आहे. चित्रांतल्या सरोवरावरूनच खऱ्या सरोवराची कल्पना येत असल्यामुळें इतक्याच दृष्टीनें या चित्रांतल्या सरोवरांत खरें सरोवर आहे असें जसें म्हणावें तसेंच या जागतिक सुखांत आत्मीय सुख आहे म्हणून म्हटलें जातें. खोट्यास खऱ्याचा आधार जसा असतो, खऱ्या पुत्राच्या आधारें वंध्यापुत्राचा जसा आरोप होतो त्याप्रमाणें खऱ्या सुखाच्या आधारें बाह्य सुखांत सुखाचा आरोप केला जातो. नकाशांतला रमणीय प्रदेश पाहून जसें त्या आभासानें लक्षित होणाऱ्या खऱ्या प्रदेशालाच मनुष्य जातो व तिथें खुशाल निवास करून राहातो त्याप्रमाणेंच या जगांतलें भ्रामक रमणीय सुख पाहून त्या सुखाभासानें लक्षित होणाऱ्या खऱ्या सुखरूपी परमात्मपदास तो पोहोंचतो.

**येन रूपं रसं गंधं शब्दान्स्पर्शाँ्श्च मैथुनान् । एतेनैव विजानाति किमत्र परिशिष्यत एतद्वै तत् ॥ ३ ॥ स्वप्नान्तं जागरितान्तं चोभौ येनानुपश्यति । महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥ ४ ॥** (कठ. २।१–३–४) वरील भावार्थच या दोन श्लोकांवरून दिसून येतो. जागृत्स्वप्नांत अनुभविलें जाणारें, दिसून येणारें व शब्दादि विषय ज्याच्यामुळें आस्तित्वांत असल्यासारखे वाटतात तें निर्भेळ सुखच मी असा निश्चय झाला कीं या विषयानुभवाकडे बुद्धि वळून होणारें दुःख-शोक होत नाहींत. हा या दोन मंत्रांचा भावार्थ आहे.

**स एवाधस्तात्स उपरिष्टात्स पश्चात्स पुरस्तात्स दक्षिणतः स उत्तरतः स एवेदँ् सर्वमित्यथातोऽहंकारादेश एवाहमेवाधस्तादहमुपरिष्टादहं पश्चादहं पुरस्तादहं दक्षिणतोऽहमुत्तरतोऽहमेवेदँ् सर्वमिति ॥१॥ अथात आत्मादेश एवात्मैवाधस्तादात्मोपरिष्टादात्मा पश्चादात्मा पुरस्तादात्मा दक्षिणत आत्मोत्तरत आत्मैवेदँ् सर्वमिति ॥२॥** (छां. ७–२५।१)२) **ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद्ब्रह्म पश्चाद्ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण । अधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठं ॥** (मुंडक. २–२–११)—तो, मी, आत्मा व ब्रह्म हे सारे अद्वितीय तत्त्वनिदर्शक, तें आनंदस्वरूपानिदर्शक संकेत आहेत. या सर्व संकेतांनीं लक्षित होणारें आपलें एक अद्वितीय आनंदघनरूप या अध्यारोपित, अध्यस्त, प्रपंचाच्या वामदक्षिण, अधोर्ध्व, अंतर्बाह्य, याच्या सत्य स्वरूपानें

रज्जुसर्पातल्या भ्रामक भावनेंत सत्य एक रज्जुव्याप्त असल्याप्रमाणें व्यापून आहे. हा निश्चय असावा, हें या वरील श्रुतिमंत्रांतून तात्पर्य निघतें. वेद उपनिषदांचें तत्त्वज्ञान एवढेंच आहे.

## आत्मज्ञानाची बाह्य फलश्रुति

**न पश्यो मृत्युं पश्यति न रोगं नोत दुःखता ऽसर्व ऽपश्यः पश्यति सर्वमाप्नोति सर्वशः ॥** ( छां. ७-२६-२ )—आत्मदृष्टि असणारा मृत्यु पावत नाहीं. त्याला रोग उत्पन्न होत नाहींत. तो दुःखहि अनुभवित नाहीं. सर्वच व्यापून राहिलेलें आपलें एक आनंदघन स्वरूपच तो पाहातो नी तद्रूप असतो. असल्याच ठिकाणीं असून सत्य अशा आनंदघनरूपानें तो सर्व व्यापून टाकतो. विस्ताराची कल्पना आणून दिलेल्या या शेलक्या वाक्यांच्या उदाहरणावरून श्रुतीचें हृदय व्यक्त होतें, तिचें महत्त्व जाणवतें. श्रुतीनें जीवांवर केलेला उपकार लक्षांत येतो. श्रुतिवचनाच्या पालनानें पूर्वऋषींना बाणलेलें ऐश्वर्य डोळ्यापुढें उभें राहातें, आमची आशा अंकुरते, मोक्षसाधनाच्या अनुष्ठानानें लागणाऱ्या निरतिशय आनंदाची कल्पना येते. उन्नत आणि सारभूत व्यावहारिक जीवनांतून निरवधि आत्मीय आनंदाचें दिव्य आयुष्य प्राप्त करून घेण्यास श्रुति शिकवितें. याच्यापुढें दिलेला साधनक्रम तसाच डावलून पुढें जाण्यास मन तयार होत नाहीं. त्यांत तथ्य आहे. **आहारशुद्धौ सत्वशुद्धिः सत्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः स्मृतिलम्भे सर्वग्रंथीनां विप्रमोक्षः ॥**—मोक्षाच्या हेतूनें सात्विक आणि सुसंस्कृत अशा अन्नादि जीवनोपयोगी पदार्थांच्या सेवनानें अंतःकरणाची शुद्धि होते आणि विषयांकडचा मनाचा ओढा नष्ट झाला कीं स्वरूपाचें आवरण नष्ट होऊन आत्मरूपाची स्मृति अचल आणि सुदृढ होते. अशी ब्रह्मैक्यस्मृति सदा टिकून राहिली म्हणजे देहात्मबुद्धि व बहिर्मुखवृत्ति राहातच नाहीं. असा या मंत्राचा अर्थ आहे. श्रुतीचें हें मार्गदर्शन आपण लक्षांत ठेवून वागावयाला पाहिजे.

## संघटना व तिचें महत्त्व

श्रुति पारमार्थिक निरतिशय सुखाचें जसें मार्गदर्शन करते त्याप्रमाणेंच तें साध्य करून घेण्याकरितां कारणीभूत असणाऱ्या व्यावहारिक जीवनाच्या उन्नत आदर्शाचाहि पण उपदेश करते. परस्परसौहार्द आणि सहकारिता हीं व्यावहारिक जीवनास अत्यावश्यक आहेत. **संगच्छध्वम् । संवो मनांसि**

**जानताम् । देवा भागं यथा पूर्वे संजानाना उपासते ॥** (ऋ. १०।१९१-२) —एकत्र व्हा. उन्नतीच्या दिव्य मार्गाचा विचार करा. तुमचा उत्कर्ष साधा. प्रगतीकरितां यत्न करा. परस्परांत प्रेमळ आचरण ठेवा. तात्त्विक आचारविचार ठेवा. मन रिझविण्यासारख्या गोड विचाराचें प्रेमळ, सत्य आणि मृदु मधुर भाषण करा. परस्परांत स्नेह आणि परस्पराशीं सहकार ठेवा. परस्परांचें सुख-दुःख जाणा. परस्परप्रेमानें त्याच्या निवृत्तीचा उपाय योजा. परस्परांचें इंगित ओळखून सर्वच सन्मार्गानें जा. सन्मार्गाच्या जीवनांत एकमेकांस साहाय्य करा. सामुदायिक एकोप्याचें जीवन चालवा. तुमचे विद्वान पूर्वज एकत्र मिळूनच विचार करीत असत, सामुदायिक अनुष्ठान चालवीत असत, आपआपले वर्णाश्रमोक्त आचार अधिकारपरत्वें कायम ठेवून त्यांतून उन्नतीचा मार्ग आंखीत असत. आपल्या सदाचरणानें, सद्विचारानें व अनन्य भक्तीनेंहि परमात्म्याला संतुष्ट करीत असत. **समानो मंत्रः समितिः समानी समानं मनः सहचित्तमेषाम् । समानं मंत्रमभिमंत्रये वः समानेन वो हविषा जुहोमि ॥** ( ऋ. १०।१९१-३ )—तुम्हां सर्वांचे विचार समान रहस्यपूर्ण असावेत. तुमच्या परिषदा अचूक विचारांनीं युक्त असाव्यात. उच्च ध्येयाच्या परिष्कृत आचार–विचारांचा त्यांतून एकजुटीनें सारखा प्रसार व प्रचार होत राहावा. सर्वांचें मन शुद्ध असावें. राष्ट्रांत शुद्ध आचारविचारांचें पीक यावें. राष्ट्रांतल्या पुढाऱ्यांत, धर्मोपदेशकांत, महात्म्यांत व इतर समाजांत दिव्य संघटना दिसून यावी. तुम्हां सर्वांचे विचार तुम्हां सर्वांच्या उन्नतीला कारण व्हावेत. अभ्युदय–निःश्रेयसाला सर्वतोपरि साधक होणारे आचार, विचार व उच्चार समाजांतून सर्वत्र पाहावयास सांपडावेत. हा समानतेनें सर्वांना माझा समान उपदेश आहे. सर्वांनाहि माझी तात्त्विक शिकवण एकच आहे. तेव्हां सर्वांचाहि योगक्षेम उत्कृष्टपणें चालावा अशीच माझी उत्कट इच्छा आहे व त्याकरितांच माझा हा सर्व प्रयत्न आहे.

**समानीव आकूतिः । समाना हृदयानि वः । समानमस्तु वो मनो यथावस्सुसहासति ॥**—तुमच्यांत एकी राहण्यासाठीं तुमच्यांत परस्पर सहानुभूति असण्यासाठीं, परस्परांचें प्रेम वृद्धिंगत होण्यासाठीं, परस्परांचें परस्परांना साहाय्य मिळण्यासाठीं तुम्हीं सर्वांनीं एकोप्यानें राष्ट्रीय, सामाजिक, आर्थिक, लौकिक आणि पारमार्थिक कर्तव्यें चालविण्यासाठीं, राजकीय विषयांतहि दुमत न होण्यासाठीं, तुम्हां सर्वांचा अभिप्राय एक असला पाहिजे.

संघटनेकरितां श्रुति किती उपदेश करीत आहे पाहा ! संघटनेंत मोठी शक्ति असते. संघटना ही शक्ति होय. संघटना हें एक समाजाचें अभेद्य कवच असतें. थेंब थेंब सांचत तळें होतें, तळ्याची नदी व नदीचा समुद्र होतो. बिंदुबिंदूचा मिळून सिंधु होतो अशी म्हण आहे. वरील श्रुतीचा अभिप्रायच यांत व्यक्त आहे. जशी जशी संघटना होत जाईल त्या त्या प्रमाणांत परमात्म्याचें व्यापक स्वरूप समाजांत प्रगटतें, समाजाला शक्ति लाभते, त्यामुळें सामुदायिक सत्कार्याला जोम येतो.

## आर्य संस्कृतीचा साम्यवाद

वैदिक आर्य संस्कृतीचीं लक्षणें समजून घेण्याकरितां वेदोपनिषदांच्या कांहीं कांहीं भागाचें अजून थोडें पर्यालोचन करूं या.

**ईशावास्यमिदँ सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ।**
**तेन त्यक्तेन भुंजीथा मा गृधः कस्य स्विद्धनम् ॥** ( ईश. )

—हें चराचर विश्व सारें परमात्म्याकडूनच व्यापलें गेलें आहे. या सर्वांच्या अंतर्बाह्य एक परमात्माच आहे, त्यामुळें या जगांत जितके प्राणि-पदार्थ आहेत त्या सर्वांनाहि तूं परमात्मस्वरूपच म्हणून बघ. तो परमात्मा सर्वांचा योगक्षेम चालवितो, ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें फल देतो. त्यामुळें तुझ्या कर्माप्रमाणें तुला त्याच्याकडून मिळणाऱ्या अनुकूलतेंत, दिल्या गेलेल्या भोगसाधनांतच तूं संतुष्ट राहा. त्याचाच अनुभव घे. दुसऱ्याच्या संपत्तीवर तूं दृष्टि ठेवूं नकोस. त्याची तूं अभिलाषा धरूं नकोस.

( दुसरा अर्थ )—रज्जुसर्पाच्या भावनेंत रज्जु म्हणजे दोरीच एक जशी व्यापून असते त्याप्रमाणें या अध्यस्त विश्वांत परमात्माच एक व्यापून आहे. रज्जूंत अध्यस्त असणाऱ्या सर्पाची भावना त्यागून एक सत्य रज्जूच ओळख म्हणून म्हटल्याप्रमाणें परमात्मतत्त्वांत अध्यस्त असणाऱ्या विश्वाची भावना त्यागून एक सत्य परमात्माच ओळख. रज्जूच्या परिचयानें लाभणारें निर्भ-यत्व, अनुभव व या सत्यनिदर्शनानंतर सर्पभावनेच्या कोणत्याहि कल्पनेंत तूं रमूं नकोस, म्हणून जसें सांगावयाचें त्याप्रमाणें परमात्मतत्त्वाच्या परिज्ञानानें लाभणारें निर्भयत्व, असंसारित्व, आनंदघनत्वादिकांचा अनुभव घे; या सत्य-निदर्शनानंतर विश्वभावनेच्या कोणत्याहि कल्पनेंत तूं रमूं नकोस म्हणून श्रुति सांगते. हा दुसरा अर्थ थोडा तात्त्विक आहे.

**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतँ समाः ।**
**एवं त्वयि नान्यथेतोस्ति न कर्म लिप्यते नरे ॥२॥**

—सर्व प्रकारचीं उन्नत कर्में करीत, आपल्या धर्मकर्माप्रमाणें वागून, आपल्या व्यावहारिक व पारमार्थिक, तशाच श्रौतस्मार्त–पुराणोक्त निष्काम कर्मांनीं जनतेला व जनार्दनाला तसेंच इंद्रादि अधिकारीवर्गाला संतुष्ट राखीत आपले कुलधर्म कुळाचार पाळीत, सर्व प्रकारें कुलदीपक होऊन स्वपरउद्धारात्मक सत्कार्यें मोक्षापर्यंत करीत शेवटीं कृतार्थ झालें पाहिजे. एकदम हें साधलें नाहीं तर पूर्णायुष्याचीं शंभर वर्षें राहून मोक्षापर्यंत सतत सत्कार्य करीत मुक्त होण्याची इच्छा बाळगली पाहिजे. इहपर साधूं पाहणाऱ्या अशा तुला या मार्गापेक्षां श्रेष्ठ साधन दुसरें कोणतेंहि नाहीं. एका सत्कर्माहून अन्य कोणत्याहि साधनानें तुला दुष्कर्म घालवितां येणार नाहीं. स्वपरउद्धाराकरितां केलेलीं निर्दुष्ट निष्काम कर्में मनुष्याला बंधकारक होत नाहींत.

**यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ।**
**सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥ ६ ॥**

—जो सर्वांनाहि आपल्यांत, आपल्याला सर्वांत पाहतो तो सर्वसमान असतो. तो सर्वांशीं समप्रीति ठेवून वागतो. नीचोच्च भावनेनें होणारा कोणाचाहि तिरस्कार त्याच्या ठिकाणीं दिसून येत नाहीं. तो कोणाचीहि निंदा करीत नाहीं. कोणालाहि तो तुच्छ लेखीत नाहीं.

**यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ।**
**तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥ ७ ॥**

—आत्मसाक्षात्कारानें ज्याला सर्वत्र आत्मानुभव येतो, ज्याला ज्याला अखिल प्राणिपदार्थ आत्मरूपानें अनुभवाला येतात त्याला त्या आनंदमात्रतेंत, अद्वितीय स्वरूपांत शोकमोह दोन्ही राहात नाहींत. निरवधि आत्मानंदरूपानें राहून, समदृष्टीनें इतरांस तो पाहातो. हा स्वपर–शोकमोहनाशाचा दिव्य मार्ग आहे. नीचोच्च भावनेचा ठाव पुसून टाकणारा श्रुतीचा हा असा साम्यवाद आहे. ही आर्यांची सभ्यता ! हें भारतीयांचें दिव्य जीवन ! ही अशी एक जगदादर्शभूत दिव्य संस्कृति, जगन्मौलीभूत नाहीं असें कोण म्हणेल ? या दोन मंत्रांनीं आत्मज्ञानाशिवाय जगाचे शोकमोह व जगांतली नीचोच्च भावना अन्य कोणत्याहि विचारानें व साधनानें निर्मूल होत नाहीं हें घोषित होतें. नीचोच्च

भावनेची आढी मनांतच असते. व ती धन–विद्या–अधिकाराच्या मदानें वाढीस लागते. याला आत्मज्ञानाचा, एकात्म निश्चयाचा अभावच कारणीभूत होतो, देहाभिमानच कारण असतो. याची निवृत्ति आत्मज्ञानाशिवाय होत नाहीं. असें झाल्यास आत्मज्ञानानें लाभणारी समता अन्य कोणत्याहि साधनानें कशी लाभेल?

या समतेबद्दलचे गीतेचे कांहीं श्लोक बघूं.

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शिनः ॥** ( ६।२९ )

——समदर्शी योगी सर्वांत आपण आहों, आपल्यांत सर्व आहे असें बघतो. **यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति । सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजिगुप्स्यते ।** या ईशावास्य मंत्राची हा गीतेचा श्लोक आठवण करून देतो. कैवल्योपनिषदांत तर थोड्या फरकानें अगदीं असाच श्लोक आला आहे. यावरून गीतेच्या शेवटीं असणाऱ्या 'उपनिषत्सु' या शब्दाचा अर्थ कळेल. **सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि । संपश्यन्ब्रह्मपरमं याति नान्येन हेतुना ॥ १० ॥** सर्वभूतांत आपल्याला व आपल्यांत सर्व भूतांना बघूनच कोणीहि सर्वरूप ब्रह्मतत्त्व होतो. एरवीं हें कोणत्याहि साधनांनीं शक्य नाहीं. खरें समत्व हें **स एव सर्वं यद्भूतं यच्च भव्यं सनातनम् । ज्ञात्वा तं मृत्युमत्येति नान्यः पन्था विमुक्तये ॥ ११ ॥** हा मंत्र याच्यापूर्वीं आला आहे. आतांपर्यंत झालेलें, पुढें होणारें व आतां असलेलें हें सर्वहि एक सनातन परमात्माच आहे असें त्या परमात्म्याचें एकमेवाद्वितीय व म्हणूनच सर्वसम स्वरूप जाणल्यानेंच केवळ जीव मृत्युपाशांतून सुटतो. एरवीं त्याला जाणावयाला दुसरा असा कोणता मार्गच नाहीं. असा या मंत्राचा अर्थ आहे, असा या दोन मंत्रांचा पूर्वापार संबंध आहे. उत्तरार्धाच्या थोड्या फरकानें "**सर्वभूतस्थमात्मानं**" असा हा गीतेंत असणारा श्लोक मनुस्मृतीच्या १२ व्या अध्यायांतहि आढळतो. **सर्वभूतेषु चात्मानं सर्वभूतानि चात्मनि । समं पश्यन्नात्मयाजी स्वाराज्यमधिगच्छति ॥**—सर्व भूतांत मीच एक आत्मरूपानें आहें व हीं सर्व भूतें सर्वात्मरूपी अशा माझ्यांत आहेत असें जो आत्मयज्ञप्रधान मनुष्य जाणतो तो "**स्वेन राजते प्रकाशत इति स्वराट् ब्रह्म तस्य भावः स्वाराज्यं ।**" स्वयंप्रकाश ब्रह्मच होऊन असतो असा याचा अर्थ. अगदीं या विवेचनाशीं जुळणारा असा दक्षस्मृतीचा एक

श्लोक आठवला तो देतों. यामुळें वेदशास्त्रांतून कशी एकवाक्यता असते हें आढळून येईल. सर्वानुमतानेंच हें कसें सिद्ध झालें आहे, तें उमगेल.

**यस्त्वात्मव्यतिरेकेण द्वितीयं नैव पश्यति ।**
**ब्रह्मभूतः स विज्ञेयो दक्षपक्ष उदाहृतः ।।**

—आपल्याहून वेगळें म्हणून जो तिळमात्रहि पाहात नाहीं तोच एक ब्रह्मनिष्ठ होय. असा ब्रह्मनिष्ठाचा परिचय आम्हांला दक्षानें करून दिला आहे.

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः** ।। (भ. गी. ५।८)

—विद्या व विनयानें संपन्न असणाऱ्या ब्राह्मणाला, गाईला, गजाला, श्वानाला आणि श्वपचाला आत्मज्ञानी सदा समदृष्टीनेंच बघतो. आत्मदृष्टीनें बाणणाऱ्या समत्वाची साक्ष हा श्लोक कसा उजळमाथ्यानें पटवीत आहे पाहा.

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्माणि ते स्थिताः ।।**
**नं प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्माणि स्थितः ।।**

—खरोखर समत्व एका आत्मानिष्ठाला अथवा ब्रह्मनिष्ठालाच लाभतें, याला हे दोन श्लोक प्रमाण आहेत. संसार जिंकलेल्याचेंच मन एक सर्वसाम्यांत अवस्थित असतें. सर्वव्यापी सर्वात्मरूप ब्रह्म निर्दोष आहे. त्या स्वमात्र अशा ब्रह्मदृष्टीनें सर्व त्यांना निर्दोषच दिसतें, म्हणजे ब्रह्ममात्र दिसतें असा अर्थ. ब्रह्मवित् ब्रह्मस्वरूपांतच राहातो व त्याला प्रियाप्रिय पदार्थांच्या प्राप्तीनें हर्षशोक होत नाहींत. तो ब्रह्माप्रमाणेंच ब्रह्मनिष्ठ असतो.

**सुहृन्मित्राण्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।**
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते** ।। ( भ. गी. ६।९ )

—आप्तेष्ट, बंधुबांधव, शत्रुमित्र, मध्यस्थ, उदासीन, रागद्वेषी, सज्जन-दुर्जन, पापी–पुण्यवान या सर्वांच्याहि ठिकाणीं सर्वसमबुद्धि ठेवणारा विशेष असतो. आत्मज्ञानाचें त्याचें वैशिष्ट्य असतें. आत्मज्ञानाशिवाय समतावाद जीव धरूनच राहात नाहीं. म्हणून समतावादाचें हें पराकाष्ठेचें स्वरूप गीतेनें उकलून दाखविलें आहे; आर्य संस्कृतीच्या अंतरंगाचा परिचय करून देणारें द्वारोद्घाटन आहे.

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥** (१३।२०)

—नाशिवंत अशा सर्व पदार्थांच्या ठिकाणीं असलेल्या एका अविनाशी परमात्म्याशिवाय इतर कांहींच पाहात नाहीं, तोच एक सर्वसम, तोच एक खरें बघतो. त्याला ज्ञानदृष्टि प्राप्त होते. ज्याला ज्ञानदृष्टि प्राप्त झाली आहे तोच खरा डोळस. बाकीचे कोण हें ओघानेंच समजून येण्यासारखें आहे. त्यांना ही दृष्टीच नसतांना ते सर्वसमत्वानें बघूं शकतीलच कसे ?

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥**

—सर्वांच्या ठिकाणीं एकरूपानें व्यापून राहिलेल्या परमात्म्याला जो सर्वत्र समान पाहातो त्याला आपल्या ठिकाणींहि सर्वत्रहि एक परमात्माच दिसतो; किंबहुना आपलेंच स्वरूप दिसतें. त्याला दुसऱ्याची हिंसा करणें म्हणजे स्वतःचीच हिंसा करण्यासारखें होत असल्यामुळें तो कोणाचीहि हिंसा करीत नाहीं. अशा तऱ्हेची आत्मभूमिका निर्माण झाली, अशा तऱ्हेच्या आत्मभावनेनें उत्पन्न झालेली अहिंसा ज्याच्या ठिकाणीं बाणली आहे तोच एक मुक्त होतो. मुक्त होण्याची इच्छा करणारेहि पण अशा तऱ्हेच्या आत्मीय भावनेनें उत्पन्न झालेली अहिंसा अंगीं बाणवूनच मुक्त होतात.

**इंद्रियाणां निरोधेन रागद्वेषक्षयेण च ।**
**अहिंसया च भूतानाममृतत्वाय कल्पते ॥**

—इंद्रियनिरोधानें, रागद्वेषाच्या क्षयानें व अहिंसेच्या पालनानें अमृतत्वाची म्हणजे मोक्षाची प्राप्ति होते. परवस्तुहरणानें, परहिंसा न करतां सर्वांनाहि सर्व प्रकारांनीं सत्यसुखाच्या दिव्य जीवनाची प्राप्ति होईल असें झटणें, मुख्यतः सर्वांना आत्मज्ञानाची प्राप्ति करून देणें व त्यायोगें समाजांत निर्भय समता निर्माण करणें असा हा आर्य अथवा वैदिक समतावाद आहे हिंसेला रागद्वेष व मुख्यतः स्वदेहसुखाची कल्पनाच कारण होते. जोंपर्यंत विनाशी दृश्य पदार्थांच्या ठिकाणींच, सुखाची भावना असते तोंपर्यंत, पदार्थ-मात्राविषयीं अनिवार्य प्रीति निर्माण होते. "मज नाहीं तुज साजेना" अशी ईर्षा निर्माण होते. परस्व बलात्कारान आपल्यासाठीं हरण करण्याची दुष्टबुद्धि

होते व त्यामुळें परहिंसा घडते. परहिंसेला बाह्यसुखाची भावनाच मुख्य कारण आहे. ती असे तोंपर्यंत रागद्वेषद्वारां हिंसा ही होणारच. निर्विषय मन होईपर्यंत व (या निर्विषय मनाला कारण होणारें) आत्मज्ञान होईपर्यंत अहिंसा अंगीं बाणणार नाहीं. ही अहिंसा बाणेतोंपर्यंत सर्वसमत्व उत्पन्न होणार नाहीं. अशा रीतीनें सर्व ठिकाणीं आत्मदर्शन होऊन सर्वसमत्व दृढ होईपर्यंत, सर्व-समत्ववाद केवळ शाब्दिकच दिसून येईल. क्रियेंत मात्र विषमवाद-अपस्वार्थांनीं पुरेपूर हिंसाच आढळेल. सर्व प्राणिपदार्थांच्या ठिकाणीं निःसीम समता दिसून येऊं लागली कीं, समतेचें तत्त्व ठसलें म्हणून म्हणतां येईल. एरवीं अहिंसारूपी समतावादाच्या मतप्रचाराकरितां हल्लीं दिसून येणारी अमानुष हिंसा व असह्य विषमता हीच भरपूर दिसून येत राहील. अनात्मदृष्टीच सर्व तऱ्हेच्या हिंसेला आणि विषमतेला कारण होते. ती जशी जशी कमी कमी होत जाईल तशी तशी विषमता आणि हिंसाहि कमी कमी होत जाते. संपूर्ण निर्विषय आत्म-स्थितीच खरी अहिंसा व सर्वसमता होय. स्वपरअनुभव व स्वपरविचार यांनीं बाह्य पदार्थांत थोडेंहि सुख नाहीं असा कोणालाहि निश्चय होतो, हें सर्वहि दुःखरूपच आहे याची शाहानिशा होते, सर्वव्यापी परमात्मस्वरूपच एक खरें सुख आहे याचा प्रत्यय येतो व निर्विषय आत्मस्थिति क्रमेण प्राप्त होते.

**नह्यध्रुवैः प्राप्यते हि ध्रुवं तत्** ॥ (कठ. १–२–१०)—अशाश्वतांनीं कधींहि शाश्वताची प्राप्ति होऊं शकत नाहीं. अनित्य पदार्थांच्या साधनानें त्या अनंत सुखसागर परमात्मस्वरूपाची प्राप्ति होणार नाहीं म्हणूनच **परीक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन** ॥ (मुंडक. १-२-१२) —अनित्य कर्मसाधनानें अनित्य लोकांचें क्षणभंगुर विषयसुखच प्राप्त होतें असें जाणून त्या निर्विषय परमात्मस्वरूपाचा शाश्वतानंद इच्छिणाऱ्यांनीं साधनांसह विषयसुखाचा व तशा भोगप्रधान लोकांच्या इच्छेचा त्याग केला पाहिजे. त्यांच्या त्यागाकरितां पराकाष्ठेचा प्रयत्न अहर्निश चालविला पाहिजे. कोण-त्याहि 'कृतक' म्हणजे ऐहिक, पारलौकिक जड पदार्थांनीं 'अकृत' म्हणजे परमात्मरूप नित्यसुख लाभत नाहीं. नित्यसुख पदार्थांच्या अनित्य साधनांनीं व अनित्य पदार्थांनींहि प्राप्त होत नाहीं असें एकदां ठरल्यावर, बाह्य पदार्थांच्या ठिकाणीं रागद्वेष ठेवून विषयसुखाची इच्छा कां बरें धरावी? परहिंसात्मक कर्में कां बरें करावींत? खऱ्या अहिंसेचा व सत्यसमतेचा श्रुतिस्मृतींनीं घालून दिलेला धडा स्वपरहितार्थ कां बरें आत्मसात् करूं नये?

**संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।**
**मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ ( ६।२४ )**
**शनैः शनैरुपरमेद्‌बुध्द्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥**
**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥**
**प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥**
**युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते ॥ २८ ॥**

—मनोवृत्तीपासून अथवा मनाच्या संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या विषयवासना त्यागून कोणत्याहि इंद्रियांच्या व्यापाराला अवकाश न देतां,कसलीहि वृत्ति उठूं न देतां, कसलीहि कल्पना अशी येऊं न देतां, केवल जाणीवच एक शिल्लक ठेवावी. मनोवृत्तीपासून अथवा संकल्पापासून उद्‌भवणाऱ्या वासनांचा मनासकट त्याग करून स्वस्थ व्हावें. दोरीवर भासणाऱ्या सर्पादि कल्पनांचा त्याग करून एक दोरीच शिल्लक उरविल्याप्रमाणें कसल्याहि कल्पनेशिवाय फक्त जाणीवच एक शिल्लक ठेवावी. केवल जाणीवेंत हें कांहींहि नाहीं. म्हणून धैर्यानें सर्व कल्पनांचा, वासनांचा व मनाचा हळुहळु त्याग करीत, मन जाईल तिथे कल्पना त्यागून फक्त जाणीवच उरवीत, निर्विकल्प जाणीवमात्रच शिल्लक राहावें. नित्य असा कांहीं वेळ अभ्यास करीत जावा. अभ्यास वाढल्याप्रमाणें हें सुलभ साध्य होतें. अशी स्थिति ध्यानावस्थेंत बाणूं लागली म्हणजे त्या वेळीं कसली कल्पना, कसली वासना स्फुरेनाशी होऊन स्वतःच मन शांत होतें. मन शांत झाल्यानंतर केवळ जाणीवेच्याच रूपानें असणारें परमशुद्ध व अतिपवित्र असें ब्रह्मसुख आपल्या रूपानेंच प्रगट होऊन त्यांत साधक समरसून जातो. ठराविक वेळीं नित्य आसनावर बसून अभ्यास करीत असतां, झालेल्या या निरवधि आनंदाचें स्मरण मनांत शिल्लक राहातें. जगत्कारण हें असें आहे याची जाणीव उरते. अमार्गीं पाऊल पडत नाहीं. श्रवणमनननिदिध्यासानें असें हें सर्वात्मरूप, केवल एक आनंदरूप आहे ही जाणीव ठसून आडमार्गीं पाऊल पडत नाहीं,

रागद्वेष राहात नाहींत, तात्त्विक विचारानें यथोक्त कर्में व्यवस्थित पार पडतात आणि व्यवहारांत सर्वसमत्व बाणतें.

**यतो यतो निवर्तेत विमुच्येत ततस्ततः ।**
**एष धर्मो नृणां क्षेमः शोकमोहभयापहः ॥**

(भागवत ११-२१-१८)

—विवेकविचारानें ज्या ज्या पासून मनुष्य परावृत्त होतो त्या त्या पदार्थांच्या वासनेपासून तो मुक्त होतो. निर्विषय असें सुखघन परमात्मस्वरूप हळुहळु प्राप्त करूं पाहातो. शोक, मोह, भय यांचा नाश करणारा हा धर्म मानवांना अतिशय क्षेमकर व सुखावह आहे.

**भगवंताचा प्रिय भक्त मुमुक्षु**

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥**
**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥१४॥**

(भ. गी. अ. १२)

—सर्व भूतांच्या ठिकाणीं द्वेषरहित असल्यामुळें जो लोकमित्र सर्व-दयापर, निर्मम, निरहंकार, सुखदुःखसम, सहनशील, क्षमाशील, अल्पसंतोषी, सतत समाधानी असतो, स्वरूपांत विरून जो जितेंद्रिय, दृढनिश्चयी आणि माझ्या (परमात्म्याच्या) ठिकाणीं जो मनबुद्धि ठेवून वागतो, अनन्य भक्तीनें असतो असा योगीच मला प्रिय होय. असें भगवंताचें म्हणणें आहे.

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥१५॥**

—जो लोकांना विटत नाहीं व ज्याला लोक विटत नाहींत असा हर्षशोक, कामक्रोध, उद्वेगचिंता यांनीं रहित असणारा माझा भक्तच मला प्रिय असतो.

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यन्तवन्तः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥** (भ. गी. ५।२२)

—बाह्य पदार्थांच्या संयोगानें इंद्रियांना होणारीं भोगसुखें म्हणजे केवळ दुःखाच्या खाणीच होत. हीं वैषयिक सुखें उत्पत्ति व नाश यांनीं युक्त आहेत. बुद्धिमान अशा विकारी सुखांत कधीं रमत नाहीं. आत्मसुखाची आकांक्षा बाळगणारा मुमुक्षु असल्या, विजेप्रमाणें क्षणभंगुर असणाऱ्या, भ्रामक विषयसुखाच्या ठिकाणीं कधींहि रममाण होऊं नये. तो विरक्त असावा. असला विरक्तच देहाभिमानाच्या मगरमिठींतून मुक्त होतो. दैहिक सुखाची कल्पना ज्याला शिवत नाहीं तोच विवेकी. दैहिक सुखाची कल्पनाच ज्याला नसते तो बुद्धिमान. देह व तत्संबंधीं विषयजालांत ज्याचे 'अहं'कार ' मम 'कार पूर्ण नष्ट झाले आहेत तोच ज्ञानी. आत्मानंदानें जो संतृप्त असतो तोच त्यागी. अखिल विश्वांत याला परिशुद्ध आनंदाचा आत्मभाव असतो. याला सर्व-भूतहिताची दृष्टि असते. आर्य संस्कृतींत विश्वात्मता आहे, आनंदघन परमात्मैक्य आहे, त्या स्वरूपभूत अनंत आनंदाचा आचार, विचार व प्रचार आहे. आर्य संस्कृतींत दुःखाचा मागमूस नाहीं, भेदाचा वारा नाहीं, स्वार्थाचा प्रवेश नाहीं, वैयक्तिक सुखाचा गंध नाहीं. यांत प्राणिमात्राच्या सुखाची इच्छा आहे, प्राणिमात्राच्या उद्धाराचा संकल्प आहे, प्राणिमात्राच्या दुःखनिवृत्तीचें दिव्य जीवन आहे, दुःखसंतप्तांचीं दुःखें घालविण्याचें गोड आचरण आहे.

**न त्वहं कामये राज्यं न स्वर्गं नापुनर्भवम् ।**
**कामये दुःखतप्तानां प्राणिनां आर्तिनाशनम् ।।**

——मी राज्याची अपेक्षा करीत नाहीं; स्वर्गाची इच्छा बाळगीत नाहीं मोक्षाचीहि पण मला अभिलाषा नाहीं. पण हताश अशा त्या दुःखी कष्टी जीवांचे ते दुःखकष्ट नष्ट करावेत हेंच माझें एक इष्ट आहे. त्याकरितां स्वतःला मी वाहून घेतलें आहे. यांतच माझें सारसुख आहे. असे रंतिदेवाचे प्रेममधुर उद्गार आहेत. आर्य संस्कृतीच्या भूतदयेचें व समत्वाचें हें एक उदाहरण आहे. हीं आर्य संस्कृतीचीं अथवा वैदिक संस्कृतीचीं ब्रीदवाक्यें आहेत.

**विश्वाचें दिव्य जीवन**

वेदविहित निष्काम कर्म, एकांतिक भक्ति निर्विषय स्थिति, विश्वात्मभाव, भूतदया, स्वार्थत्याग, जनहितदक्षता, दुःखनिवृत्ति, जगदुद्धार, देहसुखाच्या घाणींतून सोडवून तत्त्वज्ञानाच्या पवित्र तीर्थांचें स्नान घालून, हिंसा नाहींशी करून, रागद्वेष नष्ट करून, समत्वाचे धडे देऊन विशुद्ध आत्मतृप्तीचें

जगन्मंगलकर दिव्य जीवन करण्याचें अखिल मानवजातीच्याच उन्नतीचें या आर्य संस्कृतीचें ध्येय आहे. या आर्य संस्कृतीच्या सात्त्विक समतावादाचें अनुकरण केल्यास कुठेच अशांति राहाणार नाहीं. समाजांतील दुष्कृत्यें आपोआपच थांबतील आणि समतेमध्यें असणारी विषमता पार विरघळून जाईल. अहिंसेंत अनुभवास येणारी हिंसा तिथेच विलीन होईल. नागरिकतेच्या ठिकाणीं दिसून येणारा रानटी वर्तनाचा प्रकार पुन्हां दिसून येणार नाहीं. सभ्यतेच्या पांघरुणाखालचें निंद्य आचरण पुन्हां शिल्लक उरणार नाहीं. दुसऱ्याचा घात करून आपण जगण्याची दुष्ट प्रवृत्ति समूळ नष्ट झालेली दिसेल. ॲटमबॉंबसारख्या शोधाचें निष्प्रयोजकत्व मनास पटेल. भय, दुःख, शोक यांचें वातावरण नाहींसें होऊन दिव्य आनंदाचें शांत वातावरण चोंहोंकडे व्यापून राहील. समतेनें आत्मानंदाचें व निर्भयतेचें, निर्मल साम्राज्य आपल्या निरतिशय पावित्र्यानें चोंहोंकडे पसरेल. भारतानें आपला हा वाडवडिलार्जित अधिकार पुनश्च असा संपादन केल्यास आज दिसून येणारा प्रक्षोभ, उत्पात, अशांति, असमाधान, परस्परद्वेष, कुटिल नीति, राक्षसी महत्त्वाकांक्षा, स्वार्थ, दुष्ट प्रवृत्ति, प्रांत-प्रांतीयता, फूट, लुटालूट, अत्याचार व आपसांतली यादवी हें सर्वहि नाहींसें होऊन सुखशांतीचें दिव्य जीवन देशांत सर्वत्र पसरेल. दैवी संपत्तीच्या आत्मसुखाचें विश्वशांतकर अशा मंगलमय पावित्र्यानें विश्वमौलीभूत एकाधिपत्यहि या राष्ट्राला प्राप्त होईल. ऐहिक सुखापेक्षां खरें निर्भेळ सुख निराळें आहे, या निश्चयाचा उदय झाला कीं, पापाची काळोखी रात्र मावळते. मरणकालीं सर्व सोडून येथून निघून जावें लागतें, या स्मृतीनें अत्याचाराचें बंड थांबतें. किळस उत्पन्न करणाऱ्या देहद्रव्याच्या स्मरणानें व तेंच तेंच पुन्हां पुन्हां अनुभविण्यांत येणाऱ्या निःसार विषयसुखाच्या वैयर्थ्यानें कुटिल नीतीचीं कृष्णकारस्थानें एकदम ओसरून जातात. सर्वत्र असणाऱ्या मंगलमय परमात्म्याच्या आनंदघन अस्तित्वाचा प्रत्यय सर्व विश्वच आनंदमय करून टाकतो. आनंदरूपी परमात्म्याची प्राप्तीच जीवनाचें एकमेव ध्येय ठरलें, परमात्मप्राप्तीच्या साधनांत परस्परांना साहाय्य करीत राहण्याचा जीवनक्रम एकदां आंखला गेला, त्यांत अखंड व्यापृत ( गर्क होऊन ) राहणें हाच मानवी धर्म निश्चित झाला, भरीव अध्यात्मनिष्ठेचें उन्नत जीवन आपल्या पराकाष्ठेच्या उत्कर्षानें प्रकाशूं लागलें, अखिल विश्वांत आत्मतृप्तीच्या मंगल गुढ्या सर्वत्र उभारल्या गेल्या कीं, समता ही आपोआपच प्रस्थापित होते. अनायासेंच सुखशांति नांदते. शांतिमय जीवन

होतें. नीति प्रत्येकाच्या हृदयांत घर करून राहाते. शुद्ध आचारविचार सर्वांगीं बाणतो. सौहार्दाच्या उन्नतीचें साम्राज्य पसरतें. धर्माचा अधिकार चालतो. सर्वहि अनिष्टांचें निवारण होतें व अभिष्टांची प्राप्ति होते; आणि त्याच वेळीं हें जग तृप्त होतें.

## वेदांचा विश्वास उपदेश

वेदांचा कसा उपदेश आहे, वेदांचें कसें शिक्षण आहे, वेदांचें आश्वासन कसें आहे हें या पुढील मंत्रावरून जाणतां येईल.

**सहृदयं सांमनस्यमविद्वेषं कृणोमिवः ।**
**अन्योऽन्यमभिनवतवत्संजातमिवाघ्न्या ॥**

( अथर्व. पैप्पलादशाखा ५–१९; संज्ञानसूक्त )

—परस्परांबद्दल असणारा तुमचा द्वेष व असूया नाहींशी करून मी तुमच्या सर्वांच्या ठिकाणीं सहृदयता, सौमनस्य निर्माण करतों. गाय जशी आपल्या वांसरांवर प्रीति करते, त्याच्या प्रीतीनें ती जशी आकर्षित होते त्याप्रमाणेंच तुम्हीं परस्परांवर प्रीति ठेवली पाहिजे. सर्वांनीं अन्योन्यप्रेमानें आकर्षित झालें पाहिजे.

**अनुव्रतः पितुः पुत्रो मात्रा भवति संयतः ।**
**जायापत्ये मधुमतीं वाचं वदतु शांतिवाम् ॥ २ ॥**

( अ. वे. पि. शा. ५।१९ )

—मुलगा संयमशील असून मातापित्यांची आज्ञा परिपालन करणारा असला पाहिजे. सतीपतींनीं पातिव्रत्य आणि एकपत्नी–व्रत यांचें पालन करून परस्परांशीं प्रेमानें वागावें व मंजुळ शांतिदायक भाषण करावें.

**मा भ्राता भ्रातरं द्विक्षन् मा स्वसारमुत स्वसा ।**
**सम्यञ्चः सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया ॥ ३ ॥**

—बंधुबंधूंच्या ठिकाणीं परस्परांत द्वेष नसावा. बहिणीबहिणींच्या ठिकाणींहि परस्परांत द्वेष नसावा. तुम्हीं सर्वांनीं एकमनानें, एकमतानें राहून एकजुटीनें ब्रह्मचर्यादि सद्व्रतांचें पालन केलें पाहिजे. प्रेमळपणानें वागलें पाहिजे. पावित्र्यानें राहिलें पाहिजे. सर्वांच्या हिताची इच्छा ठेवून सर्वांच्या कल्याणाकरितां गोड मंगलकारक असें सत्य भाषण केलें पाहिजे.

**येन देवा न वियन्ति नो च विद्विषते मिथः ।**
**तत्कृण्मो ब्रह्म वो गृहे संज्ञानं पुरुषेभ्यः ॥ ४ ॥**

——ज्या ब्रह्मज्ञानानें देवता परस्परांशीं अति प्रीतीचा व्यवहार ठेवून वागतात; केव्हांहि परस्परांचा द्वेष करीत नाहींत, भेद ठेवीत नाहींत, त्याप्रमाणें तुम्हीं सर्वांनीं व्हावें. तुमच्यांत एकमत असावें, समत्व बाणावें, आत्मीय भावनेनें तुमचा निर्दुष्ट व्यवहार चालावा, उन्नत नीति व उत्तम आचारविचार राहावा, स्वधर्मोचित कर्में सर्वहि शांतिसमाधानानें चालावींत. म्हणून मी ब्रह्म-स्वरूपाचा तुम्हांला उपदेश करतों व ती दिव्य ब्राह्मीस्थिति मी तुमच्यांतून निर्माण करतों.

**ज्यायस्वन्तश्चित्ति नो मा वियौष्ट । संराधयन्तः सधुराश्चरन्तः ॥**
**अन्योन्यस्मै वल्गु वदन्तो यात । समग्रास्थ सध्रीचीनान् ॥ ५ ॥**
**(अन्यो अन्यस्मै वल्गु वदन्त एत सध्रीचीनान् वः। संयमनस्कृणोमि॥)**

——तत्त्वज्ञान झालें तरी व्यवहारांतला श्रेष्ठ—ज्येष्ठ—कनिष्ठपणा पाळून त्या त्या नियमानुसार वर्ता व इहपर सुखाचें उन्नत लक्ष्य पुढें ठेवून, आपआपला कार्यभाग यथोक्त चालवा. परस्परांना साहाय्यक व्हा. भिन्न भिन्न अभिप्रायाचे होऊं नका. एक होऊन सामाजिक, धार्मिक, राजकीय, तशीं पारमार्थिक कार्यें करा. त्यांत परस्परांशीं अमृतमय भाषणाचें व प्रीतीचें वर्तन ठेवा. प्रगतिपर जीवनांत अग्रेसर व्हा. पारमार्थिक दिव्य जीवन चालवा. परमात्मैक्याच्या दिव्य ज्ञानानें मी तुम्हांला पवित्र मनाचे करीन, संयमी करीन व नित्यतृप्त करीन.

**समानी प्रपा सहवोऽन्नभागः । समाने योक्त्रे सह वो युनज्मि ।**
**सम्यञ्चीऽग्निं सपर्यतारा । नाभिमिवाभृताः ॥ ६ ॥**

——एका कुटुंबांत, समाजांत, एका संस्थेंत, सार्वजनिक कार्यांत देवा-दिकांच्या उत्सवांत, एका पाणपोईंत, एका छत्रांत यथास्थान असें प्रेमानें पाणी प्या व भोजन करा. वाढण्यांत कोणताहि उच्चनीच भेद धरूं नका. सारखें वाढा. एकच अन्न असूं दे. अन्नपाण्याचा वांटा समान व्हावा. एकच एक आत्मप्रेमाच्या पाशानें तुम्हांला मी जखडून सर्वांनाच एकत्र करतों. तुम्हांतून एकवाक्यता निर्माण करतों. आत्मोद्धाराच्या दृष्टीनें; जीवननिर्वाह चालवा. व्यावहारिक कार्यक्षेत्रांत वर्णाश्रम धर्मांनीं वागा. पारमार्थिक क्षेत्रांत एकात्मदृष्टीनें असा. एकात्मनिश्चयानें तुमच्या व्यावहारिक व पारमार्थिक जीवनांचा प्रीतिसंगम

व्हावा. अग्नि इत्यादि देवतांची वेदोक्त उपासना चालवा; परंतु सर्व उपासनेंतहि एकात्मनिश्चयच ठेवा. चक्राच्या अऱ्याप्रमाणें एकाच अंतिम ध्येयांत, एकाच आदर्शांत, एकाच परमेश्वरांत तुम्हीं संलग्न व्हा, सुप्रतिष्ठित व्हा. तुमच्या तुमच्या वर्णाश्रमधर्मांच्या अनुष्ठानानें त्या अद्वितीय परमात्म्याची आराधना चालवा. भेद हा व्यवहारोपयोगी व अभेद हा परमार्थोपयोगी आहे. जीवनांत दोन्हींची सांगड झाली पाहिजे. पिंडब्रह्मांडांत भेद आणि विविधत्व कितीहि असलें तरी एका चैतन्यानेंच त्यांत एकसूत्रीपणा आला आहे हें ध्यानांत धरावें.

**सध्रीचीनान् वः संमनसः कृणोम्येकश्नुष्टीन् संवननेन सहृदः ।**
**देवा इवेदमृतं रक्षमाणाः सायंप्रातः सुसमितिर्वो अस्तु ॥ ७ ॥**

—सर्वांनाहि समानरूप असलेली मोक्षरूप परमगति प्राप्त करून घेणाऱ्या तुम्हांला एकामताचे मी बनवितों, मनोजयी करतों. एका परमात्म्याच्या छत्राखालीं जितके तुम्हीं सर्वहि याल असें करतों. पुढाऱ्यांशीं प्रेमानें वागून सहकारी व्हाल असें करतों. स्वर्गांतील अमृताच्या रक्षणार्थ देव जसे एकमतानें गोळा होतात त्याचप्रमाणें तुम्हीं सर्वहि धर्माचें, राष्ट्राचें, संस्कृतीचें, मानव-आदर्शांचें, रक्षण करण्यास एकमतानें गोळा झालें पाहिजे. अखिल ऐकमत्याच्या स्वपरउन्नत्यर्थ रात्रंदिवस तुमच्या सभा भरत असल्या पाहिजेत व त्यांत शास्त्र-दृष्टि ठेवून, सर्वतोपरि जनहिताचीच दृष्टि बाळगून, निःस्वार्थतेनें व निःपक्ष-पातानें अनेक विषयांवर चर्चा होत असली पाहिजे. चर्चा करणारे सर्वतोपरि उच्च संस्काराचे साक्षात्कारी विद्वान असावेत.

### वेदांची शिकवण

**वेद मनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति** ॥ ( तै. शि. ११–१ )

—वेद शिकवून पूर्ण झाल्यानंतर घरीं पाठविण्याच्या वेळीं आचार्य, गृहस्थाश्रमाचा स्वीकार करण्याची इच्छा असणाऱ्या त्या शिष्याला वात्सल्यानें जवळ बसवून, पुढच्या जीवनाच्या मार्गदर्शनाकरितां असा हा हार्दिक उपदेश करीत, हें यामुळें कळून येतें. या दृष्टीनें याचें महत्त्व फार आहे. वेदाध्ययन केल्यानंतर घरीं परततांना धर्मचर्चा करण्याची ही पद्धति युक्तच होती. स्वाभाविक प्रवृत्तीचेंच हें द्योतक आहे. ब्रह्मचर्याश्रमांत धर्मकर्माचें ज्ञान करून घेऊन, गृहस्थाश्रमांत त्याचें अनुष्ठान होतें.

**सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातंतुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्नप्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यम् । कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् । स्वाध्याय-प्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ॥** ( तै. शि. ११–१ )

—बाळा ! सदा सत्य बोल. ( असेल तसें सांगणेंच सत्य होय. ) धर्माचें, कर्तव्यकर्माचें पालन कर. वर्णाश्रमोचित असा वाग. गुरूंना प्रिय असणारी दाक्षिणा देऊन त्यांची संतुष्टि व आशीर्वाद तूं आतां संपादिला आहेस. आमच्या अनुज्ञेनें घरीं जाऊन कुल, शील परीक्षून, स्ववर्णीय वधूशीं गोत्रादिकांचा विचार करून विवाह कर. सगोत्र विवाह निषिद्ध आहे. संततीस तसाच कांहीं प्रतिबंध असल्यास पुत्रकामेष्टि आदिकांच्या अनुष्ठानानें पुत्रप्राप्ति करून घे. कोणत्याहि प्रकारें संततिविच्छेद होऊं नये. सुपुत्रवान हो. संसारांत गुरफटून सत्याचें विस्मरण होऊं देऊं नये. दोरीवरच्या सर्पभावनेंत दोरीच एक सत्य असल्याप्रमाणें संसारांत परमात्म्याचेंच एक स्वरूप सत्य मानावें. प्रपंचाकडे दुर्लक्ष करूं नको व चुकून सुद्धां प्रपंच सत्य मानूं नकोस व कर्तव्यकर्में विसरूं नकोस. व्यावहारिक व पारमार्थिक यथार्थ भाषण सोडूं नकोस. मोक्षधर्माच्या, वर्णाश्रमधर्माच्या व तशाच इतर लौकिकधर्माच्या अनुष्ठानास चुकूं नकोस. वैयक्तिक, पारमार्थिक आणि सामाजिक धर्माचें उल्लंघन करूं नकोस. कुलधर्म, कुलाचार सोडूं नकोस. त्या त्या व्यक्तींशीं त्या त्या धर्माप्रमाणें वाग. कुटुंबाच्या पोषणाकरितां, देवपितृकार्याच्या अनुष्ठाना-करितां, अतिथींच्या सेवेकरितां, गोरगरिबांच्या साहाय्याकरितां न चुकतां न्यायानें धन संपादन कर. दानधर्म सोडूं नकोस. आत्महितापासून वंचित होऊं नकोस. ऐहिक, पारलौकिक आत्महित साध. ज्यामुळें कल्याण आणि कुशल लाभेल असें तुझें आचरण व अनुष्ठान असावें. ऐश्वर्यमापक सत्कार्यांत औदासिन्य बाळगूं नकोस. प्रापंचिकांना ऐहिक आणि पारलौकिक अशा दोन्ही वैभवांची आवश्यकता असते. वेदाच्या अध्ययन-अध्यापनाच्या कामीं दुर्लक्ष करूं नकोस. सद्ग्रंथांचा अभ्यास सोडूं नकोस.

**देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यान्यस्माकँ सुचरितानि तानि त्वयोपास्यानि । नो इतराणि ।** ( तै. शि. ११–२ )

——यज्ञहोमादि देवकार्यांत व श्राद्धपक्षतर्पणादि पितृकार्यांत कोणताहि प्रमाद होऊं देऊं नकोस. आईच्या ठिकाणीं देवताबुद्धि ठेव. पित्याच्या ठिकाणीं देवताबुद्धि ठेव. आचार्यांच्या ठिकाणीं देवताबुद्धि ठेव. अतिथीच्या ठिकाणीं देवताबुद्धि ठेव. या सर्वांची देवतेप्रमाणें सेवा कर. शास्त्रोक्त कर्में सोडूं नकोस, निषिद्ध कर्में करूं नकोस. अजाणपणानें आमच्या हातून चुकीचें आचरण घडलें असल्यास त्याचें तूं अनुकरण करूं नकोस. आमच्या हातून घडलेल्या सत्कर्मांचेंच मात्र अनुकरण कर. आमच्यांत कांहीं दुर्गुण तुला आढळल्यास ते सोडून तूं सद्‌गुणच तेवढे घे. मोठ्यांचेंहि सदोष आचरण ग्राह्य ठरत नाहीं. त्यांचा निषेधच केला पाहिजे. केवळ कोणत्याहि अकार्याचें व अकर्मआचरणाचें तूं अनुकरण करूं नकोस.

**एकेचास्मच्छ्रेया ँसो ब्राह्मणाः । तेषां त्वयाऽऽसनेन प्रश्वासितव्यम् ।।**

( तै. शि. क्षा. ११—३ )

——केवळ सद्‌गुरूच्या ठिकाणींच तेवढी श्रद्धा ठेवून तत्सम इतरांच्या विषयीं अनादरानें वागूं नये. आम्हांप्रमाणेंच गुरुस्थानीय असणाऱ्या इतर विद्वान अशा सत्पात्र व श्रेष्ठ ब्राह्मणांचा तूं उत्थानानें व आसनपाद्यादिकांनीं सत्कार करीत जा. पादसेवनादिकांनीं त्यांची सेवा करीत जा. त्यांनीं केलेल्या सदुपदेशाचें श्रद्धेनें श्रवण करून तो आचरणांत उतरविण्याचा कसोशीनें प्रयत्न कर. एककल्ली, हेकाड व एकलकोंडा होऊं नकोस. चांगलें तें कोठूनहि घेऊन आंगवळणीं पाडावें. वाईट, मग तें कुठेहि दिसून येवो तें सर्वथैव त्याज्यच मान.

**श्रद्धया देयम् । अश्रद्धया देयम् । श्रिया देयम् । ह्रिया देयम् । भिया देयम् । संविदा देयम् । अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् । ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः । युक्ता आयुक्ताः । अलूक्षा धर्मकामाः स्युः । यथा ते तत्र वर्तेरन् । तथा तत्र वर्तेथाः अथाभ्याख्यातेषु । ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः । युक्ता आयुक्ताः अलूक्षा धर्मकामाः स्युः । यथा ते तेषु वर्तेरन् तथा तेषु वर्तेथाः ।** ( तै. शि. क्षा ११-४ )

अशा या वचनांच्या अनुसंधानानें अथवा महात्म्यांच्या सांगण्याप्रमाणें न केल्यास कदाचित त्यांच्या शापानें संपत्तिहि नष्ट होईल या भीतीनें तरी दान करावें, इत्यादि असा अर्थ " भिया देयम् । " या वचनांतून निघतो. ही सर्व संपत्ति परमात्म्याचीच आहे. मी त्याचा वृथा अभिमान बाळगतों. आपलें धन म्हणून म्हटल्यानें भगवंताच्या धनाचा अपहार केल्यासारखा होतो व

त्यामुळें त्या लक्ष्मीपतीच्या द्रोहास पात्र व्हावें लागतें. अशा तऱ्हेच्या विचारानें तरी दान द्यावें. व्ययशील असणारी संपत्ति कशीहि राहात नाहीं. चांगल्या मार्गांत तिचा व्यय केला नाहीं तर ती पापाची वृत्ति उत्पन्न करून व्यसनादि मार्गांनीं तरी खर्च होणारच, किंवा इरेस पाडूनहि कोर्टकचेरी-दाव्यांतून तरी ती खर्च होतेच. अशामुळें खर्च झाली नाहीं तर वैद्य-डॉक्टराकडे तरी ती जातेच. व्यर्थ अथवा वाईट मार्गानें तिचा विनियोग घडून अरत्रपरत्रहि गमाविण्यापेक्षां तिचा सद्विनियोगांत व्यय करून दोन्ही लोक कां साधू नयेत? श्रेयोभागी कां होऊं नये? या विचारानें तरी दान करावें. मागच्या जन्मीं दान दिल्यामुळें या जन्मीं अशी ही संपत्ति लाभली आहे; या जन्मीं दान दिल्यास पुढच्या जन्मींहि लाभेल, या विचारानें तरी दान द्यावें. काम्य कर्माची व पुनर्जन्माची इच्छा नसल्यास निष्काम दानानें परमात्मकृपा होते, या विचारानें तरी दान द्यावें. श्रीसद्‍गुरुसेवेनें मोक्ष मिळतो, या विचारानें तरी दान द्यावें. हें इतकेंहि पटत नसल्यास देवसद्‍गुरु-कार्यीं खर्च झालेला पैसा दुपटीतिपटीनें व त्यांना वाटल्यास अनंत पटीनेंहि परत आपल्याला मिळतो, या विचारानें तरी दान करावें. शेवटीं दान देणें हा गृहस्थांचा धर्म आहे या जाणीवेनें तरी दान द्यावें. हेंहि पटलें नाहीं तर **दान-मेकं कलौ युगे** ।—कलियुगांत दानालाच प्राशस्त्य दिलें आहे या विचारानें तरी दान द्यावें, इत्यादि असा हा "संविदा देयं।" या वचनावरून बोध होतो. आचार, व्यवहार, शिक्षा, दीक्षा, श्रौतस्मार्त कर्मे, जीवनवृत्ति यासंबंधीं व त्या त्या लोकांशीं अथवा त्या त्या व्यक्तीशीं त्या त्या वेळीं वागण्यासंबंधीं तुला संदेह निर्माण झाल्यास ब्रह्मनिष्ठ, विचारी, वादविवादकुशल, श्रुतिशास्त्रा-नुसार निर्णय देण्यांत दक्ष, सदाचारसंपन्न, दयादानधर्मशील, स्वधर्मनिरत, रागद्वेषरहित, शास्त्र सोडून दुसऱ्याच्या बुद्धीनें न चालणारे, सौम्य स्वभावी, निर्विकारी, सन्मान्य असे ब्राह्मण त्या बाबतींत जें मत देतात, त्या त्या प्रसंगीं जसें आचरतात, त्या त्या व्यक्तीशीं अथवा समाजाशीं त्या त्या वेळीं जसें वागतात तसा तूंहि वाग. ग्राह्याग्राह्य, स्पृश्यास्पृश्यादि विचारांत पूर्वोक्त जबाबदार, विद्वान् आचार्य विचारानें जे परिपाठ घालून देतील त्याप्रमाणें वाग, जें सांग-तील तें ऐक व त्यांच्या शुद्धाचाराचें अनुकरण कर.

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत ।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥**

—दान करावयाचें झाल्यास देश, काल, पात्र पाहून श्रद्धेनें करावें. अश्रद्धेनें तें कधीं करूं नये. अश्रद्धेनें केलेल्या कोणत्याहि कर्माला फळ नाहीं. या गीतेच्या श्लोकाचें वाचकांना इथें स्मरण झाल्याशिवाय राहणार नाहीं. अश्रद्धेनें अर्पण केलेली आहुति, दिलेलें दान, केलेलें तप आणि अनुष्ठिलेलें कोणतेहि कर्म 'असत्' अयोग्य म्हणवून घेऊन, इथल्या तशाच परलोकाच्या सुखाला त्याचा कांहीं उपयोग नाहीं, असें श्रीभगवंताचें दिव्य वाक्य आहे. आपल्या ऐश्वर्यानुरूप दान करावें. देव, गोब्राह्मण, अतिथि यांची सेवा करावी- गोरगरिबांना साह्य करावें. दानादिकांच्या वेळीं पैशाचा मोह आडवा आलाच तर लोक काय म्हणतील, या लोकलाजेनें तरी आपल्या ऐश्वर्याप्रमाणें दान द्यावें. देवानें मला इतकें देऊन देखील मी योग्य दानधर्म केला नाहीं तर देव काय म्हणेल ? रागावून दरिद्री केलें तर ? या भीतीनें अथवा **अदत्त्वा दानाच्च भवेद्दरिद्री** ।—योग्यप्रकारें दान न दिल्यास दरिद्री होतो, या भीतीनें कां होईना दान द्यावें. दान, भोग आणि नाश अशा या तीन गति संपत्तीच्या असतात. जो स्वतःकरितां उपयोग करीत नाहीं व इतरांनाहि देत नाहीं त्याच्या संपत्तीची तिसरी गति होते, म्हणजे नाश होतो. धर्म, अग्नि, नृप व तस्कर असे चार संपत्तीचे अधिकारी असतात. **त्यांपैकीं धर्मच ज्येष्ठ होय.** धर्माकारितां संपत्तीचा विनियोग झाला नाहीं तर बलात्कारानें अग्न व नृप त्या संपत्तीचे विभागी होतात. घर जळून जातें, अथवा दंडादिकांनीं सरकाराकडे जातें. त्यांतूनहि ती जर संपत्ति राहिलीच तर ती चोर, दरोडेखोर लुटून नेतात. या अर्थाचे दोन श्लोक आहेत, ते असे :

**दानं भोगो नाशस्तिस्त्रो गतयो भवन्ति वित्तस्य ।**
**यो न ददाति न भुंक्ते तस्य तृतीया गतिर्भवति ॥**

**चत्वारो वित्तदायादा धर्माग्निनृपतस्कराः ।**
**ज्येष्ठपुत्रावमानेन त्रयः कुप्यन्ति सोदराः ॥**

**एष आदेशः । एष उपदेशः । एषा वेदोपनिषत् । एतदनुशासनम् । एवमुपासितव्यम् । एवमु चैतदुपास्यम् ॥** ( तै. उ. )

—असेंच श्रुतीचें विधान आहे. हाच श्रुतीचा उपदेश आहे. हेंच वेदोपनिषदांचें रहस्य आहे. हीच ईश्वराज्ञा आहे. तेंच आम्हीं तुला कळविलें. थोडक्यांत हा एक जीवनाचा ध्रुवताराच आहे, असें समज.

सनातन वैदिक धर्माची संस्कृति समजून घेण्याकरितां, आचरणांत आणण्याकरितां, त्याप्रमाणें कुटुंब समाजांतून तिचा प्रचार करण्याकरितां, विश्वमान्य असणाऱ्या या आर्य संस्कृतीच्या रक्षणाकरितां आतांपर्यंतचें हें सूत्रात्मक विवेचन बुद्धिमानांना मार्गदर्शक होऊं शकेल.

## वैदिक प्रार्थना

**ॐ इषेत्वोर्जेत्वा वायवस्थोपायवस्थ देवो वः सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मण आप्यायध्वमघ्निया देवभागमूर्जस्वतीः पयस्वतीः प्रजावतीरनमी वा अयक्ष्मा मावस्तेन ईशतमाघशँ सो रुद्रस्य हेतिः परि वो वृणक्तु ध्रुवा अस्मिन्गोपतौ स्यात बव्हीर्यजमानस्य पशून्पाहि ॥**
( य. जु. १-१-१ )

—हे परमेश्वरा, तुझ्या ब्रह्मतत्त्वाकरितां आणि विवेकाकरितां मी तुझी प्रार्थना करतों. विपुल पर्जन्याकरितां आणि विपुल धान्याकरितां मी तुझी प्रार्थना करतों. सुप्रजा आणि अभ्युदय यांकरितां मी तुझी प्रार्थना करतों. स्वत्वाच्या अधिकाराकरितां आणि उत्कृष्ट सदाचाराकरितां मी तुझी प्रार्थना करतों. तूं सर्वगत आहेस. तुला सर्वांच्या हिताची चिंता आहे. सर्वांना उत्पन्न करणारा परमात्मा माझ्याकडून श्रेष्ठ कर्मेंच करवून घेण्यास कारण होवो व सदैव आम्हांला असल्या श्रेष्ठ कर्माच्या ठिकाणींच प्रेरणा करो. देवतांच्या प्रीत्यर्थ अनुष्ठिल्या जाणाऱ्या कर्माकरितां ज्ञानसाधन असणारीं इंद्रियें पाहिजेत, कृषि पाहिजे, दूध इत्यादिकांनीं युक्त अशा जीवनोपयोगी गाई पाहिजेत. मनःशांतीला सदाचार आणि ज्ञानविचार पाहिजे. हीं सर्वहि देवाच्या अंतर्बाह्य सेवेकरितां, अभ्युदय-निःश्रेयस याकरितां कारण होतात. हीं साधनें केव्हांहि कोणत्याहि कारणांनीं नष्ट होऊं नयेत. परमात्म्याच्या कृपेनें आमच्या गाई, स्त्रिया या सर्वहि आरोग्यशील असाव्यात. संततिसंवर्धनाकरितां यांच्या ठिकाणीं विपुल दूध असावें. यांच्यावर चोर, लुटारू व दुष्ट भ्रष्टांचा घाला पडूं नये. हे परपेश्वरा, तुझ्या स्वामित्वाखालीं आमची प्रजा, गाई, स्त्रिया, आमची बुद्धि आदि सर्व सुरक्षित असावें. तुझ्या कृपेनें हें सर्वहि निश्चल व निर्दोष असें असावें. तूं यजमानांचीं इंद्रियें तशीं शरीरें धष्टपुष्ट कर. सर्व लोक, सर्व गाई, सर्व मुलें आणि इतर सर्व पशु यांचें रक्षण कर. त्यांची संख्या अधिक वाढव.

**हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।**
**तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥** ( ई. श. १५; बृ. ५।१५।१ )

—हे ब्रह्मरूपी सूर्या, तुझें तें मंगलमय मुख मोहवश करणाऱ्या अशा कनककांतादि चित्ताकर्षक बाह्य वस्तूंनीं, या नामरूपात्मक अखिल विश्वानें, या सुवर्णपात्रानें, तुझ्या सत्यसच्चिदानंदस्वरूपाचें दर्शन होऊं देऊं नये म्हणून, संपूर्ण झांकलें गेलें आहे. सत्यस्वरूपी तुझ्या सत्यस्वरूपाचा साक्षात्कार व्हावा म्हणून उक्त सत्यधर्माचें अनुष्ठान करणाऱ्या मला तुझ्यावरचें हें चित्तवेधक विश्वाचें आवरण काढून टाक. तुझ्या यथार्थ सच्चिदानंदरूपाचें दर्शन मला होऊं दे.

**पूषन्नेकर्ष यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन्समूह । तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि योऽसावसौ पुरुषः सोहमस्मि ॥** ( ईश. १६; बृ. ५।१५।१ )

—आम्हां सर्वांचें रक्षण व पोषण करणाऱ्या, आम्हां सर्वांच्या स्वरूपानें अद्वितीय असणाऱ्या, आम्हां सर्वांचें नियमन करणाऱ्या, आम्हां सर्वांनाहि अंतीं आपल्यांत विलीन करून घेणाऱ्या व आपल्या अगाध आश्चर्यकारक मायेनें ही सकल संसारसृष्टि निर्माण करणाऱ्या, हे सर्वात्मरूपा, या सर्व प्रजेच्या स्वामित्वाचा अधिकार बाळगून असणाऱ्या हे परमेश्वरा, तुझें हें विचित्र विश्वाचें हें दृश्य दर्शविणाऱ्या संतापजनक वासनाकिरणांचें जाळें एका बाजूला सार; म्हणजे तुझें तें अनंत मंगलकारक, अत्यंत सुखमय चित्स्वरूप मी पाहीन, त्याचा साक्षात्कार मला होईल. तुझ्या त्या आनंदरूपांतच मी समरसून जाईन. जें या सूर्यबिंबांत आहे तें सच्चिदानंदस्वरूपच मी.

**अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् ।**
**युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नम उक्तिं विधेम ॥** (ईश.)

—हे अग्ने, आध्यात्मिक, आधिदैविक व आदिभौतिक अशा सर्वोत्कृष्ट वैभवाच्या अनुभवाकरितां आम्हांला सर्व प्रकारच्या सन्मार्गानेंच तूं घेऊन जा. सर्व प्रकारचे सन्मार्ग, कर्म, उपासना, ज्ञानादि साधनें हें सर्वहि तूं जाणतोस. आमचा सर्वस्वीं नाश करणारीं विषयवासनेचीं सर्व पातकें तूं नष्ट कर. या पापतापांची निवृत्ति झाल्यानंतरच सारस्वरूपभूत असें तुझें तें सच्चिदानंद ब्रह्मरूप प्राप्त करून घेण्यास आम्ही पात्र होऊं. तुझ्या अनंत

स्वरूपाची यथार्थ उपासना चालविण्यास असमर्थ असणारे आम्हीं ती काय करूं शकूं ! आम्ही सर्वतोपरि तुला शरण येऊन एक मोठा नमस्कार घालतों. केवळ या नमस्कारानेंच आम्हीं तुला सर्व उपचार अर्पण करतों; तुझी सेवा पूर्ण करतों. या शरणागतीनेंच तूं प्रसन्न हो. अनंतरूपी, अपार महिमाशाली, स्वतःपूर्ण, आनंदघनरूपी असणाऱ्या तुझी या एका नमनाखेरीज दुसरी कोणती सेवा करणें आम्हांस शक्य आहे ?

**त्वमग्ने यज्ञानां होता । विश्वेषां हितः । देवेभिर्मानुषे जने ॥**

(साम. १।१।१।२)

—हें अग्नि, तूं आमचे सर्व प्रकारचे यज्ञ पूर्ण करणारा आहेस व त्याचप्रमाणें तूं इंद्रादि देवतांकडून पर्जन्य व धनधान्य इत्यादिकांची समृद्धि करून तूं आमचें व अखिल विश्वाचेंच हित साधणारा आहेस. आत्मज्ञान देऊन तूं स्वतः सर्वांचाच उद्धार करणारा आहेस.

**भद्रं कर्णेभिः श्रुणुयाम देवाः । भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः । स्थिरैरंगैस्तुष्टु वा ँ सस्तनूभिः । व्यशेम देवहितं यदायुः । स्वस्ति न इंद्रो वृद्धश्रवाः । स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः । स्वस्तिनस्ताक्ष्यों अरिष्टनेमिः । स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥** (यजु. आरण्य. १-१-१)

—हे देवदेवतांनो, आम्हीं तुम्हां सर्वांच्या कृपेनें आमच्या कानांनीं सदाच पवित्र, शांतिप्रद आणि अचल सुख देणारे असे कर्णमधुर मंगल शब्द ऐकावेत. यज्ञ करणाऱ्यावर आपली कृपा करून त्यांना या संसारसमुद्रांतून तारणाऱ्या देवतांनो, आमच्या डोळ्यांनीं आम्हीं नेहमीं मंगलकारक शुद्ध सात्त्विक दृश्यच पाहावें—तें दिव्य परमात्मरूपच न्याहाळावें. तुमच्या कृपेनें आम्हीं अकुंठित इंद्रियशक्तीनें व संपूर्ण आरोग्यानें सुसंपन्न होऊन, त्या तसल्या दृढ कायेनें देवाचें हित साधावें, देवाच्या सेवेंत आयुष्य घालवावें, तुमच्या स्तुतिस्तवनांत मन गोवावें. तुमच्या हिताच्या जीवनाची प्राप्ति आम्हांस व्हावी. इंद्र वृष्टयादिकांनीं आमचें क्षेम करो. सूर्य जीवनदानानें आमचें क्षेम करो. गरुड सर्व विषारी प्राण्यांपासून आमचें क्षेम करो. बृहस्पति आम्हांला संतति, संपत्ति (देवो) व आत्मज्ञानानें आमचें क्षेम करो.

**सह नाववतु । सह नौभुनक्तु । सह वीर्यं करवावहि ।**
**तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥** (तै.)

—आम्हां गुरुशिष्यांचें परमेश्वर रक्षण करो, अन्नपानादिकांनीं आम्हां उभयतांचें पोषण करो. उभयतांनीं मिळून मोठ्या मोठ्या पराक्रमाचीं प्रभावी महत्कार्यें अनेक करावींत. ब्रह्मवर्चस्वानें युक्त असणारें आमचें सर्व अध्ययन केव्हांहि मलीन न होतां प्रगट तेजस्वी राहावें. आम्हां गुरुशिष्यांत कोणत्याहि दृष्टीनें वैमनस्य व मनस्ताप कधींहि उत्पन्न होऊं नये.

**सह नौ यशः । सह नौ ब्रह्मवर्चसम् ।** ( तै. शांति )

—आमचीं सर्व कार्यें परिशुद्ध असावींत. कोणत्याहि कार्यांत आम्हां गुरुशिष्यांना एकदमच यश प्राप्त व्हावें. अखिल कर्तव्यपूर्तीनें आम्हांत एकदमच ब्रह्मवर्चस्व उत्पन्न व्हावें.

**आप्यायन्तु ममांगानि । वाक् प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च सर्वाणि सर्वं ब्रह्मोपनिषद्म् । माहं ब्रह्म निराकुर्याम् मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणमस्त्वनिराकरणं मे अस्तु । तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥** ( छां. शान्ति )

—माझें शरीरबल, माझें मनोबल, माझे करचरणादि समस्त अवयव, वाक्, चक्षु, श्रवणादि सारीं इंद्रियें, पंचप्राण त्या ब्रह्मतत्त्वांतच बुडून राहावेत. माझें सारेंच जीवन परिशुद्ध तत्त्वमय व्हावें. ब्रह्मप्राप्तीचें साधन हातून घडण्याकरितां व त्या ब्रह्मतत्त्वाचा साक्षात्कार होण्याकारितां, आवश्यक असें सर्व सामर्थ्य माझ्या मनइंद्रियांना प्राप्त होवो. सर्व उपनिषदांत ज्याचें प्रतिपादन केलें आहे तें ब्रह्मच हें सर्व आहे असा माझा सदैव निश्चय असो. मी त्या ब्रह्मस्वरूपाचें निराकरण करूं नये व त्या स्वरूपानेंहि माझें निराकरण करूं नये. अशा या अनिराकरणाचें भाग्य मला लाभो. अशा या अनिराकरणाचा लाभ मला होवो. त्या ब्रह्मात्मैक्याच्या अभ्यासांत मी नित्य असतां उपनिषदांत वर्णिलेलीं सारीं ब्रह्मलक्षणें माझ्यांत उमटावींत. **सर्वं खल्विदं ब्रह्म ।** ( छां. १३ । १ ) **अहं ब्रह्मास्मि ।** ( बृ. ४. ४ ) श्रुति, हें सर्वहि ब्रह्मच म्हणून सांगत असतां मी सुद्धां ब्रह्मच आहें हें ओघानेंच सिद्ध होतें. श्रुतिहि पण तसेंच सांगते. मी ब्रह्म असा कसा असेन म्हणून नसत्या उपाधीच्या अध्यासानें, नुसता संशय ठेवून माझ्याकडून केव्हांहि ब्रह्मस्वरूपाचें निराकरण न होवो. ब्रह्मसाक्षात्कार होण्यापूर्वींच संशय निर्माण होत असल्यामुळें तोंपर्यंत आपला साक्षात्कार होण्यास अपात्र स्थितींत मला ठेवणें म्हणजेच माझें

निराकरण करणें होय. तें ब्रह्म माझें असें निराकरण न करो. तें ब्रह्म मला ब्रह्म-साक्षात्कारास अयोग्य म्हणून कधींहि न मानो. तें ब्रह्म आपल्या साक्षात्काराच्या योगानें शक्य तितक्या लौकर मला पावन करो. त्याचें मला विस्मरण होऊं नये कीं माझें त्याला विस्मरण होऊं नये.

**भद्रं नो अपि वातय मनः** – ( अथर्व. शांति ) आमच्या धारावाही मनाला विषयाकडून सोडवून सच्चिदानंदस्वरूपाकडे प्रवाहित कर, अशी वेदांत प्रार्थना आहे. आतांपर्यंत दिलेल्या कांहीं वेदवचनांवरून वेदाचें हृदय प्रगट होईल, आर्यांच्या मनोभूमिकेचें दिग्दर्शन होईल, आर्य संस्कृतीचें लक्षण समजून येईल. यांतून होणाऱ्या ओझरत्या दर्शनानेंहि आर्य संस्कृतीचें महत्त्व मनांत बिंबेल आणि तिचा मनाला वेध लागेल. आदरणीय अनुकरणीय अशा या आर्य संस्कृतचें श्रेष्ठत्व लक्षांत घेऊनच भारतीयांनीं वागलें पाहिजे. प्रथम भारतवासियांच्या हृदयांत हा दिव्य संस्कृतीचा वृक्ष रूढमूल झाला पाहिजे, त्यानंतर तो चोहोंकडे फोफावला पाहिजे. ‘ अतिपरिचयादवज्ञा ’ असें कांहीं झालें नाहींना म्हणून भारतीयांनीं आपल्या मनाची परीक्षा करावी. राज्यसूत्रें चालविणाऱ्यांनीं स्वपरहिताकरितां या विश्वमौलीभूत आर्य संस्कृतीच्या बाबतींत विशेष लक्ष पुरवून वागलें पाहिजे.

## लोकनायकांची जबाबदारी

**यद्यदाचरति श्रेष्ठः तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥** ( भ. गी. ३।२१ )

—राज्यसूत्रें धारण करून अधिकारपदावर असणाऱ्यांनीं व सर्व प्रकारांनीं समाजाच्या इहपर हिताहितास कारणीभूत होणाऱ्या प्रमुख व्यक्तींनीं आपलें अनुकरण करणारा समाजहि आपल्याप्रमाणेंच उन्नत अथवा अवनत होतो व आपल्या विचाराचा बनतो हें चांगलें लक्षांत ठेवलें पाहिजे.

**राज्ञि धर्मिणि धर्मिष्ठाः पापे पापाः समे समाः ।**
**राजानमनुवर्तन्ते यथा राजा तथा प्रजा ॥** ( महाभारत )

—‘ यथा राजा तथा प्रजा ’ या वचनाचा म्हणीप्रमाणेंच उपयोग होतो. सर्वांनाहि ही म्हण तोंडपाठ आहे. राजा अथवा मंत्री धार्मिक असतील तर त्या राज्यांतील प्रजाहि धार्मिक होते; व तेच ते पापाचरणाचे असतील तर त्या राज्यांतली प्रजाहि तशीच पापाचरणी होते. पुढाऱ्यांनीं वर्णसंकराला पुष्टि

दिली, अथवा तसा धडा घालून दिला म्हणजे प्रजाहि त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून चालूं लागते व वर्णसंकर करते. राजा बोले दळ हाले, नेत्याप्रमाणेंच अनुयायी, जसें घर तसे वासे, बाप तसा बेटा, कुंभार तसा लोटा, घराची कळा अंगण दाखविते, गुरु तसा चेला या सर्व म्हणी ध्यानांत घेण्यासारख्या आहेत. **गतानुगतिको लोकः ।** या न्यायानें प्रजा ही केव्हांहि राजा, मंत्री, महंत, पुढारी यांचें अनुकरण करते, हें स्वाभाविक आहे. आपलें आचरणच समाजाला अनुकरणीय होऊन, आपले विचारच त्यास प्रमाणभूत होतात, हें तत्त्व न विसरतां कोणत्याहि तऱ्हेनें आपल्या आचारविचारांनीं समाजाच्या इहपर उन्नतीस कोणताहि अपाय न होईल असा खोल विचार करून, दीर्घदृष्टीनें व वेदशास्त्रांच्या योग्य पर्यालोचनानें, राजानें अथवा मंत्र्यांनीं राज्यकारभार चालविला पाहिजे व तदनुषंगानें शासन–नियम आंखले पाहिजेत.

**आधिव्याधिपरीताय अद्य श्वो वा विनाशिने ।**
**को हि राजा शरीराय धर्मापेतं समाचरेत्** ॥ ( अ. पु. २३।२१ )

आधिव्याधींनीं ग्रस्त आणि त्रस्त झालेल्या, आज ना उद्यां नष्ट होणाऱ्या या शरीराच्या सुखाकरितां कोणता राजा, मंत्री, महंत किंवा पुढारी धर्मविरुद्ध आचरण करील ? असा या श्लोकाचा भावार्थ आहे. राजा आदि प्रमुख व्यक्तींनींच तेवढा याचा विचार करावा आणि इतरांनीं सोडून द्यावा असें नाहीं. प्रत्येकानेंच याचा विचार करण्यासारखा आहे.

**आर्यद्वामी य चक्षसा मित्रवयंच सूरयः ।**
**व्यचिष्ठे बहुपाय्ये यतेमहि स्वराज्ये** ॥ ( ऋ. ५–५६–६ )

——हे व्यापक दृष्टीच्या व परस्परांशीं मित्रभावानें वागणाऱ्या पुढाऱ्यांनो, आम्ही सर्वेहि विद्वान् मिळून स्वराज्यांतील सर्व प्रजेच्या अभ्युदय-निःश्रेयसाकरितां तुमच्यासह उपाययोजना करतों व स्वराज्याच्या भरभराटीकरितां परोपरीनें झटतों अशा अर्थाचा यांतून बोध होतो. पुढाऱ्यांच्या संबोधनांत आलेलीं विशेषणें पुढाऱ्यांचीं लक्षणें दाखवितात. इंजिन रुळावरून चाललें म्हणजे डबेहि त्याच्या पाठीमागून व्यवस्थितपणें जातात व सुरक्षित असतात. इंजिन रुळावरून बाहेर गेलें कीं, त्यावरोबर सर्व डबे ढांसळतात. मंत्र्यांनीं, नेत्यांनीं, पुढाऱ्यांनीं हें उदाहरण नीट लक्षांत ठेवावें. त्यांच्यावर इंजिनाची व इंजिन चालविणाऱ्यांची अशा दोन्ही जबाबदाऱ्या आहेत. सत्तेपुढें शहाणपण चालत

नाहीं म्हणून म्हणतात. त्याप्रमाणेंच अधिकाऱ्यापुढें विद्वानांचें कांहीं चालत नाहीं. विद्वान् व अधिकारी हे कृष्णअर्जुनाप्रमाणें मिळत जुळत असले तर तेथें भाग्य आहे, नीति आहे, कीर्ति आहे आणि विजयहि आहे. हा या मंत्रांतला गर्भितार्थ आहे. अखिल मानवजातीच्या ऐहिक आणि पारलौकिक अशा श्रेष्ठ उन्नतीकरितां अभ्युदय-निःश्रेयसाकरितां सर्वतोपरि अनुकूल अशा आचार-विचारांनीं युक्त अशी वैदिक संस्कृति आहे, हें विश्वांतल्या विवेकी पंडितांनीं नुसतें मानलें, इतकेंच नव्हे तर न राहवतां मुक्त कंठांनीं तें सभेंत बोलूनहि दाखविलें. त्याचा खोल अभ्यास केला व अभ्यासानंतरची अचल समाधानाची व नितांत शांतीची बाणलेली दिव्य स्थितीहि उघड व्यक्त केली व विश्वकल्याणा-करितां त्याचा लिखाण-प्रवचनद्वारां भरपूर प्रचारहि केला. ते ते धर्मग्रंथच त्या त्या संस्कृतीला कारण होतात. त्या धर्मग्रंथाचे विचार पुढें ठेवूनच त्या संस्कृ-तीच्या दृढीकरणार्थ प्रयत्न केला पाहिजे. विश्वमान्य अशा आर्य संस्कृतीला विश्ववंद्य अशीं वेदशास्त्रेंच प्रमाणग्रंथ होत, हें आपल्याला माहीत आहेच. समाजाला या शिक्षणाचेंच बाळकडू पाजविलें पाहिजे. सरकारी कायदेहि त्याला अनुकूलच असावयाला पाहिजेत. पोषणानें व प्रचारानेंच कोणतीहि संस्कृति दृढमूल होते. ज्याच्या प्रचाराचे आम्ही आटोकाटीचे प्रयत्न करतों त्यावरचें प्रेम त्या प्रयत्नानें व्यक्त होतें. उत्कट प्रेमाची अभिव्यक्ति त्याच्या उत्कट आचार-प्रचारांतूनच होते.

**श्रुतिस्मृत्युदितं सम्यङ् निबद्धं स्वेषु कर्मसु ।**
**धर्ममूलं निषेवेत सदाचारमतन्द्रितः ॥** ( मनु. ४।१५५ )

—श्रुतिस्मृतींनीं सांगितलेल्या आपआपल्या कुलजातींतील धर्माला मूल असणाऱ्या सदाचाराचें निरलसपणें अनुष्ठान केलें पाहिजे, असें मनूचें सांगणें आहे. आर्य संस्कृतींत अथवा वैदिक संस्कृतींत सदाचाराला फार महत्त्व आहे.

**आचाराल्लभते ह्यायुराचारादीप्सिताः प्रजाः ।**
**आचाराद्धनमक्षय्यमाचारो हन्त्यलक्षणम् ॥ १५६ ॥**

—सदाचरणानें पूर्णायु होतो, अभीप्सित सत्प्रजा उत्पन्न होते, यथेच्छ धन मिळतें; आणि अवलक्षण नष्ट होतें.

**दुराचारो हि पुरुषो लोके भवति निंदितः ।**
**दुःखभागी च सततं व्याधितोऽल्पायुरेव च ॥ १५७ ॥**

—दुराचारी पुरुष लोकनिंदित, दुःखी, रोगी व अल्पायुषी होतो.

**सर्वलक्षणहीनोऽपि यः सदाचारवान्नरः ।**
**श्रद्दधानोऽनसूयश्च शतं वर्षाणि जीवति ॥ १५८ ॥**

––दिसावयाला अवलक्षणीहि जरी असला तरीहि जर तो श्रद्धाळू, परदोषदृष्टिशून्य, सदाचारी असेल तर तो त्यानेंच शंभर वर्षें जगतो.

**आचार्यं च प्रवक्तारं पितरं मातरं गुरुम् ।**
**न हिंस्याद्ब्राह्मणान्गाश्च सर्वांश्चैव तपस्विनः ॥ १६२ ॥**
**नास्तिक्यं वेदनिंदां च देवतानां च कुत्सनम् ।**
**द्वेषं दंभं च मानं च क्रोधं तैक्ष्ण्यं च वर्जयेत् ॥ १६३ ॥**

—वेदाध्यापक, वेदार्थ-व्याख्याता, मोक्षगुरु, आईवडील, ब्राह्मण, गाय, तपस्वी यांना प्रातिकूल होईल असें आचरूं नये. देव, धर्म, गुरु, स्वर्गनरकादि लोक इत्यादिकांचें निराकरण, गुरु, वेद व देव यांची निंदा, द्वेष, दंभ, ताठा, उद्धटपणा, फाजील अहंकार, अकारण अधिक क्रोध आणि कठोर वृत्ति यांचा त्याग करावा.

**सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम् ।**
**एतद्विद्यासमासेन लक्षणं सुखदुःखयोः ॥ १६० ॥**

—आत्मव्यतिरिक्त पदार्थापासून लाभणारें जें सर्व विषयसुख तें दुःख व आत्माधीन असणारें जें निर्विषय सुख तें सुख अशी थोडक्यांत सुखदुःखाची व्याख्या आहे.

## श्रुतीच्या उपदेशाचें तात्पर्य

**यस्मिन् द्यौः पृथिवी चान्तरिक्षमोतं मनः सह प्राणैश्च सर्वैः । तमेवैकं जानथ आत्मानमन्या वाचो विमुंचथामृतस्यैष सेतुः ॥** ( मुंडक. २।२।५ )—ज्यांत स्वर्ग, पृथ्वी व अंतरिक्ष, सकल सृष्टि व सर्व इतर साधनांसह, प्राणासहित मनहि एकत्रित झालीं आहेत तें तुमचें सर्वव्यापक, सर्वाधार, अनंत, स्वतःसिद्ध, अद्वितीय आनंदघन ब्रह्मस्वरूप जाणा. बाकीच्या सर्व गोष्टी सोडा; बाळगल्या तरी त्याला महत्त्व देऊं नका. त्यांतहि शास्त्रीयता शोधा. आत्मविवेकच केवळ संसारसमुद्र ओलांडून जाण्यास एक सेतु होय. एकात्मविज्ञानानें निर्भेळ आनंदाची प्राप्ति होते. हेंच श्रुतीच्या उपदेशाचें तात्पर्य होय.

**कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति ॥** (मुंडक. ३।१।३)

—ज्या एकाच्या ज्ञानानें एकदम सर्वांचेंहि ज्ञान होतें तें असें काय आहे या जिज्ञासात्मक प्रश्नाचें वेदोपनिषदें समाधान करतात.

**आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेय्यात्मनि खल्वरे दृष्टे श्रुते मते विज्ञात इदँ्सर्वं विदितम् ॥** ( बृ. उ. ५-५-६ )

**आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेय्यात्मनो वा अरे दर्शनेन श्रवणेन मत्या विज्ञानेनेदँ् सर्वं विदितम् ॥** ( बृ. २।४।५ ) —स्वाभाविकपणें आत्मस्वरूपच सर्वत्र पाहावें. तें तसें समजून नच आलें तर गुरुमुखानें समजून घ्यावें. गुरुमुखानें ऐकूनहि एकदम निश्चय झाला नाहीं तर गुरूपदिष्ट युक्तिप्रयुक्तीनें व श्रुतिवाक्यांनीं त्याचें सतत मनन करावें; मननानें निश्चय झाला तरी वृत्ति तदाकार राहात नसेल तर त्याचें अखंड अनुसंधान ठेवावें. त्याचा निदिध्यास धरावा. एकात्मदर्शन, श्रवण, मनन, निदिध्यासन यांच्या द्वारां होणाऱ्या आवरणविक्षेपरहित पूर्ण निश्चयानें आत्मसाक्षात्कार होतो. विज्ञान म्हणजे आत्मस्थिति. आत्मस्थिति बाणल्यानंतर आत्मतत्त्वच एक तेवत राहातें. दोरीवर भासलेली सर्पाची कल्पना तिच्या ज्ञानानें संपूर्ण नष्ट झाल्यानंतर सर्प म्हणून भासणारी एक दोरीच होती म्हणून जसें ज्ञान होतें त्याप्रमाणेंच आत्मरूपावर भासलेली जगाची कल्पना आत्मरूपाच्या ज्ञानानें संपूर्ण नष्ट झाल्यावर जग म्हणून भासणारें हें एक अद्वितीय आत्मरूपच होतें म्हणून ज्ञान होतें. एका आत्मज्ञानानें सर्वांचेंच एकदम ज्ञान होतें याचा अर्थ हा. प्रत्येकांत ‘ मी ’ ही जाणीव आहे. ही आत्मभावना असल्यामुळें आपलें अस्तित्वच यामुळें भासमान होतें. मी या आपल्या अस्तिभातिप्रिय अशा आत्मीय भानांत हें जगद्भान होतें म्हणून जग सर्व तद्रूपच आहे. हें सर्व चराचर विश्व, मीपणाच्या ( आपल्या ) जाणीवेंत पाहिलेलें सर्वहि एक मीपणाची जाणीवच असते. मीपणाच्या ( आपल्या ) जाणीवेंत आपणच एक अद्वितीय असतों. एवंच आपणच एक आपल्या अस्तित्वानें, ज्ञानरूपानें, आनंदमात्रतेनें आहोंत. जग म्हणून पूर्वींहि कांहीं नव्हतें, आतांहि कांहीं नाहीं व पुढेंहि कांहीं असणें शक्य नाहीं असें उमगतें. अशा रीतीनें एकात्मज्ञानानें, सर्वांच्या सत्यरूपानें स्वरूपच एक आहे. आरशांत प्रतिबिंबलेले पदार्थ आरशापुढून काढून टाकले असतां जसा एकच एक स्वच्छ आरसा राहातो त्याप्रमाणेंच अनेकत्वाच्या संकल्पामुळें दिसून येणारें हें सर्व विश्व, संकल्पासह काढून टाकलें, कीं एकच एक ‘ मी ’ पणाची स्वच्छ जाणीव आपल्या सच्चिदानंदरूपानें शिल्लक

राहाते. अनेक घट रिकामे केले असतां त्यांतील सर्व समुद्राचें पाणी आपल्या मूळ रूपांत समरसून एक समुद्रच झाल्याप्रमाणें सर्व देह रिकामे केले असतां त्यांतील आत्मीय ' मी ' पणाची जाणीव आपल्या मूळ रूपांत समरसून एकात्मरूपच शिल्लक राहातें. अद्वितीय आत्मरूप सर्वहि आपल्यांत आपणच एक असल्यामुळें, वस्तुस्थितीचें ज्ञान झाल्यानंतर दुसरें म्हणून कांहीं शिल्लकच राहात नाहीं. स्वतःच्या ठिकाणीं स्फुरलेल्या मीपणाच्या या संवित्द्वारां '**एकोऽहं बहु स्याम्**'।—'बहु व्हावें' असा संकल्प करून केवळ आपल्या संकल्पानेंच त्या अद्वितीय परमात्म्यानें हें बहुत्व धारण केलें. ईशसंकल्पाची ही सृष्टि वस्तुतः संविद्रूप अशा 'मी' या आत्मीय भानाचें अद्वितीय ज्ञानरूपच आहे. या दृष्टीनें मोक्षाकरितां विश्वांत वस्तुतः असणारें ' मी ' या आत्मीयतेचें असें हें ज्ञानमात्र एकत्व निवडून घ्यावें लागतें.

**यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वाऽस्मिँल्लोके जुहोति यजते तपस्तप्यते बहूनि वर्षसहस्राण्यन्तवदेवास्य तद्भवति यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वास्माल्लोकात्प्रैति स कृपणोऽथ य एतदक्षरं गार्गि विदित्वास्माल्लोकात्प्रैति स ब्राह्मणः॥** (बृ. ३।८।१०)—या अविकारी व अविनाशी आत्मतत्त्वाला न जाणून या लोकीं किती होमहवन आणि यज्ञयाग जरी केले, अनेक सहस्र वर्षें जरी तप केलें, असेंच अन्य कितीहि कांहीं केलें तरी त्यापासून कधीं शाश्वत सुख असें लाभत नाहीं. झाली तरी ती अशाश्वत सुखाचीच प्राप्ति त्यापासून होते. जो या अविनाशी आत्मतत्त्वाला न जाणून देहत्याग करतो तो क्षुद्र व दीन होतो; केलेल्या कर्माचेंच तेवढें वीट आणणारें अल्प क्षणभंगुर सुख अनुभवितो. धन असून न अनुभविल्याप्रमाणें आत्मसाधन करणें शक्य असून देखील त्या अविनाशी सुखसाधनांनीं आत्मसुख अनुभवीत नाहीं, यामुळें आत्मज्ञान—विधुर मनुष्याला इथे कृपण म्हणून म्हटलें आहे. जो अविनाशी आत्मतत्त्व जाणून देहत्याग करतो तोच खरा ब्राह्मण. जो आत्मतत्त्व जाणून देहत्याग करीत नाहीं तो जातीनें ब्राह्मण असून देखील खरें ब्राह्मणत्व त्याला येत नाहीं. देह असतांच ब्राह्मणानें तें आत्मतत्त्व ओळखून दुसऱ्याला त्याचा उपदेश करावा. त्याच्या उपदेशानें **स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्।** या आधारानुसार स्त्रिया, वैश्य, शूद्रदेखील ब्राह्मण म्हणजे ब्रह्मसाक्षात्कारी होतात व देहान्तीं ब्रह्मरूपाशीं ऐक्यता संपादून पुन्हां जन्मास न येतां संसारांतून कायमचीं **मुक्त** होतात.

## ज्ञान्यांचा व्यवहार

**अबाधकं साधकं च द्वैतमीश्वरनिर्मितम् ।**

**अपनेतुमशक्यं चेत्यास्तां तद्द्विष्यते कुतः** ।। ( पंचदशी द्वै. ४२ )

—ईश्वरनिर्मित द्वैत आणि बहुत्व हें अबाधक आहे. आत्मतत्त्व जाणण्याकरितां कांहीं अंशीं तें साधकच आहे, तर ईशसृष्टीचें निवारण अशक्य झाल्यास तें असल्यानें बाधक काय ? खुशाल असो. ब्रह्मज्ञानानंतर **ब्रह्मविश्वमिदं जगत् । ब्रह्मैवेदं सर्वम् आत्मैवेदं सर्वम्** । हें समग्र विश्व ब्रह्मरूपच आहे. हें सर्व ब्रह्मरूपच आहे, आत्मरूपच आहे, असाच त्यावेळीं अनुभव येतो. **अहमेवेदं सर्वम्** । मीच हा, हें सर्व आहे असें अनुभवाला येतें. " हें विश्वचि माझें घर । ऐसी मति जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ।।" ( श्रीज्ञानेश्वर )—भेद घालविण्याचा व समत्व बाणविण्याचा असा हा मार्ग आहे. याला आत्मज्ञान हें साधन आहे. त्या आत्मज्ञानाची प्राप्ति समाजास झाल्यास आपोआपच भेद जातो, एकत्व बाणतें व समत्व येतें. " तेथें उच्च नीच नाहीं परी । राया रंका एकचि सरी । झाला पुरुष अथवा नारी । एकचि पद ।।"( श्रीसमर्थ : दासबोध ) इथे मजूरशाहीहि पण उरत नाहीं आणि भांडवलशाहीहि पण राहात नाहीं स्त्रियांच्या स्वातंत्र्याचा झगडाहि पण मिटतो. स्त्रीपुरुष हा विचारच मुळीं इथे स्फुरत नाहीं. " ब्राह्मणाचें ब्रह्म तें सोंवळें । शूद्राचें ब्रह्म तें ओंवळें । ऐसें वेगळें आगळें । तेथें असेचिना ।। " या आत्मज्ञानानें केवळ " सकळांचें मिळोनी ब्रह्म एक" हा अनुभव येऊन जातीजातींतलें वैषम्य राहात नाहीं. **सर्व एते यत्र एकीभवन्ति** । हे सर्वच जिथे एकरूप होतात तिथे जातीचा प्रश्न कसा उरेल ? आत्म अथवा ब्रह्म-स्वरूपाच्या परिज्ञानानें मात्र तिथे जातीचा प्रश्न आपोआपच मावळतो, जातीयतेचा अंत होतो. " सकळ धर्मांमध्यें धर्म । स्वरूपीं राहणें हा स्वधर्म।" (श्रीसमर्थ) हें का एकदां कळून चुकलें म्हणजे धर्मवैषम्याहि उरत नाहीं. अशा या आत्मज्ञानानेंच केवळ पूर्वीं भारतीय जातीयता विसरून, धर्मीयता विसरून सर्वहि एकोप्यानें राहून व्यवहारोपयोगी भेद व धर्म जगाच्या व्यावहारिक जीवनाकरितां हवा म्हणून तो तात्पुरता वरवर पाळून सुखशांतीचें दिव्य जीवन ब्राह्मणापासून तें हरिजनापर्यंत आनंदानें अनुभवीत असतात; व्यवहार व परमार्थ दोन्ही साधीत असत. या अंतर्बाह्य साधनानेंच भारतांत आजपर्यंत ब्राह्मणादि जाति टिकून

राहिल्या व मुसलमान, ईसाई आदि धर्म टिकून राहिले. मजूर आणि जमीन-दारहि मिळून मिसळून होते. राजा–प्रजाजनांतूनहि कलह नव्हता. मंत्री प्रजेचें हित साधीत असत व प्रजाजन मंत्र्यांच्या स्वाधीन असत. **नियतिं न विमुंचन्ति महान्तो भास्करा इव** ।—भारतांत सूर्यादिकाप्रमाणें ज्ञानी जन नियति न सोडतां आपआपलें कर्तव्य व्यवस्थितपणें पार पाडीत आले. **भावाद्वैतं सदा कुर्यात् क्रियाद्वैतं न कर्हिचित्** । ( श्रीशंकराचार्य ) हें भावाद्वैत सदैव मनांत असावें व त्याचा अतिक्रम होऊन क्रियाद्वैतांत मात्र कुणीहि पाय घालूं नये. हा दंडक घालून वैदिक आर्य संस्कृतीनें प्रपंच-परमार्थाची सांगड घातली आहे. यंत्रांतील चक्राप्रमाणें सर्व माणसांची एकवाक्यता त्या वेळीं होती.

" भेद ईश्वर करून गेला " । " सकळ सृष्टि भेदें चाले " ॥ " जो जो जयाचा व्यापार । तेथें असावें खबरदार ॥ " ( श्रीसमर्थ ) संत-महंतांचा उपदेश हा असा आहे. हेंच युक्त असें आम्हांला व्यावहारिक क्षेत्रांत दिसून पण येतें. समर्थ म्हणतात, " ज्या इंद्रियास जो भोग । तो तो करी यथासांग । ईश्वराचें केलें जग । मोडितां उरेना ॥ " इंद्रियांचा भेद नाहींसा करणें शक्य नाहीं. शरीरदृष्ट्या स्त्रीपुरुषात्मक भेद घालविणें शक्य नाहीं. शरीराच्या उंचखुजेपणाचा भेद घालविणें शक्य नाहीं. देहाचे बाल्यतारुण्यादि अवस्थाभेद घालविणें शक्य नाहीं. झाड, झुडपें, वेली यांचा भेद घालविणें शक्य नाहीं. धान्यांचे, फळांचे भेद घालविणें शक्य नाहीं. पंचभूतांचे भेद घालविणें शक्य नाहीं. समत्वाकरितां भरविलेल्या ' भेदविनाशिनी ' नांवाच्या सभेंत देखील अध्यक्ष, उपाध्यक्ष, मुख्य वक्ता, उपवक्ता, सदस्य इतर श्रोते यांत भेद असतोच; अधिकारहि पण कमी जास्त असतात. इयत्ता व योग्यता ठरवूनच कार्याची विभागणी होते. या व्यावहारिक नियमानुसार भेद घालवितां येणें शक्य नाहीं. न्यायालय, कार्यालय, विधिमंडळ आणि राज्यसभा यांतून अधिकार–तारतम्य असतेंच. या दृष्टीनें आनुवंशिक व्यावहारिक पात्रतेचा विचार करून, भिन्न भिन्न भूमिकेंत भिन्न भिन्न वस्तूंना महत्त्व देऊन जीवन आंखणें अपरिहार्य होतें. नेते, अनुयायी आज्ञा-कारी, आज्ञा-धारी असे भेद कोठल्याहि समतावादाच्या पुरस्कर्त्या राष्ट्रांत, समाजांत आणि व्यक्ति-व्यक्तींत, अखिल कार्यक्षेत्रांत असतातच. आणि ते राहावयालाहि पण पाहिजेत. हे सर्व भेद अपरिहार्य मानून ठेवल्याप्रमाणेंच पूर्वापार चालत असलेले ब्रह्मचर्यादि आश्रम कां ठेऊं नयेत ? त्यालाच कां फाटा द्यावा ? मानवसमाजाचा

भेद नाहींसा करणें शक्य नाहीं असें व्यावहारिक दृष्टीनें पाहातांहि स्वाभाविकच दिसत नाहीं का? या नीचोच्च भावना, हें द्वैत आणि हें बहुत्व सुद्धां एकत्वांतच विरवून, जिरवून ईशसृष्टीचा व्यवहार रागद्वेषरहित होऊन व्यवस्थित चालवावा. **न चर्मणो न रक्तस्य न मांसस्य न चास्थिनः। न जातिरात्मनो जातिः व्यवहारप्रकल्पिता ॥**—जाति ही एरवीं सर्वसामान्य सप्तधात्वात्मक शरीराचीहि नव्हे आणि चिन्मय अद्वितीय अशा आत्म्याचीहि नव्हे. व्यवहाराच्या निर्वाहाकरितां "प्रपंचासारिखें चालावें। अंतरीं शाश्वत ओळखावें।" यासारख्या दंडकानुसार केवळ भिन्नत्व व विविधत्व यांचा अंगिकार करून विवेकविचारसंपन्न आर्य संस्कृति अखंड समाधानानें, निर्विकारतेनें पूर्वीपासून तों आतांपर्यंत अव्याहत वागत आली आहे. आजपर्यंतच्या सर्व जातींतल्या सर्व ज्ञान्यांनीं अव्यभिचरित आत्मसमाधान अंतरीं बाळगून आपआपलीं वर्णाश्रमोक्त कर्मे करीत, व्यावहारिक नीचोच्च भावना बाळगून सर्वतोपरी सुखशांतीनें आपापली जीवनयात्रा चालविली, आपलें जीवन दिव्य व सुखमय केलें. वाल्मीकि रामायणांतील रामराज्याचें हें वर्णन पाहा.

**क्षत्रं ब्रह्ममुखं चासीद्वैश्याः क्षत्रमनुव्रताः।**
**शूद्राः स्वकर्मनिरतास्त्रीन्वर्णानुपचारिणः ॥**

—रामराज्यांत क्षत्रियवर्ण ब्राह्मणांच्या आज्ञा पाळी. वैश्य क्षत्रियांचीं आज्ञा पाळीत. शूद्र स्वकर्मनिरत राहून या तीन उच्चवर्णियांची मनोभावानें जिवापाड सेवा करीत. कुठेच वैमनस्य नव्हतें. परस्परस्नेहानें आपापलें आचारधर्म आणि अधिकार आपल्या जीवनक्रमानें सुरक्षित ठेवून सर्व सुखशांतीनें नांदत, असें या श्लोकावरून स्पष्ट होत नाहीं का? आजच्या कालांतील वर्णद्वेष, जातिमत्सर, उच्चनीच भावना, वर्णसंकर ही आर्य संस्कृतीहि नव्हे आणि स्वपरउद्धाराचें हें साधनहि पण नव्हे!

**अन्तः संत्यक्तसर्वाशो वीतरागो विवासनः।**
**बहिः सर्वसमाचारो लोके विहर राघव ॥** (योगवा. ५-१८-१८)

—आंतील सर्व आशांचा संपूर्ण त्याग करून, विरक्त होऊन कोणतीहि वासना न ठेवतां, अंतरांतील एकत्वाचा निश्चय न सोडतां बाहेर मात्र यथोक्त रीतीनें वाग. वर्णआश्रमाप्रमाणें चाल. श्रुतिशास्त्रांच्या आज्ञांचें परिपालन कर. आदर्श जीवन ठेव. ईशसृष्टींतील व्यावहारिक भेद आणि विविधत्व पुसून टाकणें शक्य नसल्यामुळें व ती दृष्टि वाढवूनहि प्रयोजन नसल्यामुळें आंतल्या

प्रकाशणाऱ्या ज्ञानमात्र असणाऱ्या आपल्या आनंद निष्प्रपंच स्वरुपाचें अखंड अनुसंधान ठेऊन आत्मानंदानें, एकात्मदर्शनानें जीवननिर्वाहक अवश्य कर्मे कर. तुझी जबाबदारी पार पाड. स्वपरहिताचीं जास्तींत जास्त अशीं सर्वथा योग्य ठरणारीं उत्कृष्ट सत्कार्यें मोठ्या उत्साहानें कर. त्याकरितां पुरेपूर तकवा ठेव. बाह्यसृष्टीचा उपयोग करून नित्य नव्या जोमानें स्वपरउद्धारक व सर्व कार्य-क्षेत्रांतहि जीवननिर्वाहक ठरतील अशीं निदुष्ट कर्मे निष्काम होऊन कर. याकरितां सर्वत्र दक्षता ठेव व लागेल तें सर्व कांहीं कर. हा वरील श्लोकाचा मातितार्थ आहे. हें **आर्यांचें जीवनरहस्य** होय. ही आर्यांची संस्कृति होय. हाच वैदिक संप्रदाय होय. हेंच रामराज्याचें ह्रद्गत होय. हाच आदर्श जीवनाचा दिव्य उपदेश होय. यामुळें व्यावहारिक जीवनाचा व व्यवहाराचाहि निर्वाह होऊन आंतरस्थिति वृद्धिंगत होते.

“ आम्ही वैकुंठवासी आलों याचि कारणासी ।
सांगितलें जें ऋषि साचभावें वर्ताया ॥ ”

श्रीतुकारामांचें हें वाक्य आहे. ऋषिमुनींनीं जें सांगितलें आहे त्याप्रमाणें स्वतः वागून, सर्वांनाहि वागविण्याकरितां वैकुंठवासी आम्हीं वैकुंठाहून इथे आलों आहोंत. खरा मार्ग दाखवून जगाचा उद्धार करण्याकरितांच आम्हांला देवानें धाडलें आहे असा याचा अर्थ. ‘ यातिशूद्र ’ असून देखील तुकारामांनीं शास्त्राची मर्यादा उल्लंघन केली नाहीं. पुढें शूद्र जात ‘ **परप्रत्ययनेयबुद्धिः** ’ होऊन शास्त्र सोडून अतिक्रम करून वागूं लागेल हें समजूनच यांनीं शूद्र जातींत जन्म धारण केला हें उघड आहे.

### द्वैताद्वैतविवेक

‘ सांगितलें जें ऋषि ’ यांत केवढा अर्थ भरला आहे पाहा. ते अंतरीं एकात्मतेचें सुख अनुभवीत, बाह्य वर्णाश्रमोक्त कर्मे रागद्वेषरहित होऊन यथोक्त आचरीत असत.

सर्व व्यवहार भेदयुक्तच असतो. **नहि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्य-कर्मकृत्** । हा भेदव्यवहार सोडून देह असेपर्यंत एक क्षणभरहि राहाणें शक्य नाहीं. त्या त्या प्रसंगीं आपआपल्या परीनें वागावेंच लागतें. त्यामुळें **भावाद्वैतं सदा कुर्यात् क्रियाद्वैतं न कर्हिचित्** ॥ अद्वैत धारणेंत ठेवून या ‘ **सूत्रे मणिगणा इव** ’ द्वैत-प्रपंचांत वागावयाला पाहिजे. क्रियाद्वैतानें जगाचा

निर्वाहच होऊं शकत नाहीं. म्हणून क्रियाद्वैत म्हणजे सबगोलंकार कोणी करूंच नये, असें श्रीशंकराचार्यांनीं सांगितलेलें आपण पूर्वींच बघितलें आहे. " एकंकार गोलंकर करूच नये " असा श्रीसमर्थांचाहि उपदेश आहे. द्वैताचा आरंभ वृत्तीपासूनच होतो. तो इंद्रियांमध्येंच असतो. प्रथम मनाच्याच व्यापारांत तो दिसून येतो. प्रपंचदर्शक मनइंद्रियांतूनच द्वैत उत्पन्न होऊन सर्व जगभर पसरलें व त्यांत अद्वितीय आत्मस्वरूपाचीहि अंतर्वृत्ति झाली. एका समाधींत मात्र केवल चैतन्य असतें. एकत्वाचा अनुभव येतो. जीवनक्रमाच्या प्रदेशांत का एकदां प्रवेश झाला कीं फूल उमलून सुवास बाहेर टाकल्याप्रमाणें हा द्वैत-प्रपंच अद्वैताचें तत्त्व बाहेरं टाकीत आपोआप विकास पावतो. दृश्यभेद व दृष्टिभेद व्यवहाराचें जीवन आहे. व्यावहारिक कार्यक्षेत्रांत तो नाहींसा होत नाहीं व करणेंहि शक्य नाहीं. भेद आणि विविधता या संकल्पानें उत्पन्न झालेलें जग भेदानें व विविधतेनेंच दिसून येतें. भेदच विविधतेचा व्यवहार चालवितो. एका उद्यानांतल्या अनेक फुलांच्या जातींप्रमाणें जगांत, मनुष्यांतहि अनेक जाती आहेत. फूल आपली जात कळवून त्याच्या त्या तेवढ्या सुगंधानें दरवळत असल्याप्रमाणें आपापलें स्वजातीय कर्तव्य करीत ईशसृष्टीचें सौंदर्य वाढविण्यास काय हरकत आहे? या विविधता—रूपाच्या जगाला प्रकाशविणारें आत्मरूप मात्र प्रतिप्राणि-पदार्थांतून अद्वितीय आहे. द्वैताद्वैतरूप आत्मजगतांचा प्रीतिसंगम या जगांत झाला आहे. निसर्गच असा असतांना तदनुरूपच क्रिया आंखून या कोंडींतून कायमचेंच बाहेर पडलें पाहिजे. वर्णाश्रमोक्त कर्में आत्मनिश्चयाच्या वृत्तीनें यथायोग्य बाहेर होत असलीं पाहिजेत. विवेकविचारशील जनक आपल्या मुलांच्या संगोपनाकरितां व शिक्षणाकरितां त्यांच्याशीं भेदबुद्धीनें वागत नाहींत का? त्याचप्रमाणें जगज्जनक परमात्मस्वरूपहि, स्वतःपासून झालेल्या जगाशीं त्याच्या संगोपनार्थ व शिक्षणार्थ भेदव्यवहार ठेवतें. त्याच्या अंतरंगांत मात्र नेहमींच अविच्छिन्न एकत्व स्वभावतःच दृढ असतें. जगांत सर्व असेंच चालावयाला पाहिजे कीं नाहीं? एकाच देहांत किती अवयवभेद आहेत! त्या अवयवांचें स्वरूप व कार्यें भिन्न भिन्न आहेत. त्या भिन्न भिन्न अवयवांनीं व त्यांच्या भिन्न भिन्न कार्यांनींच देहाचा निर्वाह होतो. मस्तक हें उत्तमांग म्हणून मानलें जातें. तें सर्वांच्या वर असतें. पाय सर्वांच्या खालीं असतात. मांड्या आणि बाहु पायांच्या ऊर्ध्वभागीं असतात. यांतहि मांड्यांच्या

ऊर्ध्वभागीं बाहू असतात. हे सर्व अवयव मिळून जसा सर्व देह एकच असतो, त्याचप्रमाणें जात्यान्वयें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे भेद उच्चनीच भावनांनीं युक्त असले तरी परमात्म्याचा हा विराट देह एकच म्हणून श्रुति सांगत आहे. अंतस्थ आत्मस्वरूप अद्वितीय आहे, म्हणून श्रुति उपदेश करीत आहे. अवयवांची उपमा देऊन देहाचे अवयव निराळे करणें, त्यांचें स्थलांतर करणें जसें शक्य नाहीं त्याचप्रमाणें विराट देहावयवीभूत वर्णव्यवस्था निराळी करणें व तिचें स्थळांतर करणें म्हणजे ब्राह्मणांना शूद्र अथवा शूद्रांना ब्राह्मण बनविणें इत्यादि हिताच्या दृष्टीनें केव्हांहि इष्ट वा शक्यहि नाहीं. म्हणून एक अनिवार्य व्यवहार श्रुति दाखवीत आहे; व त्यांतील गंभीर एकात्मक विज्ञानाचा बोध करीत आहे. मस्तक वर आहे म्हणून त्याच्या नाशाकरितां बाकीचे बाहु, मांड्या, पाय हे अवयव उद्युक्त झाल्यास बाकींच्या-या अवयवांची जशी स्थिती होईल तशीच ब्राह्मण जात नष्ट करण्यास उद्युक्त झालेल्या क्षत्रिय, वैश्य, शूद्र या वर्णांचीहि पण होईल, हें यांतून ध्वनित होतें.

## ब्राह्मण, त्याचें महत्त्व व कर्तव्य

**चातुर्वर्ण्यं चातुराश्रम्यधर्माः । सर्वे न स्युर्ब्राह्मणानां विनाशात् ॥**

असें महाभारताचें वाक्यहि पण आहे. आतांपर्यंतच्या ब्राह्मणांनीं वैदिक धर्माचा उपदेश करीत वर्णाश्रमाची स्थिति सुधारीत, त्यांचें स्वास्थ्य वाढवीत, समाजांत निष्कंटक सुखशांति राखीत, इहपर निर्दुष्ट सुखसाधनांचें रक्षण करीत स्वपरउद्धाराचें जीवन आंखलें. अध्ययन-अध्यापनाच्या योगानें या विश्वमान्य वेदांचेंहि आतांपर्यंत त्यांनींच अतिपरिश्रम सोसून रक्षण केलें.

**ब्राह्मणं तु स्वधर्मस्थं दृष्ट्वा बिभ्यन्ति चेतरे ।**
**स्वधर्मं चानुतिष्ठन्ति कृत्यं सर्वं च कुर्वते ॥** ( शुक्रनीति )

—स्वधर्मानुष्ठानपर असून सर्व जनहिताचीं कामें मोठ्या दक्षतेनें करणाऱ्या सत्पात्र ब्राह्मणाचा समाजावर हटकून परिणाम होतो. त्याच्याविरुद्ध समाज जात नाहीं; इतकेंच नव्हे तर त्याच्या उपदेशानुसार चालतो. स्वधर्माच्या व सद्वर्तनाच्या तपोमूर्ति ब्राह्मणाला भिऊन सर्वहि आपापल्या धर्माप्रमाणें बिनबोभाट वागूं लागतात. समाजांत सद्वृत्ति वाढते.

**ब्राह्मणेषु प्रमूढेषु धर्मो विप्रणशेद्भुवम् ।**
**धर्मप्रणाशे भूतानामभावः स्यादसंशयः ॥** ( महाभारत )

—ब्राह्मण स्वधर्मापासून चेवले, किंकर्तव्यमूढ झाले, त्यांचें पथप्रदर्शनाचें काम थांबलें, वेदशास्त्रांचा अभ्यास राहिला म्हणजे धर्माचाच म्हणजे समाजांतल्या धर्मबुद्धीचाच नाश होतो. धर्मच जीवन असल्यामुळें धर्मनाशानें तें राष्ट्र अथवा समाजच नष्ट होतो. जगांतून नीतीचीं धर्मतत्त्वें नष्ट झालीं म्हणजे जगाचा नाश निःसंशय जवळ ओढवला आहे असें समजावें. धर्मप्रचाराचें काम ब्राह्मणांचें असतें. धर्मग्रंथाच्या अध्ययनानें व तपानें धर्मतत्त्व समजून घेऊन त्याचा उपदेश करण्याकरितांच ब्राह्मण जात वेगळी ठेवली आहे. ती तशीच राखून ठेवणें समाजाच्या हिताचें आहे. परमात्मप्राप्ति, सत्य सुखाचा लाभ, तत्त्वज्ञान, धर्मविवरण, धर्माचरण, मनोनिग्रह, इंद्रियनिग्रह, तप, पावित्र्य, शांति, उदात्त सरळ स्वभाव, ज्ञानविज्ञानसंपन्नता या लक्षणांनींच ब्राह्मणजात ओळखिली जाते. अशा ब्राह्मणाकडूनच खरें जनहित साधतें व राष्ट्राचें इहपर कल्याण होतें. अशा परिशुद्ध आत्म्यांच्या संमतीनेंच पूर्वीं सामाजिक, राजकीय व धार्मिक इत्यादि जनहिताचे सर्व कायदे होत होते. राजाचे हे मुख्य सल्लागार असत. कृष्णार्जुनांच्या जोडीप्रमाणें वेदवेदांगपारंगत, तपोनिष्ठ, साक्षात्कारी, ज्ञानविज्ञानसंपन्न ब्राह्मण आणि नीतिमान, धर्मनिष्ठ, उच्च ध्येयाचे, राज्यधुरंधर विद्वान मुत्सद्दी हे दोघे म्हणजे ब्राह्म-क्षात्र शक्ति एकवटल्या म्हणजे तेथें ऐहिक आणि पारलौकिक उत्कृष्ट वैभव, सकळ दैवी व ऐहिक संपत्ति, संपूर्ण धर्म, उन्नत नीति, उत्कट समाधान, नितांत शांति व अत्युच्च आनंद आपोआपच नांदतो. परिस्थिति ओळखून ब्राह्मणांनीं धर्मकारणाबरोबर प्रजेच्या क्षेमाकरितां राजकारणहि आपल्या हातांत घेऊन अपघातापासून किती वेळां तरी समाजाचें रक्षण केलें आहे. ‘ कर्तव्यत्वेन ’ हा ब्राह्मणांचा धर्मच होतो:

**ब्राह्मणायावगूर्यैव द्विजातिर्वधकाम्यया ।**
**शतं वर्षाणि तामिस्रनरके परिवर्तते ॥** ( मनु. ४।१६५ )

—शूद्र तर राहोच, त्यांच्याहून खालच्या जाताचा प्रश्नच नाही. क्षत्रिय वैश्यांपैकींहि जर कोणी ब्राह्मणाला मारण्याकरितां नुसती लाठी उचलील तर तेवढ्यानेंच तो क्षत्रिय–वैश्यहि, उच्च वर्णांतलाहि मनुष्य गाढ काळोखीच्या नरकांत शंभर वर्षें खितपत पडतो, असें क्षत्रियकुलावतंस मनु महाराजांचें वाक्य आहे. मेल्यानंतर तें तसें होईलच, पण इथेच त्याला असें कांहीं तरी प्रत्ययाला आल्याशिवाय राहात नाहीं.

**अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते । त्रिभिर्वर्षैस्त्रिभिर्मासैस्त्रिभिः पक्षैस्त्रिभिर्दिनैः॥**—अत्यधिक पुण्यपापांचीं चांगलीं व वाईट फळें इथेच तीन वर्षांच्या, तीन महिन्यांच्या, तीन पक्षांच्या व तीन दिवसांच्या अवधींत भोगावीं लागतात, असें शास्त्रवचन आहे. **न कदाचिद्द्विजे तस्माद्विद्वानवगुरेदपि । न ताडयेत्तृणेनापि न गात्रात्स्रावयेदसृक्** ॥ ( मनु. ४।१६ ) जाणत्यानें केव्हांहि ब्राह्मणावर रागावूं नये. त्याला भेडसावूं नये. कसल्या गवतानें देखील मारूं नये. मग लाठी, शस्त्र इत्यादिकांच्या प्रहारानें त्याचें रक्त निघेल असें करणें बाजूलाच राहिलें. हेंहि मनूचेंच वाक्य आहे. असें विधान करावयाचें म्हणजे ब्राह्मणांच्या हातून दोष होणेंच अशक्य म्हणून सांगणें आहे. ब्राह्मणांची अशी परिशुद्ध जात होती व तशी ती अजूनहि असावयास हवी. **यज्ञोऽनृतेन क्षरति तपः क्षरति विस्मयात् । आयुर्विप्रापवादेन दानं च परिकीर्तनात्** ॥ ( मनु. ४।२३७ )—असत्यानें यज्ञ नष्ट होतो. **विस्मयः स्यादाश्चर्यगर्वयोः ।**—गर्वानें तप नष्ट होतें. ब्राह्मणनिंदेनें आयुष्य नष्ट होतें. बोलून दाखविण्यानें दानाचें पुण्य नष्ट होतें. **अनभ्यासेन वेदानामाचारस्य च वर्जनात् । आलस्यादन्नदोषाच्च मृत्युर्विप्राञ्जिघांसति** । (मनु.स्मृ. ५।४)—वेदांच्या अनभ्यासानें, ब्राह्मणाचाराच्या परित्यागानें, अनुष्ठानाच्या ठिकाणीं आळस बाळगल्यानें, अन्नदोषानें मृत्यूचा यांच्यावर घाला पडतो. नाहींतर ते मरणाचीच इच्छा करतात अथवा ते अपमृत्यूनें पछाडतात अथवा मरणप्राय अपमान सहन करतात. **न लोकवृत्तं वर्तेत वृत्तिहेतोः कथंचन । अजिह्मामशठां शुद्धां जीवेद्ब्राह्मणजीविकाम्** ॥ (मनु. ४–११)—उपजीविकेच्या हेतूनें सामान्य लोक जसा वागतो त्याप्रमाणें वागूं नये. कनिष्ठ, हीन जातीयाकडे नौकरीस राहूं नये. कनिष्ठ व हीन लोकांचें आचरण ठेवूं नये. परधर्माचें व परजातीचें अनुकरण करूं नये. पापरहित शुद्ध आणि सरळ असा ब्राह्मणांचा शास्त्रीय तपःप्रधान जीवनक्रम असावा. **श्रुतिस्मृत्युदितं सम्यङ्निबद्धं स्वेषु कर्मसु । धर्ममूलं निषेवेत सदाचारमतंद्रितः** ॥ ( मनु. ४–१५ )—श्रुतिस्मृत्युक्त अध्ययनाध्यापनादि स्वकर्मानें संबद्ध असलेल्या धर्ममूळ सदाचरणाचें जीवन ब्राह्मणानें पत्करावें. **वेदाभ्यासस्तपो ज्ञानमिंद्रियाणां च संयमः । अहिंसा गुरुसेवा च निःश्रेयसकरं परम्** ॥—संहिता, आरण्यक, ब्राह्मण, उपनिषत् आदि वेदग्रंथांचा अर्थासहित तत्त्वजिज्ञासापूर्वक अभ्यास, तप म्हणजे नियमबद्ध आचरण, कृच्छ्रचांद्रायणादि देहदंड, आत्मज्ञानविषयक

श्रवणादिक, इंद्रियजय, अहिंसा, गुरुसेवा हीं इहपरसाधक ब्राह्मणांचीं जीवनसाधनें होत.

**शनकैस्तु क्रियालोपादिमाः क्षत्रियजातयः । वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥ पौंड्रकाश्चौड्रद्रविडाः कांबोजा यवनाः शकाः । पारदाः पल्हवाश्चीनाः किराता दरदाः खशाः ॥ मुखबाहूरुपज्जानां या लोके जातयो बहिः । म्लेंच्छवाचश्चार्यवाचः सर्वे ते दस्यवः स्मृताः** ॥ ( मनु. १०।४३, ४४, ४५ ) ब्राह्मणांचा उपमर्द केल्यानें, क्रियालोपानें, संस्कारहीनत्वानें व ब्राह्मणांच्या नंतर आपोआप झालेल्या अदर्शनानें क्षत्रिय जाति धर्महीन व दुष्ट झाल्या. या अशा क्षत्रिय जातींचींच नांवें वरच्या श्लोकांत आहेत. पौंड्रादि हीं तीं नांवें ब्राह्मणांचें शिक्षण आणि रक्षण सुटल्यामुळें वाटेल तसें वागून, त्यांनीं त्या त्या देशाला अनुसरून तीं तीं नांवें धारण केलीं आणि ते केवळ पशुवृत्तीचे बनले. भारतवर्षांतूनच ज्या जाती भारताच्या बाहेर गेल्या त्यांचें धर्माचें शिक्षण सुटलें व ते मग क्रमेण रानटी लुटारूंप्रमाणें पूर्वी झाले असावेत. म्लेंच्छ अथवा आर्य अशा भाषेनेंहि ओळखल्या जाणल्या त्या जाती संस्कारशून्य समजाव्यात, असा या श्लोकांचा भावार्थ वाटतो. एखाद्या देशांतून हद्दपार झालेल्या गुन्हेगारांचें जसें कालांतरानें दुसरें राष्ट्रच बनावें, तशींच भारतवर्षांतील हद्दपार झालेल्या चारहि वर्णांच्या गुन्हेगारांचीं भारतेतर राष्ट्रें झालीं असें अनुमान यांतून निघतें काय ? त्या दृष्टीनें कांहीं मर्यादेपर्यंत अमेरिकाचा विचार करतां येईल असें वाटतें. ' निवासवेत् ', ' प्रवासनम् ' असे शब्द अपराध्यांच्या बाबतींत दिसून येतात. एखादा श्लोक उदाहरणार्थ घेऊं. **आगःसु ब्राह्मणस्यैव कार्यो मध्यमसाहसः । विवास्यो वा भवेद्राष्ट्रात्सद्रव्यः सपरिच्छदः** ॥ ( मनु. ९।२४१ ) या श्लोकांत ब्राह्मणानें अपराध केल्यास सद्रव्यसहकुटुंब त्याला **देशाच्या बाहेर** घालवावें म्हणून या श्लोकांत सांगितलें आहे. परमात्म्याच्या मुख, बाहु, मांड्या व पाय यांपासून जी मानवांची प्रथमसृष्टि झाली ती एकच असणार. कोणतें तरी नियत स्थानच त्या मनुष्यांना दिलें असलें पाहिजे. मनुष्यजातीचा आदिपुरुष मनु हा आर्यावर्तांतच होता. याच्यापासूनच सूर्यवंश पुढें चालला. ऋषिमुनींचे आश्रम, तपोभूमि, यागभूमि, कर्मभूमि हा भारतवर्षच आहे, हें त्या त्या ऐतिहासिक स्थलमहात्म्यावरून, पुराणांवरून सिद्ध होतें. प्रथम मानवांची उत्पत्ति येथें होऊन ( इथेंच ते होते ) पुढें अपराध्यांना हद्दपारीची शिक्षा म्हणून इतर देशांत पाठविण्याचा क्रम

सुरू झाला. उपजीविकेच्या दृष्टीनेंहि पुढें कांहीं तिकडे गेले असतील. पुढें पुढें त्या दोषी लोकांच्या शूद्राचाराचाच परिणाम तिथल्या इथून उपजीविके-करितां गेलेल्या अशा लोकांवरहि झाला. पुढें इकडचें दळणवळण कांहीं कारणानें तुटून गेलें आणि तेहि 'संगदोषेण' तसेच बनले. बराच काळ असा मध्यें जाऊन तिकडच्यांची रानटी संस्कृति बनली. पुढें प्रवासी लोकांनीं इकडून कांहींतरी तिकडे नेऊन, कांहीं इकडचें, कांहीं मनाचें, कांहीं त्या देशाच्या व त्या माणसांच्या अनुकूलतेचें सर्व गोळा करून कांहीं धर्माची, नीतीची, भक्तीची, तत्त्वज्ञानाची गोळाबेरीज तिकडच्यांना सांगितली. अनेक मतप्रचारक झाले. असें सर्व होऊन तिकडच्या राष्ट्राचें आजचें असें एकरूप दिसून येत आहे, असें म्हणतां येईल. यानें वैदिक सृष्टिक्रम सुटत नाहीं. एक देव,एक सृष्टि, एक धर्म व एक धर्मग्रंथ या ठोकळ विचारालाहि समंजस होतें. **एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः । स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ॥** ( मनु. २ । २० ) या श्लोकाचाहि निर्वाह होतो. ' स्वं स्वं '—आपले आपले मूळ आचार पृथ्वींतल्या सर्व मानवांनीं या भारतांत जन्माला आलेल्या व इथेच वाढून शास्त्रीय शिक्षण घेतलेल्या सर्वतोपरि आदर्श ब्राह्मणांकडूनच शिकावेत असें मनूनें सांगितलें आहे. ब्राह्मणांचें गुरुत्व विदेशीयांवरहि या मागच्या प्राचीन धाग्यानें संबंधित होतें. इतर देशांतून धर्माचा प्रचार ब्राह्मणांनीं करावा, पूर्वीं केला होता असेंहि यांतून ध्वनित होतें.

**इंद्रंवर्धन्तोऽप्तुरः कृण्वन्तो विश्वमार्यम् । अपघ्नन्तोऽराव्णः ॥** ( ऋ. ९ । ६ । ३५ ) राक्षसी अथवा पशुवृत्तीच्या अनीतीला घालवून परमात्म्याचें तत्त्वज्ञान जगभर प्रसृत होईल, वृद्धिंगत होईल असें करून सबंध जगालाच उच्च आचारविचारांचे आदर्श आर्य बनवा. **पृथिव्यै समुद्रपर्यंताया एकराट्** ।—सबंध समुद्रवलयांकित पृथ्वीचा एकच एक सम्राट असावा, अशी यांची महत्त्वाकांक्षा होती. **वसुधैव कुटुंबकम्** ।—यांचें विश्वच एक कुटुंब, हे विश्वकुटुंबी. **सर्वे जनाः सुखिनो भवन्तु** ।—आणि म्हणूनच सबंध विश्वच सुखी असो अशी यांची वासना. ब्राह्मणांचें हें लक्ष्य. **उत्पत्तिरेव विप्रस्य मूर्तिर्धर्मस्य शाश्वती । स हि धर्मार्थं उत्पन्नो ब्रह्मभूयाय कल्पते ॥** ( मनु. १ । ९८ ) धर्माच्या रूपानेंच ब्राह्मण जन्माला येतो. धर्ममूर्तीच असून धर्माकरितांच उत्पन्न झालेला ब्राह्मण स्वधर्माच्या आचरणानें स्वतः ब्रह्मरूप होतो व दुसऱ्यालाहि ब्रह्मरूप करतो. मोठेपणाच्या

आचार–विचार–उच्चारांनींच मोठ्यांचा मोठेपणा कायम राहातो हें तत्त्व ब्राह्मणांनीं ओळखून असावें म्हणून व तशा कांहीं ब्राह्मणांत तसें कांहीं सामर्थ्य कां दिसून येत नाहीं, या प्रश्नालाहि आपोआप उत्तर मिळावें म्हणून मनूनें हा पुढचा श्लोक लिहिला असावा. **आचाराद्विच्युतो विप्रो न वेदफलमश्नुते आचारेण तु संयुक्तः संपूर्णफलभाग्भवेत्** । ( मनु. १।१०९ ) ब्राह्मणांच्या कुलांत जन्मून सांग वेदाध्ययन जरी केलें असलें आणि आचरण मात्र तसें नसलें तर त्या आचारभ्रष्टाला वेदाध्ययनाचें तें तसें उज्ज्वल फळ मिळत नाहीं. **आचारहीनं न पुनन्ति वेदाः** । आचार-अनुष्ठानच मुख्य. ब्राह्मणकुलांत जन्माला येऊन ज्यानें सांग वेदाध्ययन केलें आहे व जो तशा आचार-विचार-उच्चारानेंहि युक्त आहे त्यालाच मात्र वेदाध्ययनाचें संपूर्ण फळ मिळतें. तोच वेदमूर्ति ब्राह्मण. त्याच्या ठिकाणीं वेदहि आपलें पूर्ण सामर्थ्य प्रगट करतात. **विद्वद्भिः सेवितः सद्भिः नित्यमद्वेषरागिभिः । हृदयेनाभ्यनुज्ञातो यो धर्मस्तं निबोधत** ॥ ( मनु. २ । १ )—वेदवेदांगपारंगत असणाऱ्या सज्जनांनीं रागद्वेषशून्य अशा आपल्या हृत्पूर्वक जो धर्म म्हणून सांगितला असेल तोच तुम्ही जाणा. तोच धर्म मी तुम्हांला सांगत आहें. त्याची ओळख चांगली पटवून घ्या, म्हणून मनूनें सांगितलें आहे. **वेदाचाररतो विप्रो वेदवेदांगपारगः । तैरप्यनुष्ठितो धर्म उक्तश्चैव विशेषतः** ॥ बृहद्यम स्मृतीच्या पांचव्या अध्यायाचा हा चौथा श्लोक आहे. यांतहि तसेंच सांगितलें आहे. **यत्तु आर्याः क्रियमाणं प्रशंसन्ति स धर्मः** । ( आपस्तंबसूत्र ) असे हे आर्य ज्या आचाराची प्रशंसा करतात तोच धर्म असें आपस्तंबसूत्रांत सांगितलें आहे. आर्यांच्या आचरित, कथित, प्रतिपादित धर्मालाच 'धर्म' म्हणावयाचें. **महाजनो येन गतः स पन्थाः** । महाजन ज्या मार्गानें जातात तोच उन्नतीचा राजमार्ग. धर्म अशा महाजनांनाच विचारावयाचा असतो. अशांनाच धर्म-निर्णयाचा अधिकार असतो. **चत्वारो वेदधर्मज्ञाः परिषत् त्रयमेव वा । सा ब्रूते यत्स धर्मः स्यादेको वाऽध्यात्मवित्तमः** ॥ ( याज्ञ. स्मृ. १।९ )— वेदधर्म उत्तम प्रकारें जाणणारे चार अथवा तीन असले तरी पुरे. ती एक धर्मसभा व्हावयास हरकत नाहीं. त्यांनीं दिलेला तो धर्मनिर्णय होय. अथवा पूर्ण अध्यात्मनिष्ठ एक असला तरी पुरे. त्यानें सांगितलेला धर्मनिर्णय सर्वांनींहि मानावा. जो आपल्यांत सर्वांना व सर्वांत आपल्याला बघतो तो समदृष्टीचा आत्मज्ञानी स्वराज्याची म्हणजे आत्मराज्याची प्राप्ति करून

घेतो, अशा तऱ्हेचें मनूचें वाक्य आपण मागें बघितलें आहे. पुन्हां पाहिजे तर त्याचें स्मरण करूं. **सर्वभूतेषु चात्मानं सर्वभूतानि चात्मनि । समं पश्यन्नात्मयाजी स्वाराज्यमधिगच्छति ॥** ( मनु. १२।९१ )—अशा या स्वाराज्याची ज्याला प्राप्ति झाली त्याचें प्रतिअणुरेणु प्राणिपदार्थांतूनच स्वराज्य असतें. जगाच्या सर्व प्राण्यांना स्वरूपानेंच पाहात त्या सर्वांच्याविषयीं निष्काम प्रेम, निरपेक्ष दयार्द्रबुद्धि ठेवून प्रतिफळाची इच्छा न करतां त्यावर परोपकार ते करतात. त्यांची क्षमा, अहिंसा, सहिष्णुता, सभ्यता, सौजन्य हें सर्वच कांहीं अवर्णनीय असतें. यांचें स्वहित सारें प्रत्येकांच्या परहितांत सामावून गेलेलें असतें.

व्यक्तिगत सुखाची मुळीं कल्पनाच यांना कधीं शिवत नाहीं. आपल्याकरितां परहिंसा करणें, स्वार्थाकरितां दुसऱ्याचा द्वेष करणें, दुसऱ्याची उर्जित अवस्था पाहून मनांतच असूया बाळगणें, दुसऱ्यांचा तिरस्कार करणें, स्वतः स्वैर वर्तन ठेवून उलट सज्जनांची निंदा करणें, धर्माविरुद्ध वर्तन ठेवणें, नीतीच्या निर्बंधाचें उल्लंघन करणें, दुसऱ्याचें धनधान्य, स्त्रीपुत्र, पशुपक्षी, जमीन एवंच परस्व स्वसुखासाठीं बलात्कारानें हिरावून घेणें आदि आसुरी प्रवृत्ति व कृति ज्यांच्या वाऱ्यालाहि उभी राहत नाहीं; किंवा अगोदरच कोठें घर करून असल्यास त्या ठिकाणींच ती ज्यांच्या कृपामात्रें नष्ट होते तेच हे महासत्वशील आर्य. इंद्रियमनांना स्वाधीन ठेवून, शुद्ध अंतःकरण करून, स्वपर उद्धाराकरितां तात्त्विक, वेदविहित कर्में करीत, त्या मोक्षधर्माच्या प्रचारार्थ जीवन बाळगणारे तेच आर्य. मनुष्याच्या ठिकाणीं असणारी पशुवृत्ति घालवून, मनुष्यधर्माचा बोध करून, त्यांना सद्धर्मपरायण करून, उत्कृष्ट नीतिमान् करून, परोपकारी करून, निष्कामतेच्या राजमार्गानें सर्वांना जे आनंदघन परमात्मस्वरूपाकडे घेऊन जातात तेच आर्य. वैदिक मतानुसार उत्तम सदाचार ठेवून मानवजातींत त्याचा प्रचार करणें, वैदिक तत्त्वांचा अभ्यास करून त्यांना दुसऱ्यांच्याहि आंगवळणीं पाडणें हीं आर्यांचीं मुख्य कार्यें होत. वैदिक वर्णाश्रम धर्मकर्माचें स्वतः चोख आचरण ठेवून अद्वितीय परमात्म्याचें आनंदघन स्वरूप एक आहे अशी आस्तिक्यबुद्धि स्वतः बाळगून तिला दुसऱ्याच्या ठिकाणीं रुजू करणें; परमात्म्याच्याच कृपेनें इहपरसुखाचीं साधनें लाभतात हा विश्वास बाळगणें व इतरांतून त्याचा पूर्ण प्रसार करणें; परमात्मप्रीत्यर्थच

देवपितृकार्यें करणें व करविणें; श्रुतिस्मृतिपुराणोक्त कर्मांचें अनुष्ठान करणें व करविणें; ऐहिक पारलौकिक विषयसुखांत त्याज्यबुद्धि बाळगून ती तशीच दुसऱ्यांच्या ठिकाणींहि उत्पन्न करणें; कर्मभक्तिज्ञानयोगांनीं परमात्मैक्य संपादण्याची प्रवृत्ति आपल्यांत ठेवून, ती दुसऱ्यांतहि निर्माण करणें; वेद, स्मृति, पुराणग्रंथ हे अखिल विश्वाचेच धर्मग्रंथ आहेत, असें निश्चित करणें व करविणें; कर्तृत्व-भोक्तृत्वादि अहंकारानें जन्म येतो व त्याच्या राहिल्यानें मोक्ष मिळतो ही भावना आपल्यांत दृढमूल करून घेऊन दुसऱ्यांच्या हृदयांतहि त्यांच्या मुळ्या खोलवर रुजतील असें करणें; वेदविहित प्रवृत्ति–निवृत्तिमार्गांत त्या त्या अधिकारी जनांना ठेवणें व ठेवावयाला लावणें; आदर्शात्मक साऱ्याच परिशुद्ध आचरणानें व तत्त्वग्राही वैदिक उपदेशानें जगदुद्धाराची दृष्टि ठेवून वागणें व वागावयास लावणें; हीं इत्यादि अशीं आर्यांचीं कार्यें होत. हींच आर्यांचीं लक्षणेंहि पण होत. आर्य संस्कृतीचें थोडक्यांत लक्षणहि पण असेंच आहे. वैदिक धर्माचीं ठोकळ तत्त्वें तीं हींच. हींच विश्वोत्कर्षाचीं, विश्वोद्धाराचीं उच्चतम सिद्धान्तरत्नें!

**गृहस्थाश्रमाचें मूळ**

**प्रजाकामो ह वै प्रजापतिः । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा । स मिथुन उत्पादयते ॥** ( प्रश्नो. १–४ )—प्रजाकाम प्रजापतीनें प्रजा निर्माण करावी म्हणून संकल्प केला. हेंच त्याचें तप होय. अशा रीतीनें संकल्प करून त्यानें एक मिथुन म्हणजे प्रकृतिपुरुषाची एक जोडी निर्माण केली. **सोऽकामयत द्वितीयो म आत्मा जायेतेति । स मिथुनँ समभवत् ॥**(बृ. २–४) दुसरा एक माझा आत्मा व्हावा म्हणून इच्छा केली व आपल्यांत दुसरें नसल्यामुळें तो स्वतःच प्रकृतिपुरुषाचें जोडपें बनला. पावसाळा आल्याबरोबर जसा बदल होतो त्याप्रमाणें सृष्टीच्या उत्पत्तीचा काल येतांच एक तऱ्हेचा बदल भासूं लागतो. परमात्म्याच्या ठिकाणीं सृष्टिकार्याकरितां शक्तीची कल्पना येते. आणखी एक दुसरें माझें आत्मरूप व्हावें अशी कल्पना स्फुरते. अद्वितीय रूपानें असणाऱ्या परमात्म्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली त्याच्या स्वरूपाची दुसरी भावनाच त्याची शक्ति. या शक्तीलाच प्रकृति म्हणतात. या प्रकृतीला 'द्वितीया' असेंहि एक नांव आहे. मूळरूप पूर्ववत् असून परमात्म्याच्या संकल्पानें दोन रूपें धारण झालीं. हेंच मिथुन, हींच प्रकृतिपुरुष होत. सृष्टिकरणाच्या आंदोलन-समयापासून ते स्पष्ट सृष्टीपर्यंत प्रत्येक झालेल्या सर्व कृतींतून या प्रकृतिपुरुषाचें स्थूलसूक्ष्मरूप नित्य असतेंच.

**आत्मैवेदमग्र आसीत् । पुरुषविधः ।** ( बृ. १–४–१ ) **स वै नैव रेमे । तस्मादेकाकी न रमते । स द्वितीयमैच्छत् । स हैतावानास यथा स्त्रीपुमाँ्सौ संपरिष्वक्तौ स इममेवात्मानं द्वेधाऽपातयत्ततः पतिश्च पत्नी चाभवतां तस्मादिदमर्धबृगलमिव स्व इति ह स्माह याज्ञवल्क्यस्तस्मादयमाकाशः स्त्रिया पूर्यत एव ताँ्समभवत्ततो मनुष्या अजायन्त ॥** ( बृ. १–४–१, ३ )––पुरुषाच्यासारख्या आकाराचा एक आत्मा या सृष्टीच्या पूर्वीं होता. एकट्यालाच त्याला करमलें नाहीं, एकटाच तो त्या वेळीं रमूं शकला नाहीं. या मूळपुरुषाच्या स्वभावाप्रमाणें आतांहि एकट्याला करमत नाहीं. एकटाच रमूं शकत नाहीं. रममाण होण्यास कांहीं दुसरें असावें अशी त्यानें इच्छा केली. अशी ही इच्छा झाल्याबरोबर आलिंगिलेल्या स्त्रीपुरुषांच्या एकवटलेल्या रूपाप्रमाणें तो झाला. नारी-अर्धभागाच्या या पुरुषानें या आपल्यालाच पृथक् अशा दोन रूपांनीं विभागलें. नंतर ते दोन विभाग पतिपत्नींच्या रूपानें प्रगट झाले. मूळपुरुषाचें द्वितीयरूप प्रकृति असल्यामुळें तिला जसें 'द्वितीया' हें नांव आहे त्याप्रमाणेंच इथेहि पत्नी ही पुरुषाचें द्वितीयरूप असल्यामुळें तिला ' द्वितीया ' हें नांव आलें. मूळ प्रकृतिपुरुषच पतिपत्नी झाले. जुळविलेल्या एका वेळूच्या दोन उभ्या अर्धभागांप्रमाणें आपलें स्वरूप आहे असें याज्ञवल्क्य मैत्रेयी नामक आपल्या पत्नीस म्हणाला. या कारणानें पुरुषाचा हा मोकळा वामभाग स्त्रीनेंच भरून निघतो. ब्रह्मदेवाच्यापासून प्रथम उत्पन्न झालेला मनु आपल्या पत्नीमुळें पुन्हां जन्मास आला, त्या वेळीं हीं मनुष्यें झालीं.

**अव्यक्तान्महत् महतो अहंकारः ।**––अव्यक्तापासून महत्तत्त्व,महत्तत्त्वापासून अहंकार हीं तीन स्थित्यंतरें जगदुत्पत्तीच्या पूर्वील प्रकृतीचे सूक्ष्म, मध्यम आणि स्थूल भावांचे तीन प्रकार होत. अव्यक्त स्थितींतील जगत्संकल्पाची अव्यक्तता हेंच तेथील प्रकृतिरूप. महत्तत्त्वांतील जगत्संकल्पाची, व्यक्ताव्यक्ततेची उभयात्मकता हेंच तेथील माध्यमिक प्रकृतिरूप. अहंकारांतील जगत्संकल्पाचें प्रत्यक्ष स्थूलरूप हेंच तेथील प्रकृतीचें, जगदाकाराचें स्थूलरूप होय. बीज असेपर्यंत अव्यक्त अंकुराप्रमाणें महत्तत्त्व, त्या अंकुरापासून पुढें व्यक्त व निरनिराळीं होणारीं दोन पानें हेंच स्थूल प्रकृतिपुरुषांचें प्रथक् स्वरूप. यांच्यापासून विस्तारलेलें यांचें द्वंद्वात्मक स्थूलरूपच हा विश्वप्रपंच. या अव्यक्त, महत्तत्त्व आणि अहंकार यांच्या अभिमानी परमात्मस्वरूपाला ईश्वर, हिरण्यगर्भ

आणि विराट अशीं क्रमशः तीन नांवें आहेत. उपरिनिर्दिष्ट बृहदारण्यक श्रुति पूर्वापररूपानें विराटपुरुषच एक चतुर्मुख ब्रह्मदेवाच्या रूपानें झाला असें सांगते. या ब्रह्मदेवापासूनच मनु-शतरूपा यांचा जन्म झाला. यांच्यापुढें अखिल पतिपत्न्यात्मक जोडप्यांचें निर्माण व या पतिपत्नींच्या जोडप्यांपासून तदीय तद्रूपाची सृष्टि झाली. ब्रह्मदेवाला एकट्याला करमेनासें झालें. इथेहि एकट्याला करमत नाहीं. ब्रह्मदेवानें आपल्या दुसऱ्या रूपाची इच्छा केल्याप्रमाणें येथें सुद्धां पुरुष आपल्या दुसऱ्या रूपाची इच्छा करतो;तीच स्त्री. विवाहापूर्वीं स्त्रीची वासना पुरुषाच्या ठिकाणीं उत्पन्न होते हेंच एकवटलेलें स्त्रीपुरुषांचें रूप. त्या वेळीं दोन भाग होण्यापूर्वीं दोन भागांची भावना निर्माण करणारें,एकाला एक चिकटून असणारें पृथक् करणाचें पूर्वरूप एक होतें. प्रकृतिपुरुषांचीं दोन वेगवेगळीं रूपें होण्यापूर्वीं ते दोन्ही भाग एकमेकांना चिकटून असल्याप्रमाणें एकत्र असतात. प्रकृतिपुरुषाचें व तसेंच स्त्रीपुरुषांचें रूप स्थूलत्वानें पृथक् होण्यापूर्वीं एका वासनेंत तें सूक्ष्म रूपानें एकात्रित असतें. एका वेळूचे उभे दोन भाग करून ते अर्धे अर्धे जोडले म्हणजे जसा एक वेळू पूर्ण होतो त्याप्रमाणें पुरुषाचा प्रकृति अथवा स्त्री—रूपाचा अर्धा भाग त्याच्याशीं जोडला कीं गृहस्थाश्रमांत एक अखंड देह होतो. सतीपतींनीं एकदेहन्यायानें वागावें म्हणून याचकरितां म्हणतात. प्रजाकाम असणाऱ्या पुरुषाचा वासनेच्या रूपानें असणारा अर्धभाग विध्युक्त विवाहांत धर्मपत्नीच्या रूपानें व्यक्त होतो. सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवानें पति-पत्नीचा संकल्प करून आपल्या देहाच्या दक्षिणवाम भागापासून स्त्रीपुरुषांना निर्माण केलें. निर्माण करण्याकरितां दुसरें कांहीं तेथें नसल्यामुळें त्यानेंच तीं दोन्ही रूपें धारण केलीं. त्यानें स्वतःच आपल्या दाक्षिणवाम भागांनीं स्त्रीपुरुष रूपें धारण केलीं. हींच मनु आणि शतरूपा होत. या शतरूपा-मनूच्या योगानेंच मनुष्यें अथवा मानव झाले. मनुस्मृतींत पहिल्या अध्यायांतील बत्तिसाव्या श्लोकापासून या सृष्टिक्रमाचें वर्णन आलें आहे. उदाहरणार्थ—

**द्विधा कृत्वात्मनो देहमर्धेन पुरुषोऽभवत् ।**
**अर्धेन नारी तस्यां स विराजमसृजत्प्रभुः ॥ ३२ ॥**
**तपस्तप्त्वाऽसृजद्यं तु स स्वयं पुरुषो विराट् ।**
**तं मा वित्तास्य सर्वस्य स्रष्टारं द्विजसत्तमाः ॥ ३३ ॥** ( मनु. १ )

या श्लोकांवरून मनु ब्रह्मदेवापासून जन्मास आल्याचें व त्याच्यापासून

सृष्टि उत्पन्न झाल्याचें स्पष्टपणें कळून येतें. हें ब्राह्मणांनो, या सर्वांचा उत्पत्तिकर्ता मीच म्हणून समजा, असा मनूनें आपला परिचय करून दिला आहे. **मनोर्जाता मनुजाः। मनोर्भवा मानवाः। एवमेव यदिदं किं च मिथुनमापिपीलिकाभ्यस्तत् सर्वमसृजत** ॥ ( बृ. १–४–४ ) याप्रमाणें सर्व जातींतील जोडप्यांची उत्पत्ति झाली. स्त्री-पुरुषांचीं युग्में उत्पन्न झालीं.

## सतीपतींतील मूलग्राही तात्त्विक दृष्टि

प्रपंचाच्या विस्ताराकरितां गृहस्थाश्रमाच्या वासनेनें परमात्म्यानेंच आपल्या प्रकृतिपुरुषात्मक स्त्रीपुरुषांचें रूप धारण केलें. शतरूपा आणि मनु यांची जोडी प्रथम निर्माण झाली असल्यामुळें तिचींच पुढें भावी पतिपत्नींचीं अनेक युग्मरूपें झालीं. अखंड असलेलेंच दोन भाग होऊन त्या दोन भागांच्या एकत्रीकरणानेंच पुन्हां एक पूर्ण भाग होण्याच्या या नियमानुसार अखंड एक असलेलें परमात्मस्वरूप पतिपत्नींच्या रूपानें दोन भाग होऊन, त्या दोन भागांच्या एकीकरणानेंच एक त्यांचें संपूर्ण रूप होतें. पतिपत्नी हे एका देहाच्या वामदक्षिण भागाप्रमाणें अन्योन्य आहेत. या मूलग्राही तात्त्विक दृष्टीचा विचार करूनच्च प्रवृत्तिमार्ग हा आंखला गेला. परमात्म्याच्या ऐक्यज्ञानानें सतीपतींना प्रवृत्तिमार्ग हा त्यांच्या मोक्षाला कारण व्हावा म्हणून त्यांत सतीपतींतून एकात्मता निर्माण केली, एकदेहन्याय सांगितला. स्त्रीला ‘ वामा ’, ‘ द्वितीया ’ अशीं नांवें आहेत. या दोन नांवांच्या उच्चारावरूनच पूर्वीचें सर्व विवरण लक्षांत येईल. **अर्धो वा एष आत्मनो यत्पत्नी** ।–पतीचा वामभाग सती होते. **प्रतीपदर्शिनी वामा वनिता महिला तथा । पत्नी पाणिग्रहीती च द्वितीया सहधर्मिणी** ॥ ( अ. द्वि. कां. ) या दृष्टीनेंच **अन्योन्यस्याव्यभीचारो भवेदामरणान्तिकः । एष धर्मः समासेन ज्ञेयः स्त्रीपुंसयोः परः** ॥ (मनु. ९।१०)

गृहस्थाश्रमांत पतिपत्नींची अनन्यता आमरणांत असली पाहिजे व हाच संक्षेपतः स्त्रीपुरुषांचा मुख्य धर्म म्हणून मनूचें सांगणें आहे. तात्त्विक दृष्टीनेंहि मनूच्या आज्ञेप्रमाणेंहि पतिपत्नींचा अन्योन्यसंबंध एका देहाच्या दक्षिणवाम भागाप्रमाणें अविभाज्य आहे, हें समजून आलें असतां कोणता विचारी मनुष्य पुनर्विवाहाला संमति देईल; शास्त्रविरुद्ध विजातीय विवाहाला अथवा असवर्ण विवाहाला तयार होईल व तशा प्रकारचे कायदे करील ?

एका देहाचे दक्षिणवाम भाग दुसऱ्या एका देहाचे दक्षिणवाम भाग

जसे होणार नाहींत त्याचप्रमाणें एका स्त्रीपुरुषदेहाच्या दक्षिणवाम भागाचे पुरुष-पत्नी दुसऱ्या एका पुरुष-स्त्रीदेहाचे दक्षिणवाम भाग म्हणजे पतिपत्नी होणार नाहींत. हा मनुष्यप्राण्यांचा संबंध दाखविणारा तात्त्विक विचार आहे.

**अशनापिपासे एवाभिविज्ञानम् ।** या उपनिषद–वाक्यानुसार भोगयोनी असलेल्या मनुष्येतर प्राण्यांना हा नियम नाहीं. मोक्षप्राप्तीला कारण असणारा विचार त्यांना नसल्यामुळें मनुष्यच विवेक-विचारद्वारां मोक्षाला पात्र होत असल्यामुळें या तात्त्विक विचाराचें आचरण सर्व मनुष्यांनाच अत्यावश्यक आहे. हा मानवधर्म म्हणून म्हटला जातो.

**अयं द्विजैर्हि विद्वद्भिः पशुधर्मो विगर्हितः ।**
**मनुष्याणामपि प्रोक्तो वेने राज्यं प्रशासति ॥** ( मनु. ९।६६ )

या श्लोकांत एका स्त्रीला दुसरा पति होणें हा मनुष्यधर्म नसून पशुधर्म आहे असें मनूचें सांगणें आहे. पूर्वीं हा प्रकार नव्हता. अधार्मिक वेन राजाच्या कालापासून हा पशुधर्म मनुष्यांत प्रविष्ट झाला. याला अनीतीमान, अधार्मिक वेन राजाच कारण होय. विवेकविचारयुक्त मनुष्य अशा तऱ्हेचा पशुधर्म आचरूं लागला तर तो पशुतुल्यच होतो असें वरील श्लोकावरून स्पष्ट होतें. मनुष्यामध्यें या पशुधर्माचा म्हणजे पुनर्विवाहाचा प्रचार व आचार कायद्यानें करण्याची प्रवृत्ति म्हणजे मनुष्यांना पशुतुल्य करण्याचा खटाटोपच होय, असें मनूच्या श्लोकावरून व विचारावरून लक्षांत येईल. त्या त्या ऋषींची संतति त्या त्या गोत्रावरून ध्यानांत येते. भारतवर्षांत त्या त्या गोत्रद्वारां एकेक अविच्छिन्न परंपरा चालत आली आहे. पुनर्विवाहानें, असवर्ण विवाहानें ब्राह्मणांतील ही ऋषि-परंपरा नष्ट होते. हा वर्णसंकर **संकरो नरकायैव ।** म्हटल्याप्रमाणें नरकाला कारण आहे. नरकापेक्षां याच्यापासून दुसरा कोणताहि लाभ एरवीं दिसून येणार नाहीं. नाहीं म्हणावयाला यापासून दुष्ट प्रजेचा एक दुसरा भरपूर लाभ मात्र होईल!

**इतरेषु तु शिष्टेषु नृशंसानृतवादिनः ।**
**जायन्ते दुर्विवाहेषु ब्रह्मधर्मद्विषः सुताः ॥** ( मनु. ३।४१ )

—शास्त्रोक्त विवाहाचा त्याग करून बाकीच्या निंद्य विवाहानें क्रूर, अनृतवादी, वेदविद्वेषशील, धर्मद्वेषी प्रजा होते.

**अनिंदितैः स्त्रीविवाहैरनिंद्या भवति प्रजा ।**
**निंदितैर्निंदिता नृणां तस्मान्निंद्यान्विवर्जयेत् ॥** ( ३-४२ )

—अनिंद्य कुमारिकेशीं विध्युक्त झालेल्या विवाहानें सर्व दृष्टीनेंहि अनिंद्य प्रजा निर्माण होते. निंद्य कुमारिकेशीं अविधियुक्त झालेल्या विवाहानें निंद्यच प्रजा निर्माण होते. या कारणानें निंद्य कुमारिकेशीं अविधीनें कधींहि विवाह होऊं नये. समाजशास्त्रज्ञ, प्रजाहितदक्ष मंत्री, पुढारी इत्यादि या श्लोकाचा अवश्य विचार करतीलच.

**गुरुणानुमतः स्नात्वा समावृत्तो यथाविधि ।**
**उद्वहेत द्विजो भार्यां सवर्णां लक्षणान्विताम् ॥** ( ३-४ )

—सांग वेदाध्ययनानंतर गृहस्थाश्रमाकरितां आचार्यांची अनुज्ञा घेऊन सवर्णाच्या सुलक्षण कन्येशीं विवाह करावा.

**असपिंडा च या मातुरसगोत्रा च या पितुः ।**
**सा प्रशस्ता द्विजातीनां दारकर्मणि मैथुने ॥** ( ३-५ )

—मातृकुलोत्पन्न, पितृगोत्रोत्पन्न वधु निषिद्ध होय. सगोत्र निषेधाचा हा श्लोक आहे.

**हीनजातिस्त्रियं मोहादुद्वहंतो द्विजातयः ।**
**कुलान्येव नयन्त्याशु ससन्तानानि शूद्रताम् ॥** ( ३।१५ )

—मोहानें हीन जातीच्या मुलींशीं ब्राह्मणानें विवाह केला तर तें सर्व कुल, संतति शूद्रत्वाला प्राप्त होते.

**शूद्रां शयनमारोप्य ब्राह्मणो यात्यधोगतिम् ।**
**जनयित्वा सुतं तस्यां ब्राह्मण्यादेव हीयते ॥** ( ३।१७ )
**दैवपित्र्यातिथेयानि तत्प्रधानानि यस्य तु ।**
**नाश्नन्ति पितृदेवास्तन्न च स्वर्गं स गच्छति ॥** ( ३।१८ )

—सवर्ण वधूशीं विवाह न करतां शूद्रिणीशीं विवाह करून तिच्याशीं रमूं लागला तर तो ब्राह्मण अधोगतीस पोहोंचतो, म्हणजे त्याला नरक प्राप्त होतो. तिच्यापासून पुत्र झाला तर ब्राह्मण्यापासूनच तो च्येवतो. त्याचें ब्राह्मणत्व नष्ट होतें. हीन जातीच्या स्त्रीशीं विवाह केला तर ती अर्धांगी म्हणून देवपितृ-कार्यांत बरोबर बसूं शकत नाहीं, ब्राह्मण अतिथीस वाढूं शकतहि नाहीं. (तिच्या हातच्या ) हव्यकव्यांचा देवपितर स्वीकार करीत नाहींत. पुढें श्राद्धहि बंद पडतें. पितरांना पिंड लाभत नाहीं. अतिथि, इष्टमित्रसुद्धां त्याचें घर वर्ज्य करतात. अशा रीतीनें सर्व सत्क्रियांचा लोप होतो. तोहि पण हीन व निंदित होतो. पातित्यामुळें त्याला व त्याच्या पितरांना स्वर्ग मिळत नाहीं. पितरांसह स्वतःहि

असला मनुष्य नरकांत पडतो. यानें काय साधलें! ना इह ना पर. **संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च। पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः॥** (भ. गी. १–४२)—प्रजेच्या दृष्टीनेंहि संकराची प्रजा आपलें गोत्र कोणतें म्हणून सांगेल? कोणत्या पितरांना पिंड देईल? कोणत्या कुलाचा अभिमान धरील? बहुतेक अशी प्रजाहि भ्रष्ट आचरणाचीच असते. 'बाप से बेटा सवाई' ही म्हण अशांच्या बाबतींत अधिक लागू पडते!

## सगोत्रविवाह–निषेध

**सर्ववर्णेषु तुल्यासु पत्नीष्वक्षतयोनिषु।**
**आनुलोम्येन संभूता जात्या ज्ञेयास्त एव ते॥** (मनु. १०।५)

—ब्राह्मणादि चार वर्णांतहि त्या त्या वर्णाच्या शास्त्रोक्त विवाहाच्या परिशुद्ध स्त्रियांतून उत्पन्न झालेली संततीच त्या त्या वर्णाची म्हणून मानली जाते. अशामुळेंच वंशान्वय राहातो. यांनाच त्या त्या जातीचे विध्युक्त संस्कार होतात. देवपितृकार्यांत यांनाच अधिकार पोहोंचतो. हेच उत्तराधिकारी होतात. यांनाच उत्तरक्रियेचा अधिकार असतो. पुत्र म्हणून हेच म्हणवून घेतात. **पुन्नाम नरकात् त्रायत इति पुत्रः।**—'पुत्' नांवाच्या नरकापासून सोडवितो तोच पुत्र अशी पुत्राची व्याख्या अशा औरस संततीलाच लागू पडते.

**ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यस्त्रयो वर्णा द्विजातयः।**
**चतुर्थ एकजातिस्तु शूद्रो नास्ति तु पंचमः॥** (१०।४)

—ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य म्हणवून घेणाऱ्या अशा या तीन आणि शूद्राची एक चौथी, मिळून चारच भारतांतल्या मूळ आणि मुख्य जाती. या चारांशिवाय पांचवी म्हणून एकहि जात नाहीं. याहून वेगळ्या दिसून येणाऱ्या बाकीच्या सर्व पोटजाती. या पोटजातींना संस्कार नाहीं. मनुस्मृतीच्या दहाव्या अध्यायांत यांच्याविषयींचें विवेचन आहे. स्मृतिग्रंथांतून यांना वेगवेगळीं नांवें आहेत. यांच्याकरितां वेगवेगळे व्यवसायहि नेमून दिले आहेत. अशी ही आर्य संस्कृति आहे. विश्वमान्य आर्य संस्कृतीच्या धर्मग्रंथांच्या प्रमाणेंच त्या धर्मानुयायांचा विचार व्हावयास पाहिजे. त्यांच्या धार्मिक प्रणालीचें उल्लंघन न होईल असा न्याय देणें व त्यांच्याविषयींचा विचार करणें, राजकीय, सामाजिक कायदे त्याविरुद्ध न होतील याची काळजी घेणें राजकर्त्यांचें कर्तव्य आहे. इहपर उन्नत–सुखास कारण होणाऱ्या उच्च संस्कारांचा आदर्श

क़ायम राखण्याकरितां व सरभेसळीनें ते संस्कार नष्ट होतात म्हणून जाती, जातीधर्मकर्म, व्यवहार, व्यवसाय इत्यादि वेगवेगळे सांगितले आहेत. अन्य जातीशीं रोटीबेटीच्या व्यवहाराचा निषेधहि पण याचकरितां केला आहे. स्पृश्यास्पृश्य विचारांना जें इतकें महत्त्व दिलें जातें तेंहि याचकरितां. अनार्यता, निष्ठुरता, क्रूरता, निष्क्रियात्मता—**पुरुषं व्यंजयन्तीह लोके कलुषयोनिजम्** ॥ ( मनु. १०–५८ ) सदाचारहीनता म्हणजेच अनार्यता. कठोर भाषण, कठोर स्वभाव, क्रूरवृत्ति, हिंसात्मक क्रिया, स्वपरहिताच्या युक्तकर्मांचें अनुष्ठानत्व इत्यादि हीं लक्षणें संकरजातित्व प्रगट करतात. **पित्र्यं वा भजते शीलं मातुर्वो भयमेव वा । न कथंचन दुर्योनिः प्रकृतिं स्वां नियच्छति** ॥ ( मनु. १०–५९ )—संकरोद्भव मनुष्याच्या ठिकाणीं पितृसंबंधीं, मातृसंबंधीं अथवा उभयसंबंधींहि दुष्ट स्वभाव दिसून येतो. आपल्या संकरत्वाचा व जन्माला कारणीभूत असणाऱ्या मातापितरांचा स्वभाव आपल्या गुणांनीं प्रगटविल्याशिवाय तो कधीं राहातच नाहीं. **कुले मुख्येऽपि जातस्य यस्य स्याद्योनिसंकरः । स श्रयत्येव तच्छीलं नरोल्यमपि वा बहु** ॥ ( मनु. १०–६० ) मोठ्या कुलांतला म्हणवून घेत असला तरी संकरयोनीचा मनुष्य कांहीं अंशानें तरी आपल्या जन्माला कारण असलेल्या पित्याच्या वळणाचा असतोच. त्याला वर्णव्यवस्था मान्य होत नाहीं. ज्या वर्णीयापासून अथवा ज्या धर्मीयापासून त्याची उत्पत्ति झाली असते त्या धर्मावर व त्या वर्णावर त्याची विशेष प्रीति दिसून येते. त्या त्या वर्णाप्रमाणें व त्या त्या धर्माप्रमाणें वागावें असें त्याला वाटतें. त्या त्या वर्णाच्या व धर्माच्या लोकांना विशेष साहाय्य करावें, इतकेंच नव्हे तर स्वकुलांतल्या व स्वधर्मांतल्या आपल्या माणसांनीं तसेंच वागावें असें त्याला वाटतें व त्याप्रमाणेंच तो आपला अधिकार चालवून आपल्या कुटुंबांत अथवा राष्ट्रांत नियम घालूं लागतो.

अलीकडच्या बहुजनांच्या दृष्टिकोनाचा विचार केला म्हणजे, या सिद्धांतानुसार यांपैकीं कोणाचीच बीजशुद्धि नाहीं, म्हणून सांगण्याचा सूर यांतून निघाल्यासारखा वाटला तरी, तो केवळ तसाच मानतां येत नाहीं. कारण, विचारसंकराचें, आचारसंकराचें, आहारसंकराचें, शिक्षणसंकराचें, देशसंकराचें, आईबापांतून कोणीहि असलें तरी पुरे. यांच्यांत जातीसंकर, अथवा धर्मसंकरच व्हावयास पाहिजे असें नाहीं. त्यांच्या संततींत तोच संस्कार उतरतो. अथवा लहानपणापासून भिन्न धर्मा व भिन्न जातीच्या माणसांत,

भिन्न देशांत, भिन्न संस्कारांत, भिन्न आचारविचारांत व भिन्न शिक्षणांत जर तो वाढला असला तरी त्याचीच त्याला अधिक प्रीति दिसून येते. कित्येक राजेरजवाड्यांतून व गर्भश्रीमंतांतून इतर वर्णाच्या व इतर धर्माच्या दाया असतात. त्यांचें दूधहि असें करतें. हाहि एक प्रकारचा संकरच होतो. बहुजन समाजाच्या विचारांचा पगडा इतरांवर पडूनहि असें होण्याचा संभव असतो. सार्वजनिक शिक्षणाचा परिणामहि कारण होतो. हाहि एक प्रकारचा संकरच आहे. गर्भ राहावयाच्या वेळीं ज्याची आठवण होते, जी कल्पना येते, जें पुढें दिसतें, त्याच्या वाईट-चांगलेपणामुळेंहि, गर्भावर परिणाम होऊन ती संतति, त्याच्याप्रमाणें चांगली-वाईट होते. गर्भ राहिल्यानंतरहि कांहीं कालपर्यंत समोरील दृश्याचा, जवळच्या संगतीचा, सभोंवारच्या वातावरणाचा, खाण्या-पिण्याचा, कांहीं अंशानें त्या गर्भावर, त्या त्या प्रमाणें चांगलावाईट परिणाम होतो. झोंपावयाच्या खोलींतल्या निग्रोच्या फोटोवर दृष्टि पडल्यामुळें एका सच्छील नवराबायकोच्या पोटीं स्वभावानें व रूपानें निग्रोसारखाच मुलगा झाला. कारण काय हें न जाणून एका साधूला विचारावयाला गेले असत त्यानें त्या फोटोची जाणीव देऊन समाधान केल्याचें, एका ठिकाणीं ऐकलेलें आठवतें. हाहि एक प्रकारचा संकरच आहे. आपली संस्कृति हीन वाटूं लागली व दुसऱ्या संस्कृतीचा प्रचार आपल्यांतून व्हावा अशी बुद्धि झाली कीं, यांपैकीं कोणत्या प्रकारचा कां होईना, संकर झाला असें मानावेंच लागतें. अलीकडच्या काळांत तर, कित्येक मुंबईसारख्या शहरांतलीं तरुण मुलेंमुली, घरीं केलेले पदार्थ टाकून, इराण्याच्या अथवा ख्रिश्चनांच्या हॉटेलांत जातात, त्यांचे संस्कार काय होतील ? सनातनी आईबाप असले तरी, मुलगा कॉलेजांतहि जावयाला नको, साध्या इंग्रजी शाळेंत गेला तरी, पुढें क्रॉप ठेवतो, बूट घालतो, आणि ' तुम्ही जुन्या काळची मंडळी ' म्हणून तो सरळ आपल्या आईवडिलांना नांवें ठेवतो, सोवळ्याओंवळ्याची हा टिंगल करतो व जाती-धर्माला तर तो झुगारूनच देतो. असा हा वातावरणाचा परिणाम होतो.

**सत्संगाद्भवति हि साधुता खलानां । साधूनां न हि खलसंगमात्खलत्वम् । आमोदं कुसुमभवं मृदेव धत्ते । मृद्गंधं न हि कुसुमानि धारयन्ति ॥** (सुभाषित.) **आमोदं कुसुमभवं मृदेव धत्ते ।**—"पुष्पसंगें मातीस वास लागे." —या अनुभवाप्रमाणें विदेशीय, विधर्मीय, विजातीय, परभाषीय संस्कार, आपल्यावर न होऊं देतां, त्यांच्यावरच उच्च आर्यांच्या या संततीचा कां

परिणाम होत नाहीं ? असें कोणी विचारल्यास ती आर्यांची वृत्ति आज शेंकडों वर्षांपासून निर्भेळ अशी ठेवली गेली नसल्यामुळें, त्यांच्या या संततींतून तो प्रभाव उरला नाहीं; त्यामुळें चटकन अन्यांचा परिणाम त्यांच्यावर होतो. नियमाला अपवाद असतोच. आपल्या आचारविचारानें दुसऱ्या धर्मीयांवर व दुसऱ्या संस्काराच्या माणसांवर परिणाम उत्पन्न करणारी मंडळी पूर्वी नव्हती व आज नाहींत असेंहि म्हणतां येत नाहीं. मुसलमानी अमदानींत कबिरासारख्या अनेकांवर या हिन्दु संस्कृतीचा परिणाम झाला. इंग्रजी अमदानींत मॅक्समुल्लर आदि कित्येकांवर परिणाम झाला. भगवीं वस्त्रें धारण करून कित्येक पाश्चिमात्य, वैदिक संन्यस्त वृत्तीच्या शांत जीवनाचा आतांहि अभ्यास करीत आहेत. कित्येक पाश्चिमात्य नवराबायकोंचीं जोडपीं, धोतर-लुगडीं नेसून, भस्म-कुंकू लावून, आर्य संस्कृतीचा आदर दाखवितात. त्या मुसलमानांच्या अमदानींतच मुकुंदराज, ज्ञानेश्वर, श्रीपाद श्रीवल्लभ, श्रीनृसिंह सरस्वति, तुलसीदास, श्रीसमर्थ, तुकारामादि संत झाले. बिरबलासारखे प्रधान झाले. इंग्रजी अमदानींत विवेकानंद, रामतीर्थ, टिळक, गोखले, पं. मालवीय इत्यादि झालेच.

वर्णदूषक, धर्मदूषक राष्ट्रांत अधिक होणें, कोणीहि विचारी पुरुष अनिष्ट आणि घातुकच मानील.

**यत्र त्वेते परिध्वंसा जायन्ते वर्णदूषकाः ।**
**राष्ट्रियैः सह तद्राष्ट्रं क्षिप्रमेव विनश्यति** ॥ ( मनु. १०।६१ )

—ज्या कुलांत व ज्या राष्ट्रांत असे धर्म व वर्ण-विध्वंसक लोक अधिकारपदावर असतात अथवा विशेष मनुष्यबळानें अथवा द्रव्यबळानें युक्त असतात तें कुल व तें राष्ट्र यांच्या स्वतःच्या अनाचारानें व अनाचाराच्या हट्टी प्रचारानें थोड्याच अवधींत नष्ट होतें, असा या वरील श्लोकाचा अर्थ आहे. किती कष्ट झाले, वेळीं आत्मयज्ञ करावा लागला तरी मागें पुढें न पाहातां प्रत्येक सज्जनानें वैदिक संस्कृतीच्या रक्षणार्थ झटावें, जिवापाड कष्ट सोसावेत. ब्राह्मणजातीवरच जगाच्या इहपर कल्याणाची भिस्त आहे. स्वाभाविकच त्यांचे उच्च संस्कार असतात. उच्च संस्काराचे परिणाम त्यांच्या गर्भावस्थेपासूनच होत असतात. उच्च संस्कार अशा रीतीनें त्यांच्या रक्तांतूनच भिनलेले असतात. **ब्राह्मणांनीं आपला अधिकार व उत्तरदायित्व ओळखून असावें.** अजूनसुद्धां ब्राह्मणाविषयीं स्वाभाविकच समाजांत आदर दिसून येतो. **गोब्राह्मणेभ्यः शुभमस्तु नित्यं लोकाः समस्ताः सुखिनो भवन्तु** ।-गोब्राह्मणांना

शुभ आणि क्षेम असलें म्हणजे सर्व लोकच सुखी होतात हें या प्रार्थनेंतून स्पष्ट होतें. गोब्राह्मण समाजाचे घटक आहेत. **नमो ब्रह्मण्यदेवाय गोब्राह्मण-हिताय च ।** असें म्हणूनच देवाला नमस्कार करण्याची पद्धत आहे. गो-ब्राह्मणांना एकदा राखलें म्हणजे जगाचें आपोआपच संरक्षण होतें ही देवाचीहि कल्पना आहे. समाजाच्या जबाबदार मनुष्याचीहि ती तशी असावी. या विषयासंबंधींचा मनूचा एक श्लोक सहज ओघानें आठवला.

**ब्राह्मणार्थे गवार्थे वा देहत्यागोऽनुपस्कृतः ।**
**स्त्रीबालाभ्युपपत्तौ च बाह्यानां सिद्धिकारणम् ॥** ( मनु. १०-६२ )

—गोब्राह्मण आणि स्त्रीबालक यांच्या रक्षणार्थ प्रसंगीं प्राणत्याग करणेंहि श्रेयस्कर होतें, असें मनूचें म्हणणें आहे. ब्राह्मणांनीं आपल्या आचरणांनीं आजपर्यंतचें पूज्यत्व पुढेंहि कायम राखिलें पाहिजे. आपल्या सत्त्वबलानें मनुष्य जगतो हेंहि पण विसरतां कामा नये.

**परित्यजेदर्थकामौ यौ स्यातां धर्मवर्जितौ ।**
**धर्मं चाप्यसुखोदर्कं लोकविक्रुष्टमेव च ॥** ( ४।१७६ ).

—धर्मविरुद्ध असणारीं द्रव्योत्पादनाचीं साधनें त्यागावींत. अधर्मानें लाभणारें धन स्वीकारूं नये. धर्माला अविरुद्ध इच्छा बाळगाव्यात व त्यांच्या पूर्तीचे प्रयत्न करावेत. धर्मविरुद्ध कसलीहि इच्छा मुळीं करूंच नये. गृहस्थांनीं स्वधर्मोचित ' काम ' केवळ सत्संततीकरितांच बाळगावा. परिणामीं असुखकारक व सज्जनमन संतापजनक कार्यांत कर्तव्यबुद्धि अथवा धर्मबुद्धि ठेऊं नये.

**अधार्मिको नरो यो हि यस्य चाप्यनृतं धनम् ।**
**हिंसारतश्च यो नित्यं नेहासौ सुखमेधते ॥** ( ४।१७७ )

—अधार्मिक आचरणाचा, असत्यादि अमार्गीय धनोपार्जनचा, हिंसा-प्रधान जीवनाचा मनुष्य या जगांत कधींहि सुखी होत नाहीं.

**न सीदन्नपि धर्मेण मनोऽधर्मे निवेशयेत् ।**
**अधार्मिकाणां पापानामाशु पश्यन्विपर्ययम् ॥** ( ४।१७१ )

—धर्माच्या अनुष्ठानानेंच असतां कसलेहि कष्ट आले, असलेली संपत्ति नष्ट होऊन अन्नाची ददात जरी भासूं लागली तरी अधर्माकडे कधीं वळूं नये, कारण अधर्मानें अधार्मिकांना, पापानें पाप्यांना लौकरच्च त्यांच्या पापकर्माचें फळ याहून अधिक मिळाल्याशिवाय राहात नाहीं. अधर्मानें स्वतःला व पुढें पुत्रादिकांना अत्रीं परत्रीं व पुढच्या जन्मींहि दुःख अनुभवावें लागतें व पुढें

च धर्ममार्गांत असूनहि इथे मिळालें नाहीं तरी स्वतःला व पुढें पुत्रादिकांनाहि परत्रीं व पुढच्या जन्मीं तरी खास सुख आहेच, म्हणून परत्रसाधनाकरितां तरी धर्माचरण करावें. चांगल्याचें चांगलें व वाईटाचें वाईट असें फळ आज ना उद्यां मिळाल्याशिवाय कधींहि राहात नाहीं.

**नाधर्मश्चरितो लोके सद्यः फलति गौरिव ।**
**शनैरावर्तमानस्तु कर्तुर्मूलानि कृन्तति ॥**

—कांसेला हात घालून दूध काढूं लागल्याप्रमाणें अधर्म तात्कालच फळ देतो असें नाहीं. सावकाशपणानें अधर्म कर्त्याचें सर्वतोपरि निर्मूलन करतो. त्याच्या संततिसंपत्तीचेंहि निर्मूलन करतो.

**यदि नात्मनि पुत्रेषु न चेत्पुत्रेषु नप्तृषु ।**
**न त्वेव तु कृतोधर्मः कर्तुर्भवति निष्फलः** ॥ ४–१७३ ॥
**अधर्मेणैधते तावत्ततो भद्राणि पश्यति ।**
**ततः सपत्नाञ्जयति समूलस्तु विनश्यति** ॥ ४–१७४ ॥

—पापाचा परिणाम एकदम दिसला नाहीं तरी मुलगा, नातु, पणतु म्हणून पुढें तरी त्याच्या कुलांत त्यांना तें अनुभवावें लागतेंच. अधर्मानें प्रथम प्रथम पैसा, बायकामुलें, दासदासी, मोठा वाडा इत्यादिकांनीं वैभव प्राप्त झाल्यासारखें दिसलें तरी, आपल्याविरुद्ध असणाऱ्या सज्जनांना जनधन-बलानें कष्ट देऊन त्यांच्यावर जय मिळविल्यासारखें वाटलें तरी, वेळ आली कीं तो अधर्म या सर्वांचा एका क्षणांत समूल नाश करून टाकतो. मग हें 'स्वप्नप्रपंचा' प्रमाणें होतें कां नव्हतें याप्रमाणें होतें. अधर्म त्याच्या तारतम्यानें कमीअधिक प्रमाणांत व कमीअधिक प्रकालांत फलद्रूप होतोच होतो. कितीहि झांकलें तरी दुष्कृत्यांचा स्फोट झाल्याशिवाय राहात नाहीं. 'Murder will be out' अशी एक इंग्रजी भाषेंतहि म्हण आहे.

विवाहाचा संबंध धर्माशीं आहे, नीतीशीं आहे, स्वतःच्या व भावी पिढीच्या जीवनाशीं आहे. **यथा बीजं तथांकुरः** । या न्यायानें निर्दुष्ट माता-पितरांच्यावरच निर्दुष्ट प्रजा अवलंबून असते. असेंच पुढें जाऊन म्हणावयाचें म्हणजे विवाहाची एक पद्धत निर्दुष्ट झाली म्हणजे सर्व जगच निर्दुष्ट होतें. दृश्य प्रपंचांत एक मनुष्यजातच अशी आहे कीं, जीत नीतिनियम पाळले जातात; जींत स्वेतर स्त्रीच्या ठिकाणीं आईबहिणीचा व्यवहार दिसून येतो. असा उन्नत विचार जर मनुष्यजातींतून नाहींसा झाला तर मनुष्यजातच

नरपशु म्हणवून घेईल. अशी ही पशुवृत्ति थांबविण्याकरितांच केलेल्या अनेक निषेधांतून सगोत्रविवाहाचा निषेधहि पण एक आहे. भारतवर्षांत सर्व ऋषींची संतति आहे. गोत्र सांगणें म्हणजे अमक्या ऋषीच्या वंशान्वयांतला मी आहें म्हणून कळविणें होय. 'अमुक वेदांतर्गत, अमुक गोत्रोत्पन्न, अमुक शर्माऽहंभो अभिवादयामि ' या वैदिक अभिवादनांत म्हणजे संध्येच्या नंतर नित्य केल्या जाणाऱ्या गुरुवंदनांत ऋग्वेदादि विभागांनीं 'अमुक वेदांतर्गत, अमुक सूत्राच्या अमुक शाखेचा, अमुक गोत्रांत उत्पन्न झालेला, अमक्या नांवाचा मी आहें. हे गुरुवर्या, असा मी तुला नमस्कार करतों ' म्हणून गुरु, आचार्य यांना नमन करावयाचें असतें. यांत प्रत्येक ब्राह्मण विशिष्ट वेद, सूत्र, शाखा, प्रवर, गोत्र व नांव उच्चारून आपल्या वंशान्वयाची ओळख करून देतो व ती जाणीव ठेवतो. हा वंशान्वय पुढें अविच्छिन्न चालण्यास कुलीन घराण्याच्या सवर्ण कन्येशीं विवाह करावा. ती सगोत्रांतील असूं नये, म्हणून सांगितलें आहे. एका गोत्राची मंडळी म्हणजे एका ऋषीच्या वंशांतली मंडळी. या दृष्टीनें सगोत्र–विवाह म्हणजे भाऊबहिणींचाच तो विवाह होतो. आणि ही पशुवृत्ति आहे. म्हणून मनुष्यांना, त्यांतून विशेष ब्राह्मणांना, हें सांगितलें आहे. असलेल्या जातींत ब्राह्मणवर्ग आतांपर्यंत कितीहि नाहीं म्हटलें तरी इतरांपेक्षां अधिक प्रमाणांत हें पाळून आहे असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं. आतां तोहि पण विस्कळीत होऊं पाहात आहे. आणि तो तसा करण्याकरितां इतर जातींचा व सरकारचा अनाठायीं आग्रह दिसून येत आहे. जगांतली एक उच्च संस्कृति मालवून सर्वच अंधारांत चांचपडण्याचीच ही योजना आहे. जगाचें भवितव्य काय आहे कोणास ठाऊक ! सत्याच्या आणि तत्त्वाच्या दिव्य जीवनाला हें जग दिवसेंदिवस आंचवत चाललें आहे असें म्हणणें प्राप्त होतें.

एका गोत्राचे लोक एककुटुंबाप्रमाणें असतात. एका कुटुंबांत असणाऱ्या बंधुबंधुप्रमाणें अथवा भगिनीभगिनीप्रमाणें त्या त्या गोत्राचे लोक असतात. असें असल्यामुळें सगोत्र विवाह म्हणजे बंधुभगिनींत लग्न लावण्या इतकी पशुवृत्ती स्वीकारणें होय. त्यांत मनुष्यत्वाची कोणतीहि उच्च भावना दिसून येत नाहीं, हें आपण पाहिलें. सवर्ण विवाहाचा विचार झाला. पुनर्विवाहाचाहि विचार केला. वेन राजाच्या कालापासून तों आतांपर्यंत शूद्रांत, अन्य वर्णांत पुनर्विवाहाचा संस्कार कांहीं अंशीं दिसून येत असला तरी ब्राह्मणांत तो

आतांपर्यंत नव्हता. या वेन राजाची साऱ्याच मानवांना पशुतुल्य करण्याची अवशिष्ट वासना जागृत होऊन हल्लींच्या राज्यसूत्रधाऱ्यांच्या ठिकाणीं शिरली व ती अवशिष्ट ब्राह्मणजाती भ्रष्ट करून आपला दुष्ट संकल्प पूर्ण करण्याकरितां असा प्रयत्न करीत आहे, असें कोणी म्हटल्यास त्याला कोण काय उत्तर देईल?

## आर्यांची विभागपद्धति

भारतवर्षांत ह्या वेदोक्त देवपितृकार्यें चालवीत आलेल्या अविच्छिन्न परंपरेंत पित्रार्जित अधिकार पुरुष संततीलाच आहे. पुरुष संततीच्या योगानेंच परंपरा अविच्छिन्न पुढें चालू राहाते. पुरुष संतति ही स्त्री संततीप्रमाणेंच परगोत्रांत न जातां त्या गोत्रांतच राहाते, आपल्या कुलांतच असते. पुरुष संततीलाच देवपितृकार्यें चालविण्याचा आणि वंशवृद्धीचा अधिकार पोहोंचत असल्यामुळें त्यांना पित्रार्जित संपत्तीचा अधिकार असणें ओघानेंच प्राप्त होतें. पितरांचा उद्धार त्या त्या वंशाच्या पुरुष संततीपासूनच होतो, स्त्री संततीपासून नाहीं, असें 'पुत्रः' या शब्दाच्या व्युत्पत्तीवरून स्पष्ट होतें. याचा विचार मागें आला आहे. उत्तरक्रियेचा अधिकारहि पुरुष संततीलाच असतो. या सर्व विचारावरून पूर्वीपासून चालत आलेल्या पुरुष संततीलाच वडिलार्जित संपत्तीचा वांटा देण्याची पद्धत शास्त्रीय आणि सयुक्तिक आहे असें कोणास वाटणार नाहीं? धर्माच्या पूर्वपरंपरेचा विचार करून, विद्वान पंडितांशीं साधकबाधकांचा संपूर्ण उहापोह करून, धर्माला विरोध न येईल अशा रीतीनें समाजाच्या अभ्युदयनिःश्रेयसाकरितां अनुकूल असे कायदे, नियम केले पाहिजेत. असें न करतां अविचारानें कायदे करून विश्वादरणीय संस्कृतीचा नाश करण्यांत एक त्या संस्कृतीचा द्रोहच नव्हे, अखिल विश्वाचा आदर्शच नाहींसा करून विश्वद्रोहालाच पात्र होणें आहे, असें विचारदृष्ट्या कोणासहि कळून येईल.

तेव्हां माझ्या दृष्टीनें असें कोणी आडमार्गानें न जातां परममंगल व अतिपवित्र आनंदघन स्वरूपाच्या साधनांनीं आर्य संस्कृतीच्या उच्च वातावरणांत नांदून सर्वांनींच कृतार्थ व्हावें असें आहे.

* * *

## भारताच्या सद्यःपरिस्थितीचे कांहीं विचार .......४

' स्वामींनीं केवळ अध्यात्मपर अनुभवाचा, ह्यपरिवर्तनशील युक्तिप्रयुक्तीनें भरलेला एखादा सुंदर वेदांतग्रंथ लिहिला असता तर तो याहून लोकोपकारक झाला असता ' असें कुणाला वाटेल ! त्या विश्वात्म्यानें आज जें पाहिजे तें माझ्या हातून लिहविलें. पुढें तशाच केवळ ग्रंथाची जेव्हां समाजाच्या भूमिकेनुसार आवश्यकता भासेल त्या वेळीं तसाहि ग्रंथ माझ्या हातून तो लिहवील. " त्याचा तोचि । आपणास ठाव नाहीं " हीच त्या परमात्म्याची अनन्यता. गरजेनुसार परमात्मा पुरवठा करतो, या सिद्धांतानुसार आजकालच्या परिस्थितीला अनुसरून असाहि संदेश देवविला अशा विचारानें कुणालाहि समाधान होईल.

हा शेवटचा भाग आहे. भारताच्या सद्यःपरिस्थितीचा कांहीं विचार या भागांतून आपण करणार आहोंत. ' हरिदास मूळपदावर आले ' असें म्हटल्याप्रमाणें हा ग्रंथ संपतहि आला. हा समारोप आहे. थोड्या फार प्रमाणांत यांतून व सबंध ग्रंथांतूनहि आलेलेच विचार थोड्याशा फरकानें पुन्हां आल्यासारखे वाटतील. इथे मला श्रीसमर्थांच्या ओव्या आठवतात. " कर्म केलेंचि करावें । ध्यान धरलेंचि धरावें । विवरलेंचि विवरावें । पुन्हां निरूपण ॥ १ ॥ तैसें आम्हांस घडलें । बोलिलेंचि बोलणें पडलें । **कां जें विघडलेंचि घडलें । पाहिजे समाधान** ॥ दास. ११।५।२ ॥ " सद्यःपरिस्थितीच याला कारण आहे. " देवास जयाची अत्यंत प्रीति । आपण वर्तावें तेणें रीतीं । येणें कारितां भगवंतीं । सख्य घडे नेमस्त ॥ ( ४–८–३ ) आपण तैसेंचि वर्तावें । आपणासी तेंचि आवडावें । मनासारखें होतां स्वभावें । सख्य घडे नेमस्त ॥ ५ ॥ " या प्रकरणांत मागच्याची थोडी आठवण व देवानें बुद्धि दिल्याप्रमाणें दुसरे कांहीं विचार आपण करूं. सद्यःपरिस्थितींतून युक्तीनें सुटण्याचेच विचार देव स्फुरवील हें निःसंशय.

**त्रयाणामाश्रमाणां च गृहस्थो योनिरुच्यते । सीदमानेन तेनैव सीदन्तीहेतरे त्रयः** ॥ (दक्ष स्मृ. २–५८)—ब्रह्मचर्य, वानप्रस्थ आणि संन्यास या विमल आश्रमत्रयाचीहि जन्मभूमि गृहस्थाश्रमच आहे. भूकंपानें हीच हालूं

लागली तर तिनें धारण केलेल्या आश्रमत्रयाची काय अवस्था होईल ! गृहस्थाश्रमाचा आधार आणि आदर्श का एकदां ढासळला म्हणजे उदात्त जीवनाचे हे तीन आश्रमहि ढांसळतात, म्हणजे उत्कृष्ट ब्रह्मचारी, उत्कृष्ट वानप्रस्थ आणि उत्कृष्ट संन्यासी होण्याची भूमिकाच कोणाला लाभत नाहीं असें दक्षानें सांगितलें आहे. गृहस्थाश्रमाचा हा पाया बळकट करावा असें कोणालाहि वाटणारच. गृहस्थाश्रमाचें सत्य रूप आर्य संस्कृतींत प्रगट झाल्याप्रमाणें इतर कुठेहि तसें तें आपल्या शुद्ध रूपानें दाखवून घेत नाहीं. आर्य संस्कृतीचा गृहस्थाश्रम तात्त्विक आहे. इतर ठिकाणीं विषयभोगाचें हिडीस स्वरूप दिसल्यास आर्यांच्या गृहस्थाश्रमांत तत्त्वाचा साक्षात्कार होतो. कन्यादानांत व गृहस्थाश्रमांतहि आर्यांची कशी मूलग्राही तत्त्वदृष्टि आहे, याचें प्रथम थोडें परिशीलन करून पुढें जाऊं. या आदर्शभूत पवित्र भावनेचें उच्चाटण करून तिला इतर संस्कृतीचें इंद्रियसुखाच्याच एक केवळ वासनेचें जें रूप देण्याचा प्रयत्न होत आहे, ती पवित्र भावना कायद्याच्या कात्रींत धरून सत्तेच्या दडपणाखालीं पार रगडून टाकावी म्हणून जे प्रयत्न चालत आहेत, ते पाहून यावर आणखी थोडा विचार करावा म्हणून कांटा बोंचलेल्या स्थळाकडेच लक्ष गेल्याप्रमाणें इकडेच मन आकृष्ट होतें, नीट समजाऊन सांगण्याची पुनः पुनः प्रवृत्ति होते. अलीकडील कायद्यांचा विचार केला म्हणजे विवाहासंबंधीं एकच काय 'उडदामाजी काळेगोरे । काय निवडिती निवडणारे ।' म्हटल्यासारखें झालें आहे. विवाह–यांत आर्यांची किती उदात्त दृष्टि आहे पाहा !

### आर्यांची विवाहपद्धति

**कन्यां कनकसंपन्नां सर्वाभरणभूषिताम् ।**
**दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया ॥**
**विश्वंभराः सर्वभूताः साक्षिणः सर्वदेवताः ।**
**इमां कन्यां प्रदास्यामि पितॄणां तारणाय च** ॥ ( विवाह प्रक. )

या वचनांवरून आर्यांच्या विवाहपद्धतींतील उच्च भावना स्पष्ट दिसून येतात : 'ब्रह्मलोक जिंकण्याच्या इच्छेनें (मोक्षप्राप्तीकरितां) विष्णुस्वरूपी असणाऱ्या तुला मी कन्यादान करतों. ही सर्वाभरणभूषित सुलक्षण अशी आहे. या प्रसंगीं मी तुला ही माझी कन्या अर्पण केल्याबद्दल विश्वांतून व्यापून असलेलीं भूतें, विश्वांतील सर्व देवता साक्षी आहेत.' पितरांच्या उद्धाराकरितांहि हें मी कन्यादान

करतों असा या संकल्पाचा अर्थ. कन्यादानांत स्वतःच्या मोक्षाचा व पितरांच्या उद्धाराचा हेतु स्पष्ट दिसतो. कुठल्याहि ' रजिस्टर्ड मॅरेजां 'त असा कुठे कसला संकल्प दिसून येतो का ? आर्य विवाहपद्धतींत असणारें गांभीर्य, उच्च ध्येय, तात्त्विक दृष्टि, उदात्त भावना इतर कठल्याहि विवाहांतून दिसून येत नाहींत. ' **दास्यामि विष्णवे तुभ्यं श्रीरूपिणी एषा मया दत्ता** ' या पदांवरून आर्यांची कन्या-जामातांच्या ठिकाणीं असलेली लक्ष्मी-नारायणाची भावना दिसून येते. आर्य संस्कृति सोडून बाकीच्या कोणत्या संस्कृतींत अशा तऱ्हेची उच्च भावना दिसून येते ? आर्य हे मूलग्राही तत्त्वज्ञान सोडून आणि मोक्षहेतु सोडून कधींहि चलायमान होत नाहींत. दुसऱ्या कशाचेंहि चिंतन करीत नाहींत. त्यांच्या नसोनसीं भरलेलें तत्त्वज्ञान त्यांच्या अखिल कार्यांतून सारखें प्रवाहित होत असतें. आर्यांचा शीलस्वभाव या वरील वाक्यांनीं स्पष्ट होत नाहीं काय ? अशा तऱ्हेच्या उच्च भावनेची उच्च कोटी असल्यामुळेंच त्यांना सर्वोत्कृष्ट, श्रेष्ठ, या अर्थानें ' आर्य ' म्हणून संबोधिलें जातें व गौरविलें जातें. आर्यांना वधुवरांच्या ठिकाणीं प्रकृतिपुरुषात्मक वस्तुस्थितीची यथार्थ भावना दृढमूल आहे. **मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् । अस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥** या श्रुतिनिर्देशाचा आशय आर्यांच्या कार्यांतूनहि व्यक्त होतो. अशा तात्त्विक विचारसरणीनें व तात्त्विक आचारसरणीनेंच अखिल विश्वाला मोक्षमार्गदर्शक होऊन आर्य हे जगद्गुरु ठरले. ह्यांनीं आचरावयाचा धर्महि अखिल जीवांच्या मोक्षास कारणीभूत असल्यामुळेंच या वैदिक आर्य धर्माला सनातन विश्वधर्म असें म्हणतात. आर्यांच्या विवाहांत जगाची कामुक दृष्टि नसून आर्यांना वधुवरांच्या ठिकाणीं प्रकृतिपुरुषांचा ऐक्यरूप मोक्ष दिसतो. ही आर्यांची थोरवी नी आर्य संस्कृतीची महत्ता ! ज्या कोणाला या आर्य संस्कृतीचें महत्त्व न समजून आपल्या अधिकाराच्या जोरावर ' रजिस्टर्ड मॅरेज'ची पद्धत घालून द्यावी वाटते त्यांच्या बाबतींत फार कडक बोलावेंसें वाटतें. त्यांच्या हातून घडणाऱ्या कृतीमुळें लिहावेंसें वाटतें, पण त्यांचा गौरव राखावा म्हणून लिहूं नये असेंहि वाटतें. तरीहि आर्यांना लांच्छनास्पद अशी त्यांची वेगळी जातच म्हणून कांहीं काढून टाकतां येत नाहीं ! आर्य संस्कृतीचा अर्थ त्यांना समजला नाहीं हें मात्र उघड आहे. **अज्ञानतोऽध्यासवशात्प्रकाशते ज्ञाने विलीयेत विरोधतः क्षणात् ॥** विरुद्ध संस्कारानें, सहवासानें व अध्यासानें त्यांना असें वाटतें, त्याचा विरोध दिसून येऊन आर्य संस्कृतीचें

यथार्थ ज्ञान यांना झालें कीं, या भावना सूर्योदयानंतरच्या काळोखाप्रमाण आपोआप सर्व नष्ट होतील. अवाच्य कांहीं बोलण्यापेक्षां आपलेपणानें त्यांना वस्तुस्थितीचें ज्ञान करून देण्यांतच सर्वांचें हित असतें. ज्यांना, स्त्रीपुरुषांतून घाणेरड्या इंद्रियभोगाचीच दृष्टि असते, किळसवाण्या देहाचीच कल्पना येते त्यांची कींव करावी वाटते. आपण सर्व मिळून वैदिक तत्त्वदृष्टीचा अभ्यास करूं या. वैदिक तत्त्वदृष्टीनें त्यांत दिव्य परमात्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो.

**कन्ये ममाग्रतो भूयाः......दानान्मोक्षमवाप्नुयात्** ।—वत्से, अशी पुढें ये. तुला मी अर्पण करून मोक्ष मिळवितों. या वचनाचा अर्थ आर्य संस्कृतींतल्या पित्याला मुलीच्या ठिकाणींहि मोक्षसाधक सच्चिदानंद ब्रह्म-तत्त्वाचाच साक्षात्कार होत असतो. **ब्रह्म विश्वमिदं जगत् । ब्रह्म ब्राह्मण आत्मना अन्तरस्मिन्निमे लोकाः । अन्तर्विश्वमिदं जगत्** ॥ ( तै. ब्रा. २–८ –७ )—हें सर्व जग ब्रह्मस्वरूपच आहे. ब्राह्मण स्वतः ब्रह्मच होय. त्याच्या अंतरंगांतच भूलोकादि सर्व लोक आहेत. हें आखिल विश्व स्वांतर्भूतच आहें, म्हणून वेदाचें सांगणें आहे. **अर्धो वा एष आत्मनो यत्पत्नी** । ( तै. सं. ) वैदिक संस्कृतीच्या माणसाला पत्नीच्या ठिकाणीं आपल्या सच्चिदानंद स्वरूपाचा शेषार्ध भागच दिसत असतो. मुलांतूनहि त्यांना आत्मरूपच दिसतें.

## सतीपति आणि संतति यांविषयीं आर्यांची दृष्टि

**अंगादंगात्संभवसि हृदयादधि जायसे ।**
**आत्मा वै पुत्रनामासि स जीव शरदः शतम्** ॥ ( एकाग्निकांड )

—आपल्या अंगप्रत्यंगापासून, हृदयापासून, सच्चिदानंद रूपाच्या अशा या “ मी ” स्मृतिपासून उत्पन्न झालेला तूं माझें तें सच्चिदानंद स्वरूपच आहेस. तूं स्वपर हितकर आणि उद्धारक असणारीं उच्च सत्कर्मे करीत आनंदरूपानें शेंकडों वर्षें राहा. या ठिकाणीं **कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छत ँ्समाः** । या ईशावास्याच्या मंत्राची आठवण होते व आर्यांना आपल्या पुत्राच्या ठिकाणीं कोणती व कशी दृष्टि असते, तें यामुळें कळून येतें. अशा तऱ्हेची उच्च संस्कृति जगद्वंद्य कां होणार नाहीं ? अशा तऱ्हेची संस्कृति कोणत्याहि रूपानें नष्ट करण्याचा प्रयत्न करणारे लोक विश्वद्रोही आहेत असें कोणी म्हटलें तरी तें हे कसें खोडून काढतील ? सद्धर्मपरायण अशा एका सच्छील मातापितरांच्या मातृभक्त, पितृभक्त मुलामुलींतून व

त्यांच्या तशाच सत्संततींतून पण परब्रह्मरूपी परमेश्वराच्या स्वरूपभूत शक्तीपासून झालेला तदंशाचा हा विस्तार आहे असें आर्यांच्या दृष्टीनें असतें.

**यस्मिन्नृणं सन्नयति येन चानंत्यमश्नुते ।**
**स एव धर्मजः पुत्रः कामजानितरान्विदुः** ॥ (मनु. ९।१०७)
**ज्येष्ठेन जातमात्रेण पुत्रीभवति मानवः ।**
**पितृणामनृणश्चैव स तस्मात्सर्वमर्हति** ॥ (९।१०६)

—ज्याच्यामुळें मनुष्य पितृऋणांतून मुक्त होऊन धर्म, अर्थ, काम या पुरुषार्थद्वारां पुढें ज्ञानानें मोक्ष मिळवितो, अनंत सुख प्राप्त करून घेतो तो पहिला पुत्र म्हणजेच गृहस्थधर्माप्रमाणें खरा पुत्र. त्यामुळें प्रजोत्पादनाच्या दृष्टीनें गृहस्थधर्म पूर्ण होतो. इतरांची पुढें जी उत्पत्ति होते, आवश्यक नसतांना ती कामामुळेंच झाली असें होऊन, अशा पुत्रांना 'कामज' म्हणजे कामापासून निर्माण झालेले असें म्हणतात. ज्येष्ठ मुलगा उत्पन्न झाल्यानेंच तो गृहस्थ पुत्रवान होतो. गृहस्थाश्रम पूर्ण होतो. तो ज्येष्ठ पुत्र पुढच्या वंशवृद्धीला कारणीभूत होत असल्यामुळें तोच त्याचा उत्तराधिकारी होतो. त्याच्या जिदगीचा तोच अधिकारी असतो. या प्रमाणावरून एकाखेरीज झालेले अधिक पुत्र कामज होत असें सांगून कामवशतेचा निषेध केला आहे. **प्रजातंतुं मा व्यवच्छेत्सीः** ॥ प्रजातंतूचा उच्छेद करूं नये एवढेंच श्रुतीचें सांगणें आहे.

**श्रीर्वर्चस्वमायुष्यमारोग्यमाविद्याच्छोत्रमानं महीयते ।**
**धनं धान्यं पशुं बहुपुत्रलाभं शतसंवत्सरं दीर्घमायुः** ॥

या वैदिक आशीर्वाद—पद्धतींत '**बहुपुत्रलाभः**' असें एक पद आहे. मनूच्या वचनाचा व या आशीर्वादाचा मध्यबिंदु साधावयाचा म्हणजे "**कामात्मता खल्वपि न प्रशस्ता**" या वाक्याची आठवण होते. इथे स्त्रीवश व कामवश होऊन वागूं नये, असा पाहिजे तर अर्थ काढावा. कामज पुत्रांच्या उल्लेखाच्या पुढच्या श्लोकांतच बहुपुत्रांचा उल्लेख आला आहे.

**पितेव पालयेत्पुत्राञ्ज्येष्ठो भ्रातॄन्यवीयसः ।**
**पुत्रवच्चापि वर्तेरञ्ज्येष्ठे भ्रातरि धर्मतः** ॥ (९।१०८)

—पित्याप्रमाणें आपल्या भावंडांचें वडील भावानें पोषण करावें व पुत्राप्रमाणें त्या भावंडांनीं त्याच्याशीं वागावें. या श्लोकांत वांटा द्यावा असें सांगितलें नाहीं. पुढच्या १११ व्या श्लोकांत याचा कांहीं उल्लेख सांपडतो.

**एवं सह वसेयुर्वा पृथग्वा धर्मकाम्यया ।**
**पृथग्विवर्धते धर्मस्तस्माद्धर्म्या पृथक्क्रिया ॥** ( ९–१११ )

—मोठा भाऊ जर चांगला असला, भावजयहि जर चांगली असली तर सर्वांनींहि एकत्र राहावें हें उत्तम. तसें नसल्यास धर्माच्या सदुद्देशानें वाटलें तर वेगळेंहि व्हावें. वेगळें राहून धर्मानुष्ठान तशा प्रसंगीं वाढतें. वेगळें झालें म्हणजे कुलधर्म–कुलाचार वेगवेगळे करावेत. पृथक् पृथक् पंचमहायज्ञादिकांचें अनुष्ठान करावें.

**एकपाकेन वसतां पितृदेवद्विजार्चनम् ।**
**एकं भवेद्विभक्तानां तदेव स्याद्गृहे गृहे ॥** ( बृहस्पतिः )

—वांटणी न होतां, एकच स्वयंपाक असतांना 'पितृदेवद्विजार्चन' एकट्या वडील भावानेंच करावें. पण वांटणी झाली म्हणजे मात्र प्रत्येकानें तें आपापल्या घरीं वेगवेगळें करावें.

**नान्योत्पन्ना प्रजास्तीह न चाप्यन्यपरिग्रहे ।**
**न द्वितीयश्च साध्वीनां क्वचिद्भर्तोपदिश्यते ॥** ( मनु. ५।१६२ )

—विधिनियमाला अनुसरून शास्त्रोक्त विवाहित अशा एका पती-शिवाय परपुरुषापासून झालेली कोणतीहि प्रजा त्या स्त्रीची प्रजा होत नाहीं. तशाचप्रमाणें उक्त नियमानुसार शास्त्रोक्त विवाहित अशा एका स्वपत्नी-शिवाय परस्त्रीपासून झालेली कोणतीहि प्रजा त्या पुरुषाची प्रजा होत नाहीं. पुनर्विवाहानें वंशान्वय कसा राहील ? या श्लोकांतल्या उत्तरार्धानें पुनर्विवाहाचा निषेध केलेलाहि आढळतो. कोणत्याहि दृष्टीनें, कोणत्याहि ग्रंथांतून कधींहि साध्वी स्त्रीला अन्य पतिपरिग्रह, अन्य भर्ता सांगितलेला नाहीं. कोणतीहि स्त्री व्यभि-चारानें जशी तशीच पुनर्विवाहानें साध्वी ठरत नाहीं, असा या श्लोकांत मनूनें स्पष्ट अभिप्राय दिला आहे, हें 'साध्वी' या शब्दावरून स्पष्ट होतें. घट-स्फोटाचा कायदा करून स्त्रियांना स्वैर केल्यासारखें होतें व पुनर्विवाहाचा कायदा करून स्त्रियांना व्यभिचारिणी बनविल्यासारखें होतें. ब्राह्मणांतूनच काय पण कोणत्याहि जातींतून असें होणें अनिष्ट आहे, समाजघातक आहे. यानें समाज पशुवृत्तीचा बनतो, नीतिभ्रष्ट होतो. अशा स्त्रीपुरुषांचें प्रेमहि स्थायी आणि खरें नसतें. त्यांच्यांत अनन्यता नसते. चवचाल स्त्रीबरोबर केलेला संसार कोणाला सुखावह होऊं शकतो ? तीं मुलें कोणाचीं म्हणून मानलीं जातलि ? बाप म्हणून कोणाला त्यांनीं पिंडपाणी द्यावें ? कोणाच्या उत्पन्नाचे

ते अधिकारी होतील ? त्या मुलांत कोणाला प्रीति उरेल ? थोडक्यांत जबरीचा असा एक कायदा झाला तर प्रतिकुटुंबाचें शीलच नष्ट करणें होय व भावी पिढीला नीतिभ्रष्ट बनविणें होय. असेंच झालें तर पुढें ब्राह्मणाचीच काय कोणतीच शुद्ध जात राहणार नाहीं. अशा नीतिभ्रष्ट प्रजेला ना इह ना पर; साऱ्यांचीच इहपराची बोळवण होते. या संदर्भानें 'दो दिवसांची जाइल सत्ता अपेश माथां घेउं नको ' असें प्रेमाच्या कळकळीनें सांगण्यापलीकडे आतांच्या कायदेकारी मंडळांना आणि मंत्र्यांना अधिक कोणतें सांगण्यास कांहीं सुचतच नाहीं !

## ऋणत्रय

**ब्रह्मचर्येण ऋषिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः एष वा अनृणः।** ( तै. संहिता ) ब्रह्मचर्याश्रमांत राहून वेदशास्त्राध्ययनानें अथवा वेदाच्या अनधिकाऱ्यांना वैदिक मताच्या ग्रंथाध्ययनानें ऋषिऋणांतून, आपापल्या अधिकारानुसार श्रुतिस्मृतिपुराणोक्त यज्ञादि निष्काम कर्मानें देवऋणांतून, कर्तव्य म्हणून केलेल्या अकाम प्रजोत्पादनानें पितृऋणांतून प्रवृत्तिवासनेचा मनुष्य मुक्त होतो. **देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम्** । ( तै. शिष्य ) देवपितृकार्यें सोडूं नको म्हणून पुत्राला सांगितलें आहे. या पुनर्विवाहानें या वाक्यांना कोणता अर्थ राहणार ! वांटणीच्या दृष्टीनें सुद्धां कुणाचीं तीं मुलें ठरतील ? कोण्या एकाची म्हणून कोणती इस्टेट शिल्लक राहील ? वांट्याचा प्रश्नच राहात नाहीं. देवपितृकार्याचा अधिकार औरस पुत्राला असल्यामुळें वंशान्वय, कुलधर्म, कुलाचार, देवपितृकार्य वंशपरंपरेनें आपल्या कुलांतल्यांनीं चालवीत असावें म्हणून वाडवडिलांनीं घर करून, श्रमांनीं संपत्ति मिळवून ती मुलाला द्यावयाची असा वैदिक धर्मशास्त्राचा कायदा आहे. मुली परगोत्राला दिल्या जात असल्यामुळें तिला वांट्याचा हक्क नाहीं असें श्रुतिस्मृतींनीं सांगितलें आहे. उत्तरक्रिया, वंशवृद्धि, कुलधर्म, कुलाचार चालविणाऱ्या संततीला दिल्याप्रमाणें स्त्री संततीला वांटणी दिली तर काम करणाऱ्याला व न करणाऱ्याला एकच वेतन दिल्याप्रमाणें होईल. या दृष्टीनें **तस्मा स्त्रियः निरिंद्रिया अदायादीः** । स्त्रिया वांट्याच्या अधिकारी होऊं शकत नाहींत असें श्रुतीचें सांगणें आहे. पुरुष संततीनेंच वंश वाढतो. गरीब कुटुंबांतील स्त्री संततीला वडिलार्जित संपत्तीचा वांटा दिल्यास पितरांच्या उत्तरक्रियेसहि पुरेसें द्रव्य एकेकापाशीं राहाणार

नाहीं, पुढील धर्मकार्य करणें कठीण जाईल व अशा रीतीनें देवपितृकार्यें अजिबात नष्ट होतील व आर्य संस्कृतीचें रूप राहणार नाहीं. वास्तविक स्वराज्य म्हणजे स्वधर्माचरणाची अनुकूलता असाच अर्थ आहे, हें विचाराअंतीं कोणालाहि पटेल.

सहृदयी आर्य धर्माला स्त्री संततीचें दारिद्र्य कसें बरें पाहवेल ? त्यांच्या दारिद्र्यपरिहारार्थ त्यांचे मातापिता, बंधु हे प्रयत्न करतीलच आणि ते त्यांनीं अवश्य करावे. तशा प्रसंगीं त्यांची ऐपत पाहून मातापितरांकडून अथवा बंधुवर्गांकडून त्या स्त्री संततीच्या रक्षणार्थ जीवनाकरितां पुरेसें सरकारानें अवश्य देववावें म्हणजे श्रीमंत कुलांतल्या स्त्री संततीची कुठे कुठे दिसून येणारी दैना नष्ट होईल.

**सकृदंशो निपतति सकृत्कन्या प्रदीयते ।**
**सकृदाह ददानीति त्रिण्येतानि सतां सकृत्** ॥ ( मनु. ९–४७ )

—आर्य धर्माप्रमाणें पितृधनाचा विभाग, कन्यादान आणि वचन हें एकेकदांच दिलें जातें. विवाहाला ‘ कन्यादान ’ म्हणतात. ‘ तुला माझी कन्या देतों ’ म्हणून सांगून वाङ्निश्चय करून वचन सत्य करण्यास त्या वरास आपली कन्या शास्त्रोक्त प्रकारें देणें व आपलें दिलेलें वचन असत्य होऊं नये म्हणून पुन्हां तिचा अन्याशीं विवाह करून न देणें असा ‘ कन्यादान ’ या शब्दाचा अर्थ होतो. पुनर्विवाहाच्या पद्धतीनें दिलेलें वचन मोडण्याचा म्हणजे असत्य भाषण करण्याचा अभ्यास प्रजेला घालून दिल्याप्रमाणें होतें. **न भवति पुनरुक्तं भाषितं सज्जनानाम्** ।—सज्जनांचें वचन बदलत नाहीं, या दृष्टीनें दुर्जनाचें वचन बदलतें हें सिद्ध होतें. पुनर्विवाहानें जर वचनभंग होतो व वचनभंग झाल्यानें तो दुर्जन ठरतो तर पुनर्विवाहाच्या कायद्यानें सरकार प्रजेला मुद्दाम दुर्जन करण्यास झटत आहे असें उघड प्रजा म्हणूं लागल्यास त्याला सरकार काय उत्तर देईल ? वचनपालन म्हणजेच सत्य भाषण. सत्य भाषण नसल्यास कसलाच व्यवहार चालणार नाहीं. येतों, जातों, देतों, करतों या वचनांवर विश्वास ठेवूनच व्यवहार चालतो. हें सर्वच असत्य झाल्यास जगाचें जीवनच आटोपलें. सुरळीत जीवनव्यवहार चालण्यासहि वचन पाळण्याची, अथवा सत्य वचनाची आवश्यकता आहे म्हणून ‘ सत्यं वद ’ हा नियम वेदानें घालून दिला. यांत इहपर मानवांचें सुख आहे. **यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः ।**

अशीच वैदिक धर्माची व्याख्या आहे. वैदिक धर्मानें व्यावहारिक तसें पारमार्थिक जीवनहि उत्कृष्टपणें साधतें व इतरांनाहि तें अनुकूल होतें.

कन्यादानाच्या वेळीं आर्यांतून जो संकल्प केला जातो तो पाहूं.

**कन्यादान**

“ **अमुकगोत्रोत्पन्नो अमुकशर्माहं मम कुलोत्पन्नानां सर्वेषां अतीतपितॄणां निरतिशयब्रह्मलोकावाप्त्यादिकन्यादानकल्पोक्तफलावाप्तये अनेनैव वरेणास्यां कन्यायामुत्पादयिष्यमाणासंतत्या द्वादशावरान्द्वादशापरान् पुरुषान् पवित्रीकर्तुमात्मनाश्च श्रीलक्ष्मीनारायणप्रीतये । अमुकगोत्रोत्पन्नाय अमुकप्रवरान्विताय अमुकशर्मणः प्रपौत्रायामुकशर्मणः पौत्रायामुकशर्मणः पुत्रायामुकशर्मणे वराय अमुकगोत्रोत्पन्नामुकप्रवरान्वितामुकशर्मणः प्रपौत्रीममुकशर्मणः पौत्रीममुकशर्मणः पुत्रीममुकनाम्नीमिमां कन्यां वरार्थिनीं श्रीरूपां प्रजापतिदेवत्यां प्रजासुहृत्वकर्मभ्यः प्रजोत्पादनार्थं तुभ्यमहं संप्रददे श्रियै** ”—अशा रीतीनें ‘ संप्रददे ’—देतों असा संकल्प करून पिता कन्यादान करतो. हें पित्यानें दिलेलें दान आणि वचन पुनर्विवाहामुळें नष्ट होतें. वंशान्वयाच्या उच्चारालाहि यामुळें कसला आधार उरणार नाहीं. ‘माझी मुलगी’ म्हणून मुलीच्या पित्याला म्हणतां येणार नाहीं व ‘तुझा मुलगा’ म्हणून वराच्या पित्याला म्हणतां येणार नाहीं. त्या वधूवराच्या आईबापांनाहि आपल्या कुलाचा उच्चार करतां येणार नाहीं. ‘ **निरतिशयब्रह्मलोकावाप्त्यादि कन्यादानकल्पोक्तफलावाप्तये** ’ याला अथच उरणार नाहीं. याच्या ठिकाणीं पुनर्विवाहानें पुढें त्या कृत्रिम आईबापांना ‘ **निरतिशयनरकलोकावाप्त्यादिसंकरकन्यादानकल्पोक्तफलावाप्तये** ’ म्हणूनच फलाकडे दृष्टि ठेवून संकल्प करावा लागणार. शास्त्रोक्त कन्यादानाचें, निरतिशय सुखाच्या, ब्रह्मलोकाच्या प्राप्तीचें फल अशानें कोणालाहि न मिळतां पुनर्विवाहादि घटनांनीं एथून तेथून सर्वांनाच इथे व परलोकांत नरकयातनेची प्राप्ति मात्र अनायासें होईल !

“ **धर्मे च अर्थे च कामे च नातिचरितव्या त्वयेयम् इति दाता । नातिचरामि । इति वरः। सह धर्मश्चर्यताम् इति दाता। चरिष्यामीति वरः।** ”

पुनर्विवाहानें नुसते आईबापच वचनभ्रष्ट होऊन नरकाला जातात असें नसून वधूवरहि वचनभंगानें नरकाला जातात हें खालील वचनांनीं कळून

येईल. कन्यादानाचे वेळीं—' धर्मार्थकामांत तूं हिला सोडून वागूं नको. हिच्या सहधर्मादिकांचें आचरण कर. एकपत्नीव्रतानें राहा,' असें मुलीचा पिता वराला म्हणतो. ' धर्मार्थकामसमयीं मी हिला सोडून वागणार नाहीं. एकपत्नीव्रतानें वागेन ' असें वर वचन देतो. ' दोघांनीं मिळून गृहस्थधर्माचें पालन करा ' म्हणून मुलीचा पिता सांगतो. ' करतों ' म्हणून वर वचन देतो. वधू वरालाहि तसें वचन देते.

## सप्तपदी

**पतिभक्तिरता नित्यं क्रीडिष्यामि त्वया सह ।**
**त्वदन्यन्न नरं मंस्ये तृतीये साब्रवीदियम् ॥**
**यज्ञे होमे च नादौ भविष्यामि त्वया सह ।**
**धर्मार्थकामकार्येषु वधू षष्ठे पदे वदेत् ॥** ( सप्तपदि )

सप्तपदीच्या वेळीं हे श्लोक म्हणण्याची कुठे कुठे पद्धत आहे. कुठे कुठे म्हटलें नाहीं तरी तत्त्व हें अव्यभिचरित असतें या न्यायानें ते श्लोक येथें देतों. मागच्या विषयाच्या ओघानें तिसऱ्या व साहाव्या पाउलांत म्हणावयाचे श्लोक इथे बरोबर लागू पडतात म्हणून ते प्रथम देतों. ' पतिभक्तिपरायण होऊन तुझ्याबरोबर मी रममाण होईन. तुझ्याशिवाय अन्य पुरुषाची मनांतहि भावना करणार नाहीं. यज्ञ, होम, दानादिकांतहि धर्मार्थकामादिकांतहि मी तुझी सहधर्मचारिणी राहीन. ' जांवयानें सासऱ्याला वचन दिल्याप्रमाणें वधूनें वराला असें वचन दिलेलें असतें.

एकंदर हे सात श्लोक आहेत. ' प्रथमपदे ', द्वितीयपदे ' असा यांचा अनुक्रम आहे. त्यांच्या योगानें आदर्श वधूचीं लक्षणें व तिचा जीवनक्रम स्पष्ट होतो. सप्तपदींत वधूनें वराला आत्मसमर्पण करण्याचा क्रम आहे.

**धन धान्यं च मिष्टान्नं व्यंजनाद्यं च यद्गृहे ।**
**मदधीनं च कर्तव्यं वधूराद्ये पदे वदेत् ॥ १ ॥**
**कुटुंबं रक्षयिष्यामि सदा ते मंजुभाषणी ।**
**दुःखे धीरा सुखे हृष्टा द्वितीये साब्रवीद्वचः ॥ २ ॥**
**लालयामि च केशान्तं गंधमाल्यानुलेपनैः ।**
**कांचनैर्भूषणैस्तुभ्यं तुरीये सा पदे वदेत् ॥ ४ ॥**

**आर्ते आर्ता भविष्यामि सुखदुःखविभागिनी ।**
**तवाज्ञां पालयिष्यामि पंचमे सा पदे वदेत् ॥ ५ ॥**

**अत्रान्ते साक्षिणो देवाः मनोभावप्रबोधिनः ।**
**वचनं ते करिष्यामि सप्तमे सा पदे वदेत् ॥ ७ ॥**

१. धनधान्य, मिष्टान्न, लोणचीं आदि व्यंजनपदार्थ घरीं असलेले माझ्या आधीन असतील तर ते व्यवस्थित ठेवून वेळोवेळीं तुझ्या आज्ञेप्रमाणें त्यांचा योग्य उपयोग मी करीन.

जमाखर्च बरोबर ठेवून अत्यति अतिमिति—कंजुषपणा किंवा उधळेपणा यांपैकीं कांहींहि न करतां प्रसंगानुसार मी शहाणपणानें वागेन असें प्रथम पदीं वधू म्हणते.

२. मी केव्हांहि मधुरभाषणी राहून कुटुंबाचें रक्षण करीन. संसारांत येणाऱ्या सुखदुःखप्रसंगीं—दुःखप्रसंगीं दुःखी न होतां धैर्यानें राहीन, सुखप्रसंगीं संतुष्ट राहीन. अधिकाराची आशा न करतां व गर्वानें कधीं फुगून जाणारा नाहीं. गृहकृत्यांत दक्षतेनें वागेन. असें द्वितियपदीं वधू म्हणते.

४. स्वच्छतेनें वागून वस्त्राभरणानें व गंधमाल्यादिक सुगंध—द्रव्यादिकांनीं केश व सर्व देह शृंगारून, पाहिल्याबरोबर तुला आनंद होईल असें मी वागेन. योग्य उपचारांनीं तुझ्या देहाचें रक्षण करीन. सर्व प्रकारांनीं माझ्या देहाचें रक्षण करून नेहमीं तुला अनुकूल असेंच मी वागेन, असें चतुर्थपदीं वधू म्हणते.

५. तुझ्या संकटकालीं मी सुद्धां तितकीच कष्टी होईन. तुझ्या सुख-दुःखकाळीं तुझ्या सुखदुःखाची समभागिनी होईन. तुझी आज्ञा पालन करीन. असें वधू वराला पंचमपदीं म्हणते.

७. मनोभाव उत्पन्न करणारे देवच या माझ्या वचनांना साक्षी आहेत. आंत एक बाहेर एक असें माझें बोलणें नाहीं, हें यावरून स्पष्ट होईल. मी केव्हांहि वंचना करणार नाहीं व सदा तुझ्या वचनांत वागेन. असें सप्तम पदीं वधू वराला वचन देते. याप्रमाणें तिघेंहि विवाहांत वचनबद्ध असतात. पुनर्विवाहामुळें या तिन्ही माणसांचीं वचनें नष्ट होतात.

सप्तपदींत म्हणावयाचे दुसरे वैदिक मंत्रहि आहेत ते यापुढें देतों.

**एकमिषे विष्णुस्त्वान्वेतु ॥ द्वे ऊर्जे विष्णुस्त्वान्वेतु ॥ त्रीणि व्रताय विष्णुस्त्वान्वेतु ॥ चत्वारि मयोभवाय विष्णुस्त्वान्वेतु ॥ पंच पशुभ्यो विष्णुस्त्वान्वेतु ॥ षष्ठाय रायस्पोषाय विष्णुस्त्वान्वेतु ॥ सप्त सप्तभ्यो होत्राभ्यो विष्णुस्त्वान्वेतु । सप्तमापदमुपसंगृह्य जपति सखायः । सप्तपदा अभूम । सख्यन्ते गमेयम् । सख्यात्ते मायोषं । सख्यास्ते मायोष्ठः ॥**

हे वैदिक मंत्र होत. 'विष्णुस्त्वान्वेतु' म्हटलें जातें, यांतूनहि वधू-वराच्या ठिकाणीं लक्ष्मीनारायणाची भावना दिसून येते.

### देवतांची प्रार्थना

सप्तपदीनंतर ब्राह्मण मंगलसूक्त म्हणतात. बंधुबांधव आहेर करतात. **सौभाग्यादिप्राप्त्यर्थं महालक्ष्मीशचीगौरीपूजां करिष्ये ॥** सप्तपदीनंतर सौभाग्यादि वृद्धीकरितां महालक्ष्मी, शची, गौरी इत्यादिकांची पूजा करण्याचा विधि आहे. यांतून पातिव्रत्यप्रेम उमटून दिसतें. '**वैवाहं भाग्यमारोग्यं पुत्रलाभं च देहि मे ।**' वैवाहिक भाग्य, आरोग्य व पुत्रलाभ तुझ्या कृपेनें मला होऊं दे, अशी प्रार्थना या मंत्रांतून आहे.

### लाजाहोम

त्यानंतर लाजाहोम. सप्तपदी—लाजाहोमकालीं म्हटल्या जाणाऱ्या मंत्रांनीं पतिपत्नींच्या सामरस्याच्या तात्त्विक भावना उद्दीपित होतात. वरानें वधूच्या हृदयाला स्पर्श करून म्हणावयाचे हे मंत्र पाहा. **मम हृदये हृदयं ते अस्तु । मम चित्ते चित्तमस्तु ते । मम वाचमेकमेकमनाः श्रुणुमामेवानुव्रता सहचर्या मया भव इति ॥**' माझ्या हृदयाशीं तुझ्या हृदयाचें ऐक्य होवो. माझ्या चित्ताशीं तुझें चित्त समरसून जावो. माझी आज्ञा एकमनानें पालन करणारी हो. मला अनुव्रत होऊन राहा. माझी सहचारिणी हो. माझ्या साहचर्यांत राहा. असा याचा भावार्थ. यावरून आर्य संस्कृतीचा दांपत्य-जीवनक्रम चांगला लक्षांत येईल.

त्यानंतर वधूच्या कानांत वरानें उच्चारण्याचे मंत्र : '**मां ते मनः प्रविशतु । मां चक्षुर्मामं ते भगः । मयि सर्वाणि भूतानि । मयि प्रज्ञानमस्तु ते ।**' तुझें मन माझ्या मनांत प्रवेश करो. तुझे नेत्र माझ्या ठिकाणींच स्थिर होवोत. तुझ्या मनाला व इंद्रियांना मीच एक लक्ष्य असलें पाहिजे. तुला प्राप्त होणारें भाग्य, संपत्ति, तप, यश, कामादि प्रवृत्ति,

मोक्षसाधन यांचा माझ्या ठिकाणींच अंतर्भाव होवो. तुझ्या देहांत असणारीं सर्व पंचभूतें आणि पांच भौतिक देहांत असणारी मीपणाची स्मृति माझ्यांतच समरसून राहो. प्रकृतिपुरुषाच्या दृष्टीनें पतिपत्नींचें ऐक्य प्रगट करून आर्य संस्कृतीची श्रेष्ठता व मूलग्राहित्व हे मंत्र सिद्ध करीत आहेत. यांत शक्ति—शक्तिमंतांचें अभेददर्शन होतें. प्रकृति अथवा पुरुषांचें शक्ति—शक्तिमंताचें म्हणजेच मूळचें ब्रह्मैक्य. हेंच स्थूळदृष्टीनें वधूवरांच्या लग्नांत दिसून येतें व सूक्ष्म दृष्टीनें योग्यांत दिसून येतें.

—वधू सप्तपदीनंतर परमात्मरूपी वरास देहादिकांचें समर्पण करून प्रवृत्तिरूपानें आत्मनिवेदन करते. त्या निवांत असणाऱ्या स्वरूपभूत परमात्म्यांत प्रकृतिरूप वधू विलीन होते. हा तत्त्वविचार आहे. ही प्रवृत्तिपर स्त्रीपुरुषांतली दृष्टि अशी. याप्रमाणेंच योगदृष्टीनें कुंडलिनी ही प्रकृति, मूलाधार, स्वाधिष्ठान, माणिपूरक, अनाहत, आज्ञा, ब्रह्मरंध्र या सप्तचक्रांतून पुढें शिशुमार चक्रांतल्या ब्रह्मीं (पुरुषस्वरूपीं) लीन होते. **अष्टप्रकृतिरूपा सा कुंडली मुनिसत्तम** ।। (जाबालिदर्शन) **प्रकृत्यष्टकरूपा च स्थानं गच्छति कुंडली । क्रोडीकृत्य शिवं याति क्रोडीकृत्य विलीयते** ।। ( योगकुंडलिनी ३।७४ ) इत्यादि वाक्यांनीं कुंडलिनी प्रकृतिरूप कशी ती लक्षांत येते. हिलाच महाशक्ति असेंहि म्हटलें आहे. ज्ञानयोगाच्या दृष्टीनें जीव ही प्रकृतिसुखेच्छा, विचारणा, तनुमानसा, सत्त्वापत्ति, असंसक्ति, पदार्थभावना, तुर्यगा या सप्तभूमिका ओलांडून प्रकृतिरूप जीव परमात्मरूपांत विलीन होतो.

## आध्यात्मिक सप्तभूमिका

या सप्तभूमिकांचें वर्णन योगवासिष्ठादि पुष्कळ ग्रंथांत आलें आहे. वराह, अन्नपूर्णा, महोपनिषदांतूनहि या सप्तभूमिकांचें वर्णन आलें आहे. वराहोपनिषद आणि महोपनिषद यांतलें वर्णन एकसारखें आहे. **ज्ञानभूमिः शुभेच्छाख्या प्रथमा समुदाहृता । विचारणा द्वितीया तु तृतीया तनुमानसी। सत्त्वपत्तिश्चतुर्थी स्यात्ततोऽसंसक्तिनामिका । पदार्थाभावना षष्ठी सप्तमी तुर्यगा स्मृता** ।। या श्लोकांतूनहि सप्तभूमिकांचीं नांवें दिलीं आहेत. **शास्त्रसज्जनसंपर्कवैराग्याभ्यासरूपिणी । प्रथमा भूमिकैषोक्ता मुमुक्षुत्वप्रदायिनी** ।। ( अन्नपूर्णा उ. ५।८१) शास्त्रसज्जनसंपर्काची इच्छा वाढविणारी, विरक्तीचा अभ्यास करविणारी, मुमुक्षुत्व प्राप्त करून देणारी, खऱ्या सुखाची इच्छा

अंकुरित करणारी ही प्रथम भूमिका होय. **स्थितः किं मूढ एवास्मि वीक्षेऽहं शास्त्रसज्जनैः। वैराग्यपूर्णमिच्छेति शुभेच्छेत्युच्यते बुधैः ॥ शास्त्रसज्जन-संपर्कवैराग्याभ्यासपूर्वकम्। सदाचारप्रवृत्तिर्या प्रोच्यते सा विचारणा ॥ विचारणाशुभेच्छाभ्यामिंद्रियार्थेषु रक्तता। यत्र सा तनुतामेति प्रोच्यते तनुमानसी ॥ भूमिकात्रितयाभ्यासाच्चित्तेऽर्थविरतेर्वशात्। सत्वात्मनि स्थिते शुद्धे सत्वापत्तिरुदाहृता ॥ दशाचतुष्टयाभ्यासादसंसर्गफला तु या। रूढसत्त्वचमत्कारा प्रोक्तासंसक्तिनामिका॥ भूमिकापंचकाभ्यासात्स्वात्मारामतया भृशम्। आभ्यंतराणां बाह्यानां पदार्थानामभावनात् ॥ परप्रयुक्तेन चिरं प्रयत्नेनावबोधनम्। पदार्थाभावना नाम षष्ठी भवति भूमिका॥ षड्भूमिकाचि-राभ्यासाद्भेदस्यानुपलंभनात्। यत्स्वभावैकनिष्ठत्वं सा ज्ञेया तुर्यगा गतिः ॥** ( वराह उ. ४। १–१०; महोपनिषत् ५–२७, ३४ )—सत्संग सच्छास्त्रा-भ्यासाची आवड, सत्साधनाची इच्छा, सत्संगादि साधनांनीं विचार येऊन सदाचारप्रवृत्ति, सत्साधनांनीं विषयवासनाराहित्य, आत्मस्थितीचा निश्चय, सिद्धि-सामर्थ्यादिकांत अप्रवृत्ति, बाह्यवृत्तिराहित्य, सहजावस्था अशीं हीं सात भूमिकांचीं लक्षणें आहेत. सातव्या भूमिकेचा जीवन्मुक्त होतो, हें पुढच्या श्लोकावरून सिद्ध होतें. **एषा हि जीवन्मुक्तेषु तुर्यावस्थेति विद्यते। विदेहमुक्तिविषयं तुर्यातीतमतः परम् ॥** ( महोपनिषत् ) अधिक दृढतेनें विदेहस्थिति लाभते, देहाची भावना, बहिर्वृत्ति असत नाहीं.

जीवमुक्तांची स्थिति पुढच्या श्लोकानें व्यक्त केली आहे. **यत्र नासन्न सद्रूपो नाहं नाप्यनहंकृतिः। केवलं क्षीणमनन आस्तेऽद्वैतेऽतिनिर्भयः ॥** ( वराह. ३४।१७ ) जीवन्मुक्ताला सत्याचीहि भावना नसते आणि असत्याचीहि भावना नसते. अहंकृतिहि नसते आणि आनंदकृतिहि पण नसते. कसलेंच चिंतन नसतां तो स्वस्थ असतो, निर्विकल्प असतो, अद्वैतमात्र असतो, नित्य निर्भय असतो. असा या श्लोकाचा भावार्थ आहे. **भूमित्रयेषु विहरन्मुमुक्षुर्भवति।** पहिल्या तीन भूमिकांचा मुमुक्षु म्हणवितो. **तुरीयभूम्यां विहरन्ब्रह्मविद्भवति। पंचमभूम्यां विहरन्ब्रह्मविद्वरो भवति। षष्ठभूम्यां विहरन् ब्रह्मविद्वरेण्यो भवति। सप्तमभूम्यां विहरन्ब्रह्मविद्वरिष्ठो भवति।**—चवथ्या, पांचव्या साहाव्या, सातव्या भूमिकेच्या माणसास क्रमानें ब्रह्मवित्, ब्रह्मविद्वर, ब्रह्मविद्वरेण्य, ब्रह्मविद्वरिष्ठ असें म्हणतात. वराहोपनिषदाच्या चौथ्या अध्यायाच्या प्रारंभीं हा विषय आला आहे. **पूर्वावस्थात्रयं तत्र जाग्रदित्येव संस्थितम्। चतुर्थी**

**स्वप्न इत्युक्ता स्वप्नाभं यत्र वै जगत्** ।। ( अन्नपूर्णा उ. ५।८७ ) **आनंदैक-घनाकारा सुषुप्ताख्या तु पंचमी । असंवेदनरूपा तु षष्ठी तुर्यपदाभिधा** ।। ८८ ।। **तुर्यातीतपदावस्था सप्तमी भूमिकोत्तमा । मनोवचोभिरग्राह्या स्वप्रकाशसदात्मिका** ।। ८९ ।। पहिल्या तीन जाग्रत, चवथी स्वप्न. या अवस्थेंत जग स्वप्नासारखें प्रतीत होतें. केवळ आनंदघन अशी सुषुप्तीसारखी पांचवी ' **अर्धसुप्तप्रबुद्धाथः** । ' अर्धवट झोंपेंतल्याप्रमाणें असलेली अवस्था. अभावरूपाची साहावी. **आनंदैकघनाकारा सुषुप्तिसदृशी स्थितिः** । आनंदघन-रूपान्नी सुषुप्तीसारखी ही स्थिति असतो. **तुर्यावस्थौपशान्ता सा मुक्तिरेव हि केवला** । सातवी भूमिका स्वप्रकाशरूप स्वानंदमात्र स्वच्छ, सौम्य व समतादि-युक्त असते. या सर्वांत देहरूपानें, मनोरूपानें व ज्ञप्तिरूपानें प्रकृतिपुरुषांचें, मायाब्रह्माचें, जीवब्रह्माचें ऐक्यच विवाहयोगासिद्धि व जीवन्मुक्ति यांत तारतम्यानें अभिप्रेत आहे. या तीन साधनांत चढती पायरी आहे हें जरी खरें असलें तरी हें मूलतत्त्व ध्यानांत ठेवून त्या त्या भूमिकेंत अनुसंधान ठेवलें म्हणजे क्रमेण तें मोक्षाचेंच साधन होऊन मुक्ति मिळते.

**दांपत्यजीवनाचें तात्त्विक रहस्य**

भगवद्गीतेंत जीवालाच प्रकृति म्हणून, अंश म्हणून दोन्ही रूपांनीं संबोधिलेलें खालील श्लोकावरून दिसून येतें. अंश म्हणा वा प्रकृति म्हणा परमात्म्याचींच हीं संकल्पानें धरलेलीं रूपें आहेत असें निश्चित केलें म्हणजे दोन्हींचा अर्थ एकच होतो. **नित्यः सर्वगतो ह्यात्मा कूटस्थो दोषवर्जितः । एकः सन्भिद्यते भ्रांत्या मायया न स्वरूपतः** ।। (श्रीजाबालोपानिषतदर्शन १०–२) ( **निकायः पुंजराशीतूत्करः कूटमस्त्रियाम्** ) देह, इंद्रियें, मन आदिकांच्या राशींत–समूहांत असणारा ' **कूटे स्थितः कूटस्थः** । ' कूटस्थ म्हणवून घेतो. यंत्राप्रमाणें असणाऱ्या देहादिकांत विजेप्रमाणें चैतन्यरूपानें सदा एकरूप व निश्चल असणारा कूटस्थ. कूट म्हणजे माया या अर्थीं मायेंत राहून तिला असंग असलेला अथवा फसविणाऱ्या खोट्या अशा मायाकार्यांत त्याला असंग असा राहून नित्य आपल्या रूपानें जशाचा तसा राहणारा, शैल-श्रृंगाप्रमाणें असणाऱ्या देहशिरोभागाच्या ब्रह्मरंध्रांत असणारा असे कूटस्थ या शब्दाचे अर्थ होतात. ' **कूट इव स्थितः कूटस्थः** । ' सोनाराच्या ऐरणीवर किती दागिने घडले जातात तरी पण ती ऐरण जशीच्या तशीच

असल्याप्रमाणें मायेकडून किती जगाचे आकार घडले गेले तरी ज्यांत कांहीं विकार होत नाहीं तो कूटस्थ, नांगराच्या फाळाप्रमाणें आपल्या विचारानें माया-कार्य भेदून जाणारा. असे हे सर्व अर्थहि आत्मदृष्टीनें लागू पडतात. **माया-निश्चलयंत्रेषु कैतवानृतराशिषु । अयोधने शैलशृंगे सीरांगे कूटमस्त्रि-याम् ।** ( अमर ) वरील सर्व अर्थ या श्लोकांत आले आहेत. **कालव्यापी स कूटस्थः स्थावरो जंगमेतरः ।** —स्थावरजंगमाहून वेगळा, कालव्यापी म्हणजे त्रिकालाबाधित, नित्य निश्चल असणारा कूटस्थ असाहि अर्थ होतो. ' **कूटस्थः कूटे निश्चलः सन् तिष्ठतीति कूटस्थः ।** ' असा हा कूटस्थ आत्मा. ' **अंचत इति आत्मा ।** ' स्वप्रकाशरूप सर्वव्यापी असून अविनाशी आहे. तो सर्वांच्या रूपानें एकच आहे. एक असून देखील मायेनेंच केवळ वेगळा मानला जातो. ही भ्रांति मायेमुळेंच होते. **अन्यथाकार-दर्शनं माया ।** वस्तुस्थितीहून वेगळ्या प्रकारें दाखविणारी माया अथवा भ्रांति म्हणून म्हटली जाते. **यदा पश्यति चात्मानं केवलं परमार्थतः । मायामात्रं जगत्कृत्स्नं तदा भवति निर्वृतिः ।** ( १०–१२ ) पारमार्थिक दृष्टीनें केवळ आपणच एक आहों असें जेव्हां बघूं लागतो आणि हें मायेमुळेंच केवळ स्वरूपाचें अन्यथा दर्शन या जगद्रूपानें होत असतें असें जाणतो तेव्हां या जीवभावाची निवृत्ति होते. **स्वशरीरे स्वयंज्योतिः स्वरूपं पारमार्थिकं । क्षीणदोषाः प्रपश्यन्ति नेतरे माययावृताः ॥** ( पाशु. ब्र. उ. )—आत्म-साधनांनीं निर्दोष झालेल्यांनाच फक्त आपल्या देहांत असणाऱ्या स्वयंज्योति अशा पारमार्थिक स्वरूपाचें दर्शन होतें; मायावृतांना तें होत नाहीं. **एकरूपा पराविद्या सत्येन तपसापि च । ब्रह्मचर्यादिभिर्धर्मैर्लभ्या वेदांतवर्त्मना॥३२॥** —ही श्रेष्ठ अध्यात्मविद्या ( ' अध्यात्मविद्या विद्यानाम् ' ) सत्य शास्त्रीय असें नियमित आचरण, व्रतोपवास, ब्रह्मचर्यादि साधनें यांनीं व मुख्यतः वेदांताच्या मार्गानें आत्मान्वेषण केल्यास संप्राप्त होते. **ज्ञानस्वरूपमेवाहुर्जगदे-तद्विलक्षणम् । अर्थस्वरूपमज्ञानात्पश्यन्त्यन्ये कुदृष्टयः ॥**—हें अखिल जग केवळ एक ज्ञानस्वरूपच असतां मायामोहित अशा कुदृष्टीला भोग्यरूप वाटतें असें उपनिषदांचें सांगणें आहे. ज्ञानस्वरूपाची दृष्टि त्यांना जगांत स्थिर करावयाची आहे यामुळें विवाहगर्भादानादि संस्कारांची तत्त्वनिष्ठा उद्दीपित करणाऱ्या मंत्रांसहित परिष्कृत व नियमबद्ध अशी आंखणी त्यांनीं केली आहे.

प्रकृतिपुरुषांचें ऐक्य विवाहांतहि स्थूलमानानें प्रगट करून लक्षणेनें

अद्वितीय ब्रह्मतत्त्वाचा वधूवरांना श्रुति बोध करते, दांपत्यजीवनाचें असें हें तात्त्विक रहस्य उकलून दाखवितें, सतीपतींच्या यथार्थ मूळ रूपाची जाणीव देते, अभ्युदयनिःश्रेयसाचा राजमार्ग दाखविते. अपौरुषेय वेदाची ही परिशुद्ध दृष्टि ! हे वैदिक धर्माचें तात्त्विक दर्शन ! हें दांपत्तिक विश्वधर्माचें सारसर्वस्व ! प्रकृति ही पुरुषाच्या प्राप्तीनेंच कार्यक्षम होते, हें तत्त्व देहरूपाच्या स्थूलमानानें वधूवरांच्या लग्नांत प्रगट होतें.

अर्धार्ध भाग मिळून जशी एक पूर्ण वस्तु होते त्याप्रमाणें प्रकृतिपुरुषांचें एकीकरण म्हणजे एक अखंड परमात्मस्वरूप. कार्य हें पूर्ण रूपानेंच व्हाव-याला लागतें म्हणून स्त्रीपुरुष लग्नानें एकरूप होतात आणि मग सृष्टीचें प्रजो-त्पादन, श्रौतस्मार्तादि सर्व कार्यें करतात.

## शिवशक्त्यैक

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् । जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥ एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय । अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥ मत्तः परतरं नान्य-त्किंचिदस्ति धनंजय । मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥** ( भ. गी. अ. ७ )—ज्याच्या योगानें हें जग धारण केलें गेलें आहे अशी जीवभूत माझी एक शक्ति आहे. या शक्तीपासून अथवा प्रकृतीपासूनच सर्व भूतांची उत्पत्ति झाली. तीपासून या दृष्टीनें होणाऱ्या सर्व कार्यांना व त्या प्रकृतीला त्यांच्या मूळरूपानें मीच एक उत्पत्तीचें आणि लयाचें स्थान आहें. माझ्यापेक्षां मोठें कांहींहि नाहीं. सुवर्णमालेंतल्या एका सुवर्णाप्रमाणें मी या सर्व भूतांच्या अंतर्बाह्य व्यापून अखंड राहिलों आहें. असा या श्लोकांचा भावार्थ आहे. **ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।** ( भ. गी. १५–७ ) या जीवलोकांत जीवभूत जो माझा अंश आहे तो अंशअंशीच्या अभेदामुळें सनातन असा मीच आहें.

**मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् । तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥१०॥** ( श्वे. ४–१० ) माया हीच प्रकृति आणि या माया-रूप असणाऱ्या शक्तीला अथवा प्रकृतीला अधिष्ठान असणारा मायी परमात्मा. या परमात्म्याच्या अवयवभूत असणाऱ्या जीवांनींच हें सर्व जग व्याप्त झालें आहे. **देहो देवालयः प्रोक्तः स जीवः केवलः शिवः । त्यजेदज्ञाननिर्माल्यं**

**सोऽहंभावेन पूजयेत् ॥** (स्कंद. उ. १०)—देहच देवालय आहे व त्यांत असणारा जीवच शिव आहे. अद्वितीय अशा शिवरूप परब्रह्मांत दुसरें कांहींच नसतांना अज्ञानाचें निर्माल्य प्रथम टाकून देऊन 'सोऽहम्' तोच मी म्हणून, ऐक्यभावानें पूजा करावी. **अभेददर्शनं ज्ञानं ध्यानं निर्विषयं मनः । स्नानं मनोमलत्यागः शौचमिंद्रियनिग्रहः ॥**—अभेद-दर्शन हेंच ज्ञान, निर्विषय मन होणेंच ध्यान, मनोमलाचा त्यागच स्नान आणि इंद्रियनिग्रह म्हणजेच शौच–(शुद्धि) **जीवो ब्रह्मैव नापरः ।** जीव ब्रह्मच आहे, परमात्मरूपच आहे. प्रकृतिपुरुषैक्य म्हणणें काय व वरील गीतानुसार जीवब्रह्मैक्य म्हणणें काय दोन्ही एकच. यालाच शिवशक्त्यैक्य असेंहि म्हणतात. जीव ही एक प्रकृति अथवा शक्ति असें मानल्यास इला सात ज्ञान-भूमिकांतून जाऊन शिवरूपी परब्रह्मांत ऐक्य पावावें लागतें.

**स एव सर्वं यद्भूतं यच्च भव्यं सनातनम् ।** (कैवल्य.) **एकः सन्बहुधा कलपयन्ति । एकः सन्बहुधा विचारः । एको देवः सर्वभूतेषु गूढः एकोबहूनाम् । एकोहꣳ सो भुवनस्यास्य मध्ये । यो योनिं योनिमधिति-ष्ठत्येको यस्मिन्निदं संचविचैति सर्वम् । यस्मिन्निदꣳ संचविचैति सर्वꣳ स ओतः प्रोतश्च विभुः प्रज्ञासु ॥** इत्यादि अनेक श्रुतिस्मृतींच्या आधारें सर्वाद्य परमात्मा अद्वितीयच असणें युक्तहि होत असल्यामुळें या युक्तीच्या आधारेंहि एका परत्माम्यानेंच आपल्या संकल्पानें हीं सर्व रूपें धारण केलीं हें सिद्ध होतें. **एकोऽहं बहु स्याम् । बहु स्यां प्रजायेयमिति स तपोतप्यत ।** इत्यादि श्रुति याचेंच विधान करीत आहेत. **स मिथुनꣳ समभवत् । एवमेव यदिदं किंच मिथुनमापिपीलिकाभ्यस्तत्सर्वमसृजत ।** या बृहदारण्याच्या वाक्यावरूनहि एक परमात्माच स्त्रीपुरुषरूप झाला, त्यानें आपल्यापासूनच जगांतलीं सर्व जोडपीं निर्माण केलीं हें सिद्ध होतें. **प्रजाकामो वै प्रजापतिः स तपो तप्यत । स तपस्तप्त्वा । स मिथुनमुत्पादयते । रयिं च प्राणं चेत्येतौ मे बहुधा प्रजाः करिष्य इति ।**

प्रश्नोपनिषदादिकांचीं अशीं एकाच अर्थाचीं इतरहि पुष्कळ वाक्यें आहेत. एवंच एक परमात्माच भिन्नत्वाच्या आणि बहुत्वाच्या संकल्पानें जितकें असें हें जगांत दिसून येतें तें सर्व झाला असल्यामुळें हें वैचित्र्य व ही भिन्नता अपरिहार्य आहे. तारतम्यानेंच भिन्नत्व आणि बहुत्व टिकून असल्यामुळें, तेंच

जगाचें रूप असल्यामुळें या ईशसृष्टींत कितीहि केलें तरी या निसर्गाला अन्यथा कोणी करूं शकत नाहीं. सुवर्णाचे स्त्रीपुरुष, पांच वर्णांचे, चार आश्रमाचे, भिन्न आकाराचे, नीचोच्च भेदाचे लोक, पशुपक्षी आदि भेद निर्माण केले तर, त्यांत व्यापून असणारें सुवर्ण एक म्हणून व एका सुवर्णाच्या दृष्टीनें स्त्रीपुरुष, वर्ण, आश्रम, मनुष्य, मनुष्येतर योनी, स्थावरजंगम हा भाव मिथ्या म्हणून जाणतां येईल. पण असें मनांत आल्याबरोबर तिथले ते आकार जसे नाहींसे होत नाहींत त्याप्रमाणेंच या सर्व भेदाभिन्न विविध जगांत सर्वरूपानें व्यापून असणारें एक परमात्मरूप म्हणून व एका परमात्म्याच्या दृष्टीनें स्त्रीपुरुष, वर्णाश्रम, मनुष्य, मनुष्येतर योनी, स्थावरजंगम हा भेदभाव मनांत आणणें मिथ्या म्हणून जाणतां येईल. असें हें जाणलें तरी ते आकार व गुणधर्म नाहींसे होत नाहींत.

सृष्टीच्या जीवनक्रमांत त्या त्या पदार्थांचा त्या त्या गुणधर्माप्रमाणेंच उपयोग करून घ्यावा लागतो. सुवर्णाचींच नाणीं असलीं तरी त्यांची कमी जास्त प्रमाणांनीं किंमत वेगळी असते. एकाच सुवर्णाचीं आभरणें असलीं तरी तीं त्या त्या ठिकाणींच घालतात. एकाच सुवर्णांत कंठा आणि कंठी असा पुल्लिंगी स्त्रीलिंगी शब्दप्रयोग होतो. 'कंठा आण' म्हटल्यानंतर कंठाच आणेल आणि 'कंठी आण' म्हटल्यावर कंठी आणेल.

## गुणधर्माप्रमाणें कर्तव्य व कार्यक्षेत्र

स्त्रीपुरुषांना त्या त्या पुल्लिंगी, स्त्रीलिंगी नांवानींच हांक मारावी लागते. त्या त्या नात्यांनीं त्या त्या व्यक्तीशीं व्यवहार करावा लागतो. प्रत्येकाची पात्रता भिन्न भिन्न असते. पात्रतेप्रमाणें अधिकार दिला जातो. अधिकाराप्रमाणें जबाबदारी असते. जबाबदारीप्रमाणें कर्तव्य वेगळें वेगळें असतें. त्या त्या कर्तव्याप्रमाणें त्याचें कार्यक्षेत्र वेगवेगळें असतें. त्या त्या कार्यक्षेत्रांत त्याला त्याला त्या त्या कर्तव्यपूर्तीला अनुरूप असे तसे तसे आचार विचार पाळावे लागतात. स्वपरहिताची दृष्टि ठेवून प्रत्येकानें वागलें पाहिजे व सर्वत्र आत्मदृष्टि ठेवली पाहिजे. असें असलें तरी जगांतल्या पदार्थांची, जातींची, गुणधर्मांची भिन्नता व विविधता घालवितां येत नाहीं व घालवून व्यवहार चालतहि नाहीं. एकानेंच भेदाचीं अनेक रूपें बुध्या धारण केलीं असल्यामुळें त्यांत विषमता नाहीं, निर्दयता नाहीं, सत्यदृष्टीनें भेद नाहीं व व्यावहारिक दृष्टीनें अभेद नाहीं. इथल्या जाती, भेद, भिन्नता, विविधता जशाच्या तशाच ठेवून त्यांचा व्यावहारिक

जीवनास उपयोग करून घ्यावा व पारमार्थिक एकत्वानें समत्व बाळगावें. अभेदांत भेद, भेदांत अभेद, अनेकांत एकत्व व एकांत अनेकत्व अशा विलक्षण अनुभवांनीं वर्तण्याचें असें कांहीं एक हें ऐहिक जीवन आहे. एकानेंच आपल्या रूपांत आधार, आधेय, आश्रय, आश्रयी, मुख्य, गौण, कार्यकारण, नीच, उच्च, असे भिन्न भाव आणि विविधता निर्माण करून तोच एक तसा वागतो. या दृष्टीनेंच भेद आणि विविधता कायम ठेवून समता बाळगावी लागते. अशीच ही व्यवहाराची व परमार्थाची तात्त्विक दृष्टि आहे. सृष्टिनियमांची पायमल्ली कोण व कोणता समाज करूं शकेल ? हें सर्व जाणून वागलें म्हणजे ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद, हरिजनोद्धाराच्या प्रचाराचा सक्त कायदा, स्त्री-स्वातंत्र्य इत्यादि प्रश्न प्रजा—सरकार दोघांच्या ठिकाणींहि उद्भवणार नाहींत. परस्परांतले भेद कायम राहून देखील परस्परांशीं परस्परांचें गोड आचरण, प्रेमाची वागणूक, आत्मीय भावनेचें साहाय्य, मृदु मधुर भाषण, इहपर श्रेष्ठ सुखाची खोल व दीर्घ दृष्टि इत्यादि समाजांत सर्वत्र दिसून येईल व सर्वांचेंच सुखासमाधानाचें दिव्य जविन होईल. कोठेंहि अशांतता, क्षुब्धता, दंगेधोपे, अत्याचार इत्यादि अविवेकाच्या कृत्यांचा मागमूसहि दिसून येणार नाहीं. रामराज्य अथवा आर्य संस्कृति, वैदिक पद्धति यांत असें एक आदर्श जीवन आपल्या उठावदारपणानें दाखवून घेत आहे.

एकेका पदार्थांत देवानें एकेक गुण ठेवला आहे. त्या त्या गुणाचा उपयोग आपल्या जीवनाला योग्य प्रकारें करून घेऊन जीवन चालवावयाचें असतें. उंसांत गोड रस अधिक आहे. त्याचाच गुळासाखरेकरितां उपयोग केला तर थोडक्या श्रमांत अधिक लाभ करून घेतां येतो. याच न्यायानें ईश्वरसृष्ट मनुष्य, पशुपक्षी व वनस्पति यांच्या भिन्न भिन्न जातींतून असणाऱ्या गुणांचा त्या त्या करितां उपयोग करून घेतल्यास थोड्या श्रमांत ती ती नड पुरी होऊन त्या त्या पासून अधिक लाभ होतो. ईशसृष्टींत गुळा-साखरेकरितांच उत्पन्न झालेल्या उंसाचा त्याकरितां उपयोग न करतां ज्या इतरांतून तो गुण नाहीं, त्या उंसाच्या तोडीच्याच इतर वनस्पति करून त्यापासून गूळ आणि साखर गुणापेक्षां अधिक काढून दाखविण्याचा जर कुणी, इतर वनस्पतींच्या दयेनें, त्यांचा उद्धार म्हणून प्रयत्न करूं लागेल तर ऊंस पिकवावयाचें राहील, दुसऱ्यांतून हा गुणधर्म उत्पन्न करण्यास शक्य होणार नाहीं व इतर वनस्पति ऊंसहि न होतां आपलाहि गुणधर्म घालवून निरुपयोगी बनतील.

देव-भक्त, गुरु-शिष्य, राजा-प्रजा, स्वामी-सेवक, सती-पति, पिता-पुत्र, वरिष्ठ-कनिष्ठ, रयत-अधिकारी यांत आज्ञा-कारी, आज्ञा-धारी असा परापरतेचा व्यवहार असावा लागतो.

शक्तीपेक्षां शक्तिमंताला अधिक महत्त्व असतें. शक्ति अथवा प्रकृति ही परमात्मरूप पुरुषाच्या संकल्पानें झालेलें त्याचें एक प्रतिरूप होय. शक्ति-शक्तिमंतांत आधार-आधेयाचें नातें आहे. शक्तीला अथवा प्रकृतीला पुरुषाचाचं आश्रय करावा लागतो. अशा रीतीनें प्रकृतीचा अथवा शक्तीचा अंश असणाऱ्या सतीला पुरुषाचा अंश असणाऱ्या पतीचाच आश्रय करावा लागतो. अंश अंशीच्या अस्तित्वानें असतो. कार्य-कारणभावाप्रमाणें कारण-रूप पुरुषाचा आश्रय कार्यरूप प्रकृतीला असावाच लागतो. कार्य कारणाच्या आश्रयानें असतें. कार्य हें कारणांत लीन होतें. त्याप्रमाणेंच प्रकृतिहि पुरुषांत लीन होते. ‘शक्तिमानाची शक्ति’ या म्हणण्यांत शक्तिमानालाच प्राधान्य दिलें जातें. हीच दृष्टि अवलंबून स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं; तिनें पुरुषाच्या आश्रयानेंच राहावें असें म्हणण्यांत येतें.

मोक्षप्राप्तीच्या सात भूमिकांचा विचार सप्तपदींत गर्भित ठेवून बहुत्वाच्या संकल्पानें स्थूलदेहधारी प्रकृतिपुरुष हे सतीपतीच्या रूपानें विवाहांत एक होतात आणि नंतर प्रजाकाम होऊन आपल्या ऐक्यत्वानें तद्योतक संततीद्वारां बहुत्वाचा संकल्प पूर्ण करतात. कार्य शक्तीमुळेंच होत असल्यामुळें शक्तिरूप असणाऱ्या धर्मपत्नीविना संततीरूप बहुत्व आणि त्याकरितां असणारा गृहस्थाश्रम पूर्ण होत नाहीं. शक्तिमंतच शक्तीचें रूप धारण करीत असला तरी, शक्ति शक्तिमंत यांच्यांत अभेदत्व असलें तरी, शक्ति ही शक्तिमंताचा आश्रय करूनच असते, हें सामान्यतः सर्वांनाहि कळून येण्यासारखें आहे. या दृष्टीनें शक्तिरूप असणारी स्त्री पुरुषाच्या आधीनच असावयाची हें तात्त्विक दृष्टीनेंहि त्यांच्या त्यांच्या उपाधिस्वभावानुरूप सहज वाटतें.

## स्त्रीपुरुषांचा एकदेहन्याय

दक्षिणवामांगाच्या अन्वयाप्रमाणें स्त्रीपुरुषांचा अन्वय एकदेहन्यायवत् सदा अतूट असतो. विध्युक्त विवाहानें प्राप्त झालेली अर्धांगीच त्याची पत्नी म्हणून म्हटली जाते. गृहस्थाश्रमांत संतति हाच प्रधान हेतु असतो. धर्म, अर्थ, काम हे तीन पुरुषार्थ गृहस्थाश्रमाचे मुख्य घटकावयव

आहेत. अर्धांगवायूच्या योगानें अर्धें अंगच कामांतून जातें, त्याच्याकडून कोणतेंहि काम करून घेण्यास होत नाहीं. त्याचप्रमाणें अर्धांगवायूमुळें स्त्री-पुरुषात्मक कोणतेंहि अंग नाहींसें झालें तरी प्रवृत्तिधर्म तिथेंच संपून उरलेल्या अर्धांगाप्रमाणें एक मोक्षमार्गच अनुसरणीय होतो. पतिनिधनानंतर सती, सतीनिधनानंतर पति यांनीं प्रवृत्तिमार्ग सोडून, निवृत्तिमार्गाचें अवलंबन करून, मोक्षाकरितां प्रयत्न केला पाहिजे म्हणून शास्त्र सांगतें. वंशाला कोणी पुढें नाहीं असें झाल्यास वंशवृद्धीकरितां (वंश पुरुषापासूनच चालत असल्यामुळें) पुरुषाला दुसऱ्या लग्नाची अनिर्वाह प्रसंगीं परवानगी आहे. पूर्ण ज्ञान-वैराग्याच्या माणसाला तोहि निर्बंध बंधक नाहीं.

## विधवाविवाह-निषेध

**नान्यस्मिन्विधवा नारी नियोक्तव्या द्विजातिभिः । अन्यस्मिन्हि नियुंजाना धर्मं हन्युः सनातनम् ॥ ६४ ॥ नोद्वाहिकेषु नियोगः कीर्त्यते क्वचित् । न विवाहविधावुक्तं विधवावेदनं पुनः ॥** (मनु. ९ । ६५)

—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या त्रैवर्णिकांनीं तरी दुसऱ्या पुरुषाशीं विधवांचा विवाह करून देऊं नये. विधवांचा अन्य पुरुषाशीं विवाह करून दिल्यास सनातन धर्माचा नाश केल्यासारखें होतें. **अर्यमणं नुदेवम् ।** (अश्वलायन गृ. सू. १-७) इत्यादि कोणत्याहि विवाहमंत्रांत कुठेहि विधवाविवाह सांगितला नाहीं. कोणत्याहि शाखेंतल्या विवाहपद्धतींतहि विधवाविवाह आढळून येत नाहीं. त्यामुळें अन्य पुरुषाशीं कोणत्याहि विधवेचा विवाह करून देणें युक्त नाहीं. यानें व्यक्तीची आणि समाजाची नीति नष्ट होते. ऐहिक, पारलौकिक उत्कर्षाची आशा मावळते. पारमार्थिक, व्यावहारिक, सामाजिक, नैतिक अशा कोणत्याहि दृष्टीनें अथवा भावी पिढीच्या दृष्टीनेंहि पुनर्विवाह केव्हांहि निषिद्धच आहे. वरील मनूच्या सांगण्याला तात्त्विक जीवनाची जितकी पुष्टि आहे तितकी सामाजिक, नैतिक, व्यावहारिक जीवनाचीहि पुष्टि आहे. एका पुरुषाचें अर्धांग असणारी स्त्री दुसऱ्या पुरुषाचें अर्धांग कधींहि होऊं शकत नाहीं. आपलें विध्युक्त पाणिग्रहण करणाऱ्या पुरुषाशीं त्याचें जीवित असेतोंपर्यंत व मरणानंतरहि ती स्त्री अनन्यच असली पाहिजे. अद्वितीय स्वरूपप्राप्तीचा हा मोक्षधर्म होय. पुरुषाचें अर्धांग असणाऱ्या स्त्रीला त्या पुरुषाशिवाय दुसरी गती नाहीं. त्याची शक्ति त्याच्यांतच लीन

होणार, राहिली तरी ती त्याच्याशींच एकरूप असणार, ही तात्त्विक दृष्टि आहे. आणखी अन्य दृष्टीनेंहि **'प्रकृतिर्जडा'** प्रकृति ही पुरुषाकडूनच चैतन्ययुक्त होते,असें झालें तर प्रकृतिरूप उपाधीचा अभिमान घेऊन असणाऱ्या स्त्रीला आपल्या औपाधिक स्वभावाप्रमाणें कांहींहि स्वातंत्र्य नसतें, हें सहज सिद्ध होतें. **न स्त्री स्वातंत्र्यमर्हति।** या मनूच्या वाक्यांत हा तात्त्विक विचारच भरून आहे. ज्यांना तात्त्विक विचार व माणुसकी नको त्यांच्याकरितां हा पशुधर्म स्वतंत्र आहे हें आतांपर्यंतच्या विवेचनानें स्पष्ट होण्यासारखें आहे!

## सतीपति व गृहस्थाश्रमरहस्य

गृहस्थाश्रमाच्या जीवनरूप बैलगाडीचीं स्त्रीपुरुष हीं दोन चक्रें होत. तात्त्विक दर्शन हा गाडीवान व पातिव्रत्य आणि एकपत्नीव्रत हे दोन बैल समजावेत. गृहस्थाश्रमांत सतीपतींचा घनिष्ट संबंध असतो. त्यांच्यांत एकात्मता असते. सतीपतींचें एकात्मिक आचरण आर्य संस्कृतीचें एक मुख्य अंग आहे. रामराज्यांत असला सीतारामांचाच एक आदर्श असला पाहिजे.

**अन्योन्यस्याव्यभीचारो भवेदामरणान्तिकः ।**
**एष धर्मः समासेन ज्ञेयः स्त्रीपुंसयोः परः ॥** ( मनु. ९।१० )

—आमरणांत सतीपति हे अव्यभिचारी असले पाहिजेत. थोडक्यांत हाच एक स्त्रीपुरुषांचा मुख्य धर्म आहे. **तथा नित्यं यतेयातां स्त्रीपुंसौ तु कृतक्रियौ । यथा नाभिचरेतां तौ वियुक्तावितरेतरम् ॥ १०२ ॥** दोघांकडूनहि धर्मार्थकाम या विषयांच्या ठिकाणीं व्यभिचार कधींहि न होईल अशी परस्पर स्त्रीपुरुषांनीं एकत्र राहून सर्वदाच काळजी घेतली पाहिजे. **नगरस्थो वनस्थो वा शुभो वा यदि वाऽशुभः । यासां स्त्रीणां प्रियो भर्ता तासां लोका महोदयाः ॥** ( वा. रा. अ. स. ११६।२१ ) **दुःशीलः कामवृत्तो वा धनैर्वा परिवर्जितः । स्त्रीणामार्यस्वभावानां परमं दैवतं पतिः ॥ २२ ॥** सीता व अनुसूया या दोन सतीशिरोमणी स्त्रीरत्नांच्या संवादांतले हे दोन श्लोक आहेत. नगरस्थ वा वनस्थ असो, शुभाचारसंपन्न असो वा अशुभाचारयुक्त असो, कसाहि असला तरीहि ज्या सतींना पति प्रिय असतो त्यांना दिव्य लोकांची प्राप्ति होते. दुःशील असो, कामी असो, दरिद्री असो आर्य स्वभावाच्या स्त्रियांना तो आपला पतीच परमदैवत आहे असा या श्लोकांचा भावार्थ आहे. नात्यागोत्याची मंडळी, सकळ राजोपचार, तो राजवाडा, तें वैभव, तो दासदासींचा परिवार,

तो थाट, तें सर्व सुख सोडून सीता श्रीरामाबरोबर फलमूलांनीं उपजीविका करीत, कंटकमय, संकटग्रस्त अशा त्या घोर वनांतल्या बिकट मार्गांनीं ऊन, वारा, पाऊस सहन करून, अनवाणी आलेली पाहून द्रवलेल्या अंतःकरणानें अनुसूयेच्या मुखांतून साहजिकच बाहेर आलेले हे उद्गार आर्य स्त्रियांचीं लक्षणेंच प्रगट करीत आहेत. रामायणांतल्या या श्लोकांशीं अगदीं जुळणारे मनुस्मृतीचे कांहीं श्लोक खालीं देतों.

**विशीलः कामवृत्तो वा गुणैर्वा परिवर्जितः । उपचर्यः स्त्रिया साध्व्या सततं देववत्पतिः ॥** ( मनु. ५।८।१५४ ). **नास्ति स्त्रीणां पृथग्यज्ञो न व्रतं नाप्युपोषणम् । पतिं शुश्रूषते येन तेन स्वर्गे महीयते** ॥ १५५ ॥ **पाणिग्राहस्य साध्वी स्त्री जीवितो वा मृतस्य च । पतिलोकमभीप्सन्ति नाचरेत्किंचिदप्रियम्** ॥ १५६ ॥—दुःशील, स्त्रीलंपट, दुर्गुणी असा कसाहि पति असो त्याला **देवाप्रमाणें** मानून त्याची सतीनें सतत सेवा करावी. ज्यायोगें केवळ स्वर्ग मिळतो त्या पतिसेवेशिवाय स्त्रियांना वेगळा असा यज्ञ नाहीं, वेगळें व्रत नाहीं, वेगळें उपोषणहि नाहीं. शास्त्रीय विवाहाच्या साध्वी स्त्रीनें **पति जिवंत असेपर्यंत व मरणोत्तरहि** त्याचें कधींहि कांहीं अप्रिय म्हणून आचरूं नये. **व्यभिचारात्तु भर्तुः स्त्री लोके प्राप्नोति निन्द्यताम् । शृगालयोनिं प्राप्नोति पापरोगैश्च पीड्यते** ॥ ५-१६४ ॥ —व्यभिचारानें स्त्री, मग ती कितीहि कुलीन असो, जिवंत असेपर्यंत जगांत निंद्य होते. मरणोत्तर कोल्ही होते. तें सर्व अनुभवून पुनः मनुष्यजन्मालाच आल्यास ती पापिष्ठांना प्राप्त होणाऱ्या मोठमोठ्या कुष्ट महारोगादिकांनीं आपोआप पछाडली जाते. पतिव्रता स्त्री गरोदर राहिली तर तिचा किती उत्सव करतात; आणि तीच विधवा ! तिचें तोंडहि कुणी पाहात नाहीं. लोकांच्या दृष्टीला न पडतां कुठे तरी कानाकोपऱ्यांतून तिला आपलें लाजिरवाणें जीवित कसें तरी कंठावें लागतें. धर्माधर्मांत असें हें एवढें अंतर आहे. **पतिं या नाभिचरति मनोवाग्देहसंयता । सा भर्तृलोकमाप्नोति सद्भिः साध्वीति चोच्यते** ॥ —मनोवाग्देहांनींहि जी पतीशीं थोडादेखील व्याभिचार करीत नाहीं, ती स्वर्गादि उत्कृष्ट लोकीं पतीसह-वास करते आणि जिवंत असेपर्यंत इथे साध्वी म्हणवून घेते. **सा भार्या या गृहे दक्षा सा भार्या या प्रजावती । सा भार्या या पतिप्राणा सा भार्या या पतिव्रता** ॥ ( व्यासस्मृति ) —जी गृहव्यापारांत दक्ष असते, जी पुत्रवती असते, जी पतिप्राण असते, जी पतिव्रता असते तीच

एक भार्या म्हणवून घेते. अवलोकनार्थ दक्षस्मृतीचे कांहीं श्लोक देतों.

**गृहाश्रमात्परं नास्ति यदि भार्या वशानुगा । तया धर्मार्थकामानां त्रिवर्गफलमश्नुते ॥ ४।१ ॥ अनुकूला न वाग्दुष्टा दक्षा साध्वी प्रियंवदा । आत्मगुप्ता स्वामिभक्ता देवता सा न मानुषी ॥ ३ ॥ अनुकूलकलत्रस्य स्वर्गस्तस्य न संशयः । प्रतिकूलकलत्रस्य नरको नात्र संशयः ॥ ४ ॥ गृहवासः सुखार्थं हि पत्नीमूलं च तत्सुखम् सा पत्नी या विनीता स्याच्चित्तज्ञावशवर्तिनी ॥ ६ ॥ प्रहृष्टा मनसा नित्यं स्थानमानविचक्षणा । भर्तुः प्रियकरा या तु सा भार्या त्वितरा जरा ॥ १२ ॥ जिव्हा भार्या शिशुर्भ्राता मित्रो दासः समाश्रिताः । यस्यैते तु विनीताः स्युस्तस्य लोकेऽपि गौरवम् ॥ १३ ॥** —भार्या जर वश असली तर त्या गृहस्थाश्रमाहून कांहीं श्रेष्ठ नाहीं. तिच्यामुळेंच धर्मार्थकाम या त्रिवर्गाचें फळ मिळतें. सर्वतोपरी अनुकूल, मंजुळ बोलणारी, दक्ष, साध्वी, सत्य आणि प्रिय बोलणारी, आपलें आपणच रक्षण करून घेणारी, पतिभक्त असणारी, देवमाणूस म्हटल्याप्रमाणें ती भार्या ‘ देवताभार्या ’ म्हणून म्हटली जाते. अनुकूल पत्नीनें पतीस स्वर्ग मिळतो व प्रतिकूल पत्नीनें त्यास नरक मिळतो. ऐहिक सुखासाठीं गृहस्थाश्रम; जगांत पत्नीमूलकच तें ऐहिक सुख असतें. जी विनयशील व अनन्य असते, जी चित्त जाणणारी असते तीच पत्नी, जी सर्वदा संतुष्ट, प्रसन्न, हंसतमुखी, स्थानमान लक्षांत घेऊन वागणारी, नवऱ्याचें प्रिय आचरण्यांत सदा दक्ष असणारी अशी असेल तर ती भार्या, नाहीं तर **जीर्यत्यंगं यया इति जरा ।**—देहाला जीर्णजर्जर करून टाकणारी ती एक जराच होय. जिव्हा, भार्या, शिशु, बंधु , मित्र, दास, आश्रित हे सर्व ज्याच्या कह्यांत असतात त्यालाच लोकांत गौरव असतो. **धर्मपत्नी समाख्याता निर्दोषा यदि सा भवेत् । दोषे सति न दोषः स्यादन्या कार्या गुणान्विता ॥ २५ ॥** —जर निर्दोषी असेल तरच ती धर्मपत्नी म्हणवून घेते. तिच्यांत कांहीं दोष असल्यास तिचा त्याग केल्यानें दोष लागत नाहीं. पुत्रप्राप्तीकरितां अन्य गुणान्वित वधूशीं शास्त्रीय विवाह करावा. मात्र दुसऱ्याचें ऐकून कसली तरी अनाठायीं कल्पना करून पत्नीचा त्याग करूं नये, म्हणून याच्या पुढच्याच श्लोकांत सांगितलें आहे. **अदुष्टापतिता भार्या यौवने यः परित्यजेत् । स जीवनान्ते स्त्रीत्वं च वन्ध्यत्वं च समाप्नुयात् ॥ १६ ॥** —निर्दोषी व अपतित अशा भार्येस जो भर तारुण्यांत सोडतो—तिचा त्याग

करितो तो मरणानंतर स्त्री होतो व त्याला बालवैधव्य प्राप्त होतें. **दरिद्रं व्याधितं चैव भर्तारं याऽवमन्यते । शुनी गृध्री च मकरी जायते सा पुनः पुनः ॥ १७ ॥** ——दरिद्री अथवा व्याधिग्रस्त असणाऱ्या पतीचा जी अपमान करते ती कुत्री, गृध्री, मगरी यांच्या जन्माला पुनः पुनः जाते.

सतीपति हीं ' एकदेहन्याया 'नें असावयाला पाहिजेत. **समापो हृदयानि नौ ।** —शुद्ध पाण्यांत शुद्ध पाणी मिळून एक झाल्याप्रमाणें आम्हां दोघांचेंहि हृदय व हृदयांतील विचार एक असावेत असें पतिपत्नीकडून वदविलें जाणारें हें वेदवाक्य आहे. वैदिक संस्कृतींतल्या सतीपतींच्या हृदयाची हें वाक्य संपूर्ण परिचय करून देतें. याच्याविरुद्ध आचारविचार ज्या ठिकाणीं दिसून येतो तें वैदिक अथवा आर्य संस्कृतीचें लक्षण नव्हे. प्रसंगोपात्त सतीशिरोमणी सीतेची या ठिकाणीं आठवण झाली. **यथा मे हृदयं नित्यं नापसर्पति राघवात् । तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः ॥** ( वा. रा युद्ध कां. ११६–२५ )—आर्य धर्माचें पातिव्रत्य कसाला लावून बावन्नकशी उतरलेल्या सती सीतेचे हे वरील उद्गार आहेत. अग्नीचें दिव्य करून पातिव्रत्याच्या परीक्षेंत सीता पूर्ण उत्तीर्ण झाल्याची साक्ष जगाला पटवून देण्याच्या उद्देशानें उच्चारलेले सीतेच्या आत्मविश्वासाचे हे उद्गार आहेत. श्रीरामाला सोडून माझें हृदय केव्हांहि विचलित न झाल्याची साक्ष म्हणून सर्वसाक्षी अग्नि माझें सर्वतोपरी रक्षण करो, म्हणून साक्ष पटविण्यासाठीं बोलावून आणण्यास अग्नीच्या राजवाड्यांत शिरल्याप्रमाणें सीतेनें पुढें धगधगत असलेल्या चितेंत अत्यंत समाधानी वृत्तीनें प्रवेश केला. **विधूयाथ चितां तां तु वैदेहीं हव्यवाहनः । उत्तस्थौ मूर्तिमानाशु गृहीत्वा जनकात्मजाम् ॥** ( वा. रा. यु. कां. स. ११८–२ )–आपल्याबद्दलची साक्ष पटविण्याकरितां प्रत्यक्ष अग्नीलाच सीतेनें घेऊन आल्याचें तें दिव्य दर्शन या श्लोकांतून होतें. सीता त्या चितेजवळ जाते तोंच ती चिता शांत झाली. अग्नीची ती गगनभेदी ज्वाला एकदम दिसेनाशी होऊन त्या ठिकाणीं शांत तेजाच्या अग्निदेवाचा दिव्य साक्षात्कार झाला. वात्सल्यानें सीतेला हातीं धरून आपली साक्ष पटविण्यास अग्निदेवांनीं सुरुवात केली. " रामा, तुझी अर्धांगी ही सीता, '**त्वच्चित्ता त्वत्परायणा** '—तुला अनन्य आहे. ही त्वच्चित्त आणि त्वत्परायण आहे. ही निर्दोषी आहे, निष्पाप आहे, मनोवाक्कायेनेंहि हिच्याकडून अन्यथा आचरण खचित झालें नाहीं व कधीं तें होणेंहि शक्य नाहीं. या तुझ्या धर्मपत्नीचा तूं

स्वीकार कर. हिच्या परिशुद्ध आचरणाची साक्ष पटविण्याकरितांच मी आलों आहें." सर्व लोकांसमक्ष अशी वस्तुस्थिति कळवून अग्नीनें श्रीरामास सीतेला अर्पण केलें. श्रीरामाला हें ठाऊक असलें तरी लोकांच्या प्रत्ययास येण्याकरितां, खरें असल्यास अग्निसुद्धां शांत होतो व देवसुद्धां प्रत्यक्ष त्याची साक्ष देण्याकरितां येतात असें सर्वांना विदित होण्याकरितां श्रीरामानें सीतेकडून हें दिव्य करविलें.

असें दिव्य करून आपल्या पातिव्रत्याची खूण पटवून देण्याइतकें आर्य स्त्रियांच्या ठिकाणीं कायवाङ्मनाचें पावित्र्य असलें पाहिजे. भारत–स्त्रीरत्नांचें असें हें शील समाजाकडून व सरकाराकडूनहि सुरक्षित झालें पाहिजे. स्त्रीपुरुष अशा शीलाचे होण्यास बालशिक्षणाच्या पायापासूनच सुरुवात झाली पाहिजे. आईवडिलांच्या आचरणांतहि तें दिसून येऊन शाळेंतहि तसेंच शिक्षण मिळालें, सरकारनेंहि तसेच कायदे केले व समाजांत सर्वत्र तसें दिसून आलें तर तो जातिस्वभाव बनतो, त्या देशाची तशी चर्याच बनते. 'केल्यानें सर्वहि होतें.' पातिव्रत्याचें, एकपत्नीव्रताचें व ब्रह्मचर्याचें परिपालन प्रत्येकाकडूनच प्राणपणानें व्हावयाला पाहिजे ही आर्यसंस्कृति आहे.

सीतेसारखेंच सावित्रीचें पण उदाहरण आहे. '**दीर्घायुरथवाल्पायुः सगुणो निर्गुणोऽपि वा । सकृद्वृतो मया भर्ता न द्वितीयं वृणोम्यहम् ॥** (महाभारत वनप. २९४।२७) — सत्यवान दीर्घायु असो वा अल्पायु, सद्‌गुणी असो वा दुर्गुणी, मी एकदां त्याला पति म्हणून मानल्यानंतर प्राण गेला तरी दुसऱ्याशीं कधीं लग्न करणार नाहीं, असें सावित्रीनें उत्तर दिलें होतें. ही आर्य स्त्रियांची तेजस्विता, पावित्र्य व उच्च आदर्शाचें दिव्य आचरण! स्त्रीपुरुषांतूनहि अशी निष्ठा पाहिजे. अविवाहित मुलांमुलींनीं इकडे लक्ष द्यावयास पाहिजे. सद्यःपरिस्थितींतून उन्नतीचा मार्ग आंखला पाहिजे. उत्कृष्ट शीलाचा वारसा गमावूं नये. आपल्यापरी भारताच्या अत्युच्च संस्कृतीचें प्रत्येकानें भूषण व्हावें. भारताची संस्कृति म्हणजे यथार्थ माणुसकीचा आदर्श होय. जगाचेंच यामुळें हित होतें. याचा विचार करून सरकारानेंहि याकरितां कंकणबद्ध राहिलें पाहिजे. सावित्रीनें अल्पायु असलेल्या सत्यवानाला दीर्घायु केलें. निष्ठेचें हें सामर्थ्य आहे. सरकारानें पुनर्विवाहाचे व घटस्फोटाचे कायदे करण्यापेक्षां अशी निष्ठा समाजांतून निर्माण होईल अशी शिक्षणपद्धति आंखावी व याला अनुरूप कायदे करावेत. यानें भारताचें व अनुषंगानें सबंध जगाचेंच

कल्याण आहे. आपण उद्धरून जगाचा उद्धार करणें हें श्रेयस्कर, का आपण नासून जगासहि नासून टाकणें हें श्रेयस्कर, याचा भारताच्या विधिमंडळानें (लोकसभेनें) व मंत्रिमंडळानें पूर्ण विचार करावा. **तीर्त्वा स्वयं भीमभवार्णवं च । अहेतुनान्यानपि तारयन्तः** ॥—आपण स्वतः हा संसारसमुद्र तरून कसल्याहि स्वार्थाशिवायच जगाचाहि उद्धार करण्याचें हें भारताचें शील आहे. हे भारताचे आनुवंशिक संस्कार आहेत. मानवी जीवनाचें खरें भूषण एक शीलच होय. **शीलं परं भूषणम् ।** भारताच्या तात्त्विक जीवनाचें भूषण असलेलें शील भारतानें प्राण गेल्यासहि सोडूं नये. पातिव्रत्याच्या प्रभावानें अबला सबला होतात. पतिव्रतेस एकादा मनुष्य, समाज, सरकारच काय प्रत्यक्ष ब्रह्माविष्णुमहेश्वरहि भ्रष्टवूं शकत नाहींत हें अनसूयेनें आपलीच साक्ष पटवून जगांत सिद्ध करून दाखविलें; महिलासमाजास धैर्य दिलें व तेजस्वी अशा पवित्र जीवनाचा दिव्य मार्ग आंखून दिला; आपल्या पतिचरणोदकाच्या सिंचनानें ब्रह्माविष्णुमहेश्वरांना नेणतीं बालकें करून टाकलें व त्या अतिथींच्या म्हणण्याप्रमाणें वाढावयाला आली; अतिथिसत्काराचें व पातिव्रत्याचें आनुवंशिक ब्रीद राखलें. पातिव्रत्याचा प्रभाव इतका मोठा असतां समाजाला असेंच कां वळण लावूं नये, **सरकारनें असेच कायदे कां परिपाठांत आणूं नयेत** ? हा दिव्य मार्ग टाकून, आर्य संस्कृति इतकी थोर असतांना हिच्याकडे दुर्लक्ष करून, भारतांत असलेली ही इतकी दिव्य संपत्ति सोडून, जगांतल्या साऱ्यांना कर्ज देण्याचा आपला अधिकार विसरून, कुठे इस्लाम तर कुठे इसाई संस्कृतीचें कर्ज कां काढावें ? कां विनाकारण आपलें महत्त्व घालवावें व मुद्दाम दीन व्हावें? न जाणून एखाद्याचें घर खालीं झालेंच तर त्यानें आपल्याबरोबर साऱ्या राष्ट्राचीच संपत्ति कां घालवावी ? उच्च संस्कृतीच्या बाळशाचें तें गोंडस रूप, तें अपार तेज घालवून खप्पड तोंडाचें तेजोहीन राष्ट्र कुणीहि कां होऊं द्यावें व कां कुणी तसे प्रयत्न करावेत? एखाद्यानें कुणी तसे प्रयत्न केलेच तर भारताला खरें आपलें हित कशांत आहे हें कां समजूं नये? **अन्धेन नीयमाना यथान्धाः** । असें कां व्हावें ? " आंधळ्याच्या सवें चाललें आंधळें । घात एकेवेळे पुढें मागें ॥ " ही श्रीतुकारामोक्ति, कशासाठीं कोण जाणें, आठवते खरी ! राष्ट्राचें भवितव्य-सूचकच ही आठवण असल्यास राष्ट्रानें वेळींच कां जागें होऊं नये ? **प्रक्षालनाद्धि पंकस्य दुरादस्पर्शनं वरम्** ॥—विटाळ करून घेऊन स्नान करीत बसल्यापेक्षां त्यापासून दूर राहून त्याला स्पर्श न केलेलाच बरा.

"Prevention is better than cure." झालेल्या परिणामाचें विविध उपायांनीं परिमार्जन करीत बसण्यापेक्षां त्याचा प्रतिबंधच अत्यंत क्षेमकर असतो, म्हणून आंग्ल संस्कृतीहि आम्हांला अशा कृत्यापासून जणूं वारीत आहे.

विवाह हा एक संस्कार आहे. विवाहानें मनुष्यरूपाच्या प्रकृतिपुरुषांना सृष्टिकार्याची व तशीच स्त्रीपुरुषामधून असलेल्या अद्वितीय तत्त्वाची दीक्षा देणें होय. अखंड अनन्यतेचे नियम घालून परस्परांच्या ऐहिक, पारलौकिक जीवनाचीं दोघेंहि पूरक आहेत, हें कळविणें व मूळची अद्वितीय निष्ठा पुनश्च जागृत करणें होय. सृष्टिकार्याकरितां स्वरूपभूत असणारी शक्ति वेगळी करून, एकाचें दोन बनून, दोघांत एकत्व बघत, संततीच्या रूपानें परमात्मा बहु झाला; तोच व्यवहार तदंशभूत प्रवृत्तिसंकल्पाच्या जीवांतूनहि अनुगत झाला आहे. हें सृष्टितत्त्व आहे. हा विश्वाचाच प्रवृत्तिधर्म होय. अन्योन्य सतीपतीच्या द्वारें परमात्मा आपला सृष्टिसंकल्प पुढें चालवीत आहे. सतीपतीच्या प्रत्येक जोडप्याच्या अनन्यतेनें आपल्या शक्तींत व आपल्यांत असलेलें अनन्यत्व म्हणजेच एकत्व परमात्मा दर्शवीत आहे. शक्ति-शक्तिमानांतून असलेल्या अनन्यतेप्रमाणें म्हणजे एकत्वाप्रमाणेंच प्रत्येक सतीपतींच्या जोडप्यांतून अनन्यता म्हणजे एकत्व दिसून यावयाला पाहिजे. चिन्मात्र पुरुषाची संवेदनात्मक शक्ति प्रजोत्पादनाच्या संकल्पानें वेगळी होऊन स्थूल प्रजोत्पादनाकरितां तीच स्थूळ पत्नीच्या रूपानें प्रगट झाली. "**एकोऽहं बहु स्याम्**" 'मी अनेक व्हावें' असा संकल्प करून स्त्रीपुरुषाच्या अनेक जोडप्यांचीं रूपें त्यानें प्रथम धारण केलीं व संततिरूपानें तो परमात्मा नंतर अनेक झाला. वगवेगळ्या स्त्रीपुरुषांच्या विविध जोडप्यांच्या रूपांनीं एक मी हें भान अनेक झालें व एकजोडप्याच्या रूपानें त्यानें आपलें एकत्व राखिलें. हीं प्रजोत्पादनाच्या निमित्तानें झालेलीं एकाचींच दोन रूपें असल्यामुळें प्रजोत्पादनाच्या व तदर्थ साधन म्हणून गणल्या गेलेल्या धर्मार्थांत आम्हीं परस्परांना सोडून परस्पर कधीं वागणार नाहीं म्हणून शपथ घेतली जाते व एकत्वानें प्रवृत्तिधर्म अनुष्ठिला जातो. भिन्नत्वाच्या कृतींत व बहुत्वाच्या व्यवहारांत एकत्वाच्या ज्ञानानें क्रममुक्ति मिळविण्याचा हा प्रवृत्तिमार्ग आहे. निवृत्तिमार्ग म्हणजे संन्यास. हा मार्ग सद्योमुक्तीचा आहे. 'मी' अशी ही एक आत्मरूपाची जाणीव प्रजोत्पादनाच्या वासनेनें सतीपतींच्या व तद्वारां संततीच्या अनेक रूपांनीं नटली असल्यामुळें सतीपतींतून व त्यांच्या संततींतून

एकत्वाची भावना जागृत राहणें अवश्य आहे व नैसर्गिक आहे. ईशप्रणीत आर्य धर्म याच दृष्टीनें सतीपतींना पातिव्रत्याचें व एकपत्नीव्रताचें आणि तत्संततीला मातृपितृभक्तीचें कर्तव्यत्वेन विधान करीत आहे. यांत कोणास कसली चूक काढतां येणें शक्य आहे ? साक्षात् ईशप्रणीत आर्य धर्माचें हें तत्त्व जाणल्यास भारतांतच काय अखिल जगांतच विवाहविच्छेद, घटस्फोट, पुनर्विवाह अशासारखे घातुक कायदे कोण करील व कोणी केल्यास कोण अमलांत आणील आणि कोण त्याप्रमाणें मनापासून वागेल ? **अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः । ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः । तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ।।**

## विधवाधर्म

प्रवृत्तिनिवृत्ति स्वरूपाच्या गृहस्थाश्रमांत प्रवृत्तीचें अंग गेल्यानंतर एक निवृत्तीच उरते आणि ती मग त्या सतीपतीपैकीं उरलेल्याचें कर्तव्य गणली जाते. निवृत्ति म्हणजे विषयाची निवृत्ति. हाच मोक्षधर्म. **कामं तु क्षपयेद्देहं पुष्पमूलफलैः शुभैः । न तु नामापि गृण्हीयात्पत्यौ प्रेते परस्य तु ।।** ( मनु. ५–१५७ )—विधवेनें पवित्र व शुद्ध अशा फलमूलपुष्पांच्या सात्त्विक आहारानें राहावें. तें शक्य न झाल्यास एक वेळ जेवावें. अन्न पवित्र व सात्त्विक असावें. नियमबद्ध शुद्ध आचरण असावें. जप, तप, पूजा, पारायण, श्रवण यांत दिवस काढावेत. निष्ठेनें राहावें. पतिनिधनानंतर पुनर्विवाह राहिलाच पण परपुरुषाचें नांवसुद्धां तिनें घेऊं नये. प्रवृत्तीची वासनाच ठेवूं नये, इंद्रियभोगाची कल्पनाच मुळीं समूळ नष्ट करावी. आत्मनिष्ठ व्हावें. **आसीतामरणात्क्षान्ता नियता ब्रह्मचारिणी । यो धर्म एकपत्नीनां कांक्षन्ति तमनुत्तमम् ।।** ( मनु. ५–१५८ )—विधवेनें मरणापर्यंत क्षमायुक्त राहावें, नियमानें वागावें, कायवाङ्मनानें ब्रह्मचर्य पाळावें, मद्यमांसमैथुनाची कल्पनासुद्धां येऊं देऊं नये. पत्नीचा जो मुख्य एक पतिधर्म तो निर्दुष्ट असा उत्तम प्रकारें चालवावा. **अपुत्रस्य गतिर्नास्ति** ।–अपुत्रवंतांना गति नसते अशीं वाक्यें संन्याश्याप्रमाणें विधवेलाहि लागू पडत नाहींत. ज्याच्या योगानें मोक्ष लाभतो तें ज्ञानच त्यांना पुत्रस्थानीय असतें. **ज्ञानान्मोक्षः । ऋते ज्ञानान्न मुक्तिः । मृते भर्तरि साध्वी स्त्री ब्रह्मचर्ये व्यवस्थिता । स्वर्गं गच्छत्यपुत्राऽपि यथा ते ब्रह्मचारिणः ।।** ( मनु. ५–१६० )—पतीच्या निधनानंतर जी साध्वी

स्त्री ब्रह्मचर्यानें राहते ती अपुत्र असली तरी बालब्रह्मचाऱ्याप्रमाणें अथवा बाल-संन्याश्याप्रमाणें निर्विषय, निष्काम असल्यास तीहि मुक्त होते अथवा ब्रह्मा-विष्णु-शिवाच्या निर्विषय लोकाला जाते; सकाम असल्यास स्वर्गाला जाते· विधवाधर्माच्या कोणत्याहि श्लोकांत कुठेहि पुनर्विवाहाचा उल्लेख नाहीं. या सर्व विचारांनीं सतीपतीचें नातें कसें असतें तें कळून येईल व त्यांचे मुख्य नियम लक्षांत येतील. आर्य संस्कृतीच्या दांपत्यजीवनाची कल्पना येईल. या वैदिक आर्य संस्कृतींत सतीपतींचा देह असतां नसतांनाहि व्यभिचार हा निषिद्ध आहे, अतिनिंद्य व महान् नरककारक आहे.

**मृतं भर्तारमादाय ब्राह्मणी वह्निमाविशेत् । जीवन्ती चेत्त्यक्तकेशा तपसा शोधयेद्वपुः ॥** ( व्या. स्मृ. २-५२ )—पतीचें शव घेऊन ब्राह्मण स्त्रीनें सहगमन करावें. जिवंत राहिलीच तर संन्यासलक्षणात्मक केशवपन करून कायवाङ्मनें दंडाचें तपाचरण करावें. **कायदण्डे त्वभोजनम् ।**—निरशन व्रतानें राहावें अथवा एकभुक्त असावें हें देहदंडण होय. **वाग्दंडे मौनमातिष्ठेत् ।**—मौनानें असावें म्हणजे तो वाग्दंड होतो. स्तोत्रपाठ, सद्गुरूला श्रवणांतल्या शंका विचारणें हें मौनांतच येतें. **मौनं मितभाषणम् ।**—अनिवार्य व्यवहारापुरतें अगदीं थोडें बोलणेंहि मौन म्हटलें जातें. मन निर्विषय करणें, मन संकल्पकल्पनारहित करणें, त्याचें चांचल्य थांबवून केवल जाणिवेनेंच राहाण्याचा अभ्यास करणें हें सर्व मनोदंडांत मोडतें. मनःशुद्धते-करितां नियम, जपध्यान, पूजन, वाचन, श्रवण, मनन, निदिध्यासन इत्यादि मनोलयाचीं साधनें करीत राहाणें मनोदंडांत येतें. **शौचामिंद्रियनिग्रहः ।**—इंद्रियनिग्रह करणें, देहानें व मनानेंहि मैथुनाचा, स्त्रीपुरुषात्मक भावनेचा संपूर्ण त्याग करणें हीच देहमनाची शुद्धि होय. संन्याश्याप्रमाणेंच विरक्त राहून भक्ति-ज्ञानादि साधनांत काळ कंठणें, हें विधवांचें कर्तव्य होय. **केशरंजनतांबूलगंधपुष्पादिसेवनम् । भूषणं रंगवस्त्रं च कांस्यपात्रेषु भोजनम् ॥ द्विवारभोजनं चाक्ष्णो रंजनं वर्जयेत्सदा । स्नात्वा शुक्लांबरधरा जितक्रोधा जितेंद्रिया ॥** (वृद्धहारीतक स्मृति ११।२०-२०७)—केस ठेवून विंचरणें, शृंगारणें, विडा खाणें, गंध, पुष्प, पुष्पांच्या माळा, अत्तर, सुगंधी तेलें, सुगंधी द्रव्यें वापरणें, अलंकार घालणें, जरीचीं, रेशिमकांठी अथवा रंगीत नक्षीचीं चित्रविचित्र वस्त्रें वापरणें, कांशाच्या पात्रांत जेवणें, दोनदां जेवणें, डोळ्यांत काजळ घालणें इत्यादिकांचा त्याग करावा. या सर्वांचा त्याग नाहीं केला तर हीं सर्व स्वतःच्या व दुसऱ्याच्या

मनांत कामादि विकार उत्पन्न करण्यास कारणीभूत होतात व यामुळें क्रमेण भ्रष्ट होण्याचा बराच संभव असतो. स्वतःला व स्वतःकडे पाहून दुसऱ्याला कधींहि कामोत्पत्ति न होईल असा आहार, विहार, आचार, विचार, उच्चार विधवांनीं ठेवावा. आपल्याला पाहिल्याबरोबर दुसऱ्यांना पवित्र व पूज्यभावना उत्पन्न होईल व ती आपल्या सहवासानें, बोलण्याचालण्यानें, वागण्यानें वाढतच जाईल असें असावें. साधी राहणी असावी. कोठेंहि कृत्रिमता नसावी. त्रिकाल स्नान, त्रिकाल उपासना करीत जावी. शुभ्र वस्त्र नेसावें. कामक्रोधादिकांचा समूळ नाश झालेला असावा. पाहिल्याबरोबरच जितेंद्रियतेची लोकांना भावना व्हावी व सात्त्विक वृत्ति व्हावी.

**न कल्ककुहका साध्वी तंद्रालस्यविवर्जिता । सुनिर्मला शुभाचारा नित्यं संपूजयेद्धरिम् ॥ क्षितिशायी भवेद्रात्रौ शुचौ देशे कुशोत्तरे । ध्यानयोगपरा नित्यं सतां संगे व्यवस्थिता ॥ तपश्चरणसंयुक्ता यावज्जीवं समाचरेत् । तावत्तिष्ठेन्निराहारा भवेद्यर्हि रजस्वला ॥** ( वृद्धहारीतक ११-२०८-२०९-२१० ) —विधवा दंभाचारयुक्त नसावी, साध्वी असावी, झोंपाळू नसावी, आळशी नसावी. देहानें व मनानें स्वच्छ, पवित्र, शुद्ध असावी. शुभाचार असावा. आपआपल्या गुरूपदेशाप्रमाणें राम, कृष्ण, विष्णु, शिव, अंबिका, आदि उपासनेंत सदा असावें. भुईवरच झोंपावें. तेवढें शक्य न झाल्यास गवताची चटई घ्यावी. प्रकृतिमानाप्रमाणें शुभ्र घोंगडेंहि वापरावयास हरकत नाहीं. दर्भासनावर, कंबलासन व त्यावर वस्त्र घालून शुद्ध, पवित्र स्थळीं ध्यानयोगपर नित्य असावें. सत्सहवास असावा. यावज्जीव तपश्चरणांत असावें. विटाळशी असतांना निराहार करावा अथवा फलाहार करावा. हा कामादि विकारनाशक संन्यस्त वृत्तीचा विधवांचा जीवनक्रम आहे. **विधवा-कबरीबंधो भर्तृबंधाय जायते । शिरसो वपनं तस्मात्कार्यं विधवया तथा ॥ पर्यंकशयना नारी विधवा पातयेत्पतिम् । तस्माद्भूशयनं कार्यं पति-सौख्यं समीहया ॥** ( व्यासस्मृति )—विधवेनें केंस ठेवून वेणी घातली किंवा बुचडा बांधला कीं त्यायोगें तिच्या मृत पतीला असेल त्या ठिकाणीं बंधनात्मक होतें. म्हणून विधवेनें केंस काढावेत. पलंगावर झोंपूं नये. पलंगावर झोंपणाऱ्या स्त्रीचा पति नरकांत पडतो. तेव्हां पतिहिताची व सौख्याची दृष्टि ठेवून विधवेनें संन्यस्त वृत्तीनें राहावें. भूशयन करावें. **भर्ता पत्नीकृतं पापं शिष्यपापं गुरुर्वहेत् ॥** —पत्नीनें केलेलें पाप नुसतें पत्नीलाच नव्हे तर

पतीलासुद्धां भोगावें लागतें. **गंधद्रव्यस्य संबंधो नैव कार्यस्तथा क्वचित् । तर्पणं प्रत्यहं भर्तुः कुर्यात्कुशतिलोदकैः ॥ तत्पितुस्तात्पितुश्चापि नामगोत्रानुपूर्वकम् । विष्णोस्तु पूजनं कार्यं पतिबुध्या न चान्यथा । पतिमेव सदा ध्यायेद्विष्णुरूपधरं पतिम् । एवं धर्मपरा नित्यं विधवाऽपि पतिव्रता ॥** —सुगंधी द्रव्यें वापरूं नयेत. कुशतिलोदकानें प्रत्यहीं पतीला, सासऱ्या-आजेसासऱ्यांना नामगोत्रोच्चारपूर्वक तर्पण द्यावें. **पतिरूपानेंच** विष्णूचें आराधन करावें. या विधानानें स्त्रियांना पतिखेरीज अन्य उपासना नाहीं हें स्पष्ट कळून येतें. विष्णु आदिकांची उपासना पति हा तद्रूपीच आहे अशा निष्ठेनेंच करावी, म्हणून या पुढील श्लोकांतहि आहे. **पतिमेव सदा ध्यायेद्विष्णुरूपधरं पतिम् । एवं धर्मपरा नित्यं विधवाऽपि पतिव्रता ॥**—स्त्रीनें पतिनिधनानंतरहि अशा धर्माचरणानें पातिव्रत्य पाळूनच राहावें हा धर्मशास्त्राचा सिद्धांत आहे. शास्त्रीय दृष्टीनें विचार करून माणुसकी पाळावयाची एवढा विचार सर्वांना आला तरी या वैदिक धर्मानें सर्वांचा उद्धार होईल. **देहाभिमानादभिवर्धते क्रिया । विद्यागताहंकृतितः प्रसिध्यति ॥** ( रामगीता १४ )—देहाभिमानानें क्रिया अधिक होत जातात. मोक्षमार्गांत देहाभिमानालाच ठाव नसतो. या दृष्टीनें मोक्षमार्गाची अभिरुची लागली म्हणजे देहसुखाचीं वैषयिक कर्मे आपोआप कमी होत जातात. देहाभिमान जसा जसा अधिक वाढूं लागेल तशी तशी देहसुखाची कल्पना अधिक अधिक बळावत जाते. देहसुखाची कल्पना बळावत गेल्याप्रमाणें बाह्य विषयसुखांच्या व त्या साधनांच्या तत्कर्मांच्या कल्पनाहि अधिक अधिक वाढूं लागतात. वैषयिक कर्मांनीं विषयवासना अधिक जशी होत जाते त्याप्रमाणेंच विषयवासना अधिक झाल्यानें वैषयिक साधनें व कर्मेंहि अधिक होऊं लागतात. मग त्याला व्यसन हें नांव येते. शास्त्रीय निर्बंधाचा बांध फुटून जातो. तो मनुष्य स्वपर घातुक आचरणांनीं स्वपर शत्रु होतो, समाजकंटक बनतो. या दृष्टीनेंच वैदिक धर्मांत देहाभिमानाच्या निवृत्तीकरितां व 'अव्हासव्हा' विषयभोगाच्या निवृत्तीकरितां, व्यष्टिसमष्टि यांच्या आत्यंतिक हिताकरितां, इहलोकांची उन्नति व निरतिशय आत्मसुखाची निर्विषय तृप्ति सर्वांना प्राप्त व्हावी म्हणून विवेकवैराग्याचा मोक्षमार्ग दाखविला आहे, अध्यात्मविद्येचा पुरस्कार केला आहे. आत्मोन्नति होऊन जीवनव्यवहारहि सर्वांचा सुरळीत चालावा म्हणून सर्वांना त्या त्या परी आचरणाचे शास्त्रीय नियम घालून दिले आहेत; ते निर्दुष्ट व सर्वोत्कृष्ट आहेत.

पूर्वीच्या काळीं सहगमनाचीच पद्धत प्रधान होती. कोणी शीलभ्रष्ट होऊं नये व त्याच्या शीलभ्रष्ट प्रजेमुळें समाजहि दुर्गतिक होऊं नये हा उद्देश यांत होता. इहलोकींचें सुख हें निःसार आहे. देह हा नश्वर असून आत्मा हा अमर आहे हें तत्त्व त्यांत होतें. ही पद्धत हजार–बाराशें वर्षांपासून तर फारच कमी कमी होत, आतां तर ती आजिबातच नाहींशी झाली आहे. साधारण तीनशें सव्वातीनशें वर्षांपूर्वी श्रीसमर्थांच्या चरित्रांत सतीची हकीकत आली आहे. त्यांच्या पुरश्चरणकालीं ते टाकळीस असतांना चाळीसगांवच्या कुलकर्ण्यांची पत्नी सती जावयास निघाली असतां वाटेंत दिसलेल्या ध्यानस्थ समर्थांना नमस्कार करून पुढें जावें म्हणून आली. नमस्काराच्या वेळीं बांगड्यांचा शब्द ऐकून अर्धवट बहिर्मुख स्थितींत तिला सुवासिनी म्हणून ताडून 'अष्टपुत्रा सौभाग्यवति भव' असा आशीर्वाद समर्थांनीं दिला व नंतर पूर्ण बहिर्मुख वृत्ति झाल्यानंतर खरी वस्तुस्थिति जाणवली. आपला शब्द खरा करण्याकरितां त्यांनीं तिच्या नवऱ्याला जिवंत करून उठविलें व 'तुला पूर्वी दिलेले आठ व आतां देतों ते दोन असे दहा पुत्र होतील' असा तिला पुन्हां आशीर्वाद दिला. त्याप्रमाणें प्रत्यक्षांत घडून आल्यानंतर त्या घराण्याचें 'दशपुत्रे' नांव पडलें असें आढळून येतें. तेव्हां श्रीसमर्थकालीं कुठे कुठे ही पद्धत होती असें कळून येतें. पुढें मोठ्या माधवरावांच्या पत्नी रमाबाई याहि सती गेल्याची इतिहास साक्ष देतो. आतां तर या गोष्टी कानावरच येत नाहींत.

साधारण चारशें वर्षांपूर्वी पावित्र्य व शील यांच्या परिपालनाकरितां, आर्य प्रजा निर्दुष्ट राखण्याकरितां मुसलमानांच्या धाडींत आर्य स्त्रिया जोहार करीत असत. सती जाण्याचाच हा एक प्रकार होता. पतिसहगमनाची दृष्टि यांत तितकीशी नसली तरी शीलपालनाची दृष्टि यांत अधिकच होती. यावरून आर्य स्त्रियांनीं कशा विस्तवाच्या खाईंतून व धगधगणाऱ्या अग्नींतून आपला देह पवित्र राखला, आपलें शील सांभाळलें व मुसलमानांनीं आपल्याला स्पर्श करूं नये कीं आपल्याला मुसलमान बनवूं नये म्हणून मुसलमानांना जय मिळाला ही वार्ता कानीं आल्याबरोबर स्वधर्माच्या अभिमानानें आपला देह जाळून घेतला, हें चांगलें कळून येतें. तो काळ किती उज्ज्वल होता व आत्तांचा काळ किती मलीन आहे. आतां मुसलमानांशीं अथवा ख्रिश्चनांशीं स्वेच्छेनें मुली लग्न करतात. किती ही अवनति!

येतां येतां अशी कां स्थिति झाली याचा विचार करावा व आतां तर जाती-धर्माचा प्रश्नच वगळून कोणीहि कुणाशीं लग्न लावावें म्हणून कायद्यानेंच मोकळीक मिळाल्यानंतर पुढें स्थिति काय होईल याचाहि विचार करावा.

## विधवांच्या केशवपनाबद्दल विचार

विधवांच्या केशवपनाबद्दल व पुनर्विवाहाबद्दल अलीकडे समाजांतून पुष्कळ ' भवति न भवति ' होते. शास्त्रकारांनीं विधवांच्या केशवपनाबद्दल व पुनर्विवाहाबद्दल जो इतका निषेध केला आहे त्यांत तत्त्व काय आहे याचा विचार करूं. विधवाकेशवपनाचा विषय येथें घेऊं. पुनर्विवाहाचा मागें थोडा विचार झाला आहे. ग्रंथविस्तारभयाच्या दृष्टीनें तो तेवढाच पुरे करूं.

केशवपनांत विधवांनीं संन्यस्त होऊन मोक्षमार्गांत राहावें हा हेतु आहे व त्याकरितांच ' **विधवा यतिमार्गेण** '—संन्याश्याप्रमाणेंच विधवांनाहि ही मुंडनाची दीक्षा दिली जाते हें विसरतां कामाचें नाहीं.

**विधवा यतिमार्गेण कुमारी च विशेषतः । तांबूलाभ्यंजने चैव कांस्यपात्रे च भोजनम् ॥ यतिश्च ब्रह्मचारी च विधवा च परित्यजेत् ।** —विधवा, कुमारी, संन्यासी व ब्रह्मचारी या सर्वांनाहि कामादि विकारापासून अति दूर राहावयास पाहिजे असल्यामुळें, यां चौघांनाहि एकाच सदरांत ठेवून कामोत्तेजक, तांबूल, तैलाभ्यंजनस्नान, काशाच्या पात्रांत जेवणें इत्यादि करूं नये म्हणून नियम घालून दिले. शीलाचें पालन व्हावें म्हणून शास्त्रकारांनीं किती बारीक विचार करून त्याकरितां कसे दूरदृष्टीचे व खोल विचाराचे नियम घालून दिले तें कळून आलें कीं त्यांच्याविषयींचे प्रेमाश्रु कृतज्ञतेनें त्यांना स्नान घालण्याकरितां स्रवूं लागतात, गळा दाटून येतो.

आतांच्या कांहीं शास्त्रीपंडितांची, नेत्यापुढाऱ्यांची पद्धत मात्र या पूर्वींच्या ऋषिमुनींच्या पद्धतीहून अगदींच वेगळी. **न स्त्रीणां वपनं कुर्यात् न च गोव्रजनं स्मृतम् । न च गोष्ठे वसेद्रात्रौ न कुर्याद्वैदिकीं श्रुतिम्** ॥१६॥ **सर्वान्केशान्समुच्छ्रित्य च्छेदयेदङ्गुलद्वयम् । एष एव तु नारीणां शिरोमुंडापनं स्मृतम्** ॥ १७ ॥ ( बृहद्यम स्मृति अ. ४ ) याच अर्थाचे असेच श्लोक यमस्मृतींत सुद्धां आले आहेत. **सर्वान्केशान्समुद्धृत्य च्छेदयेदंगुलद्वयम् । एवमेव हि नारीणां मुंडमुंडापनं स्मृतम् ॥ न स्त्रिया वपनं कार्यं न च वीरासनं तथा । न च गोष्ठे निवासं च न गच्छन्तीमनुव्रजेत्** ॥ ( यमस्मृति

५४-५५ ) अशा ‘ बादरायण ’ संबंधाच्या अप्रासंगिक श्लोकांचा आधार घेऊन स्त्रियांना वपनच निषिद्ध आहे, बाकीचे केंस वर धरून दोन बोटभर केंस फार तर काढावेत, स्त्रीमुंडनाचा प्रकारच असा आहे, सबंध शिरोमुंडन स्त्रियांना सांगितलेंच नाहीं म्हणून खुशाल थापवजा विधान करतात; आणि विधवाकेशवपन-निषेध म्हणून नांव देऊन, हें कळण्याइतकें पांडित्य कोणालाच नाहीं म्हणून त्यांत हे श्लोक अगदीं निर्भयपणें खुशाल देतात. मांजर डोळे झांकून दूध पितें, ही म्हण या अशा शास्त्रपंडितांची कृति दर्शविते. **प्रायश्चित्तांगवपनस्य एवमादिविषयेऽपवादः ।** प्रायश्चित्तांगभूत वपनाचा स्त्रियादिकांच्या विषयीं अपवाद आहे. म्हणजे स्त्री, राजा, राजपुत्र, बहुश्रुत ब्राह्मण यांना वपनाशिवायच नुसतें प्रायश्चित्त द्यावें व इतरांना मात्र सक्षौर प्रायश्चित्त द्यावें हा येथील आशय आहे. या ठिकाणीं प्रायश्चित्तांगरूप केशवपन सुवासिनी स्त्रियांना निषिद्ध आहे. फार झालें तर बाकीचे केंस वर धरून दोन बोटेंच केंस काढले म्हणजे झालें असें इथे वास्तविक सांगितलें असतांना ‘ विधवाकेशवपन-निषेध ’पर हीं वाक्यें आहेत म्हणून विधान केलें जातें याला काय म्हणावें ! **घटं भिंद्यात्पटं छिंद्यात्कुर्याद्रासभरोहणम् । येन केन प्रकारेण प्रसिद्धपुरुषो भवेत् ।** अशांतलाच हा प्रकार झाला.

**राजा वा राजपुत्रो वा ब्राह्मणो वा बहुश्रुतः । अकृत्वा वपनं तेषां प्रायश्चित्तं विनिर्दिशेत् ।।** ( यमस्मृति ५५ ) ‘ **न स्त्रिया वपनं कार्यं—** ’ या यमस्मृतीच्या ५४ व्या श्लोकाच्या पुढचाच राजा, राजपुत्र व बहुश्रुत विद्वान ब्राह्मण असल्यास यांना मात्र इतरांप्रमाणें सक्षौर प्रायश्चित्त न देतां नुसतें प्रायश्चित्त द्यावें या अर्थाचा श्लोक लागोपाठ आला आहे. यांतून राजा, राजपुत्र व विद्वान ब्राह्मण यांना क्षौरच निषिद्ध आहे म्हणूनहि प्रसंगीं विधान ठोकून द्यावयाला असले पंडित मागेंपुढें पाहाणार नाहींत असें वाटतें. कोणी पायावर येऊन पडला अथवा पैसे चारले अथवा आपल्या किंवा आपल्या-कडच्या माणसांच्या कृत्याचें समर्थन करावेंसें वाटलें तर कांहीं पंडित वाहवतात, वाटेल तसा अर्थ करतात व कुठलें तरी अप्रासंगिक वाक्य ‘ आधारें ’ लावून आपली टिमकी वाजवितात. अधर्म आणि अनीतीच धर्म व नीति म्हणून शास्त्राचें प्रमाण दाखवून सिद्ध करतात. खऱ्या सज्जन विद्वानांच्या ओरडीविरुद्ध अधिकाराचा फायदा घेऊन तसेच कायदे करतात. आपल्याबरोबर

समाजालाहि असें नासून टाकतात. यांनीं आपल्याशींच आपल्या कृत्याचा व त्यामुळें आपल्याबरोबर होणाऱ्या समाजाच्या अहिताचा विचार करावा. हा एक विद्यामदाचा, अभिमानाचा, क्षुद्रवृत्तीचा, धर्मपराङ्‌मुखतेचा, परदुःखशीतलतेचा व आपल्या दुष्कृत्यावर संभावितपणें पांघरुण घालावयाचा, अशा मताचा स्थापक व प्रचारक बनण्याच्या राक्षसी हव्यासाचा पंडितमन्य शिष्टांच्या आचरणांतून दिसून येणारा मोठा समाज-कंटक दुर्गुण आहे. याचा त्यांनींच विचार करून अमार्गांतला आपला असा हट्ट नाहींसा करावा. एरवीं त्यांना कोण सांगणार ? सांगितलें तरी ते कुणाचें ऐकणार ? यांच्याविरुद्ध शास्त्राप्रमाणें सांगणें व वागणें हा कायद्यानें गुन्हा ठरतो. मोठ्यांनीं समजून आपले दोष सुधारावेत. त्यामुळें स्वपर हित होतें.

वरचे स्त्रीकेशवपननिषेधाचे श्लोक ‘ गोघाती स्त्रीपुरुषांच्या प्रायश्चित्त ’ प्रकरणांत आले आहेत. बृहद्यम स्मृतीच्या चवथ्या अध्यायांत **गोवधे चैव यत्पापं बलीवर्दस्य चैव हि । प्रायश्चित्तं भवेत्तत्र स्त्रिया वा पुरुषस्य वा ॥** ४।२ ॥ अशा रीतीनें विषयाला प्रारंभ झाला आहे. गोघाती मनुष्याला सक्षौर प्रायश्चित्त देऊन गाईंमध्यें रात्रीं ठेवावें म्हणजे गोठ्यांतच राहवावें. दिवसा गाईच्या पाठीमागें जावयाला सांगून गाईची सेवा करावयास सांगावी. ज्याचा अपराध त्याच्याच सेवेनें त्याचा अनुग्रह संपादावयाचा असतो, या नात्यानें हें विधान आहे. पुरुषांना प्रायश्चित्त सांगितल्यानंतर स्त्रियांना सांगतांना वर दिलेले श्लोक दिले आहेत. **न स्त्रीणां वपनं कार्यं ।**—स्त्रियांचें पूर्ण वपन करवूं नये. **न च गोव्रजनं स्मृतम् ।**—गाई चारायला गाईंबरोबर पाठवूं नये. **न च गोष्ठे वसेद्रात्रौ ।**— रात्रीं गोठ्यांत तिनें असूं नये. **न कुर्याद्वैदिकीं श्रुतिम् ।**—पुरुषाप्रमाणें त्यांना पापनाशक वैदिक मंत्र ऐकवूं नयेत. **सर्वान्केशान्समुच्छ्रित्य च्छेदयेदंगुलद्वयम् । एष एव तु नारीणां शिरोमुंडापनं स्मृतम् ॥** —बाकीचे केंस वर धरून दोन बोटें मात्र केंस काढावेत. सुवासिनी स्त्रियांचा प्रायश्चित्तांग शिरोमुंडनाचा असा हा प्रकार आहे असें सांगितलें आहे. असें असतां हे श्लोक विधवाकेशवपन–निषेधपर आहेत म्हणून सांगून कांहीं विद्वान म्हणविणारे बहुजन समाजाला एकदम बुचकळ्यांत पाडून किंकर्तव्यमूढ करून टाकतात. तसेंच पुनर्विवाहाच्या बाब-तींतहि **नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ । पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥** ( पाराशरस्मृ. ४–३० ) या श्लोकाचा अर्थ विपरीतपणें

करून पुनर्विवाहाला या श्लोकाचा आधार दाखवितात. सप्तपदी व लाजाहोम होण्याच्या पूर्वीं कोणत्याहि प्रकारानें नाहींसा झाल्यास, पूर्वीं एकाला दाखवून ऐन अंतरपाट धरावयाचे वेळीं ज्याच्याशीं कोणीहि लग्न करून घेणार नाहीं अशाला उभा केल्यास, मरण पावल्यास, पळून गेल्यास, भ्रष्ट, पतित, व्यसनी असल्यास, पुरुषत्व नसल्यास, व्यंग असल्यास या पांचांपैकीं कांहीं दोष पतीच्या बाबतींत आढळून आले अथवा संभवले तर या पांच आपत्तींत ( सप्तपदी, लाजाहोम होईपर्यंत पतिपत्नीचा संबंध दृढ होत नसल्यामुळें त्याच्या आंत ) दुसऱ्याशीं त्या मुलीचा विवाह करून द्यावा असें यांत विधान आहे. श्रीसमर्थांनीं लग्नमंडपांतून ऐन 'सावधान' म्हणण्याच्या प्रसंगीं विश्वकल्याणाकरितां धूम ठोकल्यानंतर त्या भानजी गोसाव्यांच्या मुलीचें याच श्लोकाच्या आधारें दुसरें लग्न झालें. सप्तपदी व लाजाहोम यांपूर्वींच अंतर्पट धरण्याचें व 'सावधान' म्हणण्याचें विधान असतें. पुनर्विवाह व विधवांचें केशधारण यांनीं समाजाचें कल्याण होण्याऐवजी ऐहिक पारलौकिकहि अकल्याणच होतें, हें पारमार्थिक दृष्टीनें विचार करणाऱ्या कोणासहि आढळून येईल.

केशवपन विधवेनें न केल्यास केंसाच्या शुश्रूषेंत अनुष्ठानाचा बराच वेळ जातो. इच्छा असो वा नसो डोक्याला तेल लावणें, विंचरणें, आठाठ दिवसांनीं न्हाणें, डोक्यांत सांचलेला मळ घालविण्याकरितां शिकेकाईचा उपयोग करणें; कांहीं प्रयोजन नसतां अशा या नसत्या प्रयत्नांनीं वेळ दवडणें, असें हें सर्व करावेंच लागतें. आरशांत तोंड पाहावें लागतें. एखाद्या वेळीं सौंदर्याची कल्पनाहि येते, देहाभिमानाकडे वृत्ति वळते. कामादिकांचे अंकुर फुटतात, अमार्गी प्रवृत्ति होते व करूं नये तेंच कृत्य हातून घडून स्वपर इहपर गतीवर बोळा फिरविला जातो. समाजांत ते विषारी वायुप्रमाणेंच पुढें राहतात. सर्वांच्याच बाबतींत असें होतें असें सांगतां आलें नाहीं तरी आधुनिक समाजाचें निरीक्षण करून बहुतेकांचें असें होतें असें सांगतां येईल. केशवपनानें सौंदर्याची आकर्षकता कमी करून होईल तितका दुसऱ्यापासून होणारा त्रास कमी करण्याचा प्रयत्न आहे. दुष्ट लोकांची दृष्टि सकेशांकडे गेल्याइतकी केश काढलेल्या स्त्रीकडे जात नाहीं, हेंहि पण आढळून येतें. सौंदर्यांत भर पाडणारे केश असतात. स्त्रियांना देहाच्या सौंदर्याची कल्पना दृढमूल असते. केशधारणानें देहाच्या अभिमानाकडे व क्रमेण विकाराकडे झुकण्याचा संभव बराच असतो. केश काढल्यानें त्यांच्या देहाभिमानावर मोठीच

गदा पडते. परमार्थाला अनुकूल होतें. त्यागाची वृत्ति वाढते. त्यागद्योतक ही संन्यासाची दीक्षा आहे अशी जाणीव मनांत बिंबलेली असली तर ती क्षणोक्षणीं जागें करते. आडमार्गावर शक्यतों जाऊं देत नाहीं. शास्त्रकारांनीं यांच्याकडे पूज्य दृष्टीनेंच बघण्यास समाजास शिकविलें आहे. पारमार्थिक त्यागाचें तें एक संन्यासासारखेंच प्रतीक मानावें म्हणून शास्त्राचें सांगणें आहे. 'गंगा भागीरथी' म्हणून पत्रांत लिहिण्याची पद्धत आहे. ही पद्धत देखील किती त्यांच्याविषयीं पूज्यभावना निर्माण करते व पूज्य दृष्टीनें बघावें म्हणून शिकविते. केशवपनानें स्त्रियांच्या ठिकाणचा कामविकार बराच कमी होतो हें तत्त्व आर्यांनीं चोखाळूनच हा नियम विधवांच्या बाबतींत घातला. केशवपन केलेल्या विधवेची दागिन्याची हांव नष्ट होते. मोठमोठीं जरीकांठी लुगडीं, शालू, पैठण्या यांची हौस नष्ट होते. विरक्तीकडेच मन वाहूं लागतें. एक वेळ जेवणाच्या नियमानें जिव्हेवरहि ताबा मिळतो. नियमांच्या आचरणानें मन पवित्र होतें. जीवनाच्या गरजा कमी होतात. वैराग्याच्या उत्कर्षानें ज्ञानाभ्यासास अनुकूल होतें. केशवपनानें विधवा स्त्रियांचें सौंदर्य घालवितात, त्यांना मुद्दाम विद्रूप करतात; कां तें या विवेचनानें लक्षांत येऊन आक्षेपास कारण उरणार नाहीं. अलीकडे विधवा स्त्रिया केंस ठेवतात, बांगड्या, पाटल्या घालतात व चोळी किंवा पोलकें घालतात. कुंकू लावतात, दागिने घालतात. काळी पोतहि कुठे कुठे दिसते. हीं सर्व प्रवृत्तीचीं सौभाग्यद्योतक लक्षणें आहेत, संन्यासद्योतक नव्हेत. **कंचुकं न परिदध्यात्।** —चोळी घालूं नये इत्यादि श्लोकांनीं या सर्वांचा निषेध केला आहे. आतां तर याहून पुढची मजल म्हणजे पुनर्विवाहच होतो. पारमार्थिक दृष्टीनें व शास्त्रीय दृष्टीनें हा केवळ अधःपात आहे, हें कळकळीनें प्रगट बोलून दाखवावें लागतें.

कोणी पाहूं नये म्हणून खोलींत बसवून केशवपन करवितात. नापिक दुष्ट असला तर ती विधवा शीलभ्रष्ट होते; नाहीं तरी त्याचा स्पर्श असह्य होतो, इत्यादि सर्व आक्षेप घालवावयाचे असल्यास, त्याला स्त्रियाकरितां नापिकांच्या स्त्रियांचीच योजना करावी म्हणजे अशा कोणत्याच आक्षेपाला जागा मिळत नाहीं.

### विधवांसाठीं पारमार्थिक संस्था

संन्याश्यांच्या संस्थेप्रमाणें यांच्याहि संस्था निर्माण व्हाव्यात व त्यांत यांना ध्यानधारणेचें, वेदान्तविचाराचें शिक्षण मिळावें. केवळ पारमार्थिक

वातावरणांत जीवन घालविण्यास सांपडावें. नवरा मेला म्हणजे ती माहेरीं अथवा सासरीं मजूरणीसारखी बघण्यांत येते; तिला राबवून घेण्यांत येतें. तिचें आयुष्य इतरांचीं बाळंतपणें करण्यांत व मुलामुलींच्या घाणीचीं वस्त्रें धुण्यांतच जातें. नाहींतर कुठे स्वयंपाक करून जीवन चालविणें येऊन बेततें अथवा तिला परिचारिका ( नर्स ) किंवा मास्तरीण व्हावें लागतें. आवश्यकतेनें हें इष्ट वाटल्यास नसावें असें म्हणणें नाहीं. त्यांचें रक्षण व्हावें व समाजानें त्यांच्याकडे पूज्यतेनें पाहावें हा अर्थ इथे अभिप्रेत आहे. पुन्हां अशा निराश्रित दीन स्त्रियांवर परधर्मी व दुष्ट स्वधर्मी लोकांचेहि डोळे असतात. परमार्थाची माहिती नाहीं, उच्च आदर्श पुढें नाहीं व त्यांना भ्रष्टविण्याचा इतर दुष्टांचा प्रयत्न अशा खाईंतून मनाच्या वाढत असलेल्या विकारावर आळा घालणें जड जाऊन स्वमनानें अथवा बलात्कारानें त्या शेवटीं शीलभ्रष्ट होतात. त्यांच्याकरितां पारमार्थिक शाळा, पारमार्थिक संस्था, स्वतंत्र मठ निर्माण करून यांच्याकडून तात्विक सेवा होईल असें करावें. त्या ठिकाणीं त्यांचीच व्यवस्था असावी. समाजानें यांच्याकडे पूज्य दृष्टीनेंच पाहावें. असे घालून दिलेले नियम आंगवळणीं पडले म्हणजे यांना समाजाकडून त्रास न पोहोंचतां यांच्याकडून कीर्तन–प्रवचन–व्याख्यानद्वारें स्त्रियांतून तरी धर्मजागृती करवून घेतां येईल. उच्चनीतीचे, तत्त्वज्ञानाचे धडे जगाला मिळतील. इतर संपत्तीप्रमाणेंच तात्विक आचारविचाराची ही एक संपत्ति आहे. त्याच्या उपार्जनाकरितां अशा संस्था कार्य करतील. नाहींतरी पारमार्थिक मठ, आश्रम, संस्था यांतून समाजाचे थोडे पैसे खर्च होत नाहींत ! त्यांत अशा पवित्र संस्थांची भर पडेल. सत्कार्याच्या आधिक्यानें राष्ट्राची आवकहि वाढते, कमी होत नाहीं. अधर्मराहटीनें राष्ट्रांत दारिद्र्य वसतें. अशा विधवांच्या आश्रमानें समाजांतली अधर्मप्रवृत्ति, नीतिभ्रष्टता व भ्रष्ट प्रजेची उत्पात्ति थांबेल व राष्ट्राचें इहपर कल्याण होईल. पुनर्विवाह, घटस्फोट, असवर्ण विवाह, सगोत्र विवाह इत्यादि समाजघातक कायद्यांपेक्षां उच्च नीतीचे, उन्नत सुखाचे असे सरकारानें कायदे केले तर राष्ट्र थोडक्याच काळांत आपल्या उन्नत कीर्तीनें जगांत मिरवेल, राष्ट्रांत सुखशांति व अचल वैभव नांदेल.

## तेव्हांच जग पावन होईल

'As you become a reformer, you become a deformer.' रामतीर्थ म्हणत. अलीकडच्यांची सुधारणा म्हणजे पाश्चात्य संस्कृतीचे आचारविचार

भारत देशांत आणूं पाहणें अथवा नास्तिकवादांत पुढें सरसावणें. आधुनिक सुधारक वर्गाला देवधर्म, पुनर्जन्म, लोकांतरगमन, स्वर्गनरक, श्राद्धपक्ष, त्यागमोक्ष हें सर्व थोतांड वाटून आपल्या मनाप्रमाणें लोकांना तयार करण्याचा ते प्रयत्न करतात. ऐहिक देहसुखापेक्षां पलीकडील विचार कांहींच्या डोक्यांतच येणें दुरापास्त. आले तरी कृतींतून दिसून येणें फार कठीण. किंबहुना आपल्याला तें अशक्यच असें स्वतःच्या बाबतींत त्यांनीं ठरविलेलें असतें; व आपल्यासारखेंच सर्वांनाहि तें तसेंच असेल या कल्पनेनें आपला संप्रदाय अशाच पद्धतीनें निरंकुश करून दृढ करावा म्हणून ते प्रयत्न करतात. अलीकडची राज्यशासन-पद्धति या विचाराचीच अधिक दिसून येते. अग्नीला वाऱ्याचें साहाय्य मिळाल्यासारखें झालें आहे. कालमानानें, परभाषेच्या शिक्षणानें, त्यांच्या शास्त्रीय अभ्यासानें, त्यांच्या प्रचारकांच्या प्रयत्नानें, धर्मभ्रष्ट करणाऱ्यांच्या ध्येयानें, त्यांच्या संस्कारांत वाढल्यानें, त्यांच्या देशांत राहून आल्यानें व त्यांच्या राजशासनांत शेकडों वर्षें काढल्यानें आधींच धर्मप्रवृत्ति कमी, अधर्मा-कडेच अधिक प्रवृत्ति झाली आहे. त्यांतून सरकारहि या पक्षाचेंच झालें तर मग काय विचारतां–राष्ट्रांत किती बेबंदशाही माजावी तितकी माजते !

मनुष्यप्राण्याच्या उत्पत्तीबरोबरच भारतभूमि तत्त्वज्ञानाची व त्याला अनुकूल अशा आचारविचारात्मक धर्माची जन्मभूमि आणि जीवनभूमि होऊन आहे. आधुनिक कोणत्याहि पद्धतीचें निरीक्षण-परीक्षण करून शेवटीं भारत-वर्षाची पद्धति आणि परंपरा इतकी निर्दुष्ट, इतकी क्रमबद्ध, इतकी सुसंगत आहे कीं त्याची बरोबरी जगांतली इतर कोणतीहि पद्धति–परंपरा करूं शकत नाहीं असें कोणालाहि विचाराअंतीं सहज आढळून येईल. आपापला दुराग्रह सोडून जगांतल्या सर्व पद्धति व परंपरा आर्य संस्कृतीच्या या गंगाप्रवाहास मिळून एकरूप होतील तेव्हांच सर्व जग पावन होईल.

## आर्य संस्कृतीचीं लक्षणें व कार्य

भारताच्या आधुनिक राजकीय पुढाऱ्यांवर रशियाच्या साम्यवादाचा बराच पगडा बसल्यासारखा दिसतो. त्याच्या धर्तीवर सुधारणा दिसत आहेत. कायद्यानें अमलांत आणण्याची दंडेलशाहीहि थोडी थोडी डोकावत आहे. आर्यांची आनुवंशिक परंपरापद्धति त्यांना संकुचित वाटते. विश्वांतील सुखाची कल्पना अनाठायीं वाटते. ईश्वराचें अस्तित्व, त्याचें नियामकत्व, त्याचें कर्मफलदातृत्व,

स्व स्व कर्मानुरूप जीवांचें फलभोक्तृत्व, पूर्वकर्मानुरूप प्राप्त झालेलें त्यांचें जातीयत्व, प्रतिप्राणिपदार्थाचें भिन्न गुणधर्मित्व या त्यांना गंजलेल्या जुनाट कल्पना वाटतात. जगांतील स्वाभाविक विविधत्व व भिन्नत्व काढून टाकणें शक्य नसल्यामुळें स्त्रीपुरुषांचे, जातीयतेचे, प्रतिप्राणिपदार्थांचे ते ते स्वभावसिद्ध गुणधर्म राष्ट्राच्या ऐहिक पारलौकिक हिताच्या व सुखाच्या दृष्टीनें अनुकूल करून घेऊन कायम ठेवलेल्या त्यांच्या विविधतेंतून, भिन्नतेंतून व उच्चनीचतेंतून अद्वितीय परमात्मस्वरूपाचें, आंतरिक साम्य राखण्याचें, पाहण्याचें व त्याचा प्रचार करण्याचें वैदिक धर्मतत्त्व त्यांना अगदीं केवळ भोळसट वाटतें; आणि त्यांच्या अपक्व बुद्धीच्या तरुण कल्पनांना राशियाचा साम्यवाद रुचतो. केवळ ऐहिक दृष्टीनेंच आपला जीवनक्रम चालविणारी जाति, धर्म, आस्तिकता, पारलौकिक साधन इत्यादि सर्व सोडून रानांतल्या पशुपक्ष्यांप्रमाणें मोकळ्या जीवनाची अशी एक अखंड जात भारतांत केव्हां पाहूं असें त्यांना झालें आहे. उच्च पातळीच मुळीं काढून टाकून सर्वांनाच खालच्या एका पातळीवर आणून ठेवावें म्हणून त्यांचे अव्याहत प्रयत्न चाललेले दिसतात. शरीराच्या उन्नत अवनत अंगप्रत्यंगांना एका प्रकारचेंच रूप देण्याच्या प्रयत्नासारखाच हा कांहींसा प्रयत्न होऊं शकेल.

ईश्वरी सत्ता, ईश्वरी न्याय, ईश्वरी जगत्, ईश्वरी वेदवाङ्मय, कर्मफलानुसार ईश्वरी दंड, पूर्वजन्मार्जित गुण, कर्मस्वभावानुसार जन्मानें प्राप्त झालेल्या जातीची समाजव्यवस्था, ब्रह्मचर्यादि आश्रमव्यवस्था, एकपत्नीत्व, पातिव्रत्य, सत्य, अहिंसा, दानधर्म, परोपकार, दया, वैदिक धर्मश्रद्धा, परस्पर-सहानुभूति, गोड वर्तन, शुद्ध आचारविचार, अंतर्बाह्य पावित्र्य, तात्त्विक दृष्टि, एकात्मस्थिति, अपरिहार्य भेदाचा तात्त्विक दृष्टीनें उपयोग करून घेऊन सुखशांतीनें जीवन चालविणें, परगोत्राच्या सजातीय कुलीन वधूशीं लग्न करणें, तद्व्यतिरिक्त स्त्रियांत मायबहिणीची दृष्टि ठेवणें, सचोटीनें पैसा मिळविणें, श्रुतिस्मृतिपुराणोक्त कर्म-उपासना चालविणें, ज्ञानसाधनाचें अनुष्ठान करणें, होईल तितक्या त्यागपूर्ण उच्च न्यायनीतीचा आश्रय करून उच्च सभ्यतेनें वागणें, आदर्श नागरीकतेनें वागणें, मातृभक्त, पितृभक्त, देवभक्त व गुरुभक्त असणें, श्रुतिस्मृति आदिक मान्य ग्रंथांना प्रमाण मानणें, सर्वहितकारक अशा उत्कट भव्य भारी आदर्श गुणांच्या स्थावर जंगमात्मक प्राणिपदार्थांतहि, सर्व जातीच्या मनुष्यांतहि परमात्मविभूतींची दृष्टि ठेवून अश्वत्थ, तुळशी, गाय, साधुसंत, अवतारी यांच्या

ठिकाणीं आदर, पूज्यता ठेवून वागणें, मूर्तिउपासना करणें, प्रपंचवासना व ब्रह्मस्वरूपाचें अज्ञान असेपर्यंत कर्माप्रमाणें जन्म मानणें,प्राणी मरणोत्तर स्वकर्म-फलाकरितां भिन्न भिन्न लोकीं जातो याचा विश्वास धरणें, श्रुत्युक्त देवदेवता, त्यांचे लोक व अधिकार मानणें, त्या त्या फलाच्या दृष्टीनें त्यांचे त्यांचे मंत्र-यज्ञ-यागादिकांचें अनुष्ठान करणें, अद्वैतनिष्ठेचें पूर्ण ज्ञान होईपर्यंत, कर्म–उपासना-ज्ञान यांचें त्या त्या वर्णविधियुक्त अनुष्ठान करणें व पुढें जीवन्मुक्त स्थितींत होईल तितकें सर्वतोपरि लोकोपकारक कार्यें करीत आत्ममात्र स्थितींत असणें, हीं आर्य संस्कृतीचीं लक्षणें आहेत. परमात्मप्राप्तीच्या ज्ञानसाधनानें जीव तद्रूप होतो व मग त्याला भेद वैविध्य जन्मसंसारादि कांहींच नसतें, तो सच्चिदानंदरूप ब्रह्मात्म तत्त्वच एक होऊन असतो इत्यादि वैदिक धर्माचीं तत्त्वें आर्य संस्कृतींतून रूढ आहेत. हिला वैदिक अथवा आर्य-संस्कृति म्हणतात.

श्री. डॉक्टर भगवानदासजींनीं आपल्या (Science of Self) 'आत्म-विज्ञान' या ग्रंथांत आर्य संस्कृतीबद्दल काय लिहिलेलें आहे तें पाहूं.

"It is the ancient Socialism which some are convinced is truly scientific because based on the science of Psychology the most important of all sciences as is being widely recognized in the West now; while modern Socialism (or Communism) which calls itself scientific fails to be so, because it ignores and even goes positively against some fundamental facts and laws of human nature and therefore will fail to realize its objective, and fail exactly in the degree in and to the extent which it violates those facts and laws.

All this world of objects, which is named by the word "this" is made of and by ideation and hence none who knows not the Science of the Self can carry action to fruitful issues.

"He who knows the inner purpose of the laws of process and it's orders ideated by the self-existent, he alone can rightly ascertain and enjoin the rights and duties of the different classes of human beings, of their social Occupations (Varnas) and Vocations and on their Asrams, 'stages in life'."

—पुष्कळांना निश्चित असा विश्वास आहे कीं, आर्यांचा प्राचीन समाजवाद हा अध्यात्मावर उभारला असल्यामुळें खरा शास्त्रीय समाजवाद आहे. अध्यात्मशास्त्र हें सर्व विज्ञानशास्त्रांचेंहि मूळचें मुख्य असें महत्त्वाचें शास्त्र आहे

म्हणून आतां बहुतेक सर्वहि पाश्चात्य मानतात. आधुनिक समाजवाद अथवा साम्यवाद शास्त्रीय समजला गेला तरी तो त्या बाबतींत पुष्कळ लंगडा पडतो. त्यांचे सिद्धान्त त्रिकालाबाधित निसर्गाच्या मुख्य तत्त्वाविरुद्ध असल्यामुळें व ते मानवी स्वभावाला अथवा धर्मालाहि तितकेसे जुळत पण नसल्यामुळें ते आपल्या ध्येयाला गांठू शकत नाहींत. जितक्या अंशानें ते मूलग्राही सिद्धांतांना सोडून आहेत तितक्या अंशानें ते केव्हांहि तत्त्वनिदर्शनाच्या बाबतींत थोडेच पडतील, अपूर्णच राहतील, तितके ते मानवस्वभावाच्या व प्राकृतिक नियमाच्या विरुद्धच जातील.

सर्व भोग्य पदार्थांचें व दृश्य पदार्थांचें जग, ज्याला आपण 'हें' म्हणून संबोधितों, तें कोणत्यातरी एका भरीव तत्त्वाचें बनून विशिष्ट व्यवस्थेच्या दिव्य आधारानें जीव धरून आहे. जो हें आत्मतत्त्व जाणत नाहीं त्याच्या क्रिया त्यांच्या पूर्ण अर्थानें सफल होत नाहींत. ( **न ह्यनात्मवित्कश्चित्क्रियाफलं समश्नुते** । ) कायदे, नियम, साधन, विधान व सर्वांचें जीवन यांच्या आंतील तत्त्व जो जाणतो, जो हें सर्वहि आत्मस्वरूपाच्या प्राप्तीकरितांच आहे म्हणून ओळखतो, या सर्वांनाहि एक आत्मतत्त्वच आधार आहे अशी जो खूणगांठ बांधतो तोच एक केवळ सर्व ओळखतो व मानवांच्या भिन्न भिन्न कार्यक्षेत्रांतल्या पूर्वजन्मार्जितपणें लाभलेल्या जीवनाच्या भिन्न जातीचीं, तशीच मानवी आयुष्याच्या भिन्न भिन्न अवस्थारूप आश्रमांचीं कर्तव्येंहि पण तितक्याच सुखासमाधानानें बिनचूक पार पाडतो.

## जितेंद्रियत्व

स्त्रीपुरुष देह प्रजोत्पादनाचीं साधनें असल्यामुळें ते आपापल्या स्वभावानें आपल्या साहचर्यांत असणाऱ्या परस्परांत कामविकार उत्पन्न करतात. त्यांचें तसें शीलच आहे. **आकर्षणस्वरूपं हि शरीरं योषितामिह । तथा विकर्षणं नृणां शरीरं स्यात्स्वरूपतः ॥** आकर्षक आणि आकृष्य स्वभावानें स्त्रीपुरुषांचे देह आहेत. लोहचुंबक जसा आपल्याकडे लोखंडाला ओढतो त्याप्रमाणें स्त्री पुरुषाला आपल्याकडे ओढते. अद्वैत आत्मसाक्षात्कारावधि " स्त्रियांस पाहिजे पुरुष । पुरुषास पाहिजे स्त्रीवेष । ऐसा आवडीचा संतोष । परस्परें ॥ १६ । ७ । ३४ ॥ स्थूळाचें मूळ तें लिंग । लिंगामध्यें हे प्रसंग । येणें प्रकारें जग । प्रत्यक्ष चाले ॥ ३५ ॥

पुरुषांचा जीव स्त्रियांची जीवी । ऐसी होते उठाठेवी । परी या सूक्ष्माची गोवी । समजली पाहिजे ॥ ३८ ॥ स्त्रीसी पुरुष पुरुषास वधु । ऐसा आहे हा संमंधु । या कारणें सूक्ष्मसंवादु । सूक्ष्मींच आहे ॥ ३९ ॥ पुरुष इच्छेमध्यें प्रकृति । प्रकृतिमध्यें पुरुष व्यक्ति । प्रकृतिपुरुष बोलती । येणें न्यायें ॥४०॥ पिंडावरून ब्रह्मांड पाहावें । प्रचीतीनें प्रचीतीस घ्यावें । उमजेना तरी उमजावें । विवरविवरों ॥ ४१ ॥ द्वैत इच्छा होते मुळीं । तरी ते आली भूमंडळीं । भूमंडळीं आणि मुळीं । रुजू पाहावें ॥ ४२ ॥ " ( श्रीदासबोध )

पशुपक्ष्यादिकांतून एका मनुष्यांतच केवळ इतर स्त्रीशीं आईबहिण या दृष्टीनें चालण्याचा शुद्ध व्यवहार दिसून येतो. त्या त्या नात्यागोत्यांतूनहि त्याचें निर्विषय शुद्ध प्रेम दिसून येतें. माणुसकी ती यांतच आहे हेंहि खरें. ही माणुसकी सोडून मनुष्य पशुवृत्तीकडे वाहवूं नये, निषिद्ध कामविकाराला बळी पडून नीतिभ्रष्ट होऊं नये म्हणून धर्मशास्त्रानें फारच निर्बंध घातले आहेत. कामचांडाळाचें दुष्ट, निर्दयी, गोड बोलून गळा कापण्याचें, मोठे खुनशी डाव साधणारें असें निंद्य वर्तन असतें, असें सर्व सांगतात. म्हणून यावर, कोणी विश्वास ठेवूं नये. विषाची परीक्षा करूं नये म्हणून म्हणतात. त्याप्रमाणेंच याची स्थिति आहे. याच्या प्रवेशाला वाव मिळेल अशीं स्थळें, असे संनिवेश, देशकाल, आहारविहार, स्त्रियांचें साहचर्य हें होईल तितकें टाळावें व अशा प्रसंगीं धैर्य न खचूं देतां, ती कल्पना न उद्भवूं देतां आई-बहिणीच्या प्रेमाची आठवण करून पवित्र शुद्ध वर्तन ठेवावें. **स्वधर्मे स्थिरता धैर्य धर्मश्चेंद्रियनिग्रहः** ॥

" काम उत्पन्न होताहे ते वेळ नावरे जना । कामवेड जडे ज्याला तो प्राणी आत्मघातकी ॥ ( षड्रिपु. ४ ) कित्येक योषितेसाठीं जगतीं मृत्यु पावले । झडाच घालती नेटें पतंगापरि भस्मती ॥ ५ ॥ कित्येक भोरपी झाले किती गेले उठोनिया । बाटले भ्रष्टले मेले बुडाले कामवेसनीं ॥ ७ ॥ व्याधीनें नासती अंगें नासिकें झडती जनीं । औषधें दंतहि जाती रूप हानीहि होतसे ॥ ८ ॥ रुपहानी, शक्तिहानी, द्रव्यहानी परोपरी ॥ कुळहानी यातिहानी सर्व हानीच होतसे ॥ ९ कित्येक मातले भोंगे लोक लाजचि सांडिली । शुभाशुभ नसे तेथें नीचाशीं उंच भ्रष्टती ॥ १० ॥ विधिनें विषयो घ्यावा अविधि नसतां बरें । आश्रमीं न्यायनीतीनें प्रपंच करणें सुखें ॥१२॥" ( श्रीसमर्थ : षड्रिपु प्रकरण—काम ) भ्रष्टतेची वाटच बुजवून टाकावी म्हणून

श्रीतुकारामांनीं " एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण । प्राण गेल्या जाण करूं नये ॥ " असें अति निक्षून सांगितलें आहे. " स्त्रियांचा तो संग नको नारायणा । " असा एक त्यांचा अभंगहि आहे. वेश्येला पाठवून केलेल्या परीक्षेंतहि तुकाराम उत्तम प्रकारें उत्तीर्ण झाल्याचें पाहून तोच मंबाजी पुढें तुकारामाच्या पायीं लागल्याची गोष्ट प्रसिद्ध आहेच. श्रीसमर्थांनीं इंद्रानें परीक्षेकरितां पाठविलेल्या ऊर्वशीस मारुतीरायांच्या दर्शनानें भीति दाखवून विरघळून टाकल्याची ' दासविश्रामधामांत ' एक गोष्ट आली आहे. सज्जनगडच्या पायथ्याशीं असणारी नदी याच्याच स्मरणार्थ वाहत आहे असें तिथे सांगितलें आहे. एक गृहस्थाचा आदर्श तर दुसरा ब्रह्मचाऱ्याचा. या बाबतींतही श्रीसमर्थांनीं " रघुनाथाचा गुण घ्यावा " त्याच्या एकपत्नीव्रताचें अनुकरण करावें म्हणून सांगितलें आहे. " शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें " म्हणून श्रीसमर्थांचें वर्णन आहे. अशीं वाजवून पटणारीं नाणीं फार कमी. हा सवदा फार महाग आहे. इतिहासाचा या बाबतींत कटु अनुभव आहे. या दृष्टीनेंच साधुसंत व शास्त्रकार स्त्रीसाहचार्यापासून दूर राहण्याचाच सर्वत्रांस उपदेश करीत आहे. **इंद्रियाणां विचरतां विषयेष्वपहारिषु । संयमे यत्नमातिष्ठेद्विद्वान् यन्तेव वाजिनाम्** ॥ ( मनु. २।८८ )—रथनियुक्त अश्वाचा जसा सारथी संयम करतो त्याप्रमाणेंच विषयाकडे ओढणाऱ्या इंद्रियांच्या संयमाचा यत्न करावा.

**इंद्रियाणां विचरतां यन्मनोऽनुविधीयते । तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ २।६७ ॥ त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः । कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् । कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा । कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३।३९ ॥ इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते । एतैर्विमोहत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥ तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ । पाप्मानं प्रजहिह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः । मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥ एवं बुद्धेः परं बुध्द्वा संस्तभ्यात्मानमात्मना । जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥ अव्यक्तोऽयमचिंत्योयमविकार्योऽयमुच्यते । तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥२ । २५॥ प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।**

**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ २।५५ ॥** ( भ. गीता )

हे गीतेचे श्लोक मननीय आहेत. विषयांना जिंकावें. एक विषय असला तरी पुरे, आत्मबुद्धि नष्ट करतो. कामक्रोधलोभ हें त्रिविध नरकाचें द्वार आहे. या तिन्हींचा त्याग करावा. या कामक्रोधाचा वेग जो सहन करतो तोच युक्त आणि सुखी होतो. या कामशत्रूनेंच केवळ आत्मज्ञान झांकलें जातें. या कामाग्नीची भोगानें शांति न होतां उलट वृद्धीच होते. इंद्रियें, मन, बुद्धि हीं कामाचीं वसतिस्थलें आहेत. यामुळेंच तो आत्मज्ञान झांकून जीवाला मोहून टाकतो. प्रथम इंद्रियांना जिंकूनच या ज्ञानविज्ञाननाशक कामाचा नाश करावा लागतो. इंद्रियांचें चालक मन. मनाची बुद्धि व बुद्धीचाहि चालक 'मी' आहें. असें स्वतःच्या श्रेष्ठ भावनेनें, चालकत्वाच्या अधिकारानें व सुखाच्या परमावधित्वानें कामास जिंकावें. बुद्धीच्याहूनहि पलीकडचे आपण आहों, बुद्धीच्या खालीं मन, मनाच्या खालीं इंद्रियें व इंद्रियांतून वावरणारा हा काम कितीतरी खालीं आहे, याचा वारासुद्धां माझ्यापर्यंत वस्तुतः येऊन पोहोंचत नाहीं, म्हणून आपली यथार्थ जाणीव ठेऊन आपल्या पवित्र आनंदमात्र स्वरूपाच्या भावनेनें घाणेरड्या इंद्रियांच्या किळसवाण्या कामाचा मागमूसच नाहींसा करून टाकावा. अव्यक्त, अचिंत्य आणि नित्य अधिकारी असें केवळ जाणीव रूपसुखच आपलें रूप आहे असें जाणलें म्हणजे कसल्याहि शोकाचें कारणच उरत नाहीं. केवळ मनोवृत्तींतच उत्पन्न होणाऱ्या अखिल विषयकामनांना टाकून निरतिशय अशा पवित्र आत्मानंदानेंच जो तृप्त असतो, त्यालाच एक खरा आत्मनिश्चय झाला म्हणून समजावें. थोडक्यांत आपण या गीतेच्या श्लोकांचा सारांश—अर्थ पाहिला. किती अमोल उपदेश आहे हा !

विषयत्यागाच्या बाबतींत मनुस्मृतीचे हे श्लोकहि मननीय आहेत. **इंद्रियाणां प्रसङ्गेन दोषमृच्छत्यसंशयम् । संनियम्य तु तान्येव ततः सिद्धिं नियच्छति ॥** ( अ. २।९३ ) **न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति । हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ ९४ ॥ यश्चैतान्प्राप्नुयात्सर्वान् यश्चैतान्केवलां रस्त्यजेत् । प्रापणात्सर्वकामानां परित्यागो विशिष्यते ॥९५॥ श्रुत्वा स्पृष्ट्वा च दृष्ट्वाच भुक्त्वा घ्रात्वा च यो नरः। न हृष्यति ग्लायति वा सविज्ञेयो जितेंद्रियः ॥९८॥ इंद्रियाणां हि सर्वेषां यद्येकं क्षरतीन्द्रियम् । तेनास्य क्षरति प्रज्ञा दृतेः पादादिवोदकम् ॥ ९९॥**

**वशे त्कृत्वेन्द्रियग्रामं संयम्य च मनस्तथा । सर्वान्संसाधयेदर्थानक्षिण्वन् योगतस्तनुम् ॥ १०० ॥**

—शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पंचविषयांच्या ठिकाणीं कर्ण, त्वचा, चक्षु, जिव्हा आणि घ्राण हीं इंद्रियें आसक्त झालीं, यांना या विषयांचें वेड लागलें म्हणजे दोष तितके संभवतात. तेंच या विषयांपासून या इंद्रियांचा निग्रह केला, तर मोक्षासकट सर्व सिद्धि प्राप्त होते. विषय भोगून कधीं त्यांच्या वासना नष्ट झाल्या आहेत, असें कुठें आढळतच नाहीं. उलट तुपानें अग्नीची ज्वाला भडकल्याप्रमाणें भोगानें विषयांच्या इच्छा अधिकाधिक वाढूं लागतात. अखिल विषयांच्या प्राप्तीपेक्षांहि अखिल विषयांचा त्यागच सर्व-सुखकारी होतो. सर्व विषय भोगणाऱ्या चक्रवर्तीपेक्षां सर्वस्वाचा त्याग केलेला योगीच अनंत पटीनें सुखी असतो. मंजुळ ध्वनीश्रवणानें, मृदु स्पर्शानें, सुंदर दृश्यानें, पंचपक्वान्नांनीं, मधुर सुवासानें ज्याच्या मनावर इष्टानिष्टतेचा असा कांहींच परिणाम होत नाहीं तो जितेंद्रिय. अनुकूल—प्रतिकूलतेच्या भावना ज्याच्या नष्ट झाल्या आहेत तो जितेंद्रिय. चांगल्यावाईट अशा कसल्याहि पदा-र्थाच्या लाभानें ज्याला हर्षखेद होत नाहींत त्यालाच विषयांत सुख नाहीं व निरवधि सुखरूप आपणच आहों हें पटलें असें समजावें. खरा जितेंद्रिय हाच. बाकी सर्व इंद्रियें ज्ञानाच्या प्रभावानें जिंकून कोणतें एक इंद्रिय जिंकतां आलें नाहीं तरी पुरे ! मोकळ्या ठेवलेल्या तोंडावाटे पखालींतलें सर्व पाणी वाहून गेल्याप्रमाणें त्या इंद्रियावाटेच त्याचें तें ज्ञान, सर्व वाहून जातें. वाहावयाला तेवढेंच पुरे होतें. सर्वेंद्रियें समूळ स्वाधीन ठेवून मनाचा निग्रह ज्यानें केला त्याला दुष्कर असें कांहीं उरत नाही. अप्राप्य कांहीं राहात नाहीं. सर्व सुखें त्याच्या पायीं लागतात. सर्व सिध्द्या त्याची सेवा करतात. जीवनाचें हें रहस्य नव्हे का ? इकडे तरुण मुलें मुली लक्ष देतील काय ? **बलेन परराष्ट्राणि गृण्हञ्शूरस्तु नोच्यते । जितो येनेंद्रियग्रामः स शूर इति कथ्यते ॥** ( दक्ष-स्मृ. ७।१८ )—बाहुबलानें परराष्ट्रें जिंकणारा शूर म्हणवून घेतो पण तो खरा शूर नव्हे. ज्यानें इंद्रियसमुदाय जिंकला तोच खरा शूर.

## आदर्श ब्रह्मचर्य

विद्यार्जनाचा ब्रह्मचर्याश्रम फार महत्वाचा आहे. पुढच्या सर्व सुखांचा व सौकर्याचा इथेच सांठा करावयाचा असतो. उत्कृष्ट पायावरच्या इमारतीप्रमाणें

अस्खलित ब्रह्मचर्याच्या पायावर आयुष्याची उभारलेली इमारत अधिक दिवस टिकते. ब्रह्मचाऱ्याला शास्त्रकारांनीं घालून दिलेले नियम पाहूं. **वर्जयेन्मधु मांसं च गन्धं माल्यं रसान् स्त्रियः । शुक्तानि यानि सर्वाणि प्राणिनां चैव हिंसनम् ।** ( मनु. २।१७७ ) मद्य, मांस खाऊं नयेत. गंधाची उटी, पुष्पमाळा, सुगंधी द्रव्यें वर्जावींत. गूळ आदि उष्ण पदार्थ, कांदा, लसूण आदि उत्तेजक पदार्थ, चटकदार पदार्थ, तळलेले पदार्थ खाऊं नयेत. चहा, कॉफी आदि उष्ण पेयें त्यजावींत. हॉटेलांतील जिन्नस, खाणावळीचें जेवण सर्वच हें ब्रह्मचर्यपालनाला विरुद्ध आहे. अचकट विचकट सिनेमा, अचकट विचकट भाषण, चेष्टा, विनोद, मस्करी हें कांहींहि असूं नये. कामोद्दीपक आहार, विहार, संभाषण, साहचर्य या सर्वांचा ब्रह्मचाऱ्यानें त्याग करावा. स्त्रियांच्या ठिकाणीं केवळ मातृदृष्टी ठेवावी. आबालवृद्ध स्त्रियांना मातृवर्ग म्हणून आदरानें व पूज्यतेनें वागवावें. शिळे, कुजलेले, आंबवलेले पदार्थ खाऊं नयेत. कठोर आचरणानें व कठोर भाषणानें कुणाचीहि वृत्ति दुखवूं नये. हिंसा करूं नये. **अभ्यंगमंजनं चाक्ष्णो रूपानच्छत्रधारणम् । कामं क्रोधं च लोभं च नर्तनं गीतवादनम् ॥ १७८ ॥** ब्रह्मचाऱ्यानें साध्य झाल्यास थंड पाण्यानें स्नान करावें. रोज तेल लावून ऊन पाण्याचें स्नान करूं नये. अंजन, काजळ घालूं वगैरे नये. पादुका, जोडे, बूट इत्यादि, छत्री आदि अनावश्यक असल्यास वापरूं नयेत. प्रकृतीवर परिणाम न होईल असें देशकाळ बघून वागावें. काम, क्रोध, लोभ, नाच, गायन, तमाशा, छानछोक यांच्या भरीस पडूं नये. **द्यूतं च जनवादं च परिवाहं तथानृतम् । स्त्रीणां प्रेक्षणालम्भमुपघातं परस्य च ॥१७९॥** पैसे लावून खेळणें, निरर्थक वितंडवाद घालणें, उगीच भांडत बसणें, चिणचिण करणें, तुसडेपणानें वागणें, दुसऱ्यांना बोल ठेवणें, निंदा करणें, खोटें बोलणें, कामदृष्टीनें कुमारिका व स्त्रिया यांकडे बघणें, हास्यविनोद करणें, एकांतीं लोकांतीं चाहाटळपणानें भाषण करणें, स्त्रियांच्या कानाजवळ जाऊन बोलणें, त्यांच्या बरोबर पोहणें, खेळणें, फिरावयाला जाणें, नाटक–सिनेमाला जाणें, मनांत त्यांची मूर्ति आठविणें, त्यांना स्पर्श करणें, आलिंगन देणें' इत्यादि तर कायेनमनसापि ब्रह्मचाऱ्याच्या ठिकाणीं नसावींत. कोणालाहि अपकार करूं नये. **एकः शयीत सर्वत्र न रेतः स्कंदयेत्क्वचित् । कामाद्धि स्कंदयन्रेतो हिनस्ति व्रतमात्मनः ॥ १८० ॥**—पलंगावर न झोंपतां खालीं घोंगडीवर, चटईवर झोंपावें. मूत्रस्थानाला स्पर्शच करूं नये.

रेतोधारण हें जीवन आहे. रेत बाहेर येईल अशी कोणतीहि क्रिया ब्रह्मचाऱ्यानें करूं नये. तसें केल्यास ब्रह्मचर्यव्रतच नष्ट होतें. वीर्याचा एक थेंब शुद्ध रक्ताच्या ४० थेंबांबरोबर असतो. एका वेळच्या वीर्यपातानें दीड ते दोन तोळे वीर्य म्हणजे पक्क्या एक शेर रक्ताचा नाश झाल्यासारखें होतें. याच दृष्टीनें 'ब्रह्मचर्य हेंच जीवन, वीर्यनाश हाच मृत्यु' असें म्हटलें जातें. **स्वप्ने सिक्त्वा ब्रह्मचारी द्विजः शुक्रमकामतः। स्नात्वार्कमर्चयित्वा त्रिः पुनर्मामित्यृचं जपेत् ॥**—कसलीच भावना नसतां अकस्मात स्वप्नांत रेतस्खलन झालें तर स्नान करून उपास्य देवतेचें, सूर्याचें पूजन करून, ब्राह्मण असल्यास 'पुनर्मामैत्विंद्रियम्' (आश्व. तृ. ३–६) हा मंत्र तीन वेळ म्हणावा. इतरांनीं 'भीमरूपी' म्हणावी अथवा 'हनुमानचालिसा' म्हणावी.

**स्वभाव एष नारीणां नराणामिह दूषणम। अतोऽर्थान्न प्रमाद्यन्ति प्रमदासु विपश्चितः ॥** (मनु. २।२१३) स्त्रियांचा प्रभाव नव्हे स्वभावच तो. त्यांचें बोलणें, चालणें, उभें राहणें, अंगचेष्टा सारेंच स्वाभाविकपणेंच श्रृंगार-प्रधान असतें. देहस्वभावच त्यांचा तो असतो. त्या मुद्दाम करतात असें नाहीं, पण त्यानें अजितेंद्रिय, अनिग्रही मनाच्या मनुष्याच्या कामवृत्ति अकस्मात् जागृत होतात. इंद्रियांचा विकार घडतो हें जाणून होतां होईल तों बहिण आदिकांहून वेगळ्या मुलींच्या, स्त्रियांच्या सहवासांत राहणें, बोलणें, प्रेम करणें इत्यादि अनावश्यक गोष्टींचा त्याग करावा. पुढच्या सूचनेचा सर्वांनींच विचार करावा. **अविद्वांसमलं लोके विद्वांसमपि वा पुनः। प्रमदा ह्युत्पथं नेतुं कामक्रोध-वशानुगम् ॥** (मनु. २–२१४)—अशी सूचना अनेक शास्त्रकारांनीं दिली आहे. मी जितेंद्रिय आहें, ज्ञानी आहें म्हणून कोणी विषाची परीक्षा पाहावयाला जाऊं नये, अग्नीशीं खेळूं नये, अतिक्रम करूं नये, बुध्द्या विनाकारण स्त्रियांशीं अधिक लगट करूं नये. त्यांच्या सान्निध्यांत अधिक वेळ असूं नये. विद्वान म्हणून गणलेल्यालाहि ती मोहवश करून विकार उत्पन्न करते तर अविद्वानांची कथाच काय! स्वाभाविक देहस्वभावामुळें कामवश झालेल्या अविद्वानांना आणि विद्वानांनाहि स्त्रियांचें सान्निध्य कामविकार उत्पन्न करून कुमार्गीं प्रवृत्त करतें. शास्त्रकारांनीं असें कुठेच कांहीं होऊं नये म्हणून थोडें पुढें जाऊन, वाइटाला संपूर्ण आळा पडावा म्हणून इतकेंहि सांगून टाकलें आहे कीं, **मात्रा स्वस्रा दुहित्रा वा न विविक्तासनो भवेत्। बलवानिंद्रियग्रामो विद्वांसमपि**

**कर्षति** ॥ २१५ ॥ सख्ख्या नात्याच्या मंडळीशीं अतिप्रसंग होणार नाहीं म्हणून गृहीत धरून तरुण सावत्र आई, सावत्र, चुलत व मावस बहीण, भावाची मुलगी इत्यादिकांबरोबर एकांतीं अधिक वेळ बसूं नये. सख्ख्या संबंधारींहि अति लगट करूं नये अशा ' अती 'नेंहि निंदा तरी होऊं लागतेच. शास्त्राच्या नियमानें वागावें म्हणून कितीहि आग्रह धरलेल्या माणसांनासुद्धां हा उद्दाम इंद्रियसमूह व खोडसाळ मन मुद्दाम विवश करतें अशी मनूनें सूचना देवून ठेविली आहे. थोडीशी अतिशयोक्ति वाटली तरी सावध राहाणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. वाइटाची कल्पना करून त्याचा मार्गच बंद करावा, म्हणून थोड्या अधिक निर्बंधांनीं प्रतिबंध घातला जातो. नीतिभ्रष्टतेला समाजांतून वाव मिळूं नये हाच यांतला उद्देश. यांतलाच पुढचा एक प्रकार आहे. " **स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणम् । संकल्पोऽध्यवसायश्च क्रियानिष्पत्तिरेव च ॥ एतन्मैथुनमष्टांगं प्रवदन्ति मनीषिणः । विपरीतं ब्रह्मचर्यमनुष्ठेयं मुमुक्षुभिः** ॥—हे श्लोक पुष्कळ ठिकाणीं आले आहेत. श्रीशंकराचार्यांच्या स्फुट ग्रंथांतूनहि आहेत. स्त्रियांचें स्मरण करणें, स्त्रीगुणवर्णन, स्त्रियांशीं खेळ खेळणें, चेष्टा करणें, स्त्रियांकडे टक लावून पाहणें, एकांतांत भाषण करणें, कोणा एका स्त्रीच्या बोलण्याची, हंसण्याची, चालण्याची कल्पना पुनः पुनः येणें, तिच्या भेटीस जाण्याचे संकल्प मनांत सारखे घोळणें, तिच्या आकृतीचा ठसा उमटून तीच ती आकृति पुनः पुनः डोळ्यांसमोर येणें आणि संभोगाची प्रत्यक्ष कृति घडणें असें हें एकंदरींत आठ प्रकारचें मैथुन मानलें जातें. याहून विलक्षण असलेलें ब्रह्मचर्य, ज्याला म्हणून नरकाचा मार्ग बंद करून निरतिशय आत्मसुख मिळवावयाचें आहे त्यानें अवश्य अनुष्ठिलें पाहिजे. **न स्थिरं क्षणमप्येकमुदकं च यथोर्मिभिः । वाताहतं तथा चित्तं तस्मात्तस्य न विश्वसेत्** ॥ ( दक्षस्मृ. ७।१९ ) समुद्राच्या कांठावर जशा एक क्षणभरहि लाटा थांबलेल्या दिसून येत नाहींत त्याप्रमाणें चित्ताच्या लाटा नसलेल्या एका योग्याशिवाय कुणालाच त्या अजिबात थांबलेल्या आढळून येत नाहींत. नदीच्या पाण्याप्रमाणेंहि म्हणतां येईल. एका आचमनाचें पाणी दुसऱ्या आचमनाच्या वेळीं नसतें, त्याप्रमाणें चित्त सारखें निरनिराळ्या कल्पनाप्रवाहांनीं युक्त असतें. अकस्मात कसली तरी कल्पना उठते, जसा कुठून तरी दुर्गंध यावा आणि मन निर्बुजावें त्याप्रमाणें कुठलीतरी घाणेरडी कल्पना मनांत मागच्या-पुढच्या कांहींच संबंध

नसतां एकदम उद्भवते, आणि विवेकी मनाला त्रासवून सोडते; म्हणून चित्ताचा कोणी विश्वास धरूं नये. या चिंतनाचा विषय सदा असा बहुतेक गलिच्छच असतो. या चित्ताच्या अखंड ओढीनें जीव कंटाळून एकदां त्या विषयाच्या अनुभवानें तरी हें शांत होईल का म्हणून विषयांत पडतो. विषयांचें व स्त्रियांचें सान्निध्य म्हणजे 'आधींच मर्कट तशांतचि मद्य प्याला' असें त्या चित्ताच्या बाबतींत होतें. **सर्वोत्कटाः सुराः सर्वे विषयैश्च वशीकृताः प्रमादिनि क्षुद्रसत्वे मनुष्ये चात्र का कथा ।** (दक्ष. ७।२७)— सत्त्वबलानें व सात्त्विकतेनें कितीतरी श्रेष्ठ असणाऱ्या सर्व देवांनाहि या कामादिकांनीं व विषयांनीं वश करून टाकलें, तर प्रमादशील क्षुद्रसत्त्वाच्या माणसाची कथा काय !

**पंचविंशतिपर्यन्तं ब्रह्मचर्यं समभ्यसेत् । बलवान् शक्तिसंपन्नः शतायुस्तु भविष्यति ॥**—वयाच्या पंचवीस वर्षेपर्यंत मुलानें ब्रह्मचर्य पाळलें कीं तो शारीरिक, मानासिक बळानें युक्त, दैवीशक्ति-संपन्न, शंभर वर्षें आयुष्याचा होतो. **पूर्णषोडशवर्षा स्त्री पंचविंशेन संगता । शुद्धे गर्भाशये मार्गे रक्ते शुक्रेऽनिलो हृदि ॥ वीर्यवन्तं सुतं सूते** ' इत्यादि. '**पंचविंशे ततो वर्षे पुमान्नारी तु षोडशे । समत्वागतवीर्यौ तौ जानीयात्कुशलो भिषक् ॥** —पुरुषाला पंचवीस व मुलीला सोळा वर्षांच्या वयोमानाचा निर्बंध आहे. या वयांत दोघांच्या धातूंची योग्य पुष्टि होते. अशांपासून झालेली संतति ही बलवीर्यवान होते. तोंपर्यंत त्याची दृष्टि इकडे तिकडे अजिबात जातां कामाची नाहीं. पंचवीस वर्षांच्या अवधींत सर्व धातु पुष्ट होतात. मुलांच्या कोंवळ्या मनावर घाणेरडे संस्कार झाले म्हणजे ते लहानपणापासूनच आडमार्गाकडे वळून सबंध आयुष्यच भुंग्यानें पोखरलेल्या तुळईप्रमाणें निःसत्त्व करून टाकतात. सांप्रतकाळीं ब्रह्मचर्याचें पालन तितकेसें योग्य रीतीनें होत नसल्यामुळेंच आधुनिक तरुण पिढी बहुतेक निस्तेज, निरुत्साही, निर्बळ, काटकुळी, डोळे खोल गेलेली, थोडक्यांत म्हणजे प्रेत-कळेची व अल्पायु दिसून येते. पूर्वीं हुशार असल्यास पांचव्या वर्षीं अथवा सातव्या-आठव्या वर्षीं मुलांच्या मुंजी होऊन, तीं ऋषींच्या त्या पवित्र वनांतल्या सात्त्विक दृश्याच्या अति मनोरम आश्रमांत व जितेंद्रिय, सामर्थ्य-संपन्न, वेदवेदांगपारंगत अशा त्या शांत ब्रह्मनिष्ठ ऋषींच्या दिव्यसान्निध्यांत देववाङ्मयाचें म्हणजे अपौरुषेय वेदांचें अध्ययन करीत असत. पवित्र

वातावरण, पवित्र अवस्था, पवित्र वेदांचें अध्ययन व तेंहि पण पवित्र अशा आत्मसाक्षात्कारी ऋषींकडून, ही कल्पनाच इतकी मनांत शांत व दिव्य वातावरण निर्माण करते, तर ती त्या वेळची परिस्थिति कशी असेल ! ब्रह्मचारी बटु म्हणजे पावित्र्याची ओतीव मूर्ति, पवित्र हृदयाचें तें एक मूर्तिमंत दर्शनच. जात्याच सुंदर असणाऱ्या व्यक्तीस आरोग्याची व मनःसमाधानाची जोड मिळाल्यास ती जशी अधिक खुलून दिसते त्याप्रमाणेंच जात्याच त्या अवस्थेंत मन पवित्र असतें. त्यांतून गायत्रीचें अनुष्ठान, सूर्याची उपासना, वेदांचें अध्ययन, दिव्य वातावरणाचा मनावर झालेला सुपरिणाम यानें तें पवित्र तेजस्वी बाल्य, पावित्र्याच्या संपूर्ण कलेनें अधिक उठावदार दिसून येई. परीक्षित राजासारख्या सत्त्वसंपन्न राजाला शमीक ऋषीचा तो कुमार शाप देतो काय, आणि तो शाप लागूं नये म्हणून पाण्यांतल्या एकस्तंभाच्या मंदिरांत कुठूनहि साप न येईल अशी तयारी करून तो बसला असतांनाहि बरोबर वेळ साधून तो शाप खरा होतो काय ? हा सर्व त्या वातावरणाचा व त्या अमोघ वीर्याचा प्रभाव, दुसरें काय ? आतांचें सहशिक्षण, प्रौढविवाह, स्त्रीस्वातंत्र्य, धर्मशिक्षणाचा अभाव, शहरी वातावरण, सुधारकांचा सुळसुळाट, विजातीय विवाह, घटस्फोट, पुनर्विवाह, आदर्श व्यक्तींच्या आदर्शाचा अभाव इत्यादि या सर्व गोष्टी आजच्या समाजाच्या वाईट परिस्थितीचीं कारणें आहेत. नुसत्या शाळेंत आणि विश्वविद्यालयांतच नाहीं, आतां तर सर्व खात्यांतूनच स्त्रीपुरुष एकत्र वागतात. इतकें असूनहि जर समाज पवित्र राहिला असता तर तें भूषणच आहे. पण अलीकडची स्थिति पाहून श्रीदत्तात्रेयांचें वाक्य आठवतें.

**अग्निकुंडसमा नारी घृतकुंभसमो नरः ।**
**संसर्गेण विलीयेत तस्मात्तां परिवर्जयेत** ॥ (अवधूत गीता)

—अग्निकुंडाप्रमाणें स्त्री व घृतकुंभाप्रमाणें पुरुष असतो व तो स्त्रीसांनिध्यानेंहि विरघळतो; म्हणून स्त्रियांचें सांनिध्य वर्जावें. श्रीदत्तात्रेयांनीं सर्वसाधारण मानवाच्या हिताकारितां हा श्लोक लिहिला आहे. हा अवधूतगीतेच्या शेवटच्या अध्यायांतील श्लोक आहे. या श्लोकांत स्त्रीला अग्निकुंडाची व पुरुषाला घृतकुंभाची उपमा देऊन त्यांच्या देहधर्माची कल्पना आणून दिली आहे. अग्निकुंडाजवळ ठेवलेल्या घृतकुंभाप्रमाणें सामान्य पुरुष स्त्रीच्या साहचर्यांत पाघळतो, इंद्रियवैकल्य होतें. देहाला आवरून धरलें तरी क्वचित रेतस्खलनादि

दोषहि संभवल्याचीं उदाहरणें ऐकिवांत आहेत. स्त्रियांच्या सान्निध्यांत पुनः पुनः जावें, बोलावें, जवळ बसावें असें एक विलक्षण आकर्षण प्रथम सुरू होतें. मन चोरून तरी घाणेरड्या कल्पना करतें. ती मूर्तीच मनापुढें राहाते. पुढच्या भ्रष्टतेला अशा गुप्त घटनेपासूनच सुरुवात होते. मनाला तोच एक विषय सळो कीं पळो करून टाकतो. तत्त्वज्ञानाच्या अभ्यासानें एकात्मतेची दृष्टि दृढ होईपर्यंत, अकाय असणारी आत्मदृष्टि सर्वत्र पसरेपर्यंत, निर्विकल्प, चिन्मात्र सुखस्वरूपाच्या अखंड धारणेनें कामादिकांचा समूळ नाश होईपर्यंत, सर्वत्र परमात्मा आहे हें तत्त्व चांगलें वठेपर्यंत, धर्मतत्त्वाचें बाळकडू अंगांत भिनेपर्यंत, उच्च नीति आंगीं बाणेपर्यंत, परस्त्रीच्या ठिकाणीं मातृदृष्टि दृढ होईपर्यंत, मनुष्यजन्माचें रहस्य चांगलें कळेपर्यंत, पशुधर्माच्या निषेधाकरितां आणि व्यक्ति व समाज यांच्या सर्वतोपरि उन्नतीकरितां, हिताकरितां, इहपर गतीकरितां स्त्रीपुरुषांचें साहचर्य पथ्यकर नाहीं, असें कोणास वाटणार नाहीं ?

## तत्त्वज्ञानी

**एवमेवैष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते स उत्तमः पुरुषः स तत्र पर्येति जक्षन् क्रीडन् रममाणः स्त्रीभिर्वा यानैर्वा ज्ञातिभिर्वा नोपजनं स्मरन्निदँ शरीरं** (छां. उ. ८-१२-३).

—देहरहित असणारें आनंदघन चैतन्यच तुझें आणि या सर्वांचेंहि एक शुद्ध व सत्य स्वरूप आहे. या आनंदमात्र स्वरूपाखेरीज अन्य असें कांहीं नाहींच. अशा या गुरूपदिष्ट तत्त्वाचा साक्षात्कार होऊन स्वसंवेद्य स्वप्रकाश, ज्ञानानंदरूप आपण एक या आपल्या रूपानेंच स्वमात्र आहों अशा अविचलित निश्चयाचा निर्विकल्प मनुष्य ‘ उत्तम पुरुष ’ महात्मा होय. हा स्त्रीपुरुषांच्या समाजांत असतांना, यांच्याबरोबर एका वाहनादिकांतून प्रवास करतांना, पायीं मार्गानें जातांना अथवा भोजनादि व्यापारांत असतांना, सरस –सल्लापानें हास्यविनोदादि करीत असतांना, क्रीडादिकांत रमून गेला असतांना अथवा एकांतांत असतांना, कोणत्याहि स्थितींत सर्वात्मभावानें राहणारा हा समीप असणारीं शरीरें पाहत नाहीं, याच्या ठिकाणीं निराकार आत्मरूपाची अशीच कांहीं दिव्य दृष्टि खिळून असते, तो नित्य निर्विकार असतो. अत्यंत विशुद्ध अशा अद्वितीय आनंदमात्र स्वरूपस्थितीनेंच हा असतो. हें ज्ञान्यांचें लक्षण. ही आर्यांची ज्ञाननिष्ठा. हिलाच जीवन्मुक्ति असें म्हणतात.

**यस्त्वात्मव्यतिरेकेण द्वितीयं नैव पश्यति ।**

**ब्रह्मभूतः स विज्ञेयो दक्षपक्ष उदाहृतः ॥** (दक्ष. स्मृ. ७।११)

—आपल्याव्यतिरिक्त असें दुसरें म्हणून तो पहातच नाहीं. तोच एक ब्रह्मरूप झाला असें दक्ष प्रजापतीचें हें मत आहे. असा या श्लोकाचा अर्थ. इतकी उन्नत भूमिका जोंपर्यंत साधत नाहीं, तोंपर्यंत **मातृवत्परदारेषु परद्रव्येषु लोष्ठवत्** । परस्त्रीच्या ठिकाणीं मातेप्रमाणें, परद्रव्याच्या ठिकाणीं मातीप्रमाणें भावना कर, म्हणून महात्म्यांचा उपदेश असतो. **परदारेष्वसंसर्गो धर्मस्त्री-पारिरक्षणम् । अहिंसा सत्यवचनं सर्वभूतानुकंपनम् ॥ शमो दानं यथा शक्ति गार्हस्थो धर्म उच्यते ॥** स्त्रियांच्या ठिकाणीं मातृबुद्धि, विवाहित स्वस्त्रीचें धर्मानुरूप रक्षण, अहिंसा, सत्यवचन, भूतदया, सर्वभूतहित दृष्टि, मनोनिग्रह, बाह्येंद्रियनिग्रह, यथाशक्ति दानधर्म, नीतिन्याय हा गृहस्थधर्म आहे. **मातृवत् स्वसृवच्चैव नित्यं दुहितृवच्च ये । परदारेषु वर्तन्ते ते नरा स्वर्गगामिनः** ।—मातेप्रमाणें, भगिनीप्रमाणें, मुलीप्रमाणें, परस्त्रीशीं वागणारा उत्तम गति प्राप्त करून घेतो. आर्यसंस्कृतीचें असें हें उदात्त रूप आहे.

**परदाराभिमर्शेषु प्रवृत्तान् नॄन्महीपतिः ।**

**उद्वेजनकरैर्दण्डैश्छिन्नयित्वा प्रवासयेत् ॥** (मनु. ८–३५२)

—परस्त्रीला भ्रष्टविण्याची प्रवृत्ति असणाऱ्या लोकांना मरेपर्यंत आठवण राहील अशी शिक्षा द्यावी. पाहतांक्षणींच हा अशा प्रकारचा म्हणून, अशा प्रकारें वागलें असतां अशी शिक्षा होतें हें माहीत व्हावें म्हणून व अशा प्रकारें पुन्हां कोणीहि करूं नये म्हणून, चांगली खूण राहील असें नाक, कान यांपैकीं कांहीं अथवा दुसरा कोणता तरी हातापायाचा भाग कापून हांकून द्यावें, असें या श्लोकांत मनूनें सांगितलें आहे. एवढी कडक शिक्षा कां ? म्हणून कुणालाहि शंका येईल हें ताडून, त्याच्या आवश्यकतेचें तोच स्पष्टीकरण करतो.

**तत्समुत्थो हि लोकस्य जायते वर्णसंकरः ।**

**येन मूलहरोऽधर्मः सर्वनाशाय कल्पते ॥** ( मनु. ८–३५३ )

—असल्या नीतिभ्रष्ट मनुष्यापासूनच समाजांत वर्णसंकर होतो. या वर्णसंकरामुळें अधर्मप्रवृत्ति, सत्कर्माचा व सज्जनांचा द्वेष वाढतो. यज्ञादिक कर्में चालत नाहींत. यामुळें धनधान्य-पर्जन्यादि बंद होतें, दुष्काळ पडतो, नवीन नवीन रोगांची उत्पत्ति होते व असा राष्ट्राचा बराच नाश होतो. श्राद्धपक्षादि

बंद पडल्यामुळें, स्त्रिया भ्रष्ट झाल्यामुळें, वंशान्वय खुंटल्यामुळें पितर नरकास जातात. अशा रीतीनें वर्णसंकर करणाऱ्याला म्हणजे कुलनाश करणाऱ्याला, त्या कुलाला व त्या कुलांच्या पितरांना नरकप्राप्ति होते. अशा दुष्टांची संख्या जास्त झाल्यानें मूळ वैदिक धर्म लुप्त होतो, मन दुष्ट व अपवित्र होतें. दुष्कृत्याकडेच तें अधिक वाहूं लागतें. भक्ति, ज्ञान, वैराग्य कांहीं राहातच नाहीं. आत्मस्वरूपाची स्मृति यांना होत नाहीं. त्याला कारण असणारी विरक्ति यांना लाभत नाहीं. मोक्षभागी होण्याऐवजीं सर्वहि नरकभागी होतात. मनुमहाराजांनीं नियुक्त केलेली ही शिक्षा इतकी घोर याकरितां आहे. नासका मनुष्य स्वतः नासतो तो नासतोच, दुसऱ्यालाहि तो आपल्याबरोबर नासवितो, म्हणून त्याला मनूनें इतकी शिक्षा सांगितली आहे हें स्पष्ट होतें.

**अकुर्वन् विहितं कर्म निंदितं च समाचरन् ।**
**प्रसज्जंश्चेंद्रियार्थेषु नरः पतनमृच्छति** ( याज्ञवल्क्य २३ )

—शास्त्रविधि उल्लंघून, विहित कर्मांना फांटा देऊन जो मन मानेल तसा निषिद्ध कर्मास प्रवृत्त होतो, केवल इंद्रियलंपट होतो. त्याचें यश, कीर्ति, प्रताप, माहिमा, आरोग्य यांचा नाश होऊन, इहकीर्ति व परत्रीची गति नष्ट होते. तो भ्रष्ट होतो. हाच पतित म्हणवून घेतो.

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि** ॥ २१ ॥

—त्यामुळें कार्याकार्य विचारासंबंधीं शास्त्रच एक प्रमाण आहे. शास्त्रांत सांगितलेलें प्रमाण मानून, त्याचें महत्त्व चांगलें जाणून घेऊन उभ्या जीवनांतलीं सर्व कार्यें यथोक्त प्रकारें सुरळीत चालवावींत.

## स्त्रियांसंबंधीं शास्त्रकारांचें मत

—स्त्रिया विद्युताप्रमाणें आहेत. त्या थोड्या उघड्या पडल्या कीं घातुक होतात. निर्बंधनांनींच त्या अधिक लोकोपकारक ठरतात.

**पुस्तकं वनिता वित्तं परहस्ते गतं गतं ।**
**यदि चेत्पुनरायाति नष्टं भ्रष्टं च खण्डितम्** ॥

—पुस्तक, वानिता, वित्त दुसऱ्याच्या हातीं गेलेलें तशाच शुद्ध स्थितींत परत येणें दुरापास्तच. म्हणून परोपरीनें स्त्रीचें रक्षण करावें लागतें.

भाषण-दर्शन-स्पर्शानें, दोन स्त्री–पुरुषांत केव्हां कामोत्पत्ति होईल हें सांगतां येत नाहीं. जगांत जोंपर्यंत स्त्रीजात भोग्य आहे, हीच एक केवळ कल्पना शिल्लक असते तोंपर्यंत तिचें रक्षण कुठेहि करीत रहावेंच लागतें.

**स्वां प्रसूतिं चरित्रं च कुलमात्मानमेव च ।**
**स्वं च धर्मं प्रयत्नेन जायां रक्षन्हि रक्षति ॥** ( मनु. ७ )

—पत्नीच्या एका रक्षणानें शुद्ध संतति–निर्माणद्वारां संततीचें, उज्ज्वल पवित्र जीवनाचें, स्वकुलाचें, आपलें, आपल्या स्वत्वाचें, धर्माचें व कर्तव्य-कर्माचेंहि रक्षण होतें.

**सूक्ष्मेभ्योऽपि प्रसंगेभ्यो स्त्रियो रक्ष्या विशेषतः ।**
**द्वयोर्हि कुलयोः शोकमावहेयुररक्षिताः ॥** ( मनु. ९।५ )

— कुसंग व दुःशील यांचा अल्पसा संबंधहि होऊं नये म्हणून बाल्या-पासूनच स्त्रियांचें रक्षण करावें. **मनेयमस्तु पोष्या** । ( अथर्व. १४।१।५२ ) — पतीकडून पोसली जाणारी सती होय. **पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने । रक्षन्ति स्थविरे पुत्राः न स्त्री स्वातंत्र्यमर्हति** ॥ ( मनु. ९।३ ) —कौमार्यांत पिता, तारुण्यांत भर्ता, वृद्धाप्यांत पुत्र स्त्रीचें रक्षण करतात. स्त्री ही स्वातंत्र्याला पात्र नाहीं. घरची मालकीण घरींच असावयाला पाहिजे. **गृहिणी गृहमुच्यते । अर्थस्य संग्रहे चैनां व्यये चैव नियोजयेत् । शौचे धर्मेऽन्नपक्त्यां च पारिणाह्यस्य वेक्षणे** ॥ ( मनु. ९ । ११ ) धनधान्यांचा संग्रह, विनियोग, धान्यादि निवडणें, घर शुद्ध ठेवणें म्हणजे झाडलोट, सडासंमार्जन, सारवणें, रांगोळी काढणें इत्यादि गृहकृत्य, स्नानपानास पाणी आणणें, धर्मकार्यार्थ सहकारी होणें, स्वयंपाक करणें, वाढणें, दळणें, कांडणें, शिशुसंगोपन करणें, घरांत काय आहे नाहीं पाहणें, असलेल्या धनधान्याचें भांड्याकुंड्यांचें रक्षण करून नसलेल्या पदार्थांची पतीला आगाऊ सूचना देणें इत्यादि गृहकार्यांत गृहिणीची योजना करावी. चूलमूल सांभाळून आपली उन्नती करून घेण्याकरितांच स्त्रियांची उत्पत्ति आहे. परमात्म्यानें गृहाच्या संततीच्या रक्षणार्थच त्याला पाहिजे ते देहस्वभाव त्यांच्यांत निर्माण करून स्त्रियांना निर्माण केलें आहे. " हे ईश्वराचें केलें जग । अन्यथा नव्हे ॥ " प्रत्येक प्राणिपदार्थांची जी उत्पत्ति झाली आहे ती भिन्न भिन्न गुणांची आहे. तो त्यांचा देहस्वभाव असतो. जीवनांत कृत्रिमता आणि स्वभाव

असे दोन प्रकार आहेत. यांत स्वभावो मूर्ध्नि वर्तते । स्वभावच टिकाऊ आणि स्वपरहितकारक असतो. **स्वभावमन्यथाकर्तुं कः शक्तो देवनिर्मितम्** ।— निसर्गाचे नियम कोण बरें वेगळे करूं शकेल ! कृत्रिमता टिकाऊ नसते व ती परिणामीं हितकारकहि होत नाहीं. **क्षेत्रभूता भवेन्नारी बीजभूतः स्मृतः पुमान् । क्षेत्रबीजसमायोगात्संभवः सर्वप्राणिनाम्** ।। ( मनु. )—बीजप्रद पिता आहे आणि ही त्याचें आंतबाहेर संगोपन करणारी स्त्री ' क्षेत्रभूता ' आहे. गर्भधारण झाल्यानंतर नवमास गर्भधारण व स्वअन्नरसांनीं पिंडाचें पोषण स्त्री करते. नवमताच्या दयाळु हृदयाला हें स्त्रियांचें दुःख पाहणें शक्य न झाल्यामुळें यांत फरक करून, तें आजपर्यंत स्त्रियांना झालें, आतां पुढें तें पुरुषांना द्यावें म्हणून समत्वाच्या दृष्टीनें विचार करून वर्तवूं लागले, तर जसें त्यांना शक्य नाहीं, तसेंच इतर शिशुसंगोपनादिक गृहकृत्यादिक पुरुषांना देऊन द्रव्योपार्जन, रक्षणादि बाहेरचीं कृत्यें स्त्रियांना दिलीं, तर तें तितकेंच साध्य होणें शक्य नाहीं. त्यांच्यांत लिंगभेद, देहभेद, स्वभावभेद, कार्यभेद, कर्तव्यभेद आहे. भिन्न भिन्न कार्यक्षमता आहे. भिन्न हेतूनेंच त्यांची उत्पत्ति आहे. " नाना पुरुषांचे जीव । नाना स्त्रियांचे जीव । एकाचि परी देहस्वभाव । वेगळाले । ( दासबोध. १७ । २ । २०. ) बालकास वाढवी जननी । हें तो नव्हे पुरुषाचेनी । उपाधी वाढे जयाचेनि । ते हे वनिता ।। २६ ।। वीट नाहीं कंटाळा नाहीं । आलस्य नाहीं त्रास नाहीं । इतुकी माया कोठेंचि नाहीं । मातेवेगळी ।। २७ ।। नाना उपाधी वाढवूं जाणे । नाना मायेनें गोवूं जाणें । नाना प्रीति लावूं जाणे । नाना प्रपंचाची ।।२८।। पुरुषास स्त्रीचा विश्वास । स्त्रीस पुरुषाचा संतोष । परस्परें वासनेस । बांधोन टाकलें ।। २९ ।। मुळीं सूक्ष्म निर्माण झालें । पुढें स्पष्ट दिसोनि आलें । उत्पत्तीचें कार्य चाले । उभायतांकरतां ।। ३२ ।। मुळीं शिवशक्ती खरें । पुढें झालीं वधुवरें । चौऱ्यांशीं लक्ष विस्तारें । विस्तारलीं जे ।।३३।।

**पानं दुर्जनसंसर्गः पत्या च विरहोऽटनम् । स्वप्नोऽन्यगेहवासश्च नारीसंदूषणानि षट्** (मनु. ९।१३) ( १ ) मांसादि उन्मत्त अन्नाचें व मद्यादि उत्तेजक ( पेयाचें ) द्रव्याचें खानपान; ( २ ) दुर्जन ' विषयी जनां 'चा संसर्ग; जवळच्या नात्याची मंडळी सोडून तसेंच, महात्मे सोडून इतर कोणत्याहि परपुरुषाबरोबर वास; ( ३ ) पतीचा विरह; ( ४ ) इकडे तिकडे फिरणें; ( स्वतंत्रपणें एकटीनें कुठे तरी जाणें ); ( ५ ) अकालीं झोंपणें; ( ६ ) व

परगृहवास हे सहा प्रकार स्त्रियांच्या ठिकाणीं व्यभिचार-दोष निर्माण करणारे आहेत. व्यवहारावरून परिणाम ताडावा या न्यायानें हे सहाहि आतां समाजांत दिसून येतात. याचा परिणाम काय झाला आहे तो समाजानें व सरकारनें विचार करून पाहावा. 'प्रत्यक्षाला प्रमाण कशाला'! **ये दृष्टार्थास्ते तत्प्रमाणम् । ये त्वदृष्टार्थास्तेषु वैदिकशब्दानुमानम् ।** —जें प्रत्यक्ष आहे त्याला प्रत्यक्षच प्रमाण. जें दृष्टिगोचर नाहीं, त्याला मात्र वैदिक प्रमाण, अनुमान प्रमाण आहे. **कामनाम्ना किरातेन विकीर्णा मुग्धचेतसः । नार्यो नरविहङ्गानामङ्गबंधनवागुराः ॥** ( याज्ञ. उ. ११ ). **जन्मपल्वलमत्स्यानां चित्तकर्दमचारिणाम् । पुंसां दुर्वासनारज्जुर्नारी बडिशपिण्डिका ॥ १२ ॥** —एक जीवन्मुक्त सोडून सामान्यतः सर्व बाकीच्या नरपक्ष्यांना आपल्या आहारीं पाडावें म्हणून नारी नांवाचें जाल काम नांवाच्या पारध्यानें जीवन-भूमीवर पसरून ठेवलें आहे. जन्मजलाशयांत वावरणाऱ्या, चित्तकर्दमांतल्या नरमीनांना आपल्या आहारीं पाडण्याकरितां दुर्वासनेच्या दोरीला नारी नांवाचें आंमिष बांधून काम कोळी वाट पाहात असतो असें जें वर्णन केलें आहे त्यांत तथ्य आहे. या कलियुगांत तर पापप्रवर्तक दुष्ट शक्तींचा फारच सुळसुळाट असतो. हे विघ्नसंतोषी कुठे संधी मिळते म्हणून वाट पाहात असतात. कलियुगांत तर दुष्ट प्रवृत्ति अधिक म्हणून सांगितलेंहि आहे. अशा वेळीं सांथीच्या दिवसांत आपलें रक्षण केल्याप्रमाणें अधिक नियम पाळून या दिवसांत राहावयाला पाहिजे कीं नाहीं? प्रौढविवाह, सहशिक्षण, विवाह-स्वातंत्र्य, घटस्फोट, पुनर्विवाह इत्यादि कायद्यांनीं व शाळा, विश्वविद्यालयें, वसतिगृहें, कचेऱ्या, न्यायालयें यांतल्या साहचर्यानें कलियुगीन वातावरणाला आतां तर आधींच पेटलेल्या अग्नींत तूप ओतल्याप्रमाणें झालें आहे. **गौडी माध्वी तथा पैष्टी विज्ञेया विविधा सुरा । चतुर्थी स्त्री सुरा प्रोक्ता ययेदं मोहितं जगत् ॥** ( अवधूत गीता ) गोडी, माध्वी आणि पैष्टी असे दारूचे तीन प्रकार आहेत. चौथ्या प्रकारची दारू म्हणजेच प्रमदा या दारूचें इतर दारूशीं वैलक्षण्य असलेलेंहि शास्त्रकारांनीं उलगडून सांगितलें आहे. **प्रमदां दृष्ट्वा च माद्यति सुरां पीत्वा च माद्यति ।**—प्रमदा—या नांवानेंच या दारूची निशा फार मोठी आहे असें वाटतें. प्याल्यानें इतर दारू चढते, पण प्रमदा नांवाची दारू, हिला नुसते पाहिल्यानेंच चढते. '**माद्यति प्रमदां दृष्ट्वा सुरां पीत्वा च माद्यति । तस्माद्दृष्टिविषां नारीं दूरतः परिवर्जयेत् ॥** (नारद प. उ. ६।३१)

—दृष्टिक्षेपानें अथवा केवळ दर्शनानेंच आपलें विष भिनविणारी जालिम विषाची एकादी सर्पाची जात असल्याप्रमाणें ही स्त्री—जात असल्यामुळें दृष्टि-विषा नारीच्या सहवासापासून, दर्शनापासून, स्पर्शनापासून, समाजापासून दूर राहावें असें त्रिकालज्ञ शास्त्रकारांनीं निक्षून सांगितलें आहे. ही गोष्ट डावलून जातां येत नाहीं. समाजशास्त्रज्ञांनीं, नेत्यांनीं, कुटुंबियांनीं, तरुण मुलांमुलींनीं याचा विचार करावा. आपल्या दर्शन-श्रवणाच्या अनुभवानें याचें सत्यत्व आज तरी ठरविणें समाजाच्या हिताच्या दृष्टीनें अत्यंत आव-श्यक आहे. धर्माची, नीतीची, मनोभूमीची, ऐहिक-पारलौकिक स्थितीची तर गोष्ट राहूंद्याच, पण या साहचार्यानें तरुण पिढीच्या प्रकृतीवर विलक्षण परिणाम होत आहे. आरोग्याच्या दृष्टीनें, भावी पिढीच्या दृष्टीनें तरी सर्वांनाच याचा विचार आतां आवश्यक भासूं लागला आहे.

स्त्रीपुरुषांचे देह आणि मनोधर्म वेगवेगळे आहेत. याच दृष्टीनें स्त्रियांना घरची व पुरुषांना बाहेरची व्यवस्था शास्त्रकारांनीं वाटून दिली आहे. नवरा-बायको दोघेंहि नोकरीवर असतांना या नवरा-बायकोची एकाच गांवांत अथवा एक-दोन मैलांच्या अंतरावरच्या गांवांत जवळ जवळ नेमणूक न होतां यांच्या नेमणुकीनें पांच पांच सहा सहा वर्षें नुसती भेटहि न झालेल्यांचीं उदाहरणें आहेत. रजा मिळत नाहीं, सुट्टीच्या दिवसांत गरिबीमुळें तितक्या दुरून येणें होत नाहीं. स्त्रीशिक्षणाला व स्त्रीकार्यक्षमतेला उत्तेजन द्यावें म्हणून पुरुषा-पेक्षां स्त्रियांच्याच नेमणुका सर्व खात्यांतूनहि अलीकडे अधिक दिसून येत आहेत. याचा परिणाम कित्येक पुरुष निरुद्योगी होऊन घरीं राहण्यांत होत आहे. असेंच अजून अधिक प्रमाणांत झालें, तर घरची व्यवस्था पुरुषांकडे व बाहेरची व्यवस्था स्त्रियांकडे येऊन आतांपर्यंत जो स्त्रीवर्ग पोष्य होता, तो पोषकवर्ग बनून पुरुषवर्गच पोष्य बनेल. झाडलोट, सडासंमार्जन करणें, स्नानपानाकरतां पाणी भरून ठेवणें, स्वयंपाक करणें, वाढणें, उष्टीं काढणें, वस्त्रें धुणें, शिशु-संगोपन इत्यादि सर्व कार्यें पुरुषालाच करावीं लागतील. या अदला-बदलींत एकच एक नवमास गर्भ वाहण्याचें काम मात्र पूर्वीप्रमाणें स्त्रियांकडेच राहील यांत संशय नाहीं. तेंहि कांहीं प्रयत्न करून पुरुषांकडे सोपवण्याचा शोध लागला म्हणजे पूर्वींचा स्त्रीवर्गच आतां पुरुष झाला व पूर्वींचा पुरुषवर्गच आतां स्त्री झाला म्हणून म्हणतां येईल व कालमहिमेचें आश्चर्य मानतां येईल. असें झालें तरी काय पुन्हां स्त्रीपुरुषांचें पूर्ववतच झालें असें होईल. वेगळें

कांहींच न होतां घेतलेले श्रम मात्र पदरांत पडतील.

**पुमान्पुंसोऽधिके शुक्रे स्त्री भवत्यधिके स्त्रियाः । समेऽपुमान्पुंस्त्रियौ वा क्षीणेऽल्पेच विपर्ययः ॥** ( मनु. ३-४९ )—स्त्री-पुरुषांच्या रजोरेतांच्या मिश्रणानें गर्भ राहतो. गर्भ राहावयाच्या वेळीं पुरुषांच्या रेताचें प्रमाण अधिक झालें तर पुरुष होतो, व स्त्रियांच्या रजाचें प्रमाण अधिक झाल्यास स्त्री होते. अनुकूल आहारादिकाच्या आधिक्यानें रेताचें प्रमाण अधिक करून पुरुषांनीं पुरुष-संततीकरितां प्रयत्न करावा, असाहि यांतून अर्थ निघतो. स्त्री-पुरुषांच्या रजोरेतांच्या समप्रमाणानें संतती नपुंसक होते; असा याहि वरच्या श्लोकाचा अर्थ आहे. विषम म्हणजे ५।७।९।१५ या रात्रीं गर्भधारण झाल्यास कन्या होते, सम म्हणजे ६।८।१०।१२।१४।१६ या रात्रीं गर्भधारण झाल्यास पुत्र होतो, असेंहि सांगितलें आहे. खाल्लेल्या अन्नापाण्याचा रस बनतो; त्या रसापासून नंतर रक्त बनतें, रक्ता-नंतर मांस, मांसानंतर मेद, मेदानंतर चर्म, चर्मानंतर स्नायु, स्नायूनंतर अस्थि व अस्थीनंतर रेत बनतें. रज हा रक्ताचाच प्रकार आहे. रेत ही शेवटची धातु आहे. त्यामुळें रेताच्या आधिक्यानें झालेला पुरुषदेह स्त्रीदेहापेक्षां देहमनाच्या शक्तीनें अधिक प्रबळ व अधिक कार्यक्षम असतो. हें असें जाणून बाहेरचीं कामें पुरुषांना दिलीं गेलीं व स्त्रियांना घरचीं कामें दिलीं गेलीं. त्यांच्या देह-मनाच्या स्थितीनुसारच तीं कामें असल्यामुळें, घरीं बसल्याबसल्या त्यांना तीं करतां येतात. स्त्रियांचे देह जात्याच अतिकोमल व श्रमअसहिष्णु असतात, हें सर्वांनाच माहीत आहे. महिन्याची पाळीहि त्यांना असते. विटाळशीपणीं इतरांचा स्पर्श व देहमनाचे श्रम त्यांना असह्य होतात. विटाळशीपणीं झालेली कांहींची अशक्तता तर बऱ्याच दिवसांनीं भरून निघते, तर कांहींचा स्राव थांबतच नाहीं. अशा वेळीं तनुमनाचे श्रम बळजबरीनें केल्यास प्रकृती-वर परिणाम होऊन देह अशक्त बनतो. कार्यहि नीट होत नाहीं. या वेळीं देहाची तशीच मेंदूची शक्ति कमी झाल्यानें साहाजिकच कांहीं नको वाटतें. नौकरीच्या आशेनें कसेंबसें काम करण्यांत येतें. हे चार दिवस स्त्रियांना रजेचे असावेत. अशीं सर्व कारणें बाहेरच्या नौकऱ्यादिकांचे विषयीं स्त्रियांचें स्वाभाविक अपात्रत्व दर्शवितात. शिशुसंगोपनाचाहि प्रश्न तसाच. आपल्या-बरोबर त्यांना मुलें नेतां येत नाहींत. दुसऱ्यांनीं दूध पाजलेंच तर त्यांच्या मुलांना तें कमी पडतें व त्यामुळें तीं मुलें दुर्बल होतात. मुलाकरितांच आईला पान्हा फुटतो, त्या दृष्टीनेंहि हें अस्वाभाविक होतें. आईचें दूध प्यावयाला न

मिळाल्यामुळें मुलाची व मुलाला प्यावयाला न दिल्यामुळें सारखें तें पिळून टाकून टाकून आईची प्रकृति बिघडेल. निसर्गाचा नियम मोडेल. पुढची पिढीहि दुर्बळ बनेल. यानें राष्ट्राचें मोठेंच नुकसान होईल. नौकरीच्या आशेनें सर्वच घराबाहेर गेल्या तर घरीं दुसऱ्या स्त्रीचें दूध मिळणारहि नाहीं. आई गेली तिथें पायापायांत घुटमळत असणाऱ्या मुलाचें संगोपन अशी नौकरीची आई कसें करूं शकेल ! शिशुसंगोपनाच्यां दृष्टीनें आई त्या शिशूजवळ चौवीसहि तास पाहिजे. प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें या सर्वांचा विचार प्रजेनें व पुढाऱ्यांनीं केला पाहिजे.

## प्रौढविवाहाची अनिष्टता

अति प्रौढ विवाहाची पद्धतहि फार घातक आहे. **गर्भाधानं द्विजः कुर्यादृतौ प्रथम एव हि । चतुर्थदिवसादूर्ध्वं पुत्रार्थी दिवसे समे ॥** लघु-आश्वलायन स्मृतीचा हा श्लोक आहे. हा गर्भाधान प्रकरणांत आलेला आहे. या प्रकरणांतल्या ह्या पहिल्याच श्लोकांत प्रथम ऋतुमती स्त्री झाली कीं अर्थात् त्यांच्या नियमानुसार **चतुर्भिरितरैः सार्धं निंदितैकादशी त्रयोदशी च ॥** पहिल्या चार, अकरावी व तेरावी रात्र सोडून सोळा रात्रींतून उरलेल्या दहा रात्रींत, अमावास्या, पौर्णिमा, एकादशी, शिवरात्र इत्यादि पर्वकाळ व कुमुहूर्त सोडून ( पायसादि सात्त्विक आहार घेऊन ) योग्य दिनीं गर्भाधान करावें म्हणून सांगितलें आहे. यांत काय बरें तथ्य असावें ? ऋतुमती झाली कीं तिच्या ठिकाणीं कामोत्पत्ति झाली असा अर्थ होतो. **स्त्रीणामष्टगुणः कामः ।** पुरुषांपेक्षां स्त्रियांना आठपट अधिक काम असतो हें या वाक्यांवरून स्पष्ट होतें. पुरुषाचेनि अष्टगुणें । स्त्रियांस ईश्वरी देणें । ऐशा केल्या बहुत जणें । तो एक मूर्ख ॥ ( दा. २।१।४२ ) श्रीसमर्थांच्या वाङ्मयांतूनहि अशा रीतीनें याचा उल्लेख आला आहे. प्रथम ऋतुमती झाली कीं गर्भाधान करावें हें याच दृष्टीनें सांगितलें असावें. कामातिरेकानें कुठे आडमार्गीं पाऊल पडेल या शंकेनेंच असें सांगितलें नसेल कशावरून ? अशा देहस्वभावाच्यांना वीस-वीस वर्षांपर्यंत लग्न न करतां ठेवल्यास समाजांत त्या पवित्र राहतीलच असें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. आतां जें ऐकिवांत येत आहे त्यावरून मनुस्मृतीचे नेमके हे श्लोक आठवतात. **पौंश्चल्याच्चलचित्ताच्च नैस्नेह्याच्च स्वभावतः । रक्षिता यत्नतोऽपीह भर्तृष्वेता विकुर्वते ॥** ९–४५ ॥

पुरुषांच्या निकट राहण्यानें व स्पर्शानें स्त्रियांच्या ठिकाणीं कामोत्पत्ति होऊन परपुरुषावर मन जातें, स्वाभाविकपणें निग्रहशक्ति कमी असते, चित्त अधिक चंचल असतें, स्वभावतः मनश्चांचल्यामुळें त्या निस्नेह असतात हें सर्व जाणून नवरा परोपरीनें त्यांच्यावर देखरेख ठेवीत असतांहि, रक्षण करीत असतांहि अशा प्रसंगापूर्वींच वारीत असतां, कांहीं विवाहित स्त्रिया जर पतीशीं प्रतारणा करतात, तर ज्या अलीकडच्या कामोद्दीपक वातावरणांत वीस वीस पंचवीस पंचवीस वर्षांपर्यंत अविवाहित असतात त्या सर्वांविषयींच कशी खात्री देतां येईल?

**कामातुराणां न भयं न लज्जा ।** —कामातुरांना भयहि नसतें आणि लज्जाहि पण नसते असें सुभाषित आहे. अशा प्रौढ स्थितींत मग मन अनावर झालें तर मनूनें सांगितल्याप्रमाणें होत असावें. ' **नैता रूपं परीक्षन्ते नासां वयसि संस्थितिः । सुरूपं वा विरूपं वा पुमानित्येव भुञ्जते ।।** ( मनु. ९।१४ ) —विकारवशतेनें मग हा सुन्दर आहे का कुरूप; तरुण आहे का उतार वयाचा या कशाचाच त्यांच्या मनाला विचार न येतां, सुरूप असो वा कुरूप असो, एका तो पुरुष आहे या दृष्टीनेंच त्या त्यांच्याशीं रत होतात. मनुमुनी हे अतींद्रियदृष्टीचे त्रिकालज्ञ होते; त्यांनीं हें जें असें लिहून ठेवलें आहे, तसेंच आतांच्या काळीं कानांवर पडत आहे. अलीकडे याचा कांहीं निषेधच न मानण्याइतकी समाजाची स्थिति येऊन ठेपली आहे.ही स्थिति पुढच्या पिढीच्या व आतांच्या पिढीच्याहि इहपराच्या दृष्टीनें अति घातुक व अधोगतिकारक आहे. परिस्थिति आंगवळणीं पडत असल्यामुळें, दहाजण वागत असल्याप्रमाणेंच एक वर्तनक्रम बनत असल्यामुळें त्या परिस्थितींतल्या लोकांना त्याची कल्पना येत नसली तरी, त्या परिस्थितीपासून दूर राहून तिचें निरीक्षण करणाऱ्या व ती ऐकणाऱ्या पवित्र हृदयाच्या सुसंस्कृत मनुष्याला त्याच्याविषयीं फारच वाईट वाटतें. अशा अधोगतीपासून समाज वांचावा म्हणूनच केवळ तो त्या स्थितीचें पटेल अशा प्रमाणांनीं दिग्दर्शन करून दाखवितो.

### सहशिक्षणाची अनिष्टता

अलीकडे मुलींच्या शाळांत मास्तरांच्या नेमणुका व मुलांच्या शाळांत मास्तरणींच्या नेमणुका होतात म्हणून ऐकलें. कोणत्याहि कर्माचा प्रारंभींचा हेतु उत्तमच असतो. मग त्याला फांटे फुटतात. माणूस विघ्नांना बळी पडतो. असा घसरला कीं, मग त्यालाच शास्त्रीयतेचें रूप देऊन तोच एक संप्रदाय

पडतो. असें सामान्यतः बहुतेक सर्व विलक्षण मताच्या कार्यकर्त्यांचें झालेलें मत पूर्वींपासूनच आढळून येतें. चांगलें किती केलें आणि झालें तर कोणी दोष देत नाहीं. वाईट परिणाम झाला कीं मग सर्व पाठीमागें लागतात. शेवटपर्यंत टिकून राहाणें व निःस्वार्थ बुद्धीनें शास्त्रीय असेंच आचरण जनहितासाठीं करणें हे दोन सिद्धीचे मार्ग आहेत. प्राणपणानें सन्मार्गाचें रक्षण करावें. **उदये सविता रक्तो रक्तश्चास्तमने तथा । सम्पत्तौ च विपत्तौ च साधूनामेकरूपता ॥** ––उदयास्तसमयीं जसा सूर्य एकाच रक्तकांतीचा असतो त्याप्रमाणें सज्जन अनुकूल–प्रतिकूल स्थितींतहि सत्याच्या एकरूप निश्चयानें असतात. **धर्मेण निधनं श्रेयो न जयः पापकर्मणा ।**––धर्मानें मरण आलें तरी हरकत नाहीं, पण अधर्मानें जय मिळविणें नको असें त्यांच्या नसोनसीं बिंबलेलें असतें. **प्राणाघातान्निवृत्तिः परधनहरणे संयमः सत्यवाक्यम् । काले शक्त्या प्रदानं युवतिजनकथामूकभावः परेषाम् । तृष्णास्रोतोविभङ्गो गुरुषु च विनयः सर्वभूतानुकम्पा । सामान्यः सर्वशास्त्रेष्वनुपहतविधिः श्रेयसामेष पंथाः ॥** ( भर्तृहरी )––एकंदरींत कोणाच्याहि मनःप्राणादिकांना अपाय न पोहोंचविणें, न्यायानें धन संपादणें, दुसऱ्याच्या द्रव्याचें अपहरण न करणें, परधनाच्या अभिलाषेपासून मन मागें ओढणें, खरें असेल तसें बोलणें, दीनाची नड पाहून वेळींच यथाशक्ति साहाय्य करणें, परस्त्रीविषयीं मुका आणि नपुंसक असणें, तृष्णेचा त्याग करणें, गुरुजनांच्या ठिकाणीं विनय बाळगणें, सर्वभूतांच्या ठिकाणीं प्रेमभाव व दया ठेवणें, सर्व बाबतींतहि शास्त्रीय आचरणाची कास न सोडणें हा सर्वसामान्य मोक्षाचा राजमार्ग आहे.

मुलें-मुली एकत्र राहून देखील त्यांच्यांत शुद्धता असली तर तशीं तीं एकत्र राहूं नयेत म्हणून कोण म्हणेल ? तें एक तत्त्वदृष्टीच्या आर्य संस्कृतीचें स्वाभाविक लक्षणच झालें. रोग्याला औषधोपचार आणि पथ्य, अशांतलाच हा प्रकार आहे. सर्वच चांगलें झालें म्हणजे कोणालाच कोणापासून भीति नाहीं.

वीस वीस, पंचवीस पंचवीस वर्षांच्या अविवाहित मुली प्रत्येक घरांत आहेतच. एकेका घरांत तर त्यांची रांकच लागलेली असते. चांगल्या सुशील असतात. हुंड्याच्या पायीं त्यांचें लग्न झालेलें नसतें. ही हुंड्याची पद्धत एकदा राष्ट्रांतून गेली म्हणजे मुलींचीं लग्नें आपोआप लौकर लौकर होतील. हुंडा घेणाऱ्याला सक्त शिक्षा व्हावी म्हणजे ही घातुक चाल अनायासें बंद

पडेल. पाश्चात्य देशांत मुलींचें वयोमान पंचवीस–तीस वर्षांचें असतें, तीच पद्धत इथें चालू करावी म्हणून प्रयत्न चालल्याचें ऐकिवांत आहे. पाश्चिमात्य देशांत तिथल्या हवेमुळें मुली लौकर ऋतुप्राप्त होत नाहींत; सामान्य व्यवहार व स्पर्श यानें पुरुषालाहि इंद्रियवैकल्य होत नाहीं. इथे तशी स्थिति नाहीं. इथे हा उष्ण देश आहे. अलीकडची स्थिति बाघितली म्हणजे शेंकडा साठांवर अधिक मुलांमुलींना नऊदहा वर्षांपासूनच त्या भावना मनांत डोकाऊं लागतात हें त्यांच्या कृतीवरून कळून येतें. शरीराची उत्पत्ती मैथुनापासूनच झाली असल्यामुळें "**कामाचें वळलें शरीर**" इतकें ते शरीरांतून व्यापून असतें. सहासात वर्षांच्या मुलांमुलींतच आईबापांकडून व इतर माणसांकडून नवरा–बायकोच्या भावनेचें बीं विनोदाच्या भाषेंतून पेरलें जातें. या हिशोबानें हिंदुस्थानांत पूर्वीं मुलींचा विवाह आठव्या वर्षींच करून टाकीत. कुठे आडमार्गानें पाऊल पडूं नये व त्या भावनेचा परिपोष, विकार उत्पन्न होण्यापूर्वींपासूनच त्या वधुवरांच्या इतकाच मर्यादितपणें वाढत असावा म्हणूनच ही योजना होती. इतके बालविवाह होऊन देखील पूर्वींच्या लोकांची देहयष्टि नवीन पिढीच्या माणसांपेक्षां कितीतरी पटीनें सुदृढ होती. याचें कारण आज उघड आहे. फार मागें जेव्हां वैदिक परंपरा उज्ज्वल होती, तेव्हां सातआठव्या वर्षींच मुलाचें उपनयन करून त्याला गुरुगृहीं वेदाभ्यासासाठीं ठेवीत असत. आणि त्या वेळीं विनोदाच्या भाषेंतूनहि त्या मुलामुलींच्या मनांत अशा भावनेचें बीजारोपण करीत नसत.त्यामुळें सांग वेदाध्ययन होऊन गुरूनें गृहस्थाश्रमाकरितां परवानगी देईपर्यंत, पंचविसाव्या वर्षांपर्यंत त्या दिव्य व पवित्र वातावरणांत वाईट संस्कार, वाईट भावना, वाईट व्यवहार यांना वाव मिळत नसे; व तसें तें मन पवित्र राखण्याचें सामर्थ्य त्या वातावरणांत, त्या गुरूंत व त्या वेदाध्ययनांत असे. **पुराकल्पे च नारीणां मौंजीबंधनमिष्यते । अध्यापनं च वेदानां सावित्रीवचनं तथा ।। पिता पितृव्यो भ्राता वा एनामध्यापयेत्परः । स्वगृहे चैव कन्याया भैक्षचर्या विधीयते ।।**—फार पूर्वीं कुमारिकांचीं उपनयनें होत असत. वेदाध्ययन पण त्या करीत असत. गायत्रीमंत्राचा उपदेशहि पण त्यांना होई. मात्र त्या कुमारीला तिचे वडील, चुलते, भाऊ यांपैकीं कोणीतरी घरच्या घरींच शिकवीत असत. स्वगृहींच त्यांची भैक्षचर्या असे. अलीकडे सोळा-सतरा वर्षांच्या मुलींना शिकवावयाला अन्य शिक्षक असतो. शिक्षण दूषित, संस्कार दूषित त्यांतून विवाहाच्या गोष्टीहि नसतां कामाचा थैमान सारखा चाललेला असतो.

मुलांमुलींचा संपर्कहि शाळा, विश्वविद्यालयें यांतून असतो. अचकट विचकट विनोद, व्यसनी मनुष्यांचा सहवास, फिरावयाला जाणें, बागेंतल्यासारख्या ठिकाणीं एकत्र बसणें इत्यादि स्वतंत्र व्यवहार चाललेला असतो. त्यांतून या भावनेचें बीं लहानपणींच पेरलें गेलेलें असतें. धर्माचें, नीतीचें शिक्षण नाहीं, पुढचा बहुतेक समाज अशाच तऱ्हेचा व त्यांतून पाश्चात्य राष्ट्राचा आदर्श.आत तर त्याला कायद्याचीहि परवानगी. नौकरी आदींचें स्वतंत्र जीवन. **एकस्य कर्म संवीक्ष्य करोत्यन्योपि गर्हितम्** । असें चाललें आहे. **पापं कर्तुं ऋणं कर्तुं मन्यंते मानवाः सुखम् । परिणामोतिगहनो महतामपि नाशकृत्** ॥— पाप करावयाला व ऋण काढावयाला मनुष्यांना प्रथमक्षणीं फार आनंद होतो. त्याचा परिणाम पुढें काय होतो हें गहन आहे. मोठमोठ्यांच्या नाशालाहि तो कारण होतो. एवंच प्रकृत स्थिति सुधारली पाहिजे. हें सर्व मंत्र्यांकडे आहे. **अन्तःसारैरकुटिलैरच्छिद्रैः सुपरीक्षितैः । मन्त्रिभिर्धार्यते राज्यं सुस्तम्भैरिव मन्दिरम्** । (सुभाषित)—अंतःसारविचाराच्या, अकुटिल, अछिद्र, सुपरीक्षित अशा मंत्र्यांकडून, स्थिर स्तंभांकडून मंदिराचें धारण केल्या गेल्याप्रमाणें, राज्याचें धारण होतें. शीलसंवर्धन हें मुख्य आहे. **शीलं परं भूषणं** । इकडे दृष्टि ठेऊन त्यांनीं राष्ट्राचा उद्धार करावा.

**अर्धो ह वा एष आत्मनस्तस्माद्यज्जायां न विन्दते नैतावत्प्रजायते असर्वो हि तावद्भवति । अथ यथैव जायां विन्दतेऽथ प्रजायते तर्हि सर्वो भवति तथा चैतद्वेदविदो विप्रा वदन्ति यो भर्ता सैव भार्या इति** । (वाजसनीय ब्राह्मण) विवाहाची प्रवृत्ति सामान्य मनुष्याला '**देहेन सह जन्यते**' असें थोड्या अतिशयोक्तीनें म्हटलें तरी तितकें भिनून असतें असा अर्थबोध होतो. वरच्या वाजसनीय ब्राह्मणाच्या वाक्यानेंहि हा जनसामान्यांचा नैसर्गिक नियम आहे हें सिद्ध होतें. आपला अर्धा भागच असल्यामुळें जोंपर्यंत 'जाया' नसते तोंपर्यंत तो पुरुष केवळ अर्ध्या भागाच्या रूपानें अपूर्णच असतो. जायेचा लाभ होऊन संतति होते तेव्हां तो पूर्ण होतो. हें सर्व जाणलेले विप्र, जो भर्ता तोच भार्येच्या रूपानें आहे, एकाच देहाचे हे दोन पार्श्व आहेत, एका 'मी' या आत्मीय स्फूर्तीनें प्रजेकरितां स्त्रीपुरुषांचीं अशीं दोन रूपें धारण केलीं असल्यामुळें पतिपत्नींत भेद नाहीं, जो पति तीच पत्नी व जी पत्नी तोच पति, असें म्हणतात. हा याचा अर्थ. अलीकडे स्त्रिया, 'आम्हांला आतांपर्यंत

हीन लेखलें ' म्हणून म्हणतात त्याला आधार नाहीं. या वरील प्रमाणानें पति-इतक्याच महत्त्वाच्या दृष्टीनें पत्नीलाहि पूर्वी पाहात होते, हें लक्षांत येईल. **पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने । रक्षन्ति स्थाविरे पुत्राः न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥ ९।३ ॥** या वाक्यानें रागावलेल्यांनीं मनूच्या या पुढच्या श्लोकाकडे लक्ष द्यावें. **पितृभिर्भ्रातृभिश्चैताः पतिभिर्देवरैस्तथा । पूज्या भूषयितव्याश्च बहुकल्याणमीप्सुभिः ॥** ( मनु. ३–५५ ) मोठ्या समारंभानें लग्न झाल्यानंतरहि ज्याला ऐश्वर्य मिळावें म्हणून वाटतें व आपलें कल्याण व्हावें असें वाटतें त्या जनक, बंधु आदिकांनीं, पति, दीरादिकांनीं गौरवानें पाहून अन्नपानादिकांनीं व वस्त्रअलंकारादिकांनीं त्या वधूस संतुष्ट राखावें. **यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः । यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफलाः क्रियाः॥** (मनु. ३–३–५६)—ज्या कुलांत व ज्या राष्ट्रांत पिता व बंधु आदिकांकडून, पति व दीर आदिकांकडून व इतर सर्वजनांकडून स्त्रिया पवित्रतेनें, गौरवानें बघितल्या जातात, तिथे देवता प्रसन्न असतात. ज्या ठिकाणीं असें पूज्य दृष्टीनें बघितलें जात नाहीं त्या ठिकाणीं होणाऱ्या सर्व श्रौत स्मात लाकिक क्रिया विफल होतात. असा याचा अर्थ. **स्त्रीषु दुष्टासु कौंतेय जायते वर्णसंकरः ।**— स्त्री दुष्ट निघाली तर वर्णसंकर होतो. आर्यांची उच्च संस्कृति नष्ट होईल अशा भीतीनें, अमोल दागिना योग्य कालीं वापरून पुनः सुंदर पेटींत ठेवल्या-प्रमाणें, स्त्रियांना पति सुंदर अशा मर्यादेनें वागवीत असत. इतरहि मातृवर्ग म्हणून मोठ्या पूज्यतेनें व गौरवानें बघत असत. हीच परंपरा आतांहि पण चालावी.

## ब्राह्मणांना समर्थांचा उपदेश

उंच झाडांना वारा अधिक लागतो हें जाणून उच्च वर्णाच्या ब्राह्मणांनीं आपलें रक्षण करून घ्यावयाला पाहिजे. डोक्यावर पाणी घातलें कीं सर्व अंगावर पायापर्यंत पडतें. मुळाला पाणी घातलें कीं सर्व शाखोपशाखांच्या पानोपानीं जाऊन पोंहोचतें. हें जाणून ब्राह्मणांनीं व समाजानें आपलें रक्षण करावें. अलीकडच्या इतक्या अधोगतीच्या काळाला ब्राह्मणांची अधोगतीच कारणीभूत झाली आहे हें विसरून भागत नाहीं. संस्कृति नष्ट होऊं नये म्हणून जसें आर्यांनीं स्त्रियांचें रक्षण केलें त्याप्रमाणें नियम घालून देऊन ब्राह्म-णांचेंहि रक्षण केलें.

" ब्राह्मणीं योग याग व्रतें दानें। ब्राह्मणीं सकळ तीर्थाटणें ॥ कर्ममार्ग ब्राह्मणाविणें। होणार नाहीं ॥ " ( दासबोध ५-१-११ ). आतां असें कांहीं नाहीं. कोणत्या वर्णाचीहि वधू जशी केली जाते त्याप्रमाणेंच कोणत्याहि वर्णांतून आतां ब्राह्मण व्हावयाला लागले आहेत. " सकळांसी पूज्य ब्राह्मण। हें मुख्य वेदाज्ञा प्रमाण ॥ वेदविरहित तें अप्रमाण। अप्रिये भगवंता ॥१०॥ ब्राह्मण वेद मूर्तिमंत। ब्राह्मण तोचि भगवंत ॥ पूर्ण होती मनोरथ। प्रियवाक्यें करूनी ॥ १२ ॥ ब्राह्मणपूजनें शुद्धवृत्ति। होवोनि जडे भगवंतीं ॥ ब्राह्मणतीर्थें उत्तम गती। पावती प्राणी ॥ १३ ॥ असो जे हरिहरदास। तयांस ब्राह्मणीं विश्वास ॥ ब्राह्मणभजनें बहुतांस। पावन केलें ॥ १४ ॥" समर्थांनीं काय इतरत्र काय ब्राह्मणाचें वर्णन किती केलें आहे. अलीकडच्या ब्राह्मणांनीं या कीर्तीला योग्य व्हावयाला नको काय? " आधीं राखावा आचार। मग पाहावा विचार ॥ आचारविचारें पैलपार। पाविजे तो ॥ ( दा. बो. १७-१०-१५ ) हें लक्षांत ठेवावयाला नको का? **अग्रतश्चतुरो वेदान् पृष्ठतः सशरं धनुः। इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि ॥** अशी ही स्थिति असती तर ब्राह्मणांची हल्लींची दैना झाली असती का? अग्नीला चेष्टेनें कोण शिवेल? शिवेल त्याला त्याच्या तेजस्वितेची जाणीव होणार नाहीं का? " हें सर्व आपणांचिपाशीं " असें यानें नाहीं का सिद्ध होत? " अंतर्निष्ठ तितुके तरले। अंतरभ्रष्ट तितुके बुडाले ॥ " असें अजूनहि नाहीं का दिसून येत? " बाह्याकारें भरंगळले। लोकाचारें ॥" ब्राह्मणांच्या ठिकाणींहि असें कां दिसून यावें? " देह परमार्थीं लाविलें। तरीच याचें सार्थक झालें। नाहींतरी हें व्यर्थचि गेलें। नाना आघातें मृत्युपंथें ॥ " ( दा. बो. १-१०-११ ) हें खोटें का? " बहुत जनासी चालवी। नाना मंडळें हालवी ॥ ऐसी हे समर्थ पदवी। विवेकें होतें ॥ (दा.बो.१८-१०-४६) हें खरें ना? "हें सर्वहि आपणांचिपाशीं। येथें बोल नाहीं जनांसी। आपण वचनें बोलावीं जैसीं। तैसीं येती पडसादें ॥" हें अजून कां पटूं नये? "तया देहामध्यें नरदेहो। त्या नरदेहांत ब्राह्मणदेहो॥ तया ब्राह्मणदेहासी पाहो। अधिकार वेदीं ॥ " ( दा. बो. १०-२-१७ ) देवानें दिलें आणि कर्मानें नेलें असें कां होऊं द्यावें? "जेथें षट्कर्में चालती। विध्युक्त-क्रिया आचरती ॥ वाग्माधुर्यें बोलती। प्राणिमात्रासी ॥ ( दा. बो. १४-७-५) सर्व प्रकारें नेमक। शास्त्रोक्त करणें कांहीं एक ॥ त्यांहीमध्यें अलौलिक। तो हा भक्तिमार्ग ॥ ६ ॥ पुरश्चरणी कायाक्लेशी। दृढव्रती परमसायासी। जगदीशा-

वेगळें जयासी । थोर नाहीं ॥७॥ कायावाचा जीवेंप्राणें । कष्टे भगवंताकारणें ॥ मनें घेतलें धरणें ॥ भजनमार्गीं ॥ ८ ॥ अंतरापासूनि वैराग्य । तेंचि जाणावें महद्भाग्य ॥ लोलंगतेएवढें अभाग्य । आणीक नाहीं ॥ १० ॥ ऐसी वृत्ति उदासीन । त्याहीवरी विशेष आत्मज्ञान ॥ दर्शनमात्रें समाधान । पावती लोक ॥ १३ ॥ बहुतांस करी उपाये । तो जनाच्या वांट्या न ये ॥ अखंड जयाचें हृदये । भगवद्रूप ॥ १४ ॥" असें असायला पाहिजे कीं नाहीं? "नीच प्राणी गुरुत्व पावला । तेथें आचाराचि बुडाला ॥ वेदशास्त्र ब्राह्मणाला । कोण पुसे ॥ २९ ॥" असें हें आतां झालें आहे खरें, पण हें "ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ॥ गुरुत्व सांडूनि झाले । शिष्य शिष्यांचे ॥ ३१ ॥" असें झाल्यामुळेंच ना? आतांच्या बहुजन ब्राह्मणांची स्थिती बघितली म्हणजे इतकें झालें तरी अजून "हें ब्राह्मणांस कळेना । त्यांची वृत्तीच वळेना ॥ मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥ ३५ ॥" असें आढळून आल्यानंतर कोणाच्या अंतःकरणाला पीळ पडणार नाहीं? "आतांचे ब्राह्मणीं काय केलें । अन्न मिळेना ऐसें झालें ॥ तुम्हां बहुतांच्या प्रचीतीस आलें । किंवा नाहीं ॥ ३९ ॥ बरें ऐसा प्रसंग झाला तो होऊन गेला । आतां तरी ब्राह्मणीं आपणाला । शाहणें करावें ॥ १४-८-१ ॥ देव पुजावा विमळहस्तीं । तेणें भाग्य पाविजेल समस्तीं । मूर्ख अभक्त व्यस्तीं । दरिद्र भोगिजे ॥ २ ॥ जगदांतरें वोळला धणी । किती एकवटील प्राणी ॥ परी ते वोळयाची करणी । आपणापासी ॥ १४ ॥ सर्व साभिमान सांडावा । प्रत्ययें विवेक मांडावा । माया पूर्वपक्ष खंडावा । विवेकबळें ॥ ४९ ॥ करिती ब्रह्म निरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण । तेचि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ॥ (६-४-२४) असें ब्राह्मण सर्वांनीं व्हावें.

## वेदशास्त्राध्ययनाचें महत्त्व

**वेदविद्द्विजहस्तेन सेवां संगृह्यते यदि । न तस्य वर्धते धर्मः श्रीरायुः क्षीयते ध्रुवम् ॥** (लघु अश्वलायन स्मृ. २२।१७) वेदज्ञ ब्राह्मणाच्या हातून जर कोणी सेवा घेईल तर धर्माचरणानें मिळविलेलें पुण्यं नष्ट होतें, धर्मबुद्धि खुंटते, आयुष्य आणि संपत्ति निश्चयानें क्षीण होते. **यस्य कस्य नरो यस्तु व्रते निष्ठुरभाषणम् । द्विजस्येह विशेषं च स च गच्छेदधोगतिं ॥ १८ ॥** —कोणीहि आपलें व्रत पाळतांना विशेषतः व्रतस्थ ब्राह्मणाला जो

निष्ठुर बोलतो तो अधोगतीला जातो. **कुरुते योऽपमानं च ब्राह्मणस्य विशेषतः । तस्याऽऽयुः क्षीयते नूनमायुलक्ष्मीश्च संततिः ॥१९॥**—अपमान हा कोणाचाहि करूं नये. त्यांतून ब्राह्मणांचा अपमान तर फारच जांचतो. अपमान करणाऱ्याचें आयुष्य, संपत्ति आणि संतति नष्ट होते. ब्राह्मणहि स्वधर्मानें राहावयाला पाहिजेत, कर्मनिष्ठ पाहिजेत. **यश्च कर्मपरित्यागी पराधीनस्तथैव च। अधीतोऽपि द्विजश्चैव स च शूद्रसमो भवेत् ॥ २२ ॥** —जो आपलें धर्मकर्म सोडून नोकरी इत्यादिकांनीं पराधीन होतो, जरी त्यानें वेदाध्ययन केलें असलें तरी त्या सेवाधर्मानें, ( सेवा शूद्रांना सांगितली असल्यामुळें ) तो शूद्रवत् होतो. **अनधीत्य द्विजो वेदानन्यत्र कुरुते श्रमम् । स जीवन्नेव शूद्रत्वमाशु गच्छति सान्वयः ॥ २३ ॥** —स्नान करून वेदांचा अभ्यास न करतां आतां होतें त्याप्रमाणें ' CAT कॅट ' म्हणून पाठ करूं लागला किंवा चांगल्या वैद्यकाचा अभ्यास करतों म्हणून तो माणसांचीं हाडें गोळा करून बसला किंवा रसायनादि दुसऱ्या कोणत्याहि आंग्ल विद्यांच्या अभ्यासाला लागला म्हणजे तो शूद्राप्रमाणें होतो. आचार विचार कांहीं राहात नाहीं. आणि आतां झालेली स्थिति होते. **प्रत्यूषे च प्रदोषे च यदधीयेत ब्राह्मणः । तेन राष्ट्रं च राज्यं च वर्धते ब्रह्मवर्चसा ॥** ( शंखलिखित स्मृति २१ ) —प्रातःकालीं व प्रदोषकालीं ब्राह्मण अध्ययन करील तर त्यामुळें ब्रह्मवर्चस्वानें तें राष्ट्र व तें राज्य वृद्धिंगत होतें. **अग्रं वृक्षस्य राजानो मूलं वृक्षस्य ब्राह्मणाः । तस्मान्मूलं न हिंसीयान्मूलादग्रं प्ररोहति ॥२२॥**—राष्ट्रवृक्षाचें मूळ ब्राह्मशक्ति व क्षात्रशक्ति हा शेंडा आहे. मूळ उपटूं नये. मूळ असल्यामुळेंच शेंड्याचा विस्तार होतो. **फलं वृक्षस्य राजानः पुष्पं वृक्षस्य ब्राह्मणाः । तस्मात्पुष्पं न हिंसीयात्पुष्पात्संजायते फलम् ॥२३॥** —या राष्ट्रतरूचें फळरूप राजशासन आहे व पुष्परूप ब्राह्मशक्ति आहे. पुष्प नासेल असें करूं नये,पुष्पामुळेंच फळ होतें.**गावो भूमिः कलत्रं च ब्रह्मस्वहरणं तथा। यस्तु न त्रायते राजा तमाहुर्ब्रह्मघातकम्॥२४॥** —जो राज्यकर्ता ब्राह्मणांच्या गाईचें, जमिनीचें, मुलाबाळांचें, संपत्तीचें रक्षण करीत नाहीं त्याला ब्रह्महत्त्या लागते. अलीकडे वेदविद्येनें चरितार्थ चालत नाहीं म्हणून वैदिक शास्त्री मंडळी इंग्लिश शिकावयाला घालतात आणि मग धर्माच्या दृष्टीनें मुलगा हातचा गेला म्हणून चरफडतात. शेंडीला चाट मिळते. सलत असलेलें जानवें फेंकून देण्यांत येतें. क्रॉपचा पगडा डोक्यावर बसतो. सरळ ' आंग्ल संस्कृतीला मी आतां डोक्यावरच धारण केलें आहे ' म्हणून

प्रत्यक्ष तो दाखवितो. आपल्या आईबापांना वेड्यांत काढतो. ते परदेशी शब्द तोंडांत बसले म्हणजे वेदाध्ययन तोंडाला लागत नाहीं. वृत्ति निराळी बनते. वैदिकांचा अथवा शास्त्र्यांचा मुलगा म्हणून कोणी परिचय करून दिल्यासच ओळखूं येतो, अशीं त्यांचीं चिन्हें. तें ब्रह्मवर्चस्व पुढें त्यांच्या तोंडावर दिसूनच येत नाहीं. याला अपवादाचीं मुलें फार थोडीं. ब्राह्मणांनीं शेंडी कां ठेवावी, जानवें कां घालावें याच्याबद्दल आपण थोडा पुढें विचार करणारच आहोंत.

प्रस्तुत परकीय विद्या शिकली तरी ती ऐहिक जीवनापुरतीच असते. मरणोत्तर त्या विद्येचा कांहीं उपयोग होत नाहीं. धर्म हा ऐहिक पारलौकिक सुखाकरितां आहे. धर्माचरणाच्या मनुष्याला परमात्म्याचें साहाय्य लाभतें. धर्म हा परमात्मप्रणीत आहे. धर्माप्रमाणें वागणें म्हणचे परमात्म्याच्याच आज्ञा पाळणें होय. धर्मत्यागानें मनुष्य देवद्रोही बनतो. धर्माचे नियम पाळले नाहींत म्हणजे धर्मत्याग घडतो. हा वैदिकधर्म ईशप्रणीत आहे हें जरी एखाद्या वेळीं पटलें नाहीं तरी या धर्माविषयीं उद्धृत केलेल्या परकीयांच्या उताऱ्यांनीं तरी याचें महत्त्व समजून येऊन त्याच्या त्यागानें आपला विश्वमान्य धर्मच अजाणपणानें त्यागला जातो हें कळून येऊन आपल्या धर्माचीं चिन्हें तेजस्वितेनें तरुण वर्ग जर वाळगील तर तें त्याच्या आर्यकुलोत्पन्नतेला साजेलसें होईल हा इथें सांगण्याचा अभिप्राय आहे. आज वेदविद्येला मान्यता नाहीं म्हणण्यापेक्षां फार कमी आहे असें म्हणतां येईल. चरितार्थाचा प्रश्न हा कोणापुढेंहि उभा राहिल्याशिवाय राहात नाहीं. तेव्हां आईबापांनीं आंग्ल विद्येकडे घातलें तरी मुलांबाळांतली धर्मश्रद्धा नाहींशी व्हावी म्हणून घातलेलें नसतें. या दृष्टीनें चरितार्थाकरितां अथवा ज्ञानाकरितां परकीय विज्ञानशास्त्रांचा अभ्यास केला तरी आपली विश्वश्रेष्ठ संस्कृति विसरूं नये कीं सोडूं नये. मनु मुनी हे त्रिकालज्ञ होते. पुढें परकीयांच्या स्वार्थाला बळी पडून भारतीय लोक श्रेष्ठ आर्य संस्कृति घालवून बसतील, परकी भाषेनेंच परकीय संस्कार नाहीं म्हटलें तरी शिरतात; सर्व शास्त्रांच्या अध्ययनापूर्वीं भाषेचेंच अध्यनन व्हावयास लागतें, दुसरी भाषाच शिकूं नये म्हणून नियम घालून दिल्यास, परदेशांतच जाऊं नये म्हणून नियम घालून दिल्यास दुसऱ्या संस्कृतीचा पगडा आर्यांवर बसून वैदिक संस्कृति नष्ट होणार नाहीं म्हणूनच केवळ त्यांना निषिद्ध म्हणून मनुमुनींनीं ठरविलें असावें, हें आतांच्या परिस्थितीवरून ताडतां येते. त्या ऋषिमुनींच्या त्रिकालज्ञतेविषयीं धन्यवाद द्यावेसे वाटतात. मेकॉलेनें १८५७ सालच्या

बंडाचीं कारणें शोधून हिंदूंना आपल्या धर्माचा अभिमान अधिक आहे आणि तो घालविल्याशिवाय आपलें राज्य स्थिर होणार नाहीं हें जाणलें. नौकरीच्या आशेनें आपल्या भाषेचा अभ्यास ते अधिक करतील, आपल्या शास्त्रांचा अभ्यास करतील व त्या अभ्यासांत त्यांना धर्मकर्म आचरण्यास वेळ मिळणार नाहीं, तें सुटून इकडचाच अभ्यास झाला म्हणजे त्यांची धर्मश्रद्धा मलीन होत होत अभ्यासानें हेंच गोड वाटूं लागेल व ती हातची जाईल, असा घाट घालून याच अर्थाचें व्हिक्टोरिया राणीला पाठविलेलें पत्र उपलब्ध होऊन बरेच दिवस झाले.

यामुळें आमच्या ऋषिमुनींनीं केलेला प्रयत्न व मेकॉलेनें केलेला प्रयत्न दोन्हीहि डोळ्यापुढें उभे राहातात. त्यापूर्वी मुसलमानांच्या पातशाहींतहि असेंच झालें. राजसत्तेला तोंड देऊन वागण्याचें धैर्य सर्वांनाच नसतें व प्रत्यक्ष राजसत्तेपुढें जीवनाच्या दृष्टीनेंहि सर्वसामान्यांना मान वांकवावीच लागते. राजसत्तेच्या माणसांनीं आपल्या धर्माची, आपल्या मताची दीक्षा घ्यावी असें स्वाभाविकच असतें. या दृष्टीनें राजसत्तेचा सर्वसामान्यांवर परिणाम होतो. चांगलें असो अगर वाईट असो एकदां सुटलें म्हणजे सुटलें. आणि या धार्मिक नियमांचें व संस्कारांचें अगदीं असें आहे. एकदां प्रातःस्नान सोडलें म्हणजे पुन्हां करूं नयेसेंच वाटतें. प्रथम प्रथम आपण संध्या करावयाची सोडली हें बरें केलें नाहीं म्हणून मनांत येतें. केली असती पण अभ्यास राहातो, वेळ मिळत नाहीं ना म्हणून तात्पुरत्या समाधानाच्या वृत्ति उठतात. इकडचे असे संस्कार मलीन होत होत मावळतात व तिकडच्या संस्काराचीं रोज नवीन पुटें चढतात व शेवटीं 'आमचे पूर्वज मूर्ख होते, मागासलेल्या माणसांची आर्य संस्कृति आहे, भोळ्याभाबड्या लोकांच्या केवळ भावना म्हणजेच त्यांतले आचारविचार, वर्ण-आश्रम इत्यादिक म्हणजे संकुचित बुद्धि आहे, सोंवळें ओवळें म्हणजे भाबड्या आजीनें आचरावयाचे नियम होत,' असें म्हणण्यापर्यंत पाळी येते. **स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः** । हें गीतेचें वाक्य विसरून गेल्याला बरींच वर्षें लोटलेलीं असतात. **योहि मोहाद्विषं पीत्वा नावगच्छति दुर्मतिः । स तस्य परिणामान्ते जानीते कर्मणः फलम्** । ( वा. रा. उ. कां. स. १५-२० ) पाश्चात्य राष्ट्रें जीवनाच्या इतिकर्तव्यतेच्या व नितांत शांतीच्या, खऱ्या सुखाच्या शोधांत आणि प्रयोगांत आहेत. तर भारत हें राष्ट्र त्याच्या निश्चयानें त्याच्या अचूक साधनांत व्यापृत आहे हें मात्र पक्कें सर्वांनीं लक्षांत ठेवावें.

वेदशास्त्राध्ययनाच्या महत्त्वाचे कांहीं श्लोक खालीं देतों. **वेदशास्त्रार्थतत्त्वज्ञो यत्र तत्राश्रमे वसन् । इहैव लोके तिष्ठन्स ब्रह्मभूयाय कल्पते ॥** ( मनु. १२–१०२ ) **अज्ञेभ्यो ग्रन्थिनः श्रेष्ठा ग्रंथिभ्यो धारिणो वराः । धारिभ्यो ज्ञानिनः श्रेष्ठा ज्ञानिभ्यो व्यवसायिनः ॥१०३॥**—वेदशास्त्रार्थतत्त्वज्ञ कुठेहि कोणच्या आश्रमांत असला तरी याच जन्मीं इथेच ब्रह्मरूप होतो. वेदाध्ययन न केलेल्यापेक्षां अध्ययन केलेला श्रेष्ठ, नुसतें तोंडपाठ केलेल्यापेक्षां अर्थाच्या अनुसंधानानें त्या धारणेंत आणि त्या आचरणांत असलेले श्रेष्ठ व त्यांच्यापेक्षांहि तीं तत्त्वें अंगीं मुरवून असलेले आत्मसाक्षात्कारी ज्ञानी श्रेष्ठ असा हा ब्राह्मणाच्याहि योग्यतेचा तरतमभाव आहे. **तपो विद्या च विप्रस्य निःश्रेयसकरं परम् ॥ तपसा किल्विषं हन्ति विद्ययाऽमृतमश्नुते ॥**—ब्राह्मणधर्माचें पालनच एक तप आहे. आश्रमविहित कर्म आणि आत्मज्ञान हीं दोन्ही ब्राह्मणांचीं मोक्षसाधनें होत. या ठिकाणीं ईशावास्याच्या **विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभय ँ सह । अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते** । या मंत्राची आठवण होतें. **वेदस्वीकरणं पूर्वं विचारोऽभ्यसनं जपः । तद्दानं चैव शिष्येभ्यो वेदाभ्यासो हि पंचधा** । ( दक्ष. स्मृ. २–३४ ) —वेदाध्ययनाचे, ब्रह्मचर्याचे नियम पाळून, गुरुसेवेंत राहून गुरुमुखानें प्रथम वेदपठण करणें, त्यांच्या निगूढ प्रमेयांवर खोल विचार करणें, तीं अनुभवांत उतरण्याकरितां त्यांचा मन लावून अभ्यास करणें, त्यांचा सारखा निदिध्यास ठेवणें आणि वेद विसरूं नयेत म्हणून पुनः पुनः त्यांचें आवर्तन करणें, तत्त्वज्ञानाच्या सिद्धिकारितां इष्टदेवतेचा जप करणें, शिष्यांना सरहस्य वेद शिकविणें असा हा मुख्य पांच प्रकारचा वेदाभ्यास आहे. **लक्षं तु वेदाश्चत्वारो लक्षं भारतमेव च** । उपलब्ध ऋग्यज्जुसामथर्व या चार वेदांच्या ऋचांची एकलक्ष संख्या आहे. **बिभर्ति सर्वभूतानि वेदशास्त्रं सनातनम् । तस्मादेतत्परं मन्ये यज्जन्तोरस्य साधनम्** ॥ ( मनु. १२–२९ )

वेदशात्रें हीं सर्व भूतांना धारण करणारीं व इहपर जीवनांत अचूक मार्गदर्शन करणारीं असल्यामुळें यांचा अभ्यास नेमून दिलेल्या ब्राह्मणांना तर हीं त्यांच्या अभ्युदय–निःश्रेयसाचीं एकमेव साधनें होत असें निश्चित मत आहे म्हणून मनूनें कळविलें आहे. **सुखाभ्युदयिकं चैव नैःश्रेयसिकमेव च । प्रवृत्तं च निवृत्तं च द्विविधं कर्म वैदिकम्** ॥ ( मनु. १२ )—संसारसाधक प्रवृत्तीचें व मोक्षसाधक निवृत्तीचें असें द्विविध वैदिक कर्म आहे. वेद हा ऐहिक

तशीं आत्मीय सुखाचीं साधनें सांगतो. त्यामुळें याहून इहपर साधनांकरितां अन्य विद्यांचा आश्रय करावा लागत नाहीं. त्यांतून तो परमात्म्यापासूनच उत्पन्न झालेला आहे. असें झालें तर मग कांहीं बोलण्याचीच आवश्यकता नाहीं. त्यांच्या अध्ययन–अध्यापनादि साधनांत ब्राह्मणांनीं राहाण्याचाच निश्चय केला तर " **योगक्षेमं वहाम्यहम्** " या वचनाप्रमाणें ब्राह्मणाला कांहीं कमी पडणार नाहीं हें तितकेंच खरें. **स्वकं कर्म परित्यज्य यदन्यत्कुरुते द्विजः । अज्ञानादथवा लोभात्स तेन पतितो भवेत् ।।** (दक्षस्मृति २।३)—आपलें कर्म सोडून जें म्हणून दुसरें कांहीं अज्ञानानें अथवा मोहानें करतो त्यामुळेंच तो ब्राह्मण पतित होतो. आतांच्या काळची हीच परिस्थिति दिसून येते. सुधारकांचेहि ब्राह्मणच पुढारी आहेत. पण अशा स्थितींत त्यांना तें ब्राह्मणत्वच जड जातें व ब्राह्मण म्हणवून घेण्याचाहि तिटकारा वाटतो. पातित्यानें ते इतक्या थराला पोहोंचतात.

## संध्या–मुक्तिदायक ब्रह्मविद्याच

**सा विद्या परमा मुक्तेर्हेतुभूता सनातनी । त्वमेव संध्या सावित्री त्वं देवि जननी वशा ।।**—मुक्ति देणारी ब्रह्मविद्याच संध्या आहे. अलीकडच्या तरुणांना गायत्री मंत्र मुंजीच्या वेळीं वडिलांनीं सांगितला होता याची आठवणहि विसरलेली असते; तर मग गायत्री मंत्राची आठवण कशी राहाणार ? गायत्री मंत्राचीच ही स्थिति तर मग त्या लांबलचक संध्येविषयीं कांहीं बोलावयालाच नको. कित्येकांना संध्या पाठ असते, करावीशीहि वाटते पण बरोबरचे विद्यार्थी हंसतात म्हणूनच केवळ करण्याचें ते टाकून देतात. **अहरहः संध्यामुपासीत ।**—न सोडतां प्रतिदिवशीं संध्या केलीच पाहिजे अशी वेदाज्ञा आहे. **यो न संध्यामुपासीत ब्राह्मणो हि विशेषतः । स जीवन्नेव शूद्रस्तु मृतः श्वा चैव जायते ।।** ( दक्ष. २।२६ ) जो संध्योपासना करीत नाहीं तो ब्राह्मण इथे जिवंत असतांना शूद्राप्रमाणें होतो. अगदींच खानपानांत नियम न ठेवतां वागला तर शूद्रच होतो व मेल्यानंतर कुत्र्याच्या जन्माला जातो. असा याचा अर्थ होतो. अशी कोणाची स्थिति होऊं नये व असला जन्महि कोणाला येऊं नये व सर्वांना संध्या करण्याची बुद्धि होवो अशी देवाला प्रार्थना आहे.

**संध्याहीनोऽशुचिर्नित्यमनर्हः सर्वकर्मसु । यदन्यत्कुरुते कर्म न तस्य फलभाग्भवेत् ।।**— संध्याहीन अपवित्र असतो. संध्या न करतां कांहीं

केलें तरी निष्फळ होतें. **अकरणान्मंदकरणं श्रेयः ।**—अगदींच कांहीं न केल्यापेक्षां थोडी तरी करणें श्रेयस्कर होतें म्हणून कर्मींत कमी दोनदां आचमन, केशवादि चोवीस नांवें, तीन अर्घ्यें, दहा गायत्री एवढें तरी करावें. थोडक्यांत गायत्रीचा विचार करूं. **गायत्री छंदसामहं ।**—वेदामध्यें गायत्री रूपानें मीच आहें. **गायत्री वा इदं सर्वं भूतं यदिदं किंच वाग्वै गायत्री वाग्वा इदं सर्वं भूतं गायाति त्रायते च ॥** ( छां. ३।१२।१ )– हें जें सर्व कांहीं आहे ते स्थावरजंगमात्मक सर्व कांहीं जग गायत्रीच आहे. परमात्म्याची वाणी म्हणजे वेद. ते वेद गायत्रीरूप आहेत. त्या वेदांनींच हें सर्व झालें असल्यामुळें हें सर्व वेदरूप, गायत्रीरूपच आहें. जो इचें गायन करतो म्हणजे जप करतो त्याला या गर्भजननमरणादि संसारापासून गायत्री तारते. **गायन्तं त्रायसे यस्माद्गायत्री त्वं ततः स्मृता ।**—गाणाऱ्याला, जप करणाऱ्याला तूं तारतेस म्हणून तूं गायत्री म्हणवून घेतेस. हा गायत्रीचा जप जरी केला तरी समग्र वेदाध्ययनाचें ब्राह्मणाला फळ मिळतें. **गायत्री छंदसां माता । वेदानां माता भुवनस्य नाभिः ।**— गायत्री जगत्कारण वेदाची माता व अखिल चराचर विश्वाचें जीवन, मुख्याधाररूप परब्रह्म होय. **ॐ मित्येतदक्षरमिदं सर्वं ।** या मांडुक्योपनिषदाच्या —' जें हें आहे तें सर्व प्रणवरूपच आहे ' या मंत्राची इथे आठवण होते. प्रणवरूपच गायत्री आहे असा यांतून अर्थ निघतो. **सर्वं ह्येतद्ब्रह्म ।**—हें सर्वहि ब्रह्मच आहे. **अयमात्मा ब्रह्म ।**—हा आत्माच ब्रह्म होय. **परं चापरं च ब्रह्म यदोंकारः ।**—ओंकार म्हणजे प्रणवच, परपार ब्रह्म आहे. प्रणव हा निर्गुण, निराकार रूप व परब्रह्माची एक संज्ञा आहे. **ॐ भूः भूवः स्वः।** तें ॐकार वाच्य परब्रह्म सच्चिदानंदरूप आहे. ( **भवतीति भूः सत् भावयतीति भुवः चित् स्वर्यते स्तूयते इति स्वः आनंदः ।** ) तत् तें प्रणव वाच्य सच्चिदानंदरूपच. **सविता तस्य सवितुः ।**–हा सविता आहे. त्याच्या रूपाचें आम्ही ध्यान करतों. **सूयते अनेनेति सविता ।**–ज्याच्याकडून या चराचर विश्वाची उत्पत्ति, स्थिति, लय हीं कार्यें होतात तोच हा सविता. या ठिकाणीं **यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति । यत् प्रयन्त्यभिसंविशन्ति तत्–ब्रह्मेति॥** या तैत्तिरीय शाखेच्या यजुर्वेद मंत्राची आठवण होते. जगत्कारण सच्चिदानंदरूपी तो सविता असला तर असेना का ? त्याचें कां ध्यान करावें म्हणून आक्षेपिल्यास " **वरेण्यं** " तें या चराचर विश्वाच्या संपूर्ण एकवटलेल्या

सुखाहून श्रेष्ठ आहे व श्रेष्ठ असल्यामुळेंच " **वरणीयम्** " "**आश्रयणीयम्**" तें आश्रयणीय आहे. इथे **एतावानस्य महिमा अतोज्यायांश्च पूरुषः** ।—या पुरुषसूक्ताच्या ऋचेची आठवण होते. तें सवितृरूप, सच्चिदानंदरूप, परमश्रेष्ठ, परम आश्रयणीय म्हणून सांगतां, त्याच्या आश्रयानें तें मोठें असलें तर त्या पुरतें असणार, आम्हांला त्यापासून काय लाभ, असा प्रश्न केल्यास "**भर्गः** " " **भर्जतीति भर्गः** " असें त्याचें उत्तर पुढच्या पदानें दिलें आहे. " **एकमेवाद्वितीयम् ब्रह्म** । "—ब्रह्म हें अद्वितीय असल्यामुळें तेंच हें तुझ्यासकट या चराचर विश्वाचें सत्यरूप असून देखील तूं "**अहं ब्रह्मास्मि**" मीच तें ब्रह्म आहे अशी स्वाभाविक भावना न करतां ज्या अज्ञानाच्या हेतूनें तूं स्वतःला " **देहोऽहं** " म्हणून मानतोस त्या अज्ञानाला व त्या अज्ञानाच्या कार्याला तें सवितृरूप परब्रह्म जाळून टाकतें आणि तुझ्या सत्य रूपानेंच तें उरतें. " **तत्त्वमसि** " तेंच तूं आहेस म्हणून तुला श्रुति सांगत आहे. स्वयंप्रकाश स्वरूप अद्वितीयच असतें. अद्वितीय वस्तु आपल्याच एक केवल सत्तेनें असते. जो आनंद आपल्या अद्वितीय सत्तेनें व जाणीवेनें स्वमात्र आहे त्यांत अन्य कशालाहि मुळीं वावच मिळत नाहीं. आम्हांला जर त्या स्वरूपाची प्राप्ति त्याच्या ध्यानानें होत असेल आणि त्यामुळें आमच्या पाठीमागें लागलेला दुःखरूप संसार जर कायमचा नष्ट होत असेल व आम्हीं त्या केवल आनंदमात्रतेनें शिल्लक राहात असूं तर अवश्य आम्हीं त्या " **देवस्य** " देवाचें " **धीमहि** " ध्यान करतों. " **दीव्यते प्रकाशत इति देवः** "—स्वयं आपल्या तेजानें जें प्रकाशत असतें त्यालाच देव जर म्हणतात तर तें " **नः धियः** " आमच्या बुद्धीला "**प्रचोदयात्**" स्वरूपज्ञानाविषयीं, स्वरूपाच्या आनंदप्राप्तीविषयीं प्रेरीत, आमच्या या आपल्या " मी " या भानांत तें आपल्या सच्चिदानंदरूपानें प्रकट होवो. असा या गायत्रीचा अर्थ आहे. ब्राह्मणाला अशा गायत्रीची मुख्य उपासना ब्रह्मप्राप्तीकरितां कर्तव्य आहे. वैदिक मंत्राचें ब्राह्मणाला व तदर्थक व इतर पौराणिक अन्य मंत्रांचें इतरांना अनुष्ठान सांगितलें आहे. सर्व मंत्रांचा 'सोऽहं' पर–'तेंच मी एक अखंड सच्चिदानंदरूप परमात्मस्वरूप' हाच – अर्थ आहे व प्रत्येक प्राणिपदार्थ हा तद्रूप आहे. ब्राह्मणानें अशा अनुसंधानानें गायत्री करावी व इतरांनीं इतर मंत्रांचें अनुष्ठान करावें. हजार गांठी असल्या तरी मुद्दा एकच.

## ब्राह्मणांचा आचारधर्म

**स्नान संध्या जपो होमः स्वाध्यायाभ्यसनं तथा । माध्यान्हिकी क्रिया पंचयज्ञाद्यतिथिपूजनम् । दानशिष्टप्रतिग्राहौ पोष्यवर्गैः सहाशनम् । सत्कथाश्रवणं सायंसंध्या होमादिकं च हि । शयनं च यथाकाले धर्मपत्न्या सह गृही । यजनं याजनं चैव वेदस्याध्ययनं च हि । अध्यापनं तथा दानं प्रतिग्रहमिहोच्यते । एतानि ब्राह्मणः कुर्यात् षट्कर्माणि दिने दिने ॥** ( लघु. आ. स्मृ. १।७ ) असाच क्रम समर्थांनीं दिला आहे. ( दा. बो. द. ११ स. ३ )

प्रातःकाळीं उठावें । कांहीं पाठांतर करावें ॥ येथानशक्ति आठवावें । सर्वोत्तमासी ॥१५॥ मग दिशेकडे जावें । जे कोणासि च न्व्हे ठावें ॥ शौच्य आच्मन करावें । निर्मळ जळें ॥ १६ ॥ मुखमार्जन प्रातःस्नान । संध्या-तर्पण देवतार्चन ॥ पुढें वैश्वदेव उपासन । येथासांग ॥१७॥ कांहीं फळाहार घ्यावा । मग संसार धंदा करावा ॥ सुशब्दें राजी राखावा । सकळ लोक ॥ १८ ॥ ज्या ज्याचा जो व्यापार । तेथें असावें खबर्दार ॥ दुश्चितपणें तरी पोर । वेढा लावी ॥१९॥ चुके ठके विसरे सांडी । आठवण झालियां चर्फडी ॥ दुश्चित आळसाची रोकडी । प्रचीत पहा ॥ २० ॥ या कारणें सावधान । येकाग्र असावें मन॥ तरी मग जेवितां भोजन । गोड वाटे॥२१॥ पुढें भोजन झालियावरी । कांहीं वाची चर्चा करी ॥ येकांतीं जाऊन विवरी । नाना ग्रंथ॥२२॥ तरीच प्राणी शाहाणा होतो । नाहींतरी मूर्खचि राहातो ॥ लोक खाती आपण पाहातो । दैन्यवाणा ॥२३॥ ऐक सदेवपणाचें लक्षण । रिकामा जाऊं नेदी एक क्षण ॥ प्रपंच व्यवसायाचें ज्ञान । बरें पाहे ॥२४॥ कांहीं मेळवी मग जेवी । गुंतल्या लोकांस उगवी ॥ शरीर कारणीं लावी । कांहींतरी ॥ २५ ॥ कांहीं धर्मचर्चा पुराण । हरिकथा निरूपण ॥ वाया जाऊं नेदी क्षण । दोहींकडे ॥ २६ ॥ ऐसा जो सर्वसावध । त्यास कैंचा असेल खेद ॥ विवेकें तुटला संबंध । देहबुद्धीचा ॥ २७ ॥ आहे तितुकें देवाचें । ऐसें वर्तणें निश्चयाचें ॥ मूळ तुटे उद्वेगाचें । येणें रीतीं ॥२८॥ प्रपंचीं पाहिजे सुवर्ण । परमार्थीं पंचीकरण ॥ महावाक्याचें विवरण । करितां सुटे ॥ २९ ॥ कर्म उपासना आणि ज्ञान । येणें राहे समाधान ॥ परमार्थाचें जें साधन । तेंचि ऐकत जावें ॥ ३० ॥

**देवैश्चैव मनुष्यैश्च तिर्यग्भिश्चोपजीव्यते । गृहस्थः प्रत्यहं यस्मात्त-स्माच्छ्रेष्ठो गृहाश्रमी ॥** ( दक्ष स्मृ. २।५७ ). **त्रयाणामाश्रमाणां च गृहस्थो योनिरुच्यते । सीदमानेन तेनैव सीदन्तीहेतरे त्रयः ॥ ५८ ॥ मूलं प्राणो धनंस्कंधस्तस्माच्छाखाश्च पल्लवाः । मूलेनैकेन नष्टेन सर्वमेव विनश्यति ॥ ५९ ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन रक्षणीयो गृहाश्रमी ॥ ६० ॥** या दक्षस्मृती-चाच भाव श्रीसमर्थांच्या दासबोधांतून उतरला आहे.

नाना वेश नाना आश्रम । सर्वांचें मूळ गृहस्थाश्रम ॥ जेथें पावती विश्राम । त्रैलोक्यवासी ॥ ( दा. बो. १४–७–१ ) देव ऋषी मुनी योगी । नाना तापसी वीतरागी ॥ पितृ आदि करून विभागी । अतीत अभ्यागत ॥२॥ गृहस्थाश्रमीं निर्माण झाले । आपला आश्रम टाकून गेले ॥ परंतु गृहस्था-गृहीं हिंडों लागले । ( त्यांच्या रक्षणार्थ, उद्धारार्थ ) कीर्तिरूपें ॥ ३ ॥ या कारणें गृहस्थाश्रम । सकळांमध्यें उत्तमोत्तम ॥ परंतु पाहिजे स्वधर्म । आणि भूतदया ॥ ४ ॥ जेथें षड्कर्में चालती । विध्योक्त क्रिया आचरती । वाग्माधुर्यें बोलती । प्राणिमात्रासी ॥ ५ ॥

**विभागशीलसंपन्नः क्षमायुक्तो दयालुकः । स्वकर्मणि सदा युक्तो गृहस्थः स्वर्गभाग्भवेत् ॥ ६६ ॥ दया लज्जा क्षमा श्रद्धा प्रज्ञा त्यागः कृतज्ञता । एते यस्य गुणाः सन्ति गृहस्थो मुख्य उच्यते ॥ ६७ ॥** द्रव्य-अन्न–विभागशील संपन्न, क्षमायुक्त, दयाळु, स्वकर्मनिरत गृहस्थ स्वर्ग–भागी-दार होतो. दया, लज्जा, क्षमा, श्रद्धा, आत्मनिष्ठा, त्याग, कृतज्ञता इतके ज्याचे गुण आहेत तो ' गृहस्थ ' म्हणवून घेतो. **स्नानसंध्या जपो होमो देवतानां च पूजनम् । आतिथ्यं वैश्वदेवश्च षट्कर्माणि दिने दिने ॥**—स्नान, संध्या, जप, होम, देवपूजा, अतिथिसत्कार, वैश्वदेव हीं ब्राह्मणांचीं नित्य षट्कर्में होत. दक्षस्मृतींत खालीलप्रमाणें त्याज्यात्याज्य कर्में सांगितलीं आहेत. **संध्यास्नानं जपो होमः स्वाध्यायो देवतार्चनम् । वैश्वदेवस्तथाऽऽतिथ्यमुद्घृतं चापि शक्तितः ॥ ९ ॥ अनृतं पारदार्यं च तथाऽभक्ष्यस्य भक्षणम् । अगम्या-गमनापेयं हिंसास्तेयं तथैव च ॥ ११ ॥ अश्रौतधर्माचरणं कर्मधर्मबहि-ष्कृतम् । नवैतानि विकर्माणि सततं तानि वर्जयेत् ॥ १२ ॥ पैशून्यमनृतं माया कामः क्रोधस्तथाऽप्रियम् । दोषो दम्भः परद्रोहो विकर्माणीति वर्जयेत् ॥ १३ ॥ गीतनृत्ये कृषिः सेवा वाणिज्यं लवणक्रिया । द्यूत-कर्मायुधान्यात्मप्रशंसा च विकर्म च ॥ १४ ॥ शौचे यत्नः सदा कार्यः**

**शौचमूलो द्विजः स्मृतः । शौचाचारविहीनस्य समस्ता निष्फलाः क्रियाः ॥ ५।२ ॥ शौचं च द्विविधं प्रोक्तं बाह्यमाभ्यंतरं तथा । मृज्जलाभ्यां स्मृतं बाह्यं भावशुद्धिस्तथाऽन्तरम् ॥ ३ ॥** —स्नान, संध्या, जप, होम, वेदाध्ययन, देवतार्चन, वैश्वदेव, आतिथ्य व वेदार्थविवरण हीं ब्राह्मणांचीं नऊ कर्मे नित्याचीं आहेत. असत्य, व्यभिचार, मांसादि अभक्ष्यभक्षण, अगम्यागमन, मद्यादि अपेयपान, हिंसा, चोरी, वेदविरुद्ध कर्म, धर्मबहिष्कृत कर्म, मग तें स्वतःच्या बुद्धीनें असो कीं परप्रेरणेनें असो, कधींहि करूं नये. हीं विकर्मे होत. दुष्टपणा, लबाडी, कपट-कारस्थान, गोड बोलून गळा कापणें, काम, क्रोध, जन-अप्रिय, प्रमाद, दम्भ, परद्रोह इत्यादि विकर्मे होत. यांचा त्याग करावा. गाणें, नाचणें, नांगरणें, नौकरी करणें, व्यापार करणें, लोखंड, मीठ, दूध व अन्न विकणें, जुगार खेळणें, शस्त्र धारण करणें, आत्मस्तुति करणें, हें सर्व विकर्मांत मोडतें. याचा ब्राह्मणांनीं त्याग करावा. शुद्धता असावी. शुद्धतेनेंच 'ब्राह्मण' म्हणवून घेतो. शुद्धता नसलेल्यांचीं सर्व कर्मे निष्फळ होतात. अंतर्बाह्य असें दोन प्रकारचें शौच असतें. जलमृत्तिकादिकानें बाह्य शुद्धता संपादून आत्मनिष्ठेनें संपादिलेल्या चित्तशुद्धीनें, भावशुद्धीनें आंतरंगिक शुद्धता संपादावी. **ऋषयः पितरो देवा भूतान्यतिथयस्तथा । आशासते कुटुंबिभ्यस्तेभ्यः कार्यं विजानताः ॥** (मनु ३।८०)—ऋषी, पितर, देव, गाय, म्हैस, कुत्रें आदि सर्व प्राणी अतिथि म्हणून कुटुंबी माणसाकडे येतात. शहाण्यानें त्यांना अन्न-पानादिकानें संतुष्ट करावें. **सद्यः पतति मांसेन लाक्षया लवणेन च । त्र्यहेण शूद्रो भवति ब्राह्मणः क्षीरविक्रयात् ॥** ( अत्रिस्मृति ). **शौचं मंगलमायासा अनसूया स्पृहा दमः लक्षणानि तु विप्रस्य तथा दानं दयाऽपि च ॥** ( अत्रि स्मृ. ३३ ) असें अत्रिस्मृतींत सांगितलें आहे. **इष्टापूर्तौ तु कर्मण्यौ ब्राह्मणेन विशेषतः । इष्टेन लभते स्वर्गं मोक्षं पूर्तेन विन्दति ॥** ( लघुशंख स्मृ. १ ) **वापीकूपतडागानि देवतायतनानि च । पतितान्युद्धरेद्यस्तु सपूर्तफल-मश्नुते ॥ ४ ॥** —ब्राह्मणानें इष्टापूर्त कर्मे करावींत. इष्ट कर्मांनीं स्वर्ग व पूर्त कर्मांनीं मोक्ष मिळतो. तळीं, विहिरीं, देवालयें बांधणें, उद्यानें तयार करणें, फळझाडें लावणें, अन्नछत्र, पाणपोई ठेवणें याला पूर्त कर्म म्हणतात. अग्नि-होत्र, तप, सत्य, वेदाचें पालन, आतिथ्य, वैश्वदेव हीं इष्ट कर्मे होत. ब्राह्मणाचे हे पंचमहायज्ञ आहेत. **अध्यापनं ब्रह्मयज्ञः पितृयज्ञस्तु तर्पणम् । होमो दैवो बलिर्भौतो नृयज्ञोऽतिथिपूजनम् ॥** —अध्ययन, अध्यापन हा ब्रह्मयज्ञ,

अन्नोदकानें तर्पण पितृयज्ञ, वैश्वदेव होमादि देवयज्ञ, भूतबलि भूतयज्ञ, अतिथिपूजन मनुष्ययज्ञ हे पंचमहायज्ञ गृहस्थानें करावेत. हीं ब्राह्मणांचीं नित्य कर्में होत. **यथा वायुं समाश्रित्य सर्वे जीवन्ति जन्तवः । तथा गृहस्थमाश्रित्य वर्तन्ते सर्व आश्रमाः ॥** ( मनु. ३।७७ ) प्राणवायूच्या आधारानें प्राणी जसे जगतात त्याप्रमाणेंच गृहस्थांच्या आश्रयानें मनुष्य, देव, पितर, कीट, पशुपक्ष्यादि सर्व जगतात. **स्वाध्याये नित्ययुक्तः स्याद्दैवे चैवेह कर्मणि ॥ दैवकर्मणि युक्तो हि बिभर्तीदं चराचरम् ॥** —अध्ययन, अध्यापन आणि वैश्वदेवादि देवकार्यांत ब्राह्मण निरत असला म्हणजे त्यानें चराचर विश्वाचें धारण, पोषण होतें. **अकृत्वा वैश्वदेवं तु ये भुञ्जंत्यत्यधार्मिकाः । वृथा तेनान्नपाकेन काकयोनिं व्रजन्ति ते ॥** ( लघुशातातप स्मृ. ५२ )—वैश्वदेव न करतां जे अति अधार्मिक ब्राह्मण जेवतात त्यांना मरणोत्तर काकयोनि प्राप्त होते. वैश्वदेवाचा विधि कांहीं माहीत नसला आणि शिकण्याचीहि इच्छा नसल्यास निदान केशवादि नांवांनीं तरी चोवीस आहुती घातल्या म्हणजे न केल्यापेक्षां कांहींतरी केल्यासारखें होईल. **यज्ञो विष्णुः । विष्णुमुखा वै देवाः । एकोविष्णुर्महद्भूतं पृथग्भूतान्यनेकशः । त्रींल्लोकान्व्याप्य भूतात्मा भुंक्ते विश्वभुगव्ययः ॥** इत्यादि आधारांनीं विष्णूच्या चोवीस नांवांनीं आहुत्या घातल्या म्हणजे सर्व देवांना मिळतील. **विश्वं व्याप्नोतीति विष्णुः ।** या व्युत्पत्तीनेंहि हाच अर्थ निघतो. अजिबात कांहीं न केल्यापेक्षां एवढें तरी करावें. ज्यांना विधीप्रमाणें करतां येणेंच शक्य नाहीं त्यांच्याचकरितां हा विधि सांगितला आहे. **वैश्वदेवं पुरा कृत्वा नित्ये चाभ्युदये तथा । स्वाभीष्टदेवतादिभ्यो नैवेद्यं विनिवेदयेत् ।** ( लघु आश्वलायन स्मृ. १४४ ) **अकृत्वा देवयज्ञं च नैवेद्यं यो निवेदयेत् । तदन्नं नैव गृण्हन्ति देवताश्चापि सर्वथा ॥ १४५ ॥** या लघु आश्वलायन स्मृतीच्या आधारें प्रथम वैश्वदेव व नंतर नैवेद्य दाखवावा हें सिद्ध होतें. **वैश्वदेवेन ये भीता आतिथ्याच्च बहिष्कृताः । सर्वे ते वृषला ज्ञेयाः प्राप्तवेदा अपि द्विजाः॥**(लघुशातातप स्मृ. ५०) **येषामध्ययनं नास्ति ये च केचिदनग्नयः । न कुलं श्रोत्रियं येषां सर्वे ते शूद्रधर्मिणः ॥ ५१ ॥**

## शिखेचें महत्त्व

अलीकडे सरकारी खात्यांतून ब्राह्मण युवकांचें उच्चाटण होऊं लागलें आहे व ब्राह्मण युवकांतून शेंडी व जानव्याचें उच्चाटण होऊं लागलें आहे. तत्त्व कळलें म्हणजे महत्त्वहि पटतें.

**विना यज्ञोपवीतेन भुंक्ते तु ब्राह्मणो याद । स्नानं कृत्वा जपं कुर्वन्नुपवासेन शुध्यति ॥ २३ ॥** ( लघुहारीत स्मृति ) **शिखां छिंदन्ति ये केचिद्वैराग्याद्वैरतोऽपि वा । पुनः संस्कारमर्हन्ति त्रयो वर्णा द्विजातयः॥१८॥ मोहाच्छिन्दन्ति ये केचिद् द्विजातीनां शिखां नराः । चरेयुस्ते दुरात्मानः प्राजापत्यं विशुद्धये ॥ १९ ॥ विना यज्ञोपवीतेन द्विजातिर्यद्युपस्पृशेत् । प्राजापत्यं प्रकुर्वीत निष्कृतिर्नान्यथा भवेत् ॥ २१ ॥** —ब्राह्मण जानव्या-शिवाय जेवला तर पुन्हां स्नान करून जानवें घालावें. सबंध दिवस उपवास करून बारारों तरी जप करावा. त्यानें तो शुद्ध होतो. शेंडी जर वैरानें अथवा अपक्व वैराग्यानें काढून टाकली तर ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांना पुन्हां उपन-यन संस्कार करावा लागतो. विचार न करतां मूर्खपणानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या शिखा जे दुष्ट काढून टाकतात त्यांची प्राजापत्य नांवाचें प्रायश्चित्त करूनच शुद्धि होते. शिखासूत्र नसल्यास असें प्रायाश्चित्त घ्यावें लागतें. **ज्ञानमेव शिखा नान्या ।**—आत्मज्ञानप्रधान आर्य संस्कृतीचे आम्ही आहों ही जाणीव स्वतः ठेवण्याकरितां व दुसऱ्यालाहि ती जाणीव देण्याकरितां आर्य संस्कृतीचें तें एक चिन्ह म्हणून आहे. **वन्हेर्द्वयोर्ज्वालकीलावर्चिर्हेतिः शिखा स्त्रियाम् ।** ( अमर ) शिखा हा शब्द अग्नि या अर्थाचा आहे. **अग्निर्देवो द्विजातीनाम् ।**— द्विजातींना अग्नीची उपासना असते. या दृष्टीनेंहि त्याची खूण म्हणून शिखा बाळगण्याची द्विजातींतून पद्धत आहे. **अग्ने नय सुपथा राये अस्मान् विश्वानि देव वयुनानि विद्वान् । युधोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नम उक्तिं विधेम ॥** ( यजु. वाजसनेय संहिता ) हें या मंत्रानें स्पष्ट होतें. **ब्राह्मणोस्य मुखमासीत् । मुखा दग्निरजायत ।** ( पुरुषसूक्त ) मुख हें स्थान अग्नीचें आहे. परमात्म्याच्या मुखापासूनच अग्नीची उत्पत्ति झाली. त्या परमा-त्म्याच्या मुखापासून आपली उत्पत्ति आहे ही जाणीव स्वपरांना होत असण्या-करितां त्याचें हें शिखारूपानें बाह्य चिन्ह धारण केलें जातें. अग्नि स्वप्रकाश असून परप्रकाशक आहे. ब्राह्मणहि ब्रह्मज्ञानानें स्वप्रकाश असून उपदेशादि द्वारें परप्रकाशकहि आहे. हें **वर्णानां ब्राह्मणो गुरुः ।; अस्मिन् देशे प्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः । स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ॥** इत्यादि वाक्यांवरून स्पष्ट होतें. तेव्हां या अशा विशिष्ट लक्षणाच्या विशिष्ट जातीची खूण म्हणून ही शिखा बाळगली जाते. ‘ **एष चिदग्निः** ’ शब्दांत अग्नि हा चिद्रूप ब्रह्मच आहे हें सिद्ध होतें.

**ब्रह्मब्राह्मणआत्मना ।**—चिद्रूप ब्रह्मस्वरूपाचें ब्राह्मण हें एक प्रतीक आहे. या दृष्टीनें असल्या शिखेचें धारण ब्राह्मणाकडून होतें. अग्निसारखीच पवित्र वस्तुद्योतकहि ही शिखा असावी. आपल्याला त्याचा संपर्क न लावून घेतां दुसऱ्याचें कष्मल काढून टाकण्याचा अग्नीचा गुण ब्राह्मणाजवळ असल्यामुळें तद्दर्शक ही शिखा आहे असें मानावें. **एकजातीय कल्पादग्निब्राह्मणयोः ।**—अग्नि व ब्राह्मण या दोघांची एकच जात आहे याचें निदर्शक अशी ही शिखा आहे. अग्निस्थानीय उत्तमांगरूप मुखापासून ब्राह्मणाचा जन्म झाला आहे. त्यामुळें हे सर्वांत मुख्य आहेत, असा शिखा धारणेपासून अर्थ निघतो. **यो अग्निः स द्विजो विप्रैर्मंत्रदर्शिभिरुच्यते ॥** ( मनु. ३।३१२ ) **वैश्वानरः प्रविशत्यतिथिर्ब्राह्मणो गृहान् ।** ( कठ उ. १।१।७ ) इत्यादि प्रमाणांनीं अग्नि व ब्राह्मण यांत फरक नाहीं अशी अभेदस्थिति दाखविणारें हें चिन्ह आहे. अशा अनेक प्रकारें या शिखेविषयीं सांगतां येईल. अशी ही महत्त्वपूर्ण शिखा काढून टाकल्यास त्याचा अर्थ काय होईल ? कोणती भूमिका सूचित होईल ? **केशान शीर्षन् यशसे श्रियै शिखा ।** ( यजुः वाजसनेय सं १९।९२ ) आणि ते केवळ डोक्यावरील केंस नव्हेत तर यश, कीर्ति, प्रताप, महिमा आणि वैभवाचा कळसच ती शिखा होय. **सदोपवीतिना भाव्यं सदा बद्धशिखेन च । विशिखो व्युपवीतश्च यत्करोति न तत्कृतम् ॥** ( गोभिल स्मृ. ४ )—सदैव जानव्यानिशीं असावें, शेंडी बांधलेलीच असावी. शेंडी आणि जानवें नसलेल्यानें कांहीं केलें तरी तें सर्व न केल्यासारखेंच होतें, असें स्मृतिकार सांगतात. आतां थोडा यज्ञोपवीत म्हणजे जानवें यावर विचार करूं.

## यज्ञोपवीताचें थोर सामर्थ्य

अष्टोत्तर शतोपनिषदांपैकीं अथर्ववेदांतर्गत परब्रह्मोपनिषदांत या यज्ञोपवीताचा विचार केला आहे. तो पाहूं.

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे । स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥** —या सर्व यज्ञाच्या अधिकाराचें यज्ञोपवीत हें एक चिन्ह आहे. या यज्ञोपवीतांत सूक्ष्मरूपानें सर्व कांहीं सांठविलें आहे. जें इथे नाहीं तें कुठेंच नाहीं व जें इथे आहे तेंच सर्वत्र व्यापून आहे. यज्ञोपवीत हें

ब्रह्मोपदेश झाल्याचें एक लक्षण आहे. असार देहाचें तें एक साररूप आहे. वेदाच्या अनंत सामर्थ्याकडे नेण्याचें तें एक सूक्ष्म द्वार आहे. अभ्युदय-निःश्रेयसाच्या उन्नत मार्गांतली यज्ञोपवीत ही एक विजयमाळ आहे. निरवधि आनंदघन परब्रह्माच्या ऐक्यरूप योगाचा यज्ञोपवीत हें एक अधिकारपद आहे. यांत पिंडब्रह्मांडाचें ऐक्य आहे, जीवब्रह्माचें ऐक्य आहे.

## शहाण्णव तत्त्वें

**कार्पासयज्ञोपवीतनिर्माणप्रकारः । त्रिवृदूर्ध्ववृतं कार्यं तन्तुत्रयमधोवृतम् । त्रिवृत्तच्चोपवीतं स्यात्तस्यैको ग्रंथिरिष्यते ॥ २ ॥** ( गोभिल स्मृ. ) **संहतचतुरंगुलिमूलेषु षण्णवत्या सूत्रमावेष्ट्य तत् त्रिगुणीकृत्योर्ध्ववृत्तं वलितं कृत्वापुनरधोवृत्तरीत्या त्रिगुणीकृतं तत्सूत्रं नवतन्तुकं संपद्यते तत् त्रिरावेष्ट्य दृढग्रंथिं कुर्यात् स्तनादूर्ध्वमधो नाभेर्न धार्यंतत्कथंचन ॥** ( धर्मसिंधु )—प्रथम चार बोटांना शहाण्णव वेळां सूत गुंडाळावयाचें असतें. पुढें नवकृत करून तीन पदरी जानवें होतें. आणि मग त्याला एक ब्रह्मगांठ दिली म्हणजे यज्ञोपवीत तयार झालें. हें थोडक्यांत सांगितलें असलें तरी यांत सबंध सृष्टीची उभारणी आहे. आतांपर्यंत सर्व प्राणिपदार्थ व देवदेवतांसह या आखिल सृष्टीचा अंतर्भाव यांत होतो. इथल्या चार संख्येंत **त्रिपादूर्ध्व उदैत्पुरुषः पादोस्येहाभवत्पुनः ।** ही श्रुति वसली आहे. हिच्या बरोबर तिनें ब्रह्मांडच काय पण सृष्ट्युत्पत्तीच्या अगदीं पाहिल्या क्षणाच्या उदयापासून तों आतांपर्यंत ज्या म्हणून झाल्या त्या सर्व घडामोडी घेतल्या आहेत. **एकांशेन स्थितो जगत्।** हा अनंतकोटि ब्रह्मांडाचा आखिल दृश्यपसारा परमात्म्याच्या अविद्या विभागांतील एक अंश म्हणजे एक चतुर्थांश भाग आहे. तो परमात्मा आणखी एकापेक्षां एक आधिक दिव्य असणाऱ्या आपल्या तीन संविभागांनीं वर व्यापून राहिला आहे. विद्यापाद, आनंदपाद, आणि तुर्यपाद अशीं हीं त्यांचीं नांवें आहेत. झालेली नामरूपात्मक सृष्टि सबंध या अविद्या विभागांतच पाहावयाला मिळते. स्थूलक्रियेचा अविद्यापाद, हा स्थूल देहाप्रमाणें आहे. या त्रिविध नामरूप, धर्म, कर्म, कुल, जातिसंबंध यांनीं गजबजलेल्या या दृश्याच्या उत्पत्तीपूर्वील ‘ मी बहु व्हावें ’ या संकल्पाचा तेजोमय आभासाचा हा दुसरा विद्यापाद होय. याला परमात्म्याचा सूक्ष्म देह म्हणतां येईल. आनंदपाद हा तिसरा. या ठिकाणीं सृष्टीचें, सृष्टीच्या संकल्पाचें कोणतेंहि कार्य दिसून

न येतां, कोणत्याहि अन्य विचाराचा आभास दिसून न येतां स्वरूपाच्या अनुभवाचाच एक आभास या ठिकाणीं असतो. या ठिकाणची वृत्ति स्वरूपाचा अनुभव थोडीशी वेगळी राहून घेते. स्वरूपाचा आनंदावभास-भोग या ठिकाणीं असतो आणि त्यामुळेंच या संविभागाला आनंदपाद म्हणून म्हणतात. हा तिसरा देह आहे. इथे किंचित् स्वरूपाचें आवरण असतें. चतुर्थपाद म्हणजे केवळ आपणच एक परमात्मा असतो. आनंदच आपल्या आपण एक इथे असतो. अनुक्रमें यांनाच परमात्म्याचे स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण देह म्हणतां येतील. ज्या बोटांना यज्ञोपवीताचें सूत गुंडाळावयाचें असतें त्यांच्या चार संख्येंत या सर्वांचा अंतर्भाव होतो. या सर्वांचाच त्यांत अंतर्भाव होतो हें दर्शविण्याकरितांच चार बोटांना मात्र सूत गुडाळतात. या चार देहांप्रमाणें या चार देहांच्या विराट, हिरण्यगर्भ, ईश्वर व साक्षी या चार अभिमान्यांचाहि त्यांत अंतर्भाव होतो. ब्रह्मांडाच्या देहांचाच अंतर्भाव झाल्यानंतर पिंडाच्या स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण देहांचा व त्यांच्या विश्व, तैजस, प्राज्ञ, क्षेत्रज्ञ या चार अभिमान्यांचाहि अंतर्भाव त्यांत सहज झालाच. याचप्रमाणें इतर चार संख्येच्या मोजमापांत भरणाऱ्या साऱ्या चौकड्यांचा अंतर्भाव यांत होतो. ते आठवतील तितके तसेच देत जातों. पिंडाच्या जागृदादि अवस्थांचीं अनुक्रमें नयन ( हृदय ), कंठ, नाभि आणि शिर ( ब्रह्मरंध्र ] अशीं हीं चार स्थळें आहेत. याच्या अकार, उकार, मकार, अर्धमात्रा ( अमात्रा ) अशा मात्रा आहेत. आहवनीय, गार्हपत्य, दक्षिण, सभ्य असे अग्नि आहेत. ब्रह्मा ( विश्व ) विष्णु ( तैजस ), रुद्र ( प्राज्ञ ), अक्षर चिन्मात्रस्वरूप अशा देवता आहेत.

**तस्माच्चतुरवस्था चतुरंगुलवेष्टनमिव । षण्णवतितत्त्वानि तन्तवद्विभज्य ।** शहाण्णव वेळां जें गुंडाळलेलें असतें तें शहाण्णव तत्त्वद्योतक आहे. हीं शहाण्णव तत्त्वें वराह उपनिषदाच्या प्रारंभीं दिलीं आहेत. पांच ज्ञानेंद्रियें ( कान, त्वचा, डोळे, जीभ आणि नाक ), पांच कर्मेंद्रियें ( वाणी, हात, पाय, मूत्र-मलोत्सर्गाचीं दोन इंद्रियें ), पांच प्राण, ( प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान ), पांच विषय ( शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध ), अंतःकरणपंचक ( अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त, अहंकार ), अशीं हीं पंचवीस तत्त्वें अथवा अंतःकरण धरलें नाहीं तर चोवीस तत्त्वें होतात. इतक्या तत्त्वांचा हा लिंगदेह होतो. यालाच वासनादेह, आतिवाहिक देह, सूक्ष्म देह अशींहि

दुसरीं नांवें आहेत. याला अपंचीकृत देह असेंहि म्हणतात. हीं चोवीस अथवा पंचवीस तत्त्वेंच म्हणजे जग असें कांहीं मानतात. कांहीं छत्तीस तत्त्वें मानतात. ( अशांच्या मतानें या पंचवीस तत्त्वांत आणखी भर पडते. ) पंचीकृत स्थूल पंचमहाभूतें ( आकाश, वायु, अग्नि, जल आणि पृथ्वी ), तीन देह ( स्थूल, सूक्ष्म आणि कारण ), तीन अवस्था (जागृत, स्वप्न आणि सुषुप्ति). पूर्वींचीं पंचवीस आणि हीं अकरा मिळून अशीं छत्तीस तत्त्वें होतात. आपल्याला शहाण्णव तत्त्वें बघावयाचीं आहेत.

पुढच्या तत्त्वांचा हिशोब करूं या. षड्भाव विकार हे विकार उत्पन्न झालेल्या सर्व पदार्थांना असतात. ( उत्पन्न होण्यापूर्वी सूक्ष्मरूपानें असणें, पुढें स्पष्टपणें जन्माला येणें, दिवसेंदिवस वाढणें, उतरणें ( विकार पावणें ), क्षीण क्षीण होत जाणें व शेवटीं नाश पावणें ). पुढें षडूर्मींची गणना केली जाते. भूक, तहान, शोक, मोह, म्हातारपण आणि मरण यांना षडूर्मि म्हणतात. देहधारी सर्वांना या षडूर्मि असतात. षट्कोश पाहूं. त्वचा, रक्त, मांस, मेद, मज्जा, अस्थि. प्रतिस्थूलदेहाचे हे षड्कोश आहेत. दुसऱ्या प्रकारानेंहि सांगतात तो विचार पाहूं. अन्नमय कोश हा रक्तमांसाचा देह. पूर्वोक्त षट्कोशांत एक रेत मिळविलें, म्हणजे या देहाचे सप्तधातु पूर्ण होतात. ‘ प्राणमय, मनोमय, विज्ञानमय.’ सूक्ष्मदेहांत या तीन कोशांचा अंतर्भाव होतो. या तीन कोशांचें थोडें विवरण पाहूं. प्राणमय कोशांत पंचप्राण व पंचकर्मेंद्रियें यांचा अंतर्भाव होतो. मनोमय कोशांत मन आणि पंचज्ञानेंद्रियें यांचा अंतर्भाव होतो. विज्ञानमय कोशांत बुद्धि आणि ज्ञानेंद्रियें यांचा अंतर्भाव होतो. शेवटचा कोश म्हणजे आनंदमय कोश. याचा कारणदेहांत अंतर्भाव होतो. पूर्वोक्त षट्कोश हे स्थूलदेहापुरतेच असल्यास या कोशांत मात्र तिन्ही देहांचा अंतर्भाव होतो. पूर्वोक्त षट्कोश आहेत. आणि हे पंचकोश आहेत. हे पंचकोश तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांना माहीत असतात. हे पंचकोश प्रसिद्ध आहेत म्हणून ते इथे दिले. मात्र यांचा या शहाण्णव तत्त्वांत अंतर्भाव होत नाहीं. पुढें अरिषड्वर्गाची गणना यांत होते. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मात्सर्य यांना अरिषड्वर्ग म्हणतात. यांना प्राणिमात्रांचे शत्रु म्हणून मानलें जातें. यांना षड्शत्रु म्हणूनहि म्हणतात. कोणी या शहाण्णवाच्या बेरजेंत हें अरिषट्क घेतात; तर कोणी विश्व, तैजस, प्राज्ञ व सत्त्व, रज, तम या सहांचा हिशोब करतात. विश्वादि त्रय हें स्थूलादि तीन देहाचें अभिमानी आहे. दुसऱ्या त्रयीला गुणत्रय म्हणतात.

संचित, प्रारब्ध व आगामी असें कर्मत्रय आहे. अनेक जन्मावधि पुरेल अशा अनेक जन्मांच्या अभुक्त कर्मांच्या सांठ्याला संचित ( सांठविलेलें कर्म ) म्हणतात. यांतून चालू देहाला कारण झालेलें कर्म प्रारब्ध म्हणवून घेतें व या जन्मांत होऊन या जन्मांतच जीं भोगलीं जात नाहींत व जीं अनेक जन्मांना कारणीभूत होतात त्यांना आगामी म्हणतात. वचन ( वाणीनें बोलणें ), आदान ( हातांनीं घेणें ), गमन ( पायांनीं जाणें ), विसर्ग ( गुदेंद्रियानें मलोत्सर्ग करणें ), आनंद ( जननेंद्रिय द्वारा रतिसुख घेणें ) अशीं हीं वाणी आदि पंचकर्मेंद्रियांचीं कार्यें होत. यांच्यापुढें अंतःकरण–चतुष्टयांच्या कार्यांची परिगणना आहे. संकल्प, विकल्प करणें हें मनाचें कार्य आहे. निश्चय करणें हें बुद्धीचें कार्य आहे. चिंतन करणें हें चित्ताचें कार्य आहे. अभिमान बाळगणें हें अहंकाराचें कार्य आहे. ( अंतःकरणाचें स्फुरण होणें हें कार्य आहे. ) चार सद्वासना आहेत. मुदिता, करुणा, मैत्री, उपेक्षा हीं यांचीं नांवें. परोत्कर्षानें आनंदित होणें, हिला ' मुदिता ' म्हणतात. दुःखी कष्टी लोकांच्या ठिकाणीं दया हीच ' करुणा '. आपला सदुपदेश न ऐकतां मुद्दाम आडमार्गानें जाणाऱ्याबद्दल जी उदासीनता येते तिलाच ' उपेक्षा ' म्हणतात. अनेक प्रकारच्या लोकांत वागावें कसें या प्रश्नांचा उलगडा या सद्वासनांनीं होतो. आतां यापुढें दशेंद्रियांच्या अभिमानी देवतांची गणना बघितली म्हणजे शहाण्णव तत्त्वांची बेरीज बरोबर होते. श्रोत्रेंद्रियाची अभिमानी देवता, दिशा अथवा दिग् नांवाची आहे. अशीच त्वचेची वायु, डोळ्याची सूर्य, जिव्हेची वरुण व घ्राणाची अश्विनी. अशा पांच ज्ञानेंद्रियांच्या देवता आहेत. त्या त्या इंद्रियांचीं तीं तीं कार्यें त्यांच्या त्यांच्या त्या त्या देवतेच्या सत्तेनें होतात. आतां कर्मेंद्रियाच्या अभिमानी देवतांचा परिचय करून घेऊं. वाणीची अग्नि आहे आणि अशाच रीतीनें कर, चरण, उपस्थ, पायु या कर्मेंदियांच्या क्रमानें इंद्र, उपेंद्र, प्रजापति व मृत्यु अशा देवता आहेत. ही शहाण्णव तत्त्वांची बेरीज झाली. वराहोपनिषदांत या तत्त्वगणनेच्या नंतर श्लोक आहे तो असा—

**विराट्रूपिणं मां ये भजन्ति मयि भक्तितः । विमुक्ता ऽ ज्ञान-तत्कार्याज्जीवन्मुक्ता भवन्ति ते ॥ १६ ॥**—माझ्या ठिकाणीं भक्ति ठेवून ब्रह्मस्वरूपी अशा माझ्या भजनीं जे लागले आहेत, ते अज्ञानापासून व त्याच्या अखिल सांसारिक सुखदुःखादि कार्यापासून पूर्ण होऊन इथेच जीवन्मुक्त होतात. याच्याच पुढच्या श्लोकांत या शहाण्णव तत्त्वांना ज्यानें जाणलें तो

कोणीहि असो ( तो ) जीवन्मुक्त होतो, अशी याची फलश्रुति सांगितली आहे.

**त्रिवृत्करण**

आतां पुनः प्रकृत विषयाकडे वळूं. जीवनाचें ( जानव्याचें ) महत्त्व समजून घेऊं. तीन त्रिक नऊ, अशा हिशेबानें जें सूत वळलें जातें तें 'त्रिवृत्करण' आहे. पंचीकरणासारखेंच हें एक 'त्रिवृत्करण.' हें पंचीकरणाइतकें प्रसिद्ध नाहीं. छांदोग्योपनिषदाचा अभ्यास न केलेल्याला हा शब्द अगदीं नवीन वाटेल. छांदोग्योपनिषदाच्या सहाव्या अध्यायाच्या प्रारंभींच अरुणाचा पुत्र जो आरुणी—उद्दालक याचा व याच्या श्वेतकेतु नांवाच्या मुलाचा संवाद आला आहे. त्यांत हें ' त्रिवृत्करण ' उद्दालकानें श्वेतकेतूला सांगितलें आहे. अध्ययन करून ताठ्यानें आपल्या घरीं श्वेतकेतु आला होता. त्याला ब्रह्मज्ञान झालेलें नाहीं, असें मुलाच्या वर्तनावरून उद्दालकानें ( ओळखलें ) ताडलें आणि विचारावयास सुरुवात केली. **श्वेतकेतो यन्नु सोम्येदं महामना अनूचानमानी स्तब्धोऽस्युत तमादेशमप्राक्ष्यः ।** "वत्सा, तूं जो इतका गर्विष्ठ व उर्मट झाला आहेस तो कां ?" **येनाश्रुतँ श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातमिति ॥**— "बाळ, ज्या एकाचें ज्ञान झालें असतां जितकें म्हणून न ऐकलेलें तें सर्व एकदम ऐकल्यासारखें होतें, जितकें म्हणून न समजलेलें असतें तें सर्व एकदम समजल्यासारखें होतें, ज्यांचें आतांपर्यंत ज्ञान झालेलें नसतें, त्या सर्वांचें एकदम ज्ञान होतें, तें तत्त्व काय म्हणून तूं आपल्या गुरूला विचारलें आहेस का ?" या प्रश्नाला ' नाहीं ' असें मुलाकडून उत्तर आल्यानंतर मग—**यथा सोम्यैकेन मृत्पिंडेन सर्वं मृण्मयं विज्ञातँ स्याद्वाचाऽऽरंम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ।** ( छां. ६।२।३ ) **सदेय सोम्वेदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् । तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति तत्तेजो असृजत तत्तेज ऐक्षत बहु स्यां प्रजायेयेति । ता आप ऐक्षन्त बह्व्यः स्याम प्रजायेमहीति ता अन्नमसृजन्त ॥६।२।४॥ तदपो असृजत ।**

—एका मृत्तिकेचें, सुवर्णाचें व लोहाचें पूर्ण ज्ञान झालें असतां गाडगें, रांजण इत्यादि ते सर्व मृद्विकार, कंठाकंठी आदि सर्व सुवर्णालंकार ते सुवर्णविकार व चाकू, कातऱ्या इत्यादि सर्व ते लोहविकार म्हणून एकदम समजून येतें. विकार हा केवळ शब्दप्रयोग मात्र असतो. एरवीं त्याच्या त्याच्या विकारांत अविकारी असें तें तेंच एक केवळ भरून असतें. मृत्तिकेच्या

विकारांत म्हणजे गाडगें, परळ, रांजण आदिकांत मातीच भरून असते. सुवर्णाच्या विकारांत म्हणजे बांगडी, गोट, पाटल्या आदिकांत सुवर्णच भरून असतें. लोखंडाच्या विकारांत म्हणजे विळा, खिळे, चाकू, कातऱ्या आदिकांत लोखंडच भरून असतें. हें जसें त्याप्रमाणेंच ज्या जगत्कारणापासून हें भेदाभिन्न विविध जग निर्माण झालें आहे. तेंच नित्य निर्विकार असें एक त्याच्या या सर्व विकारांतून ओतप्रोत आहे. मृत्तिकेचे विविध विकार गोचर होऊनहि, ते तसेच असूनहि, ते तसेच ठेवूनहि, त्यांचें ज्ञान तसें होऊनहि, त्यांतून एक मृत्तिकाच जशी अनुभवाला पटत असते त्याप्रमाणेंच त्या सद्वस्तूचे विविध विकार गोचर होऊनहि, तें तसेंच असूनहि, तें तसेंच ठेऊनहि, त्यांचें तसें ज्ञान होऊनहि त्यांतून एक सद्वस्तूच अनुभवाला येत असते. हें दिसून येणारें सर्वहि याच्या उत्पत्तीच्या पूर्वीं त्याच एक सद्रूपानें स्थित होतें. आपलें तें सत्य रूप जसेंच्या तसें राखून आपल्या आपणच त्यानें आपल्यावर आपल्या कल्पनेनें हें सारें जग निर्माण केलें.

प्रथम आपण बहु व्हावें अशा संकल्पानें त्या सद्रूप परमात्म्यानें आपल्यापासून तेज निर्माण केलें. आपलें पूर्वींचें तें रूप कायम ठेऊन संकल्पानें स्वतःच तो तेज ( अग्नि ) रूप झाला. त्या तेजोरूपानें पुन्हां बहु व्हावें असा संकल्प केला व आपल्यापासून त्यानें जलतत्त्व निर्माण केलें. आपलें पूर्वींचें तें अग्निरूप कायम ठेऊन आपल्या संकल्पानें स्वतःच तो जलतत्त्व झाला. पुन्हां जलतत्त्वाच्या रूपानें 'मी बहु व्हावें' असा संकल्प केला व आपल्यापासून अन्न निर्माण केलें म्हणजे पृथ्वी निर्माण केली. अन्न पृथ्वीपासूनच निर्माण होत असल्यामुळें पृथ्वी अर्थीं इथे अन्न असा शब्द वापरला आहे. अशा रीतीनें अग्नि, जल, पृथ्वी अशा तीन भूतांची अशी उत्पत्ति झाली.

**तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः सम्भूतः आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी ।** तैत्तिरीयशाखेच्या ब्रह्मोपनिषदांत असा जसा पंचभूतांच्या उत्पत्तीचा क्रम दिला आहे, तसाच इथे भूतत्रयाच्या उत्पत्तीचा क्रम दिला आहे. अर्थ दोन्हींचा एकच होतो. आकाश-वायूहून अग्निरूप या आपल्या विषयानें अधिक व्यक्त असल्यामुळें याच्यापासून जरी सृष्टि धरली तरी याच्या पूर्वींचीं आकाश आणि वायु हीं भूतें अध्याहृत धरावींच लागतात. सघन स्थितींत अन्य कशाचीहि उत्पत्ति होत नाहीं म्हणून संकल्पानें पोकळी निर्माण करून, नंतर कार्याला

चलनात्मक वायूची निर्मिती अवश्य असतेच व मग घर्षणानें अग्नी निर्माण होतो व अग्नीपासून जल निर्माण होतें. हें घामाच्या दृष्टीनें, पावसाच्या दृष्टीनेंहि कोणासहि कळून येईल. कढून कढून पाणी आटलें कीं, भांड्याच्या बुडाशीं थर बसतो. यावरून जलापासूनच पृथ्वी होते हें स्पष्ट कळून येतें. पाऊस पडल्या ठिकाणींच धान्य पिकतें. पावसाअभावीं घातलेल्या पाण्यानेंच कोंब फुटतो. या दृष्टीनें आपापासून पृथ्वी व पृथ्वीपासून पाण्याच्या संयोगानें अन्नाची उत्पत्ति होते, हें यावरून उमगतें. **सच्छब्दवाच्यमविद्याशबलं ब्रह्म । ब्रह्मणोऽव्यक्तम् । अव्यक्तान्महत् । महतोऽहंकारः । अहङ्कारात्पञ्चतन्मात्राणि । पञ्चतन्मात्रेभ्यः पञ्चमहाभूतानि । पंचमहाभूतेभ्योऽखिलं जगत् ।** ( त्रिशिखि ब्राह्मण उ. १ ) हाच क्रम इथेहि अभिप्रेत आहे. **मुख्यात्पूर्वोत्तरैर्भागैर्भूते भूते चतुश्चतुः । पूर्वमाकाशमाश्रित्य पृथिव्यादिषु संस्थिताः । मुख्यादूर्ध्वे परा ज्ञेया न परानुत्तन विदुः । एवमंशो इहभूतस्तेभ्यश्चांशो ह्यभूत्तथा । तस्मादन्योन्यमाश्रित्य ह्योतं प्रोतमनुक्रमात् ।** ( २–३–४ ) सूक्ष्म पंचभूतापासून सूक्ष्मदेह व स्थूल पंचभूतापासून स्थूलदेह अशी पांचभौतिक सृष्टि झाली. एकेक भूताचे संकल्पानें दोन विभाग करून अर्धा भाग त्या भूतांतला भूतांत ठेवून दुसऱ्या अर्ध्या भागाचे चार भाग करून ते उरलेल्या चार भूतांना वांटून दिल्यानंतर स्वांशानें व परांशानें प्रत्येक भूत पांच पांच प्रकारें वांटलें जाऊन पांचापांचा पंचवीस विभाग जसे होतात तसेच इथे तीन त्रिक नऊ विभाग होतात. पंचापंचीकृत भूतांपासून जशी सृष्टि झाली असें म्हणतात त्याचप्रमाणें त्रयात्रयीकृत भूतांपासून ही सृष्टि झाली, असें इथे प्रतिपादिलें असलें तरी दोन्हींचा अर्थ एकच. आतां हें सर्व तत्त्व जानव्यांत कसें सांठविलें आहे तें पाहूं. जानव्याच्या उद्देशानें ब्राह्मण आपल्या हातानेंच सूत कांततो. नंतर तें अखंड सूत चार बोटाला तो शहाण्णव वेळां गुंडाळतो. शहाण्णव वेळां गुंडाळून झालें कीं मग तें सूत काढून त्याचे बरोबर तीन पदर एकत्रित करून चातीवर वळतो. पुन्हां तें एकेरी सूत तीन पदर करून त्याचीं दोन्ही टोकें मिळवून ब्रह्मगांठ देतो. असें जानवें तयार होतें.

मागच्या विवेचनावरून चार बोटांनीं पिंडब्रह्मांडाच्या चारांनीं भरणाऱ्या सर्व उपाधि लक्षित होतात. शहाण्णव वेष्टणांनीं शहाण्णव तत्त्वांचें त्यांना वेष्टन आहे असें जाणलें जातें. शहाण्णव तत्त्वांचें हें जग अग्नि–जल–पृथ्वीचें ( त्रिगुणांचें ) त्रिवृत्करणरूप आहे, हें पुढच्या नऊ पदरांनीं सिद्ध होतें.

'पृथ्वी' जडत्वानें तमोगुणरूप मानली जाते; कर्मप्रधान जीवनरूपानें 'जल' रजोगुणात्मक मानलें जातें व प्रकाश म्हणजे ज्ञानरूपानें 'अग्नि' सत्त्वगुणात्मक मानला जातो. शेवटीं या अशा चराचर विश्वाचा जो यांच्यांतून व्यापून असणाऱ्या अस्तिभातिप्रियत्वानें अनुभव येतो, तो ब्रह्मरूपाच्या सच्चिदानंदत्वाचा अनुभव आहे म्हणून सच्चिदानंद या तीन लक्षणांत सर्वांचा उपसंहार करून जीवेशाचीं तत्त्वपदाचीं दोन टोकें, असिपद लक्ष्यब्रह्माच्या ठिकाणीं मिळवून **सर्वमिदमहं च ब्रह्मैव** । सर्व हें व मी चिन्मात्र आनंदघन असें अद्वितीय ब्रह्म आहों अशा अर्थाची ब्रह्मगांठ दिली जाते.

अद्वैत तत्त्वाचाच इथे आविष्कार आहे. पाषाणाच्या मूर्तीत त्या त्या विशिष्ट आकाराच्या रूपानें जगत्कारण सगुणब्रह्माचें उक्त विधीनें व वेदोक्त मंत्रानें त्या मूर्तींत जसें आवाहन करावयाचें त्याप्रमाणें जानव्यांत करावयाचें असतें. गायत्रीनें जो ब्रह्मैक्याचा बोध केलेला असतो त्याची स्मृति या जानव्याच्या धारणानें, डोळ्यापुढच्या चित्रानें त्या व्यक्तीची स्मृति आल्याप्रमाणें, पिंडब्रह्मांडाच्या व जीवेश्वराच्या ऐक्याची स्मृति राहण्याकरितां ब्राह्मणांना अशा विधानाची एक उपासना सांगितली आहे. वेदवाक्यांत, त्या परमात्म्याच्या आज्ञेंत अथवा ईशकृपाप्रेरित महात्म्यांच्या उपदेशांत, विधानांत एक विलक्षण दिव्य सामर्थ्य असतें व तें त्याप्रमाणें निष्ठेनें वागणाऱ्याच्या अनुभवासहि येतें. हें सर्व असें जाणल्यानंतर कोण आपल्या हिताच्या दृष्टीनें जानवें गळ्यांतून काढून टाकील ? मनुष्यापेक्षां देवाला आणि ऋषिमुनींना अधिक महत्व देणारा असा कोण विवेकी कोणातरी नास्तिक माणसांचें ऐकून जानव्याचा त्याग करील ?

## व्यसनें राष्ट्रहानिकारक

**गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः** । एकानें केलें म्हणून दुसराहि करतो. त्यांतूनहि चांगल्याचें अनुकरण फार श्रमाचें असतें म्हणून तिकडे मन वळत नाहीं. वाईटाचें अनुकरण सोपें म्हणून वाईट फार लवकर चिकटतें. वाईट फार लवकर चिकटतें व तें चांगल्यापेक्षां अधिक दृढमूत होतें हें व्यसनाच्या उदाहरणानें जाणतां येईल. जेवण नसेल तरी हरकत नाहीं, पण एक पेलाभर चहा असावा असें सांगणारी मंडळी कितीतरी आढळतील. ब्राह्मणेतरांच्या उपहारगृहांतील चहा पिऊं नये म्हणून मनांत वाटत असलें तरी

चहाची तल्लफ सहन न झाल्यामुळें इकडे तिकडे बघून ही मंडळी चटकन चहा पिऊन येतील. व्यसन हें असें करतें. व्यसनाधीन जीवनाचें हें असें असतें.

"Where is the reformer's moral courage and I answer drowned in the tea-cup. "—' सुधारकांचें व सुशिक्षितांचें नैतिक धैर्य कोठें नाहींसें झालें ' म्हणून मला कोणी विचारल्यास ' तें चहाच्या कपांत बुडून मेलें ' म्हणून मी उत्तर देईन, असें डॉ. ए. ओ. ह्यूमनें म्हटलें आहे. हें बारीकसें व्यसन इतकें असें करवतें तर याहून मोठमोठीं व्यसनें किती पापाकडे ओढत असतील, अधर्म शिकवीत असतील याची कल्पना करावी. या दृष्टीनें व्यसनाधीन मनुष्य केव्हां काय करील याचा पत्ता लागणार नाहीं असें वाटतें. तो विश्वसनीय ठरत नाहीं. अलीकडे राष्ट्रांतून चहा, कॉफी, विडी, सिगारेट हीं सामान्य व्यसनें तर इतकी बोकाळलीं आहेत कीं, सात–आठ वर्षांचें पोरसुद्धां यांपैकीं कोणत्याना कोणत्या व्यसनानें पछाडलेलेंच असतें. गांजा–दारूनींसुद्धां इतका नसला तरी राष्ट्रावर बराच पगडा बसविल्यासारख्या दिसतो. दारूबंदी जरी सरकारनें केली असली तरी चोरून मारून मागच्याहिपेक्षां आतां खेडोपाडीं याचें व्यसन अधिकच होत चाललें आहे, असें सांगतात. चोरबाजार फार वाढल्याची ओरड तर सर्वत्र आहे. फारच हें अनिष्ट आहे. सुरापान तर सप्तमहापातकांपैकीं एक मोठें पातक मानलें गेलें आहे. खेडोपाड्याच्या कांहीं ब्राह्मणांतूनहि हें पसरत चाललेलें पाहून मनाला फारच वाईट वाटतें. इतर समाजाला सुधारणाऱ्या या जातींतूनहि अशा व्यसनांचा व अकृत्यांचा प्रवेश होत असलेला पाहून पुढच्या अनिष्ट भविष्याचीं कारणें आतांच एकदम नष्ट व्हावींत म्हणून देवाची अनन्यतेनें प्रार्थना करावी असें वाटतें. येथें एका हिंदी कवीचें वाक्य आठवतें. " मद्य, मांस, चाय, धूम्र, आफीम जो जौ प्राणी खाय। नेमधर्म यद्यपि किये सबैं रसातळ जाय ॥ "

ज्याच्यामुळें मनुष्याची शारीरिक, बौद्धिक व आर्थिक हानी होते, इहपर प्रगति खुंटते, समाजांत असलेलाहि गौरव नष्ट होतो, अशा जीवनाला आवश्यक असणाऱ्या मादक, चटकदार व मोहक पदार्थांची घातुक संवय त्या त्या व्यसनी माणसांच्या सहवासानें मुद्दाम जडवून घेऊन हालअपेष्टा सोसणें व विनाकारण दुःख भोगणें म्हणजे व्यसन. इथे ओघानें कबिराचें वाक्य आठवतें. " गांजादारू मत पीयारो अक्कल गुंग होती है। अपना पदरका दाम खरचकर शिरपे जूती आती है ॥ " व्यसनाच्या अनिष्टतेवर हीं वाक्यें

प्रकाश पाडल्याशिवाय राहाणार नाहींत. व्यसन वाईट म्हणून अनुभवानें पटलें तरी तें पटकन् सोडणेंहि अगदीं जड जातें इतका त्याचा पगडा बसतो.

" Bad habit is first a caller than a guest and at last a master."

वाईट संवय प्रथम प्रथम निमंत्रण देऊन गौरव करून मोठ्या शिताफीनें आपल्याकडे ओढते. नंतर घरीं आलेल्या पाहुण्याप्रमाणें मोठ्या मान्यतेचा पाहुणचार स्वीकारते व हळू हळू आपल्याला वश करून शेवटीं घरच्या मालकाप्रमाणें आपला अधिकार गाजवूं लागते.

या व्यसनाच्या बाबतींतहि राष्ट्राच्या हिताकरितां विचार करणें अति अवश्य झालें आहे. फायद्याचा धंदा म्हणून चहा-कॉफीचीं दुकानें व विडीचे कारखाने आतां झपाट्यानें अधिकाधिक वाढत आहेत, त्याच्या प्रचाराचे अधिकाधिक प्रयत्न होत आहेत. त्यामुळें राष्ट्राचें किती नुकसान होतें याचा त्यांनीं विचार करावा. आपल्या एका कुटुंबाकरितां राष्ट्राला त्यांनीं व्यसनांत घालूं नये.

## सोळा संस्कार

मनुष्यांचे अनिष्ट संस्कार व अनिष्ट गुण जाऊन सर्वतोपरी त्याला व इतरांना त्याची उपयुक्तता अधिक होण्यासाठीं त्यावर संस्कार करावयाचे असतात. संस्काराचा उद्देश हाच आहे. ऐहिक तशा पारमार्थिक उन्नतीकरितांच हे संस्कार करावयाचे असतात. आर्य संस्कृतींत याच दृष्टीनें सोळा संस्कार सांगितले आहेत. गर्भाधानापासून प्रारंभ होऊन अंत्येष्टीपर्यंत या सोळा संस्कारांची व्याप्ति आहे. सोळा संस्कार कोणते तें आपण पाहूं.

( १ ) गर्भाधान, ( २ ) पुंसवन, ( ३ ) सीमन्तोन्नयन, ( ४ ) जातकर्म, ( ५ ) नामकरण, ( ६ ) विष्क्रमण, ( ७ ) अन्नप्राशन, ( ८ ) चूडाकर्म आणि कर्णवेध, ( ९ ) उपनयन, ( १० ) मेधाजनन, ( ११ ) महानाम्नी, ( १२ ) महाव्रत, ( १३ ) उपनिपत्‌व्रत, ( १४ ) समावर्तन, ( १५ ) विवाह, ( १६ ) अंतेष्टि. सकळ वैगुण्य दूर करून अखिल उपयुक्तता जीवांतून उत्पन्न करण्याकरितां त्याचा इहपरमार्ग अत्यंत पवित्र व अतिशय सोज्वळ करण्याकरितां, भोंवतालच्या वातावरणाच्या शुद्धीकरितां, जीवाला दैवी साहाय्य मिळण्याकरितां जीवाचें देहमन पवित्र होण्याकरितांच हे संस्कार आहेत, हें प्रत्येकानें लक्षांत ठेवावें. अलीकडे इकडे समाजाचें फारच दुर्लक्ष होत आहे.

देहाची शुद्धि होऊन त्याचा मनाच्या पवित्रतेकरितांहि उपयोग होईल व देवतांची कृपाहि होईल, अशा द्रव्याचा या संस्कारांत उपयोग केला जातो. याच दृष्टीनें बाह्य नियमांची यांत योजना केलेली असते. सर्वांत मुख्य म्हणजे वेदमंत्रांचा यांत उपयोग केला जातो. या दिव्य वेदमंत्रांच्या स्वरसहित उच्चारानें वातावरण दिव्य होतें, पवित्र होतें, मंगलमय होतें.

पुंसवन संकल्पच पाहाना. यांत किती उदात्त हेतु दिसून येतो. "**देशकालादिकीर्तनान्ते ममास्यां भार्यायामुत्पत्स्यमानगर्भस्य गार्भिकवैजिकदोषपरिहारपुंरुपतासिद्धिज्ञानोदयप्रतिरोधपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पुंसवनमनवलोभनं ममास्यां भार्यायां गर्भाभिवृद्धिपरिपंथिपिशितरुधिरप्रिय ऽ लक्ष्मीभूतराक्षसीगणदूरनिरसनक्षेमसकलसौभाग्यनिदानमहालक्ष्मीसमावेशनद्वारा...**"—इत्यादि यांत काय आलें नाहीं ? बीजगत गर्भगत दोषांची निवृत्ति, ज्ञानोदयाच्या प्रतिबंधांची निवृत्ति, परमेश्वरप्रीति, दुष्ट ग्रहांची व शक्तींची निवृत्ति, सकल सौभाग्यनिदान, महालक्ष्मीची प्राप्ति इतके सर्व उद्देश यांत आहेत.

[१] गर्भाधान—**गर्भाधानं द्विजः कुर्यादृतौ प्रथम एव हि । चतुर्थदिवसादूर्ध्वं पुत्रार्थी दिवसे समे ॥** (लघु आश्वलायन ३।१). [२] पुंसवन—**कुर्यात्पुंसवनं मासि तृतीयेऽनवलोभनम् । सीमन्तोन्नयनं चैव चतुर्थे मासि तद्भवेत् ॥** ( ४।१ ). [३] जातकर्म—**जाते सुते पिता स्नायान्नांदीश्राद्धं विधानतः । जातकर्म ततः कुर्यादैहिकामुष्मिकप्रदम् ॥** ( ५।१ ). [ ४ ] नामकरण—**अहन्येकादशे कुर्यान्नामकर्म विधानतः । कृत्वाभ्युदयिकं श्राद्धं द्वादशे षोडशेऽपि वा ॥** (६।१). [५] निष्क्रमण—**मासे चैवं चतुर्थे तु कुर्यान्निष्क्रमणं शिशोः । कृत्वाऽऽभ्युदयिकं श्राद्धमादायाङ्के शिशुं पिता ॥** ( ७।१ ). [ ६ ] अन्नप्राशन—**षष्ठेन्नप्राशनं कुर्यान्मासे पुंस्यष्टमेऽथवा । दशमे द्वादशे मासि केचिदेवं वदन्ति हि ॥** (८।१). [७] चौलकर्म—**तृतीये वत्सरे चौलं बालकस्य विधीयते । शुभे चैव दिने मासि विहितं चोत्तरायणे ॥** ( ९।१ ). [ ८ ] उपनयन—**ब्राह्मणस्याष्टमे वर्षे विहितं चोपनायनम् । सप्तमेन्वाथवा कुर्यात्सर्वाचार्यमतं भवेत् ॥** ( १०।१ ). [ ९ ] महानाम्न्यादि व्रतत्रय—**महानाम्नीव्रतं कुर्यात्पूर्णाब्दे चोत्तरायणे । शुक्लपक्षे शुभेह्नि स्यादुपनायनवच्च हि ॥ महाव्रतं द्वितीये तु भवेत्तत्पूर्ववच्च हि । संपूर्णे च तृतीयेऽब्दे तथा चोपनिषद्व्रतम् ॥** ( ११।१-२ ). [१०] उपाकर्म—

**श्रवणे स्यादुपाकर्म हस्ते वा श्रावणस्य तु। नो चेद्भाद्रपदे वाऽपि कुर्याच्छिष्यैः गुरुः सह ॥** ( १२।१ ). [११] उत्सर्जन—**उत्सर्गं च द्विजः कुर्यात्षण्मास इदमादितः। दार्ढ्यार्थं च हितं चैतदधीतानां च छंदसाम् ॥** (१३।१). [१२] गोदान—**गोदानं षोडशे वर्षे कुर्यात्तदुदगायने। केचिद्विवाहकाले च शुभे मासि वदन्ति हि ॥** ( १४।१ ). [१३] विवाह—**वेदानधीत्य वेदौ वा वेदं वापि यथाक्रमम्। अविप्लुतब्रह्मचर्यो गृहस्थाश्रममावसेत् ॥** ( मनु. ३।२ ). **गुरुणानुमतः स्नात्वा समावृत्तो...कुलजां सुमुखीं स्वाङ्गीं सुवासां च मनोहराम्। सुनेमां सुभगां कन्यां निरीक्ष्य वरयेद्बुधः॥** (लघु आश्व. १५।२). **स्नातकाय सुशीलाय कुलोत्तमभवाय च। दद्याद्वेदविदे कन्यामुचिताय वराय च** ( १५।३ ).

अशुद्ध मनाच्या योगें दिसून येणारी अनीति व अनर्थ कुठेहि दिसून येऊं नयेत व असूं नयेत म्हणून जन्मदात्या मातापित्यांना त्यांच्याहि जन्मापूर्वींपासून शुद्ध करीत. त्याच्या मुलाच्या जन्मापूर्वींच पुन्हां त्यांना गर्भादान, पुंसवन इत्यादि संस्कारांनीं पवित्र करून जन्माला येणाऱ्याला संस्कारानें अकृत्यापासून, अनीतिपासून, अधर्मापासून व अनर्थापासून वारण्याचा आर्य संस्कृति किती पूर्वींपासूनच प्रयत्न करते, हें यावरून स्पष्ट होईल.

## प्रवृत्ति–निवृत्तिरूपी सगुणनिर्गुण उपासना

वैदिक आर्य धर्माच्या उन्नत संस्कृतीचे प्रवृत्ति व निवृत्ति असे दोन मार्ग आहेत. **द्वावेव वेदोक्तौ मार्गौ प्रवृत्तिश्च निवृत्तिश्चेति** ॥ हे परमात्म्याचे सगुणनिर्गुणात्मक दोन उपासनामार्ग होत. सगुण परमात्म्यांतच विश्वप्रपंचाचा अथवा आपल्या बहुत्वाचा प्रवृत्तिधर्म दिसून येत असल्यामुळें हा प्रवृत्तिधर्म चालविणें, गृहस्थाश्रम स्वीकारणें, स्त्रीपुरुष-एकात्म भावनेनें, पुत्रेच्छेनें असणें, धन संपादन करून त्याचा कुटुंबपोषणाकरितां, देवपितृकार्याकरितां, अतिथिसेवेकरितां, गोरगरिबांकरितां उपयोग करणें, स्ववर्णाप्रमाणें वागून आत्मतृप्तीचें दिव्य जीवन चालविणें, परमात्म्याचें एकत्व समजून घेऊन सुखसंतोषानें नांदणें, इह आणि पर अशा संसार व मोक्ष यांना कारणीभूत असणारें कर्म उपासना ज्ञानादि साधनांनीं करीत राहणें हा प्रवृत्तिमार्ग. **प्रवृत्तिलक्षणं कर्म**।—ही प्रवृत्ति कर्मपर आहे. या प्रवृत्तीचा संकल्प व तत्कर्म सगुण परमात्म्यांतच दिसून येत असल्यामुळें एतदर्थ कर्म करणें त्या सगुण

परमात्म्याचीच उपासना आहे. परमात्म्याचीहि सगुणोपासना आहे. **द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चामूर्तं च** ।—सगुण व निर्गुण अशीं परमात्म्याचीं दोन रूपें आहेत, सगुण साकार रूपानेंच जगदुत्पत्तीचें कार्य म्हणजेच प्रवृत्ति-धर्मकर्म होतें. **आत्मा वा इदमग्र आसीत्पुरुषविधः** । ( बृ. ) इत्यादि श्रुति-वाक्यें याला प्रमाण होत. **हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत्** ।—या हिरण्यगर्भापासूनच जगाची उत्पत्ति झाली; हाच प्रवृत्तिमार्ग. हें गृहस्थाश्रमाचें मूळ. या सृष्टि करण्याच्या संकल्पाचा, पुत्रेच्छेचा व तदंगभूत सतीपतीच्या साऱ्या संसाराचाच हा गृहस्थाश्रम आहे. ही परमात्म्याची **सगुणोपासना** होते.

स्त्रीची इच्छा, धनाची इच्छा, पुत्राची इच्छा समूळ नष्ट होऊन देहवासना, शास्त्रवासना, लोकवासना जाऊन मायाऽविद्योपाधि, जिवेशोपाधि यांनीं रहित प्रवृत्तिसंकल्पशून्य असें तें निष्प्रपंच, निर्विकल्प, चिदानन्द परमात्मस्वरूप मीच म्हणून स्वरूपाच्या ज्ञानानें राहणें, या आत्मस्फूर्तीचें आपल्यासह या सर्व प्रपंचाचें केवळ आनंदघन परमात्मस्वरूपच एक सत्य-स्वरूप आहे असें जाणून त्या स्थितीनेंच सदा स्वमात्र राहणें, सर्वसम होणें, निष्कामतेनें या सत्यस्थितीस तत्त्वोपदेशद्वारां उजळवीत आनंदमात्र असणें हीच **निर्गुणोपासना** होय.

## आर्य संस्कृति हा मोक्षप्राण होय

आर्य संस्कृतींत जीवनधर्म व मोक्षधर्म असे दोन प्रकारचे धर्म आहेत. जीवनधर्मांत थोड्याफार फरकानें प्रवृत्तिमार्ग येतो व मोक्षधर्मांत थोड्याफार फरकानें निवृत्तिमार्ग येतो. आर्य संस्कृतींत **धर्मार्थकाममोक्षेषु मोक्ष एव परम-पुरुषार्थः तस्य नित्यत्वात्** ।—धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांत त्याच्या नित्यत्वामुळें मोक्षच एक परमपुरुषार्थ म्हणून म्हटला आहे. जीव-ब्रह्मैक्यच एक आर्य संस्कृतीचा अंतिम सिद्धान्त आहे. जीवनधर्मांत सामाजिक विकासाला वाव मिळतो, प्रवृत्तिधर्माला प्रवेश मिळतो. हा अभ्युदयाचा मार्ग आहे. पूर्वजन्माच्या गुणकर्मविभागाप्रमाणें झालेल्या ईशसंकल्पानुसार वर्णविभा-गांचा अन्तर्भाव या अभ्युदयांतच होतो. देशकालानुसार परस्परांशीं वागण्याचे आचार-नियम, सामाजिक जीवनक्रम या अभ्युदयांतच मोडतात. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास हे चार आश्रम जीवनाच्या भिन्न अवस्थाधर्मांत

अन्तर्भूत होऊन वर्णव्यवस्था ही सामाजिक जीवनाचा विकास दाखविते व आश्रमव्यवस्था वैयक्तिक जीवनाचा विकास दाखविते. परमात्मप्राप्तीच्या एका ध्येयबिंदूंत या सर्व वर्णाश्रमधर्मांचा अन्तर्भाव होतो. परमात्मप्राप्तीच्या एका सूत्रांत वर्णाश्रमधर्म ओवले गेले आहेत. आर्य संस्कृति ही मोक्षपाणि व मोक्ष-प्राण आहे. आर्य संस्कृति मोक्षाचें ध्येय सोडून कोणत्याहि कार्याला हात घालीत नाहीं. अनेक जलाशयांतून एका जलतत्त्वाचीच व्याप्ति डोळसाला दिसत असल्याप्रमाणें या आर्य संस्कृतीला अनेक नामरूपांत, अनेक भिन्न भिन्न धर्मांत, सर्व विविधतेंत, अखिल भेदांत, अखिल व्यवहारांत एक आनंद-घन परमात्मतत्त्वच दिसून येतें.

परमात्मविश्वसित वेदाप्रमाणें, वेदानुसारी स्मृतींप्रमाणें, आदर्शभूत व्यक्तीच्या आदेशाप्रमाणें, स्वस्ववर्णाश्रमोक्त कर्मउपासना आर्य संस्कृति उपदेशिते. आत्मानात्मविवेकानें परिशुद्ध झालेल्या मनःतृप्तिकर विचारांचा आर्य-संस्कृति प्रचार करते. निरतिशय सुखप्राप्तीकरितां नेमलेल्या आदर्श मानवी जीवन-क्रमाचा आर्य संस्कृतींत अन्तर्भाव होतो. जगज्जनक परमात्म्यानें उप-देशिलेल्या कल्याणकर प्रवृत्तिनिवृत्तिधर्मांचे अति प्राचीन संस्कार या आर्य संस्कृतींत आहेत.

## गोरक्षण अपरिहार्य

**मातरः सर्वभूतानां गावः सर्वसुखप्रदाः ।** गायी ह्या राष्ट्राच्या माताच होत. सर्व बालकांच्या संगोपनास आणि संवर्धनास माताच कारणीभूत असल्याप्रमाणें राष्ट्रांतील सर्व लोकांच्या संवर्धनास व संगोपनास गायीच कारणीभूत आहेत. मातेप्रमाणेंच सर्वांचें पोषण समदृष्टीनें या गायीच करीत असतात. आपलें स्तन्य देऊन बालकांना वाढ-विणाऱ्या आईप्रमाणेंच गायी सर्वसुखप्रदच आहेत. आई आपल्या मुलांचेंच मात्र पोषण करते पण ही गोमाता आबालवृद्धांना स्वपरभाव न ठेवितां मरे-पर्यंत, मग तो वध करणारा असो अथवा संरक्षण करणारा असो, दोघांनाहि तितक्याच वात्सल्यानें आपलें दूध देते. या दृष्टीनें विचार केला असतां गोमातेचें स्थान सर्वांपेक्षांहि अत्यंत उच्च आहे, असें कोणास वाटणार नाहीं ? गोवध म्हणजे साक्षात् आईचाच वध नव्हे का ? दुभती असो वा नसो, गाईचें रक्षण कृतज्ञ होऊन मातृभावनेनें कां करूं नये ? गायी या हिंदु

लोकांनाच मात्र आपलें दूध देऊन बाकीच्या महमदीय, ईसायी संततीला दूध देत नाहींत असें असतें तर मात्र गोवधबंदीची चळवळ सांप्रदायिक होय, असें आजच्या शासनकर्त्यांना मानण्यास जागा होती. **यद्गृहे दुःखिता गावः स याति नरकं नरः ।** ——ज्याच्या घरीं गोमाता अत्यंत दुःखानें डोळ्यांतून पाणी काढते तो मनुष्य नरकास जातो, हें वचन कोण बरें दृष्टी-आड करील ?

**गवां सेवा तु कर्तव्या गृहस्थैः पुण्यलिप्सुभिः ।**
**गवां सेवापरो यस्तु तस्य श्रीवर्धतेऽचिरात् ॥**

——पुण्याची व हिताची अपेक्षा असणाऱ्या सर्व गृहस्थांनीं गायीची सेवा मनोभावानें केली पाहिजे. गोसेवापर असणाऱ्याचें वैभव सर्वतोपरी वृद्धिंगत होतें. गायी असलेल्या मनुष्याच्या घरचीं बालकें आरोग्यवान् व गुटगुटीत असतात. गोसेवापर असणाऱ्यांची संतती, संपत्ति चित्ताकर्षक तशीच चित्ताल्हादक होते. शेणखतानें शेतांतील पीकहि उत्तम येऊन घरांत धान्याची समृद्धि होतें. धान्यसमृद्धीनें धनसमृद्धीहि होतें. कुटुंबांतील सर्व माणसें धष्ट-पुष्ट होऊन सुखी होतात; आपल्या बुद्धीनें व आरोग्यवैभवानें सर्वांनाहि दर्शनानंद निर्माण करतात. मातेच्या सेवेनें पुण्यप्राप्ति झाल्याप्रमाणें गोमातेच्या सेवेनें पुण्यप्राप्ति होणार नाहीं असें कोण बरें म्हणू शकेल ? सर्व देवतांचें वासस्थान असणाऱ्या या गोमातेच्या सेवेपेक्षां पुण्यप्रद असें दुसरें कोणतें साधन आहे ? **परोपकारः पुण्याय** ।—परोपकारच पुण्य असें असल्यामुळें पुण्यवंताच्या ठिकाणीं अधिक अंशांनीं परमात्म्याचें वास्तव्य असतें. असें झाल्यास गायींत परमात्म्याचें वास्तव्य नाहीं असें कोण म्हणेल ? परमात्म्याच्या सान्निध्यांत सर्व देवतांचें वास्तव्य असल्याप्रमाणें या गायीच्या ठिकाणीं सर्व देवतांचें वास्तव्य असतें असें वर्णन आहे. गायीसारखी पूज्य व परोपकारी वस्तु दुसरी कोणती आहे ? ती जिवंत असतां तिच्या दुधाचा उपयोग होऊन गोमूत्र व गोमय हींहि उपयोगास येतात. त्यांचा देह पडल्या-नंतरहि त्यांचें चर्म, हाडें व शिंगें यांच्यापासून आपल्या जीवनोपयोगी असे पदार्थ बनवितां येतात. स्वतः गवत चारा खाऊन जगावर अशा तऱ्हेच्या निःस्वार्थतेनें उपकार करणाऱ्या या गायींहून दुसरे कोण अधिक हितकारी आप्त आहेत ?

**तीर्थस्नानेषु यत् पुण्यं यत् पुण्यं विप्रभोजने ।**
**यत्पुण्यं च महादाने यत् पुण्यं हरिसेवने ॥**
**सर्वव्रतोपवासेषु सर्वेष्वेव तपस्सु च ।**
**भूमिपर्यटने यस्तु सत्यवाक्येषु यद्भवेत् ॥**
**तत् पुण्यं प्राप्यते सद्यः केवलं धेनुसेवया ।**

—तीर्थस्नान, ब्राह्मणभोजन, महादान, हरिसेवा, सर्वव्रतोपवास, सर्वतप, भूप्रदक्षिणा, सत्यवाक् यांच्या योगानें जें पुण्य मिळतें तेंच पुण्य एक गोसेवा केल्यानें मनुष्यास प्राप्त होतें.

**पृष्ठे ब्रह्मा गले विष्णुर्मुखे रुद्रः प्रतिष्ठितः ।**
**मध्ये देवगणाः सर्वे रोमकूपे महर्षयः ॥**
**नागाः पुच्छे खुराग्रेषु ये चाष्टौ कुलपर्वताः ।**
**मूत्रे गंगादयो नद्यो नेत्रयोः शशिभास्करौ ॥**
**येन यस्यास्तनौ वेदाः सा धेनुः वरदास्तु मे ॥**

—गाईच्या पृष्ठभागीं ब्रह्मदेव, गळ्याच्या ठिकाणीं विष्णु, मुखाचे ठिकाणीं रुद्र, मध्यभागीं देवगण, रोमछिद्रांच्या ठिकाणीं महर्षि,पुच्छामध्यें नाग, खुरांच्या ठिकाणीं अष्टकुलपर्वत, मूत्राच्या ठिकाणीं गंगादि पुण्यनद्या, नेत्रांच्या ठिकाणीं सूर्यचंद्र व स्तनांच्या ठिकाणीं वेद असणारी गाय आम्हांला वरदाई होवो. अशा युक्त वर्णनाच्या गोमातेची ही प्रार्थना आहे. अशा गोमातेच्या वधाचा अर्थ व परिणाम काय होतो हें ज्यांचें त्यांनींच जाणावें. **अघ्न्या इति गवां नाम क एनां हन्तुमर्हति ।**—‘ अघ्न्या ’ म्हणजे अवध्य हें गाईचें नांव आहे. नांवावरूनच वध करण्यास अयोग्य अशा या गोमातेचा वध करण्यास कोण तयार होईल ? भारतीय संस्कृतीचें गाय एक मुख्य अंग आहे.

**त्वं माता सर्वदेवानां त्वं च यज्ञस्य कारणम् ।**
**त्वं तीर्थं सर्वतीर्थानां नमस्तेऽस्तु सदाऽनघे ॥**

( स्कंध. ब्रह्म. धर्मारण्य १०।१८ )

—हे विमले, तूं मनुष्यांचीच एक माता नव्हेस, तर तूं समस्त देवतांचीच माता आहेस. तूं यज्ञांना कारण आहेस, सर्व तीर्थांचेंहि तीर्थ तूं आहेस. तुला माझा अखंड नमस्कार असो. अशी गाईची स्तुति केली आहे. या श्लोकावरून गाईचें महत्त्व कळून येईल. **गावो यज्ञस्य हि फलं गोषु यज्ञाः प्रतिष्ठिताः।**

( महाभारत )—गोमाता हीच यज्ञफलरूप होय. गाईच्या ठिकाणींच सर्व यज्ञ प्रतिष्ठित आहेत. यज्ञांना अवश्य लागणारें तूप गाईपासूनच मिळवावें लागतें ना ? स्थळशुद्धीकरितां, पवित्र वातावरण निर्माण करण्याकरितां, आरोग्याकरितां गोमयानें सारविण्याची पद्धत आहे. देहशुद्धीकरितां, मनःशुद्धीकरितां प्रायश्चित्त-रूपानें पंचगव्य प्राशनाच्या विधिहि आर्यांमध्यें आहे. अशा रीतीनें सर्वतोपरी उपयुक्त अशा गाईंचा वध म्हणजे जीवनाला अत्यावश्यक अशा वस्तूचाच नाश करणें होय.

भारतांत गोवध करणाऱ्यांची संख्या जास्त आहे. गोमांसाचा उपयोग कांहीं लोकांनाच मात्र होतो, तर गोदुग्धाचा उपयोग भारतवर्षाच्या आबाल-वृद्धांना, रोगी–निरोगी यांना, शक्त–अशक्तांना, रक्षकांना, भक्षकांना, गरीब–श्रीमंतांना सर्वांनाच होतो. बहुजनहित साधण्याचाच राज्यशासनाचा उद्देश असतो. गोरक्षण सर्वांनाहि आवश्यक आहे. हें मानवजातीचेंच धन आणि जगाचेंच जीवन होय. महाभारताच्या अनुशासन पर्वांत "**गोभिस्तुल्यं न पश्यामि ।**" हें वचन च्यवन महर्षींनीं नहुष राजाला सांगितलें तें किती सार्थ आहे. "**यद् यद् विभूतिमत् सत्वं ।**" या भगवंताच्या वचनाप्रमाणें आर्य गाईंच्या ठिकाणीं देवताबुद्धि ठेवून त्यांच्या सेवेनें आपली कृतज्ञता व्यक्त करतात व स्वतःला कृतार्थ मानितात. विश्वांतील सर्व लोकांच्या ठिकाणींहि ही कृतज्ञता व कृतार्थता असावयाला पाहिजे ना ?

विशेषतः भारताचें कृषिजीवन हें गोप्राण आहे. गाय ही स्वतः-पुरतीच उपकार करते असें नसून आपल्या संततीकडूनहि उपकार करविते; कृषीला कारण होऊन जीवनाला आधार होते. परधर्मीयांच्या कारकीर्दीच्या वेळीं गोवध हें एक अर्थोत्पादनाचें साधन म्हणून मानलें गेलें असलें तरीहि हें निंद्य अर्थोत्पादनाचें साधन सर्वहितप्रधान असणाऱ्या स्वराज्यांत, या रामराज्यांत अजून कां बंद झालें नाहीं ? गोवधबंदी अद्यापहि कां झाली नाहीं म्हणून बहुजन-समाजाला विचार पडला आहे. मांसाशनानें मेदोवृद्धि होते तर **सद्यः शुक्रकरं पयः।**—गोदुग्धानें तत्काळ वीर्योत्पादन होतें. देहाच्या जीवनास सर्व धातूंमध्यें सारभूत असणाऱ्या, जिवंत राहाण्यास सर्वथैव कारण असणाऱ्या वीर्याची उत्पत्ति दुधानेंच होते. असें हें शुक्रोत्पादक गोदुग्ध राष्ट्राच्या आरोग्यभाग्यास, वीर्यवत्तर कार्यास, बुद्धिमत्तेस इतकें कारण असतां राष्ट्रहित साधूं इच्छिणाऱ्या शासनकर्त्यांनीं आतांपर्यंत गोवध बंद न करणें योग्य कसें होईल ?

हिंसा म्हणजे दुःख. तें स्वतःविषयीं व दुसऱ्याविषयींहि अनिष्टच होय. स्वतःची हिंसा दुसऱ्यांनीं केली तरी, स्वतःचें मांस दुसऱ्यांनीं खाल्लें तरी ते स्वतः हर्षित होत असल्यास मात्र त्यांनीं गोवध करावा. आपल्या देहरक्षणाची आशा असणाऱ्या मनुष्याला कोणत्याहि तऱ्हेनें परहिंसा करण्याचा हक्क पोहोंचत नाहीं. ही सर्वसामान्य नीति होय. या दृष्टीनें एक गोवधच निषिद्ध नसून सर्व प्राण्यांचा वधहि निषिद्ध आहे. **न हिंस्यात् सर्वभूतानि** ।; **अहिंसा परमो धर्मः**।अशीं श्रुतिस्मृतींचीं वचनें आहेत. सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं, कोठेंहि, सर्वत्र एक आनंदच पसरविण्याकरितां हीं श्रुतिस्मृतींचीं वाक्यें हिंसेचा निषेध करून अहिंसा प्रस्थापित आहेत. **आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन । सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः** ॥ ( गी. ६।३२ )—'स्वतः-प्रमाणेंच दुसऱ्याचें दुःख समजणाराच परमयोगी ' असें भगवंतानें आपल्या मुखानें प्रगट केलें आहे. **आत्मैवेदं सर्वं । अहमेवेदं सर्वं** । असें श्रुति सांगत आहे. सर्वत्र, सर्व ठिकाणीं आपलीच व्याप्ति आहे असा याचा अर्थ. दुसऱ्याची हिंसा म्हणजे स्वतःचीच हिंसा. त्यामुळें ' आत्मौपम्येन ' आपल्याप्रमाणेंच दुसऱ्याला पाहावें असें म्हटलें आहे. अहिंसेंत अशीहि एक उन्नत आत्मीय दृष्टि आहे. सर्वात्मरूपाच्या साक्षात्काराकरितांच अहिंसा सांगितली आहे. **एष त आत्मा सर्वांतरः** ।—हा तुझा आत्माच सर्वांतरात्मा आहे, तुझें आत्म-रूपच–तूंच, सर्वांतरीं व्यापून आहेस, सर्वहृदयनिवासी तूंच आहेस, दुसऱ्याचें सुखदुःख म्हणचे तुझेंच सुखदुःख होय. हा उच्च तत्त्वोपदेश आर्यांच्या या अहिंसा तत्त्वांत स्थित आहे. **आनंद आत्मा** ।–आत्मस्वरूप केवळ आनंदरूपच आहे. तेंच झालेल्या तुला, परहिंसेनें, मांसादि अमेध्य आहारानें काय लाभावयाचें आहे ? आनंदमात्रतेच्या तुझ्या या स्वरूपांत हिंसात्मक हें दुःख कां उगीच उभें करीत आहेस ? हीं खऱ्या हिताचीं वचनें म्हणजे केवळ आनंदप्राप्तीचींच साधनें होत. हा एकात्मभाव आहे. हा आत्मसाक्षात्कार आहे. अहिंसेचें हें तत्त्व किती उठावदार आहे !

## हरिजनांचा जन्म

**स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबँश्च गुरोस्तल्पमावसन्ब्रह्महा चैते पतन्ति चत्वारः पंचमश्चाऽऽचरँस्तैरिति** ॥ ( छां. ५–१०–९ )—सुवर्णाची चोरी करणारा, दारू पिणारा, गुरुस्त्रीगमन करणारा, ब्रह्महत्या करणारा

असे चार प्रकारचे लोक पतित होतात. यांचा जन्म हरिजनांत होतो. यांना अस्पृश्य असें म्हणतात. यांच्या संसर्गीत असणारा '**तत्संसर्गी च पंचमः ।**' त्यांच्याप्रमाणेंच होतो. पांचव्यांत याची गणना होते. संसर्गाचा परिणाम हा त्यामुळेंच '**न संवसेच्च पतितैः ।**' (मनु.)—पतितांचा संसर्ग करूं नये म्हणून शास्त्र आहे.

**अभक्ष्यपरिहारश्च संसर्गश्चाप्यनिंदितैः । आचारेषु व्यवस्थानं शौच-मित्यभिधीयते ॥**—अभक्ष्याचा त्याग, अनिंद्य लोकांचा संसर्ग, वेदशास्त्रविहित व वर्णाश्रमोक्त धर्मकर्माचें अनुष्ठान, न्यायनीतिपर सदाचार यालाच श्रौतकर्म असें म्हणतात. यानेंच पावित्र्याचें रक्षण होतें. हेंच पावित्र्य व हीच शुद्धि होय.

**अस्पृश्यतेचें कारण**

**संसर्गतो दोषगुणा भवन्ति ।**—दुर्जनांनीं आपण होऊन सज्जनांच्या संगतीस येऊन त्यांचा सदाचार आपल्या अंगीं बाणण्याकरितां त्यांच्याकडे पूज्य भावनेनें पाहून व त्यांची सेवा करून त्यांच्या उपदेशाप्रमाणें वागण्याचा प्रयत्न केल्यास ते दुर्जन क्रमेण सज्जन होतात, गुणी होतात. या उलट सज्जनांनीं आपण होऊन दुर्जनांचा सहवास पत्करून त्यांची सेवा केली असतां त्यांच्या-प्रमाणें अथवा त्यांच्या सेवेचें फळ म्हणून ते त्याहून अधिक दुर्जन होतील. कोळ-शाच्या संसर्गानें तोंड काळें झाल्याप्रमाणें दुर्जनाच्या संसर्गानें सज्जनांचें होतें. हे सज्जनसुद्धां भ्रष्ट व दुष्ट चारित्र्याचे होतात. स्वतःचें शील व स्वतःच्या जातीचे संस्कार हे विसरतात. त्यांच्यांत दुर्जनांचें अनुकरण वाढूं लागतें. पाण्याचा प्रवाह जसा अधोमुख असतो तसाच मनाचाहि प्रवाह अधोमुख अस-ल्यामुळें अवनत लोकांचे संस्कार फार लवकर लागतात. अधोगतीच प्राप्त होते. सारांश, उन्नत जातींचे उच्च संस्कार हीन जातीच्या निकृष्ट संस्कारानें मलीन होऊं नयेत म्हणूनच स्पृश्यास्पृश्यतेनुसार यथाशास्त्र जीवन व्यतीत करावें अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. राज्यशासनांत चोरांना, गुंडांना, पुंडांना शिक्षा असते त्याप्रमाणें ईश-शासनपद्धतींत आहे. सज्जन ज्याप्रमाणें दुर्जनांना बहिष्कृत कर-तात, त्याप्रमाणेंच परमात्माहि त्यांना बहिष्कृत करतो. परमात्म्याच्या शासनपद्ध-तींत दुराचारी माणसांना शिक्षा भोगण्यासाठींच बहिष्कृत अशा पंचम जातींत जन्म घ्यावा लागतो. अस्पृश्यांतून जन्मणें ही एक शिक्षाच आहे. यावरून **जन्मना जातिः ।** जन्मापासूनच जाती आहेत हें सिद्ध होतें.

चांगलें वाईटांच्या संगतीनें बिघडलें तर नंतर चांगलेंच शिल्लक राहाणार नाहीं. मग बिघडलेल्यांचा उद्धार कोण व कसा करणार ? हीन जातीच्या संपर्कानें उच्च जातीचा ऱ्हास झाल्यास त्यांच्या उद्धाराचा मार्गच खुंटेल. अशा दूरदृष्टीच्या विचारांतूनच स्पृश्यास्पृश्यतेच्या शास्त्रमर्यादेचें रहस्य आहे. हीन जातीच्या सहवासानें उच्च जातीचे संस्कार, वागणूक, सर्व जीवन यांचा नाश होऊन एक आदर्श संस्कृतिच नष्ट होईल. म्हणून पूर्वीच्या राजांनीं प्रजेच्या क्षेमाकरितां वर्णाश्रमाचें परिपालन आपल्या राज्यशासनपद्धतींत तीव्रतेनें ठेविलें होतें. राज्यशासन हें प्रजेच्या अभ्युदय-निःश्रेयसाकरितां असतें. त्याच्या योगानें सर्व दृष्टीनें प्रजेचें हितच साधावयाचें असतें.

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥** — उच्च जातीच्या धर्मकर्मांचें आचरण इतर जातींनीं न ठेवतां स्वधर्मोचित कर्मांचें पालन करणें वैयक्तिक आणि सामुदायिक दृष्टीनें श्रेयस्कर आहे, म्हणून गीतेचें सांगणें आहे.

**आत्मीये संस्थिते धर्मे शूद्रोऽपि स्वर्गमश्नुते ।**
**परधर्मो भवेत्त्याज्यः सुरूपपरदारवत् ॥** ( अत्रि. )

—स्वधर्माच्या अनुष्ठानानें शूद्रालाहि स्वर्गप्राप्ति होते. परधर्म हा कितीहि सुंदर असला तरी तो परस्त्रीप्रमाणें सर्वथा त्याज्य होय. या श्लोकांत उच्च जातीच्या उन्नत सद चारास सुंदर परंतु परस्त्रीची उपमा देऊन ती त्याज्यच होय असें सांगितल आहे. हीन जातीच्या उद्धाराकरितां व उच्च जातीच्या रक्षणाकरितां जातीपरत्वें आचाराचे निर्बंध घातले आहेत; हीन जातीच्या द्वेषाकरितां ते नव्हेत हें लक्षांत घेतलें पाहिजे.

## आर्यांची विशाल दृष्टि

**आत्मवत् सर्वभूतेषु यः पश्यति स पश्यति ।**—आपल्याप्रमाणेंच इतरांचीं सुखदुःख पाहणारा तोच खरा डोळस होय, असें आर्य संस्कृतीचें सांगणें आहे. सर्वांच्या ठिकाणीं त्या त्या देहाला, जातीला, कर्माला सर्वथा असंग असून एक परिपूर्ण परमात्माच सर्वत्र व्यापून आहे असा आर्य संस्कृतीचा सिद्धांत आहे. हीन यातीविषयीं किती विशाल बुद्धि आहे तें पाहा. कशाहि शूद्र मनुष्यांतून व हीन जातींतून आर्यांना परमात्म्याचें दर्शन होतें.

**नमो व्रातेभ्यो व्रातपतिभ्यश्च वो नमः । नमो महद्भ्यः क्षुल्लकेभ्यश्च वो नमः ॥ नमो रथिभ्योऽरथेभ्यश्च वो नमः । नमः पुंजिष्टेभ्यो निषादेभ्यश्च**

**वो नमः ॥ नानायातीयाः संघाः व्रातास्तेषां पतयो व्रातपतयः ।** (रुद्रभाष्य) नाना जातींच्या संघांना 'व्राताः' असें नांव आहे. यांच्या प्रमुखांना 'व्रातपतयः' असें म्हणतात. या सर्वांना व '**पक्षिपुंजानां घातुकाः पुंजिष्ठाः निषादाः श्वपचाः ।**--पारधी, श्वपच (अंत्यज) यांनाहि नमस्कार असो, असा वरील श्रुतिवाक्याचा अर्थ आहे. यावरून आर्यांना क्षुद्र जातींतील परमात्मतत्त्वाचें विस्मरण झालें नाहीं व श्रुतीनेंहि तें होऊं दिलें नाहीं असें स्पष्ट दिसून येतें. सर्वांचेंहि यथार्थ रूप एक परमात्माच या संस्काराचें श्रुतीनें पाजलेलें बाळकडू आर्यांच्या नसानसांतून भिनलेलें आहे.

**शुनां च पतितानां च श्वपचां पापरोगिणाम् ।**
**वायसानां कृमीणां च शनकैर्निर्वपेद्भुवि ॥** (मनु. ३-९२)

वैश्वदेवाच्या शेवटीं काकबली घालण्याचा ब्राह्मणांना एक विधि आहे. त्यांत कुत्र्यांना, पतितांना, अंत्यजांना (अस्पृश्यांना), पाप्यांना, रोग्यांना, कावळ्यांना, कृमीकीटकांना हें अन्न लाभो, अशा संकल्पानें भूमीवर अन्न ठेवावयाचें असतें. हें मनूचें विधान पाहिलें तर हरिजनांना दलितवर्ग म्हणून म्हणतां येईल का? श्रुतिस्मृतींनीं ब्राह्मणांच्या अनुष्ठानांत कडक सोवळ्याबरोबर अंत्यजादिकांनाहि परमात्मबुद्धीनें अन्न घालण्याचें विधान सांगून ठेविलें आहे. ओंवळ्यांत असणाऱ्या ब्राह्मणालाहि न शिवतां सोवळ्यांत वागण्याच्या विधानांत या प्रकारचा विधि ठेवून त्या सर्वव्यापक परमात्म्याची भावना उज्ज्वल अशी जागृत ठेविली आहे. जेवणापूर्वीं असणाऱ्या काकबलीच्या विधानांत अशा प्रकारचें एक अनुष्ठान असलें तरी अंत्यजांना शिवून अथवा अगोदर जेवण घालून मग आपण जेवावें असें कोठेंहि सांगितलें नाहीं. ब्राह्मणेतरांच्या सहपंक्तींत बसून भोजन केलें पाहिजे असें कोठेंहि दिसून येत नाहीं. उलट पुढील वचनें पाहा.

**चांडालपतितोदक्यां स्पृष्ट्वोच्छिष्टोद्विजोत्तमः । प्राजापत्यं चरेत्कृच्छ्रं सुमन्तुवचनं यथा ॥** (अंगिरस स्मृ. २६) **चांडालपतितादीनामुच्छिष्टान्नादिभोजने । द्विजः शुध्येत्पराकेन शूद्रः कृच्छ्रेण शुद्ध्यति ॥ २७ ॥ चांडालान्नं यदा भुंक्ते चातुर्वर्ण्यस्य निष्कृतिः । चांद्रायणं चरेद्विप्रः क्षत्रः सांतपनं चरेत् ॥ १७६ ॥ चांडालेन तु संस्पृष्टं यत्तोयं पिबति द्विजः । कृच्छ्रपादेन शुध्येत आपस्तंबोऽब्रवीन्मुनीः ॥२०६॥ चांडालस्य च संस्पृष्टं विण्मूत्रस्पृष्टमेव वा । त्रिरात्रेण विशुद्धिः स्याद्भुक्तोच्छिष्टं समाचरेत्**

**॥ २२८ ॥ प्रपास्वरण्ये घटकस्य कूपे द्रोण्यां जलं कोशाविनिर्गतं च । श्वपाकचंडालपरिग्रहे तु पीत्वा जलं पंचगव्येन शुद्धिः ॥२३३॥ चांडालं पतितं म्लेंच्छं मद्यभांडं रजस्वलाम् । द्विजः स्पृष्ट्वा न भुंजीत भुंजानो यदि संस्पृशेत् ॥** (अत्रिसंहिता) **चांडालेन यदा स्पृष्ट्वा । विण्मूत्रं च कृते द्विजः । प्रायश्चित्तं त्रिरात्रं स्याद्भुक्तोच्छिष्टः षडाचरेत् ॥** (आपस्तंब स्मृ. ४।६ ) **चांडालः श्वपचो वाऽपि आत्रेयीं स्पृशते यदि । शेषाहात्कालकृष्टेन पंचगव्येन शुद्ध्यति ॥७।१९॥ चरेत्सांतपनं विप्रः प्राजापत्यं तु भूमिपः । तदर्थं तु चरेद्वैश्यः पादं शूद्रस्य दापयेत् ॥४।२॥ भुक्तोच्छिष्टस्त्वनाचांत-श्चांडालैः श्वपचेन वा । प्रमादात्स्पर्शनं गच्छेत्तत्र कुर्याद्विशोधनम् ॥ ३ ॥ गायत्र्यष्टसहस्रं तु द्रुपदं वा शतं जपेत् । जपंस्त्रिरात्रमनश्नन् पंचगव्येन शुद्ध्यति ॥ ४ ॥**

इत्यादि वाक्यांनीं स्पर्शन, भोजन आणि जलपान आदिकांचा सर्वांनींहि एकमतानें निषेध केला आहे. या सर्वांचाहि अंतर्भाव " **पंडिताः समदर्शिनः** " या गीतोक्तींत होत असून, हे सर्वहि परमात्मसाक्षात्कारी असून ज्या अर्थी या अशा सूचना त्यांनीं दिल्या आहेत, त्या अर्थीं यांत समाजाचें मोठें हितच असलें पाहिजे. आचाराचें पालन, उच्च भूमिकेचें रक्षण, उच्च संस्कृतीचें संगोपन हाच यांतील गर्भितार्थ आहे. सर्वांतर्यामी परमात्म्याचें अनुसंधान ठेवूनहि आचारधर्माचें यथाशास्त्र रक्षण करणें हें आर्य संस्कृतीचें एक वैशिष्ट्य होय.

## पूर्वसंस्कार व संसर्गदोष

प्रत्येक जातीजातींत उत्पन्न झालेली व्यक्ति, त्याचप्रमाणें प्रत्येक व्यक्तीचा देह, हा स्वतःचें वैशिष्ट्य म्हणजेच त्या त्या व्यक्तीच्या पूर्वजन्माचे संस्कार आणि कांहीं प्रमाणांत या जन्मींचे संस्कारहि पण दाखवितो. कुंभाराच्या कल्पेनेपासून जशीं भिन्न भिन्न आकाराचीं मृण्मय पात्रें होतात, ज्याप्रमाणें भिन्न भिन्न बियांचे मोड त्यांच्या त्यांच्या गुणधर्मांतील वैशिष्ट्य दर्शविणारे असतात; तद्वतच अनेकविध जातींत उत्पन्न झालेले मानवदेह, त्या त्या जातींतील नीचोच्च संस्कारांची भावना व्यक्त करणारे असतात. वायु हा जसा गंधवाह आहे तसाच तो संस्काररूपी परमाणूंना पण वाहणारा आहे. त्यामुळें घाणीवरून येणाऱ्या वाऱ्यांत दुर्गंध व सुगंधी पदार्थांवरून येणाऱ्या

वाऱ्यांत सुवास ( परिमळ ) ज्याप्रमाणें भरलेला असतो, त्याचप्रमाणें भिन्न भिन्न जातींत जन्म पावलेल्या व्यक्तींना स्पर्शून ( अथवा त्या देहावरून ) आलेल्या वायूंतहि त्या त्या विविध जातींतील देहाचे उच्चनीच संस्कार ओतप्रोत भरलेले असतात. म्हणूनच एखाद्या व्यक्तीच्या सहवासानें वा स्पर्शानें त्या व्यक्तीचे उच्चनीच संस्कार आपल्या मनांत इष्टानिष्ट भावना निर्माण केल्याखेरीज राहात नाहींत. जसें त्या त्या पदार्थांच्या स्पर्शानें मृदु, कठीण भावांची संवेदना उत्पन्न होऊन, मनावर त्याचा इष्टानिष्ट परिणाम होतो, तो तो पदार्थ आपला सुगंध, दुर्गंध स्पर्श करणाऱ्याला लावतो त्याप्रमाणें ती ती व्यक्ति आपले चांगले व वाईट संस्कार त्याला स्पर्शणाऱ्या व्यक्तीला लावते. या दृष्टीनें पूर्वजन्मकर्मामुळें हीन जातींत जन्मलेल्या लोकांच्या सहवासांत असूं नये व त्यांना स्पर्श करूं नये असें शास्त्रांत सांगितलें आहे. इतर प्रसंगींहि या नियमांचें पालन करणें आवश्यक आहे. असें असतां पवित्र मनानें अनुष्ठान करण्याचे वेळीं, भोजनकाळीं तर तें किती आवश्यक आहे याचा विचार केला पाहिजे.

## आहारशुद्धि

**अन्नमयं हि सौम्य मनः ।** —अन्नाच्या पवित्रापवित्रतेप्रमाणें मनहि पवित्रापवित्र होत असतें. भोजनसमयीं असलेला मानासिक संस्कारच, खाल्लेल्या अन्नांत मिसळून मनाचा स्वभाव उत्पन्न करीत असतो. या दृष्टीनें भोजनसमयीं दुष्ट लोकांच्या पंक्तींत बसूं नये, हीन जातींतल्या लोकांना डोळ्यांनींहि पाहूं नये, त्यांचा शब्दसुद्धां त्या वेळीं ऐकूं नये. भोजनाचे पदार्थहि चांगल्या लोकांकडून तयार करवून घेऊन नैवेद्य, वैश्वदेव इत्यादिकांनीं ते सुसंस्कृत करावेत असे निर्बंध घातले आहेत. **आहारशुध्द्या सत्वशुद्धिः ।** —आहारशुद्धीनें चित्तशुद्धि होते. अन्न शुद्ध असून पाकसिद्धिहि चांगल्या लोकांकडून झाली आहे व पंक्तींत आपल्या दर्शनानें चांगली भावना निर्माण करणारी उच्च जातीची आदर्श मंडळी आहेत, मन परमात्म्याच्या उच्च विचारांत आहे, असें झाल्यास त्या ग्रहण केलेल्या आहारानें मन शुद्ध होतें, शांत होतें. तें अन्न चांगल्या कर्मांची प्रेरणा करतें, परमात्म्याच्या साधनाला अनुकूल होतें. व्यवहारांतहि परहितसाधक व शास्त्रशुद्ध कर्म करण्याची सद्वृत्ति त्यापासून निर्माण होते. या दृष्टीनें भोजनसमयाचें महत्त्वहि फार आहे. भोजनसमयींच्या संस्कारानेंच मन घडविलें जातें. त्यामुळेंच जेवणापूर्वी स्नानसंध्या

जप, होम, देवपूजा, वैश्वदेव इ० करण्याचें विधान आहे. **अधिकस्याधिकं फलम् ।** असें कोण मानणार नाहीं ? अशा रीतीनें वागलें असतां कोणता समाज आदरणीय, आदर्श उन्नत व दिव्य होणार नाहीं ? या विचारानें अंत्यजांदिकांशीं सहभोजन उच्चवर्णीयांना किती उपकारक होऊं शकेल याचा विचार करण्याची जबाबदारी प्रत्येकावर आहे.

## धर्मांतराचीं कारणें

म्हैसूर प्रांतांतील चिकमंगळूरच्या जवळ असणाऱ्या एका कॉफीच्या मळ्यांत मी कांहीं दिवस होतों. या ठिकाणीं मंगळूरकडचे पुष्कळ हरिजन कामाकरितां आले होते. मी तेथें जाण्यापूर्वीं यांना भूतपिशाच्चादिकांची बाधा फार होत होती. मी गेल्यानंतर ती आपोआपच कमी झाली. श्रीस्वामींच्या आगमनानें असें झालें म्हणून एक दिवस सर्वजण दर्शनास आले. त्यांच्या ठिकाणीं मोठीच श्रद्धाभक्ति दिसून येत होती. ते सर्व धर्मांतरित झाल्याची हकीगत त्यांच्याच तोंडून मला समजली. ती अशी : एक दिवस एक पाद्री येऊन, "तुम्ही आमच्या चर्चमध्यें एक दिवस येऊन 'ख्रिश्चन झालों' म्हणून म्हणालांत तर तुम्हां प्रत्येकाला दोन दोन रुपये देऊं" असें म्हणाला. फुकट दोन रुपये मिळतात या भावनेनें आम्ही त्याप्रमाणें केलें. आमचे गळ्यांतून क्रॉस अडकविला गेला, असें तें म्हणाले. या उदाहरणावरून त्यांच्या ठिकाणीं असणारा द्रव्याचा अभाव, स्वधर्माभिमानशून्यता, धर्मांतरकल्पनाराहित्य हींच कारणें या धर्मांतराच्या बाबतींत मुख्यतः आढळून येतील. यावरून धर्मांतर करविणाऱ्या पाद्र्यांचे त्याकरितां कसे प्रयत्न असतात हेंहि दिसून येईल.

## क्षेमकर राज्यपद्धति

हीं सर्व कारणें नाहींशीं केल्याशिवाय मंदिरप्रवेशानें, सहभोजनानें, धर्मांतरित होणाऱ्या लोकांची संख्या थांबविण्याचे कितीहि प्रयत्न केले तरी कांहीं उपयोग होणार नाहीं. सरकारनें त्यांच्या सुखकर जीवनाची योग्य व्यवस्था करून देऊन त्यांच्या ठिकाणीं धर्माची जाज्वल्य भावना उत्पन्न करून दिली व **स्वधर्मे निधनं श्रेयः ।** असें दृढ केलें तर धर्मांतराचा प्रश्नहि सुटेल व त्यांचा उद्धारहि होईल. सर्वत्र आपले धर्मप्रचारक नेमून अशा तऱ्हेचीं केवळ वंचनात्मक कृत्यें थांबविलीं तर पाद्र्यांना आणि हरिजनांनाहि सत्यधर्माचें एक

मार्गदर्शन होईल. धर्मप्राण असणाऱ्या या भारत देशांत धर्मविरुद्ध कायद्यांनीं कोणताहि लाभ होणार नाहीं; उलट जनक्षोभास आणि इहपर दुर्गतीस तें कारण होईल. रामराज्याच्या न्यायी आणि जबाबदार राज्यपद्धतींत ज्यांच्या त्यांच्या धर्मांप्रमाणें वागण्यास अवकाश देऊन भिन्न मतप्रचार कायद्यानें बंद केला, हिन्दु धर्माविरुद्धच ' हिंदु कोड ' इत्यादि अप्रासंगिक अनुपयोगी कायदे करण्याच्या भानगडींत सरकार न पडलें, अर्थोत्पादनाचीं नवीन नवीन साधनें निर्माण करून सर्वसमबुद्धीनें निरुद्योग समस्येचें निराकरण केलें, तर रामराज्याच्या नांवाप्रमाणें आणि घोषणेप्रमाणें सर्वांनाहि तें युक्त ठरेल. जनतेंत शांतिसमाधानाहि निर्माण होईल. विश्वबांधव्याचें साम्राज्य पसरेल. एक आदर्श राज्यपद्धति होईल. **अव्यापारेषु व्यापारः** । थांबेल. जनतेंत विनाकारण निर्माण झालेला क्षोभ नाहींसा होईल.

एकच जात होण्यानें, सहभोजन करण्यानें संघटन होतें असें झाल्यास पाश्चात्य राष्ट्रांत कोर्टकचेऱ्या राहिल्या नसत्या आणि युद्धेंहि पण झालीं नसतीं. विवाहविच्छेद, घटस्फोट, सगोत्र विवाह, विवर्ण विवाह, आंतर्जातिय विवाह इत्यादिकांनीं शांति प्रस्थापित झाली असती तर पाश्चिमात्यांनीं भारताच्या कौटुंबिक जीवनाची प्रशंसा केली नसती; भारतांत जन्म पावलेल्या संस्कृतीचा अभ्यास करून आपल्या देशांतहि त्याचा प्रचार केला नसता. भारताच्या शांतीला, सुव्यवस्थेला, आदरणीय राज्यपद्धतीला धर्माच्या बाबतींत हात घालणें प्रासंगिक व उपयुक्तहि होणार नाहीं. स्व स्व मतप्रचाराचे कुहक उपाय थांबवून धर्माप्रमाणें ज्यांना त्यांना सवड (स्वातंत्र्य) देणें हेंच राष्ट्राच्या शांततेला अनुकूल होईल. हेंच प्रजेच्या शांतिसमाधानाचें कारण होईल. हेंच प्रजेच्या हितदृष्टीनें राज्यसूत्रें चालविणाऱ्या धुरीणांचें कर्तव्य होईल.

**राज्ञो हि परमो धर्मः स्वधर्मस्थानुपालनम् ।**
**शासतोऽन्यान् यथाशास्त्रमनापद्युत्पथानिह ।।** (भागवत १।१७।१६)

—स्व स्व धर्माप्रमाणें राहणाऱ्याचें रक्षण करणें, आपत्काल नसतां वर्णाश्रमधर्म सोडून यथाशास्त्र न चालणाऱ्यांना दंड करणें हें राज्यसूत्रधारी लोकांचें मुख्य कर्तव्य होय असें भागवतांत सांगितलें आहे.

## हरिजनोद्धाराचा अर्थ

हरिजनांचा उद्धार म्हणजे पतितांचा उद्धार करणें, हें आर्यांच्या

स्वभावांतील एक वैशिष्ट्यच होय. पतितोद्धाराची उत्कंठा बाळगणारे तेच आर्य होत. **विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि। शुनिस्ति चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥** (गीता ५।१८) समत्व हेंच आर्यांचें ब्रीदवाक्य आहे. **नमोश्वभ्यः श्वपतिभ्यः ।** (तै. रुद्र.) असा आर्यांना झालेला परमात्म-स्वरूपाचा साक्षात्कार आहे. सर्वगत परमात्मस्वरूपाच्या निदर्शनानें ते श्वानाला व श्वपचालाहि नमस्कार करतात. अस्पृश्योद्धार करूं नये असें कोणीहि म्हणत नाहीं. विहिरींत पडलेल्याच्या करुणेनें योग्य मार्गानें त्याला काढावयाचें टाकून तोहि त्याच्या बरोबर विहिरींत पडला तर एकाच पातळींतल्या माणसांना परस्परांना कसें काढतां येईल? पण स्वतःच जे विहिरींत पडून गटंगळ्या खात आहेत, त्यांच्याकडून विहिरींतल्यांचा उद्धार कसा होणार? आपण वरच्या पायरीवर राहून खालीं पडलेल्याला वर काढलें पाहिजे ना? उद्धार करणें म्हणजे उन्नत प्रदेशांतल्या अथवा भूमिकेंतल्या लोकांनीं अवनत प्रदेशांतल्या अथवा भूमिकेंतल्या लोकांना आपल्याकडे वर आणावयाचें असतें; आपणच त्यांच्या बरोबर खालीं घसरावयाचें नसतें अथवा त्यांच्या बरोबर त्यांच्या समपातळींत वागावयाचें नसतें. **न संवसेच्च पतितैर्न चांडालैर्न पुल्कसैः । न मूर्खैर्नावलिप्तैश्च नान्त्यैर्नान्त्यावसायिभिः ॥** (मनु. ४–७९) पतितादिकांबरोबर राहूं नये या मनूच्या सांगण्याचें तात्पर्य असेंच आहे हें कोण बरें मान्य करणार नाहीं? **रमणीयचरणाः रमणीयां योनिमापद्येरन् ब्राह्मणयोनिं वा क्षत्रिययोनिं वा वैश्ययोनिं वा कपूय-चरणाः कपूयां योनिमापद्येरन् श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चांडालयोनिं वा ॥** (छां. ५–१०–७) पुण्यवंतांना आपआपल्या पुण्याच्या न्यूनाधिक्या-प्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य योनीची प्राप्ति होते. पापी आपल्या पापाच्या तारतम्याप्रमाणें श्वान, सूकर, चांडालादि योनींत जन्म घेतात, असें छांदोग्य उपनिषदांत सांगितलें आहे.

पापी आणि पतित मलीन असतो. कोळशाच्या स्पर्शानें काळिमा लागतोच, हात काळे होतातच. दुर्गंधी पदार्थाच्या स्पर्शानें व सहवासानें दुसऱ्यालाहि तो दुर्गंध लागतो. सहवासांत असणाऱ्याला त्या पदार्थांचे गुणधर्म जडतात. स्पर्शजन्य रोगाप्रमाणें पतित लोकांचा सहवास क्रमशः पातित्य उत्पन्न करतो. अशा रोग्यांना दवाखान्यांत ठेवून त्यांचा रोग स्वतःस न लावून घेतां त्यांना निरोगी करण्यासाठीं वैद्य ज्याप्रमाणें दक्षतापूर्वक प्रयत्न करतात

त्याप्रमाणेंच अशा पतितांच्या बाबतींत झटावें लागतें. अशांच्याकरितां स्वतंत्र जागेची व्यवस्था करून द्यावी लागते. **चाण्डालश्वपचानां तु बहिर्ग्रामात्प्रतिश्रयः ।** ( मनु. ) उच्च संस्काराच्या माणसांत त्यांना ठेवतां येत नाहीं. त्यांना दुसऱ्याच एकाद्या चांगल्या ठिकाणीं ठेवावें लागतें; अनुष्ठानांच्या ठिकाणीं, मंदिराच्या ठिकाणीं, घरच्या ठिकाणीं घेतां येत नाहीं. त्यांच्या सहवासानें इतर बिघडण्याचा संभव असतो. स्वतः त्यांच्याप्रमाणें न बनतां त्यांच्या सेवेनें आपल्याविषयीं त्यांना असणारा आदर व स्वतःचें श्रेष्ठत्व न गमावतां त्यांना आदर्शभूत अशा उन्नत जीवनाची मर्यादा मोठ्या दीर्घ विचारानें आंखून देऊन वर राहूनच त्यांचा उद्धार करावा असा सनातन वैदिक धर्माचा उपदेश आहे व असा हा आर्य धर्माचा शिष्टाचार आहे. इहपर सुखाला व स्वपर उद्धाराला कारण असणारा आर्य संस्कृतीचा हा एक गंभीर आदेश आहे. यांत दूरदृष्टी आहे, पोक्त विचार आहे, परिणामाची कल्पना आहे.

**रुद्रस्य वाऽथ विष्णोर्वा प्राकाराभ्यन्तरे यदि ।**
**रजस्वला वधू चैव चाण्डालश्च समागतः ॥**
**तद्देवस्य कलाहानी राज्ञो मरणमेव च ।**
**तद्ग्रामस्य क्षयः प्रोक्तो सस्यानां नाशनं ध्रुवम् ॥**

—विष्णु, रुद्र आदि देवतांच्या मंदिरांतील प्राकारांतसुद्धां जर रजस्वला, अस्पृश्य इत्यादि गेले तर त्या देवतेची कलाहानी, राजाचें मरण, त्या ग्रामाचा नाश व पिकांची हानि होते हें निश्चित, असा या श्लोकांचा अर्थ. हा श्लोक वाचल्याबरोबर या बाबतींतलें सर्व कांहीं पटतें व कोणास ठाऊक न जाणो या भावना उद्दीपित होऊन गांधींची आठवण होते व हळहळ वाटते. **अंत्यजाद्या देवगृहं प्रविशेयुस्तदा ध्रुवम् । देवतानां कलानाशो दुर्भिक्षादिकमेव च ॥ रोगबाधादिकं वापि भक्तानामुपजायते॥** (रुद्रयामल.) अंत्यजादि जेव्हां देवालयांत प्रवेश करतात तेव्हां देवतांचा कलानाश होतो, दुष्काळ पडतो, रोगांच्या सांथी येतात, अनेक दुःखें आकस्मिकपणें भक्तावर आदळतात. देवळांत देव आहे हें ज्या शास्त्रानें सांगितलें जातें, त्या शास्त्रानें हरिजनप्रवेशाविरुद्ध घालून दिलेले नियम आम्हीं नाहीं पाळले तर तें शास्त्रच आम्हांला मान्य नाहीं असें म्हटल्यासारखें होतें. शास्त्रच अमान्य झालें तर त्याच्या सर्व आज्ञाहि अमान्य होतील. कांहीं आज्ञा मान्य

व कांहीं अमान्य असें म्हणतां येत नाहीं. अमान्य असणाऱ्या आज्ञा खोट्या, असार व अहिताच्या आहेत म्हणून आम्ही मान्य करीत नाहीं असें म्हटल्यास खोटें बोलणें, असार विधि सांगणें व अनाहिताचा उपदेश करणें, हा त्या शास्त्राचा स्वभाव होतो व शास्त्राला अमान्यता येते. शास्त्राला अमान्यता आली कीं त्याच्या कोणत्याच आज्ञा पाळण्याजोग्या ठरत नाहींत आणि त्याच्या विधानांवर व सिद्धांतावर विश्वास ठेवतां येत नाहीं.

अंत्यज, पतित, म्लेंच्छ, रजस्वला हीं जर देवालयांत गेलीं तर देवाची कला नष्ट होते. दुष्ट शक्तींची उत्पत्ति व वास त्या ठिकाणीं घडतो व त्यायोगें त्या गांवास, त्या भक्तांस व त्या अनुषंगानें सबंध राष्ट्रास व प्रजेस दुष्काळ, रोगबाधा, भूतबाधा, अधर्मप्रवृत्ति, अनीति–आचरण, अशांति, बरकत नसणें, कलह, परस्परविद्वेष आदि हीं सर्व बाधतात असें आगम वैदिक शास्त्राचें मत आहे. मूर्तिपूजेचा अंगीकार केल्यानंतर मूर्तिपूजेच्या नियमांचा, तेथील देवस्थानाच्या नियमांचा, मूर्तिपूजेच्या विधानांचा, उपदेश करणाऱ्या आगम शास्त्राचा गौरव राखणें, त्याच्या आज्ञा पाळणें आवश्यक असतें व आपलें तें कर्तव्यच ठरतें.

हें जर अमान्य झालें तर त्या शास्त्राचें सर्व सांगणें घातुक होणाऱ्या अमान्य मतांचा प्रचार करणारें वंचनात्मक शास्त्र या सदराखालीं येऊन अमान्यच व्हावयाला पाहिजे. या दृष्टीनें पाषाणमूर्तींत देवत्व विशेष विधीनें ( वैदिक मंत्रांनीं ) आणतां येतें व तें येतेंहि हेंहि खोटें होऊन, अविश्वसनीय होऊन, अनहिताचें होऊन अशांना तिथे देवच नसल्यामुळें न जाणेंच उचित होतें. देवाची भावना नसतांना ते कां जातात व दुसऱ्यालाहि ते कां घेऊन जातात हा प्रश्न पडतो. स्वतःला देव तिथे नाहीं असें निश्चित ( वाटत ) असतांना देव आहे या भावनेनें अनुष्ठान करणाऱ्यांना केवळ त्रास देण्याच्या उद्देशानेंच आम्ही जातों असा कबुलीजबाब त्यांना या बाबतींत द्यावा लागेल. असें झालें तर हरिजनप्रवेश करविण्याऐवजीं प्रजारक्षण–कर्तव्याच्या दृष्टीनें प्रवेश करणाऱ्यांना कायद्यानें बंदी करण्याची जबाबदारी सरकारवर येऊन पडते.

देव हा सर्वत्र आहे. देव हा सर्वांचा आहे. देवाला सर्वहि सारखेंच. असें असतांना शूद्राशिवाय ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांनीं तेवढें देवळांत जावें व हरिजनांनीं जाऊं नये असें कसें होईल ? सर्वहि त्याचीं लेंकरें असतांना हरि-जनांनीं येऊं नये असें त्या जगज्जनक परमात्म्याला वाटेल काय ? असा बहुतेक सर्वांकडूनच अलीकडच्या काळांत आक्षेप घेतला जातो. हें तत्त्व आगम

शास्त्राला माहीत नसेल का ? ज्यांनीं म्हणून आम्हांला देवाचा असा परिचय करून दिला त्या ऋषिमुनींचेंच हें सांगणें आहे का नाहीं ? यांत काय इंगित आहे याचा शोध करावयाला नको का ? मूर्ति स्थापण्यांत ईश्वराच्या व्यापकत्वाचा निश्चय व्हावा असा अंतिम उद्देश असूं शकेल, पण प्रारंभींच तो असतो असें म्हणतां येत नाहीं. या देवाच्या व्यापकत्वाच्या भावना प्रारंभींच असल्यास अशा कोणत्याहि मनुष्यानें असे नियम घातले नसते व ज्या शास्त्रानें ते नियम घातले जातात त्या शास्त्राची दृष्टिहि तशी असती तर हा हरिजनप्रवेशाचा विवाद उत्पन्न झालाच नसता. देव हा सर्वत्र आहे, असा ज्याला निश्चय झाला तो कोणत्याहि मूर्तीची स्थापना करीलच कशाला ! देव सर्वत्र आहे असा निश्चय असणारा देवळांत देवाच्या दर्शनाला जाईलच कशाला ? एखाद्या वेळीं त्याच्याकरितां ती स्थापना नसून तितकी सिद्धता नसलेल्याकरितांच त्यांनीं मूर्तीची स्थापना केली असें म्हटलें तर अर्थात अशाकरितांच स्थापित झालेल्या देवळांत देवतांच्या व्यापकत्वाच्या दृष्टीनें झगडतां येत नाहीं; आणि दर्शनाला नेणाऱ्याला व जाणाऱ्यालाहि तसा अधिकार पोहोंचत नाहीं. व्यापक भावना असती तर तेहि तिथे जाते ना. विशिष्ट देशांत व विशिष्ट मूर्तीत देवत्व आहे हीच भावना मूर्ति-आराधनेंत आहे. देव हा सर्वांचा आहे व देवाला सर्व सारखें अशी भावना मुळांत असती तर आजची ही अशी वेळ आलीच नसती. स्थापकाच्या हेतूप्रमाणें, ज्यांच्या-करितां मूर्ति स्थापित झाली त्यांच्या उन्नतीकरितां व ज्या शास्त्राच्या आधारें स्थापित झाली त्या शास्त्राच्या सिद्धांताप्रमाणें आचरण बाळगण्याकरितां हरि-जनांनीं मंदिरप्रवेश न करणें हेंच श्रेयस्कर होतें.

कितीहि प्रेम असलें तरी ओंवळ्या मुलाला, अनुष्ठान करण्याच्या आसनावर कोणी तरी बसवील का ? देव्हाऱ्याला शिवूं देईल का ? स्नान न केलेल्या लोकांना, सोंवळ्यांत असणारे लोक, मग तीं एकाच आईचीं मुलें असोत वा सतीपति असोत किंवा पितापुत्र असोत, शिवून घेत नाहींत. सोंवळ्यांत असणाऱ्या वस्त्रालासुद्धां ओंवळ्यानें कोणी शिवत नाहीं यावरून आचारधर्म किती सूक्ष्म आहे हें स्पष्ट होतें; व याच्या विचारानें अस्पृश्यांना दूर ठेवल्याचा आक्षेपहि दूर होतो. आपण खालीं न पडतां खालीं पडलेल्यांना उचलणें हाच हरिजनांच्या अस्पृश्यतेंतला सद्‌‌उद्देश होय.

सहभोजनाच्या योगानें प्रेम वृद्धिंगत होतें असें म्हटल्यास बंधुबंधूंचीं

भांडणें कां होतात याला उत्तर काय ? अस्पृश्योद्धारानें परधर्मांत जाण्याचें बंद झालें असतें तर अस्पृश्य-भावनाच नसलेले पाश्चात्य लोक परस्परांत कां भांडले असते ? हरिजनांच्या ठिकाणीं आजहि जर धर्मभावना असती तर त्यांनीं आजहि मंदिरप्रवेश केला नसता, परधर्म स्वीकारला नसता. तसा धर्माभिमान असलेले अजूनहि मंदिरप्रवेश करीत नाहींत वा परधर्महि स्वीकारीत नाहींत. धर्मांतराला व मंदिरप्रवेशाला धर्मशिक्षणाचा व धर्माभिमानाचा अभावच एक कारण आहे हें कोण नाकबूल करील ? स्वधर्माच्या शिक्षणानें, स्वधर्माभिमानाच्या जागृतीनें, त्यांच्या सुरळीत जीवनोपायाच्या सुव्यवस्थेनें, प्रेमाच्या आचरणानें परधर्माचा स्वीकार करणाऱ्या लोकांची संख्या कमी होईल; एरवीं आजकालच्या कोणत्याहि उपायांनीं हरिजनोद्धार होणार नाहीं, असें विचारवंतास कळून येईल. अयोग्य लोकांस अधिकार दिल्यानें त्या अधिकाराच्या जोरावर बाकीच्यांनाहि आपल्याकडे ओढण्याची ते खटपट करतात, पुंड होतात. त्यांच्यापासून त्यांची व समाजाची अवनतीच होऊं लागते. त्याकरितांच ती ती वस्तु यथास्थान असली तरच क्षेमकर होते. पाय पायाच्या ठिकाणींच, मांड्या मांड्यांच्या ठिकाणींच, बाहु बाहूंच्या ठिकाणींच व मुख मुखाच्या ठिकाणींच असावें लागतें.

त्या त्या जातींत त्या त्या जातींचा आनुवंशिक संस्कार त्यांच्या त्यांच्या रक्तांतून भिनलेला असतो. तो घालविणें जवळ जवळ अशक्य आहे. कष्टानें शक्य झालें तरी तें घातुकच. त्याचा कांहीं उपयोग न होतां विनाकारण सर्व दृष्टीनें हानिकारक कर्में करून व्यर्थ समाजशत्रु कां व्हावें ? ब्राह्मणादि वर्णांना त्या त्या वर्णाश्रमधर्मांत ठेवून त्यांच्या त्यांच्या आनुवंशिक रक्तांत भिनलेल्या अपरिहार्य संस्काराचा लाभ राष्ट्राला साहजिकपणें अल्प कालांत आणि अल्प द्रव्यांत आवश्यक होत असला तर तो करून राष्ट्राचें हित कां साधूं नये ? वैदिकोक्त व आगमोक्त पद्धतीनें चालणाऱ्या मंदिरांत बलात्कारानें प्रवेश करविण्यापेक्षां त्यांना एक स्वतंत्र मंदिर बांधून देऊन, त्यांच्यांत पावित्र्य निर्माण करून, भक्ति उत्पन्न करून, नीतीची दृष्टि वाढवून, धर्म बाणवून देऊन त्यांचा उद्धार व समाजाचा लाभ होत असेल तर तदनुसार व्यवस्था कां करूं नये ? एक दिवस नुसता मंदिरप्रवेश करवून त्यांना तसेंच सोडून देण्यापेक्षां त्यांच्या अडीअडचणी व सुखदु:खें जाणून त्यांना इहपर सुखी व पवित्र जीवनाचा लाभ होईल या दिशेनें उक्त प्रयत्न करणेंच योग्य नाहीं का ठरणार ?

ब्राह्मणवर्ग आदर्श स्थितींत असला म्हणजे इतर वर्णीय देखील व्यवस्थित असतात. **ब्राह्मणं तु स्वधर्मस्थं दृष्ट्वा बिभ्यति चेतरे । स्वधर्मं चानुतिष्ठन्ति कृत्यं सर्वे च कुर्वते ॥** ( शुक्रनीति ) —स्वधर्मपरायण ब्राह्मणांना पाहून इतरांना भीति वाटते, सर्वेहि स्वधर्माचें परिपालन करतात व सत्कृत्यांत असतात. **ब्राह्मणेषु प्रमूढेषु धर्मो विप्रणशेध्द्रुवम् । धर्मप्रणाशे भूतानामभावः स्यादसंशयः ॥** ( महाभारत ) —धर्मोपदेशक ब्राह्मणच मूढ असतील तर खात्रीनें धर्माचा नाश होतो. धर्मनाशानें सर्व भूतांचा नाश होतो. ब्राह्मण धर्मप्रचारक असावेत, धर्मनिर्देशक असावेत, स्वधर्मबोधक असावेत, तपोधन असावेत, ज्ञानविज्ञानसंपन्न असावेत, राजकारणधुरंधर असावेत, रागद्वेषरहित असावेत व धर्मशास्त्रानुसार आचरण करणारे असावेत. असे ते असले तरच धर्माचें रक्षण होतें. धर्मरक्षणाला जशी ब्राह्म तशीच निर्दुष्ट क्षात्रशक्ति आवश्यक असते.

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥** ( भ. गीता अ. १८ )

—तपोबलानें युक्त असणाऱ्या ब्राह्मणांच्या पाठीशीं लौकिक सामर्थ्यांनीं युक्त असणारी राजसत्ताहि उभी राहिल्यास त्या राष्ट्रीय जीवनांत लक्ष्मीचा वास अखंड होतो. सर्व ऐश्वर्य व यश त्यांना प्राप्त होतें. नीतिहि तेथें शाश्वत राहाते.

### हें भाग्य अखिल विश्वलोकांना लाभो

**आनंदाध्द्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ।**
**आनंदेन जातानि जीवन्ति आनंदं प्रयन्त्यभिसंविशन्ति ॥** (तै. उ.)

—वैदिक आर्य संस्कृतीचें हें तात्त्विक वाक्य आहे. या स्थिरचर रूपाचें अखिल विश्व एका आनंदांतूनच निर्माण होऊन, आनंदरूपामुळेंच प्रतिष्ठित असून आपल्या आनंदाचाच अनुभव घेत सुखानें नांदत आहे; या अद्वितीय आनंदानेंच आपलें प्रगतिपर जीवन सुखासंतोषानें चालवीत आहे.

जगाच्या नामरूपादि उपाधींच्या त्यागरूप व्यतिरेकानें म्हणजे सोन्याच्या दागिन्यांच्या आकाराकडे दृष्टि न देतां एका सुवर्णाच्या दृष्टीनें सोन्याच्या दागिन्यांत सोनेंच भरल्याप्रमाणें या सर्व नामरूपात्मक उपाधींतून एक सच्चिदानंद रूपच अंतर्बाह्य भरलें आहे असें समजणें अर्थात ब्रह्मदृष्टीनें असणें होय. असा निश्चय करणें म्हणजे अन्वयाचा अभ्यास होय.

हें जग अद्वितीय निरवधि आनंदांतच विरून आहे. परमात्मप्रणीत वेद पुढें ठेवून, आपल्या हृदयाचा अनुभव उकलून दाखवीत विश्वांतील सर्व लोकांना त्यांच्या खऱ्या अभ्युदय-निःश्रेयसाचा मार्ग दर्शवीत उदयमान असणारी आर्य संस्कृति आपल्या दिव्य तेजानें अखिल जगांत विराजमान आहे. 'वैदिक धर्मच विश्वधर्म' ( असा ) कानाकोपऱ्यांतून ध्वनि उमटत आहे.

ही आर्य संस्कृति वैदिक धर्माचें सलक्षण श्रेष्ठत्व सर्वांनाहि सप्रमाण पटवून देत आपलें विश्वकल्याणाचें उदात्त ध्येय, उदार हृदय उकलून दाखवीत, आपला विश्वात्मभावाचा स्वभाव प्रगटवीत अखिल जगाचें जीवन म्हणून सर्वांच्या हृदयसिंहासनावर विराजमान आहे. **यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमा । भूमैव सुखम् ॥** (छांदोग्य उ.) —ज्या ठिकाणीं दुसरें म्हणून कांहीं पाहण्यास, ऐकण्यास, जाणण्यास नाहीं तें अद्वितीय आनंद-रूपच हें जग आहे म्हणून ती कळवीत आहे. **सच्चिदानंदस्वरूपं ज्ञात्वा आनंदरूपा या स्थितिः सैव सुखम् ॥** ( निरालंब उ. ) —आपलें सच्चिदानंद स्वरूप जाणून या निरवधि आनंदस्थितीनें असणेंच एक खरें सुख होय.

विश्वधर्माच्या उपदेशाचें या आर्य संस्कृतीच्या सदुपदेशानें हें निरवधि भाग्य अखिल विश्वलोकांना लाभो !

**स्वस्ति वः पराय तमसः परस्तात् ।**
**सर्वे च सुखिनः सन्तु ।**
**सर्वे सन्तु निरामयाः ।**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु**
**मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥**

**शुभं भवतु ।**
**इति शिवम् ।**